मानस गूढार्थ चंद्रिका

# अयोध्याकाण्ड

## खंड १

लेखक

श्री.प.प.ब्र स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती





॥ श्री सद्गुरवे नमः ॥

॥ श्री राम समर्थ ॥



# ✻ विनम्र आवाहन ✻

श्रीरामकृपेने महाराष्ट्रीय संतांच्या मंदियाळीतील आधुनिक 20व्या शतकातील संत परमपूज्य प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी यांचे स्मारकरूपाने श्रीराम - मंदिर ''श्रीराम विश्रामधाम'' या नांवाने परांडा येथे विद्यमान आहे. या मंदिरातील श्रीराम - सीता सिंहासनाधिष्ठित, चरण स्पर्शित हनुमान, व लक्ष्मण या मूर्तींची प्रतिष्ठापना राष्ट्रसंत पू. मुरारी बापूंचे शुभहस्ते 2003 मध्ये झाली आहे तर भरत, शत्रुघ्न व नंदिसह शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा पू. आचार्य किशोरजी व्यास (प. पू. गोविंद देवगिरी स्वामी) यांचे शुभ हस्ते झाली आहे. तसेच या मंदिरात गणेश, दास-मारूती, माखनचोर याही मूर्ती असून या संगमरवरी मंदिरात श्रीरामचरितमानसातील मंगलाचरणे, दोहे चौपायाही कोरलेल्या आहेत. कारण श्रीरामचरितमानसावरच प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींनी आपले समग्र जीवन समर्पित केलेले होते. हे अति सुंदर मंदिर आपण एकदा तरी आवर्जून पहावेच पहावे असे आहे कारण 'संपूर्ण राम दरबार' फारच क्वचित आढळतो तो पाहिल्याने खऱ्या अर्थी मनास ''विश्राम'' मिळतो.

ह्या मंदिरात भोजनशाळा व भक्तनिवासाचे बांधकाम लवकरच सुरू करीत आहोत. तरी यासाठी आपणासारख्या उदार दात्यांकडून सढळ हाताने आर्थिक देणग्यांची अपेक्षा आहे. देणग्यांसाठी 80G आयकर सवलत उपलब्ध आहे. तरी आपण आपले चेक, डी. डी. वा मनी ऑर्डर्स ''श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ'' या नावाने खालील पत्त्यांवर पाठवाव्यात ही विनंतीवजा कळकळीची प्रार्थना.

(१) **सौ. रेखा नी. पटवर्धन,**
अक्षय रेस्टॉरंट समोर, 'पटवर्धन' बंगला, मिरज. जि. सांगली - 416410.
फोन : (0233) 2221083

(२) **सौ. राजश्री भा. दिवाकर,**
'मल्हार' बंगला समर्थ नगर, मु. पो. उस्मानाबाद (धाराशिव)- 413501
फोन : (02472) 224989

## विशेष सूचना -

सदर श्रीराम मंदिर व प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींची समाधी (त्याच वास्तूत प. पू. हंसराज स्वामी व प. पू अनंतदास रामदासी यांच्या समाधी) ''हंसराज मठ'' या एकाच वास्तूत आहेत. ही दोन्ही स्थाने पंढरपूर जवळील कुर्डुवाडी पासून 20-22 कि. मी. वरील परांडा बस स्थानकापासून चालत केवळ 5 मिनीटांचे अंतरावर आहेत प. पू. तेजोमयानंद स्वामीजी प. पू. शंकराचार्य इ. संत येथे आवर्जून येतात.

आपल्या विनम्र
**डॉ. कमल वैद्य,**
**सौ. रेखा नी. पटवर्धन**

*येन केन विधि देतां दान करी कल्याण ॥*
*तें धन धन्य जयां प्रथम गति (दान)॥ (श्रीरामचरितमानस उत्तरकांड)*

# श्रीरामचरित मानस गूढार्थचंद्रिका टीका

## द्वितीय सोपान अयोध्याकाण्ड

'रामचरित मानस' यावरील मराठी बृहत् टीकेचा अंश

(दोहा १ पासून दोहा ४६/४-५ पर्यंत)

लेखक : प. पू. स्वामी प्रज्ञानानन्द सरस्वती

प्रकाशक
रामचरितमानस प्रेमी मंडळ,
डोंबिवली.

**प्रथम आवृत्ती : श्रीगुरुपौर्णिमा २४ जुलै २००२**



**प्रकाशक :**
श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळ
४, श्रीगणेश, अनंतराज को.ऑ.हौ.सोसायटी,
जलाराम मंदिराजवळ, जि. ठाणे, डोंबिवली पूर्व, ४२१०२१.

**मुद्रक :**
प्रतिमा ऑफसेट
शॉप नं. १, 'श्रीकृष्ण', एरंडवणे को-ऑप.
हाऊसिंग सोसायटी, एरंडवणे, पुणे ४११००४.

**किंमत :**
रु. २००/- फक्त

# प्रस्तावना

## श्रीसद्गुरवेनमः

अयोध्याकांड हा मानसाचा द्वितीय सोपान, मथुरापुरी दुसरी मोक्षनगरी म्हणून मोक्षदायी भगवान शंकरांना वंदन करून याचा प्रारंभ होतो. तर दुसऱ्या श्लोकांत भरतांना वंदन केले आहे. हे पहिले दोन श्लोक प. पू. स्वामी प्रज्ञानानंद सरस्वतीकृत म्हणजे अनुवादक व टीकाकारांचे खास आहेत.

त्यानंतर गोस्वामी तुलसीदासकृत मंगलाचरणात प्रथम श्लोकात भगवान शंकरांची प्रार्थना किंवा शरणागती, त्यानंतर दोन श्लोकांत रघुनंदनांचे यथार्थ वर्णन व गुरुवंदना करून या कांडास प्रारंभ होतो.

अयोध्याकांडाची वैशिष्ट्ये सविस्तर सांगून नंतरच कथाभाग सुरू होतो. आतापर्यंत ज्या अभ्यासू, चिकित्सक वृत्तीने प.पू. स्वामींनी विवेचन केले आहे त्या पद्धतीस वाचकही आता पूर्ण परिचित झाले आहेत म्हणून नुसता विषयांचा उल्लेख केला. सविस्तर वर्णन टीकेतच पहावे. मानवी व्यक्तिमत्त्वातील सर्व आदर्शांचे उत्तम नमुने व रामप्रेममूर्ती भरतांचे अत्यंत निर्मल, ऋजु व भक्तीरसपूर्ण चरित्र सामान्य गृहस्थाश्रमीपासून ते अनन्य भक्तापर्यंत सर्वांना सर्व देणारे कसे आहे हे या वैशिष्ट्यांतून समजते.

वाचकांना बालकांडातील कथासूत्र जेथे संपले बरोबर नेमके ते हाती देऊन तेथून नवीन कथेचा धागा हाती देण्यात गोस्वामी कथासूत्रधार कसे पटाईत वा वाकबगार आहेत ते सुरुवातीपासूनच कळते.

भुवनचारदश या उल्लेखातील मर्म, पर्वत, मेघांदिची सांग रूपके स्वामींनी सुंदरपणे खुलवून दाखविली आहेत. त्यानंतर अयोध्येतील संपत्तीचे सुरेख वर्णन प्रेमभक्तीपूरकही कसे आहे ते टीकेतूनच समजते.

त्यानंतर रामांना युवराज्याभिषेक करण्याचे मनोरथ दशरथांपासून प्रजेपर्यंत सर्वत्र कसेकसे पसरले ते सविस्तर वाचताना तुलसीदासांचा मानवी मनाचा सूक्ष्म अभ्यास प. पू. स्वामी तंतोतंत उलगडून दाखवतात. 'जरठपणा जणू

करि उपदेशा' यातील सुंदर कविकल्पना मनाला भावून जाते व त्या मागची सुजाण सावधानता टीकेतून स्पष्ट होते.

दशरथ प्रत्येक महत्त्वाच्या गोष्टीसाठी गुरुंची अनुज्ञा कशी मागतात त्यावरून त्यांची गुरुभक्ती किती उच्चतम होती ते टीकेतून स्पष्ट होते. वसिष्ठ सर्वज्ञ ब्रह्मनिष्ठ सद्गुरु असल्याने राजांच्या मनोरथपूर्तीसाठी ते कसे समर्पक उत्तर देतात – दशरथांना न दुखविता त्यांना कोणतीही भावी अशुभाची कल्पना न देता खुबीदार उत्तर कसे देतात ते टीकेतून सविस्तर वाचताना गुरु व शिष्याच्या मानसिक आंदोलनांची सुंदर आवर्तने पहावयास सापडतात. 'त्वरा करा न विलंब' यातील मेख दशरथांच्या ध्यानी न येण्याचे एकमेव कारण रामांवरचे त्यांचे आत्यंतिक प्रेम ! युवराज्याभिषेकासाठी बाहेरून कोणालाही का बोलावले नाही याचा उलगडा टीकेतच सविस्तर केला आहे. राजा व राजगुरु यांच्या आज्ञेनुसार भराभर युवराज्याभिषेकाची तयारी कशी कशी झाली ते वाचताना जणू ती आनंदोत्सवाची लगबग दृष्टीपुढे साकार होते आणि या प्रसंगी कोणकोणत्या वैशिष्ट्यपूर्ण वस्तू लागतात ते कळून आपल्या (सामान्य?) ज्ञानातही मोलाची भर पडते.

रामांच्या मनात या युवराज्याभिषेकनिमित्ताने कोणते विचार सुरू होते हे वाचून त्यांचे औदार्य ध्यानी येऊन त्यांच्याविषयीचा आदर अधिकच दुणावतो. त्यानंतर तिन्ही राण्यांची प्रतिक्रिया या शुभ प्रसंगाविषयीची वेगवेगळी का व कशी आहे हे वाचताना एक आगळे वेगळे समाधान प्राप्त होते.

त्यानंतर वसिष्ठ कुलगुरु (पुरोहित) म्हणून दशरथांनी त्यांना पाचारण करणे कसे योग्य आहे ते टीकेतून वाचताना प्रत्येक गोष्टीचा प.पू.स्वामी किती सखोल अभ्यास करीत असत हे समजते. तर वसिष्ठ रामांच्या महालात गेल्यानंतर रामांनी त्यांचा आदरसत्कार वा आतिथ्य कसे केले ते पाहून सर्वांना तो एक अत्युत्तम आदर्श वस्तुपाठच आहे असे वाटते. रामांची गुरुंबद्दलची भक्ती, आदर, प्रेम, विनय इ. सर्व सद्गुण यातून स्पष्टपणे दिसतात. असे ठायी ठायी रामाचे प्रत्येक बाबतीतल्या 'आदर्शत्वा'बद्दल टीकेतून क्रमशः शिक्कामोर्तब होत जाते. राम हे राजपरिवारापासून ते प्रजेपर्यंत इतकेच नव्हे तर रघुवंशाच्या शत्रूंना देखील प्रिय असल्याने सर्वत्र युवराज्याभिषेकउत्सव व

तयारीची धामधूम सुरू असल्याचे सुंदर शब्दचित्रच गोस्वामी समोर उभे करतात. त्यानंतरच्या टीकेत 'सिंहावलोकन' हा परिच्छेद तर अत्यंत वाचनीय व खास मननीय असा आहे.

देव देखील कसे संधीसाधू व स्वार्थी व कुटीलही असतात त्याचेही शब्दचित्र अगदी हुबेहूब उभे करण्यात प.पू.स्वामी सरस ठरतात. देवांनी योजनापूर्वक मंथरेला का व कसे 'कलंकित' केले व रामांना वनवासात पाठविण्याच्या कूटकारस्थानात प्रमुखत्व दिले हे सविस्तर टीकेतून वाचताना पूर्व संस्कारांना किती कमालीचे महत्त्व असते ते कळते. यावरून सामान्य मानवाने थट्टेतसुद्धा पाप न करता किती सावधपणाने आपले जीवन व्यतीत केले पाहिजे हा दिव्य संदेश ध्यानी येतो.

त्या मंथरेचे कुटिल कारस्थान कसे रंगते व प्रत्यक्षात कैकयीकडून त्याचे प्रयोगात ती कसे रूपांतर करवून घेते ते "पाहुनि पोळे किराति कुटिला । कसे मिळे की चिंति युक्तिला ।" या चौपाईचे टीकेत क्रमाक्रमाने पटवून सांगितले आहे - अगदी कोष्टकासह, अशा तऱ्हेने मंथरेने बुद्धिभेद करीत हळूहळू कैकयीच्या मनावर कसा कुरघोडीपणाने विजय मिळवून तिच्या मूळच्या रामप्रेमात विष कालवून तिला रामविरोधिनी कसे बनवले हे टीकेतून वाचले की जणू एक छोटेसे कुटिल कारस्थान नाट्यरूपाने समोर उभे राहते इतके हे सरस असे नाट्यचित्रण बनले आहे. इतर सर्व रामायणांपेक्षाही सरस असा गोस्वामींचा भाव प.पू. स्वामींनी पूर्णतः उलगडून दाखविला आहे. "विधी देईल जर ज़न्म कृपायुत । देवो सीता सून रामसुत ।" असे म्हणणारी कैकयी त्याच राम-सीतांबाबत वज्रापेक्षाही कठोर बनली ती केवळ मंथरेच्या वाणीच्या सामर्थ्यावर. वाणी हे शस्त्र कसे बनते याचे जणू हे एक उत्तम उदाहरणच होय. सत्यकथन साधे, सरळ असते. परंतु असत्य, कुभांड, खोटे आरोप हे करायला बुद्धीची अनेक तऱ्हांनी कशी कसरत करावी लागते ते सारे या नाट्यमय प्रसंगावरून दिसते म्हणून हा प्रसंग टीकेत खूप प्रदीर्घ बनला आहे. या मंथरेच्या बुद्धिभेदासाठी टीकेची सुमारे ६० पाने खर्ची पडली आहेत.

कैकयीच्या महालाखेरीज अयोध्येत सर्वत्र कसा आनंदोत्सव सुरू आहे त्याचेही सुंदर चित्र मनोहारी रेखाटले आहे. रामांचे बालमित्र गटागटाने रामांचे

अभिनंदन करण्यासाठी कसे येतात, राम त्यांचेशी कसे व काय बोलतात, रामांविषयी त्यांचे भाव कसकसे उदात्त होत जातात हे टीकेतून वाचताना हृदय आनंदाने भरून येते.

जणू ही वादळापूर्वीची शांतता... ! कारण मंथरेच्या सल्ल्यानुसार कोपभवनात गेलेली कैकयी दशरथासारख्या सरळ, सुस्वभावी राजाला आपल्या तालावर कसे नाचवते त्याचेही चित्रण नाट्यमयतेने टीकेतून उतरले आहे. "कामवासनेचे राज्य जिथे इतके आहे तिथे ज्ञानरूपी राम वनवासात जाण्याची इच्छा न करील तरच नवल !" या टीकेतील एका अधोरेखित वाक्यावरून कैकयी-दशरथ संवादाची संपूर्ण कल्पना वाचकांनी करावी. भिल्लीण जशी आपले सावज पाशात अडकविण्यात वाक्‌बगार असते तशी जणू कैकयी कामपाशाने दशरथांना इतकी विद्ध करते की शेवटी त्यांच्या प्राणावर हे प्रकरण बेतते. हा सारा प्रसंग वाचताना जणू तुलसीदास कलियुगातील पुरुषांना सावधानतेचा इशाराच देत आहेत असे स्पष्टपणे दिसते. तुलसीदासांचा स्वानुभव असूनही ते मार्मिकपणे व गूढार्थाने थोडक्यात सांगतात तर प.पू. स्वामी संन्यासी असूनही प्रत्येक गोष्ट परखड, स्पष्ट व संपूर्ण तपशीलासह उघड करून तो तो प्रसंग जणू बोलका करून सोडतात. तरीही या संसाराबद्दल, त्यातील विषय-विकारांबद्दल स्वामीशिष्य व रामभक्त म्हणविणाऱ्या या कलियुगातील गृहस्थाश्रमींना तिरस्कार वाटून वैराग्य उत्पन्न होत नाही या विदारक सत्यास काय म्हणावे?

दशरथरूपी लावा पक्षावर ससाण्याप्रमाणे (श्येन पक्षी) कैकयीचा कसा वेगवान व प्राणघातक हल्ला झाला हे सविस्तर वाचताना हृदय शतशः विदीर्ण होते. दशरथांचा मनोरथरूपी कल्पवृक्ष जणू फुलण्यापूर्वीच समूळ नाश पावला. त्यानंतर दृष्टांत देताना 'जशि यतिस अविद्या नाशी' हे सुस्पष्ट करताना प.पू. स्वामी त्याचा अध्यात्मपर अर्थही सांगतात. कैकयीचा प्रत्येक शब्द म्हणजे जणू तीक्ष्ण, धारदार बाणाचे टोकच. ते बोलतानाही सूर्यवंशातील पूर्वज राजांचे दाखले देते म्हणजे जणू त्या बाणांनी झालेल्या जखमांवर मीठच चोळते. तर त्यानंतर कैकेयीच्या रागाला तरवारीची उपमा दिली आहे. त्याचा सविस्तर तपशील टीकेत वाचताना प्रत्येक गोष्टीचा प.पू. स्वामी किती समूळ अभ्यास करीत हे समजते. 'भरत राम दोन्ही किं ममाक्षि' असे सांगूनही कैकयीची

समजूत पटत नाही. शंकराची शपथ घालूनही ती द्रवत नाही मग दशरथ अगतिकतेने राम व भरत या दोघांचे एकमेकांवरील प्रेमही कसे दृढ आहे तेही सांगून पहातात. परंतु कैकयीवर काडीमात्र परिणाम होत नाही हे पाहताच शेवटी कसे हतबल, विकल होतात ते वाचून तर साक्षात करुणरसाच्या साम्राज्यातच आपण बुडून जातो. कैकयीला त्यानंतर रोषतरंगिणी म्हणून रूपकात्मक किती व कसे चपखल रंगविले आहे ते अगदी कोष्टकापर्यंत सविस्तर पहावे. शेवटी 'नारीमिषें शिरिं मृत्यु नाचे' हे कटु सत्य दशरथ ओळखतात अन शेवटी सर्व उपाय थकल्यावर 'राम' नामाचा आधार घेत राहतात. परंतु राम व भरतांचा स्वभाव दशरथांना पूर्णपणे ज्ञात असल्याने कैकयीच्या मागणीनुसार भविष्य काळात तसे काहीही घडणार नाही उलट 'राम सकल गुणनिधीचे शासन' आणि 'करितिल बंधु राम सेवा' हे भविष्य सुस्पष्टपणे खात्रीने सांगतात. अशा तऱ्हेने राजा-सम्राट या भूमिकेवरूनही साम, दाम, दंड, भेद चारीही प्रकाराने ते कैकयीची समजूत घालण्याचा कसा प्रयत्न करतात, त्यासाठी स्वतःकडे किती हीन-दीनता स्वीकारतात, तिलाही 'कुलकलंकिनी' हा शिक्का बसू नये व ती रामविरोधिनी होऊ नये यासाठी किती आटोकाट प्रयत्न करतात ते वाचताना दशरथांच्यातील रामप्रेम व रामभक्ती शब्दाशब्दांतून ठिबकते अन् ती इतकी सत्य व व्याकुळतेपोटी आल्याने प्रत्यक्ष वाचकांच्या डोळ्यांतूनही अश्रू रूपाने ठिबकल्याशिवाय रहात नाही. शेवटी कैकयीस चेटकिणीची उपमा दिली गेली आहे यावरून एका रामप्रेमी, राममाता हिचे केवढे अधःपतन झालेले दाखविले आहे !

अशा तऱ्हेने त्या काळरात्रीचे थैमान संपल्यावर प्रभात दशरथांना कशी वाटते ते वाचताना 'मन' जसे तसे सारे 'दृश्य' भावते हे सत्य तंतोतंत स्पष्ट होते. त्या कोपभवनाखेरीज सारी अयोध्या युवराज्याभिषेकाच्या आनंदात निमग्न असताच एकाएकी ह्या कैकयीच्या कूट कारस्थानाने सारी अयोध्या कशी 'भयाण' होते ते वाचताना प्रत्येक वाचकाच्या हृदयावरच घाव बसतो जणु!

त्यानंतर कैकयीच्या आज्ञेनुसार सुमंत्र (सुमंत) रामांना दशरथांकडे घेऊन येतात आणि रामांची व दुःखाची पहिली भेट होते. हीन दीन दुःखी अवस्थेत पित्याला प्रथमच पाहताना रामांची अवस्था आणि रामांना समोर पाहताच

दशरथाची अवस्था हे दृश्य मीठ पाण्यात विरघळते तसे हृदय विरघळून टाकणारे...! दशरथांचे दुःखाचे कारण सांगतानाही कैकेयी कशी निधडक (निर्लज्ज?) धनुर्धारी स्त्री बनली ते वाचताना जणू ती 'कठोर कैकयी' डोळ्यांपुढे उभीच राहते. रामांना पित्याचे दुःखाचे कारण कळताच रामांची प्रतिक्रिया वाचताना व त्या परिस्थितीतही त्यांनी कैकयीस 'जननी' म्हणून संबोधताना वाचकाची मति गुंग होते कारण 'राम सहज आनंद निधानु'चा दिव्य साक्षात्कार होतो. 'पुत्र कसा असावा' याचा आदर्श परिपाठ येथे मिळतो. तसेच होणारा युवराज्याभिषेक रद्द होऊन वनराज्याभिषेक होणार हे ऐकूनही मनाची प्रसन्नता अणुमात्रही ढळत नाही. इथेच रामांचे ईश्वरत्व, संतत्व दिसते. उलट 'मुनिगण मिलन विशेषिं वन मजसि परम हितकारि ।' यावरून एकाच गोष्टीविषयी वेगवेगळ्या दृष्टिकोनातून किती विचारांचे पैलू असू शकतात ते कळते. रामांची भूमिका 'विधि अनुकूल आज मज पुरता' तर त्यांचे खेरीज जवळ जवळ सारेजण विधीची प्रतिकूलता अनुभवतात. हीच विश्वलीला - विमोहन लीला नव्हे काय? तर दशरथांची भूमिका - 'कोणि एक अपराध करी भोगी दुजा फळास' अशी अत्यंत विकल आहे. दशरथ आता अगदी 'दीन' बनले आहेत. त्यामुळे ते कोणकोणत्या देवांना कशा व कोणत्या विनंत्या करतात ते पाहण्याजोगे आहे. यावरून मानसशास्त्र पारंगतता तुलसीदासांची सुस्पष्ट होते. दशरथ 'रामांचा विरह' ही कल्पनासुद्धा सहन करू शकत नाहीत इतके व्याकुळ बनले आहेत. असे हे प्राणप्रिय वनात जाण्याची अनुज्ञा पित्याकडे कशी मागतात. वनगमनास - 'मंगलसमय' का म्हणतात वगैरे पाहताना रामाचे सद्गुणांचे ऐश्वर्य समजते. कौसल्या मातेची अनुज्ञा घेऊन येतो असे म्हणून राम जेव्हा दशरथांचा निरोप घेतात तेव्हा दशरथांची काय अवस्था झाली असेल ते टीकेतून वाचावे. इथे 'रामराज्यरसभंग' हे प्रकरण समाप्त होते.

इथे अयोध्याकांड प्रथम खंडही समाप्त होतो.

श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ।

— प्रज्ञाशिष्या रामदासी

श्री गणेशाय नमः

श्री सरस्वत्यै नमः श्री गुरुभ्यो नमः श्री जानकीपतये नमः

# अध्याय १ ला

## अनुवादक कृत मंगलाचरण

*पृथ्वी —* *'मुमूर्षुजन - दक्षिण - श्रुतिपुटेषु नामामृतं ।*
*समर्पयति यो मुदा रघुपतीश - काशीपतिः ॥*
*हलाहल - विभक्षको दनुजदेव - संरक्षको ।*
*विराग - परिवर्धको भवहरो भवः पातु माम् ॥१॥*

**अन्वय :** यः मुमूर्षुजनदक्षिणश्रुतिपुटेषु नामामृतं मुदा समर्पयति (सः) हलाहल - विभक्षकः, दनुजदेवसंरक्षकः, विरागपरिवर्धकः भवहरः रघुपतीशकाशीपतिः भवः माम् पातु ॥१॥.

**शब्दार्थ :** यः जो; मुमूर्षुजन - मरणारा प्राणी; श्रुति - कर्ण, कान; पुट = पात्र; नामामृतम् - रामनाम रूपी अमृत; समर्पयति - उत्तम प्रकारें अर्पण करतो; मुदा = आनंदाने; हलाहलविभक्षकः हलाहल विषाचे विशेष भक्षण करणारा; दनुज-दानव, असुर + देव = दनुजदेव + संरक्षक - चांगले रक्षण करणारा; विराग - वैराग्य + परिवर्धकः - सर्व प्रकारें वृद्धी करणारा; भव = संसृति, संसार, त्याचे हरण करणारा = भवहरः, रघुपति आहेत ईश ज्याचे तो रघुपतीश; काशीक्षेत्राचे पति = काशीपति; रघुपतीश असे जे काशीपति ते रघुपतीश काशीपती (शंकर, विश्वेश्वर) भवः - शंकर, शिव; माम् - मला, पातु - रक्षण करो.

**अर्थ :** जो मरणाऱ्या प्राण्यांच्या उजव्या कर्णपात्रांत (कानांत) आनंदानें रामनाम - रूपी अमृत उत्तम प्रकारें घालतो, तो हलाहल विष विशेष भक्षण करून देवदानवांचें उत्तम प्रकारें संरक्षण करणारा, वैराग्याची सर्व प्रकारें वृद्धी करणारा संसाराचा संहार करणारा, रघुपति, सेवक (भक्त) काशीक्षेत्राचा अधिपति शंकर - विश्वेश्वर - माझें रक्षण करो. ॥१॥

**टीका** : (१) **श्रुतिपुटेषु** - मरणाऱ्या प्राण्याला एकच उजवा कान असतो; पण येथें श्रुतिपुटेषु असें अनेक वचन घालून सुचविले की एकाच वेळीं अनेक प्राण्यांना उपदेश करतात. **(क)** काशीपति शब्दाने सुचविलें कीं काशीक्षेत्रांत मरणारानांच हा उपदेश करतात. **(ख) नामामृतम्** - 'राम' हा दोन अक्षरी **महामंत्र, महावाक्य. 'महामंत्र जो महेश जपती । काशीं मुक्ति - हेतु उपदिशती'** (१।१९।३ टी.प.) **'धन्यास्ते कृतिनः पिबन्ति सततं श्रीरामनामामृतम्'** (किं.मं.२) यावरील टीका पहावी. **(ग) रघुपतीश** - शब्दानें सुचविलें कीं श्रीकाशी विश्वेश्वर, शंकर रघुनन्दनाचे भक्त, सेवक, असून रघुपतीच्याच सत्तेनें त्यांना हा अधिकार प्राप्त झाला आहे. (१।१९।३ टी.प.)

२. **हलाहलविभक्षको दनुजदेवसंरक्षक** :- समुद्रमंथनातून निघालेल्या महा भयंकर हलाहल विषाचे पान करून देवदानवांना जीवदान दिल्याचा इतिहास सुचविला आहे. हे कार्य शंकरास रामनामाच्या प्रभावावरील अचल, अलौकिक विश्वासामुळेच करता आले. **शंकर म्हणजे रामनाम व राम यावरील विश्वासाची साक्षात् मूर्तीच**; म्हणूनच बाल-मंगलाचरण श्लोक २ मध्ये म्हटले की **'भवानीशंकरौ वन्दे श्रद्धाविश्वासरूपिणौ'** विषयासक्ती हे महाभयंकर विष, हलाहल आहे. हलाहलाने एकदाच व देहाचाच विनाश होईल; पण विषयरूपी हलाहल पुन्हा पुन्हा मरण्याची व जन्मण्याची परंपरा पाठीस लावते. त्या परंपरेचा-भवाचा-संहार भव-शंकर करतात. रामावरील व रामनामावरील अलौकिक अढळ विश्वासच विषयासक्तीरूपी हलाहलाचा विनाश करू शकतो. **(क)** हा विश्वास मनुष्याच्या ठिकाणी असला तर या शरीररूपी काशीक्षेत्रात रामनामामृताची वृष्टी करून विश्वासरूपी शंकर विषयासक्ती हलाहलाचा संहार करून वैराग्याची सर्व प्रकारे वृद्धी करील. ते नामच ज्ञानगंगेचा प्रवाह मस्तकावर आणील व संसारचक्राची गती थांबवील. संसार सागर सुकवून गोपदा समान करील. असा दृढ विश्वास शंकराच्याच कृपेने मिळू शकतो व तो विश्वासच शं-कर होतो. या काण्डाची फलश्रुती भवरस-विरती आहे. भवरसविरतीः संसारातील विषयांविषयी पूर्ण वैराग्य, ज्याच्या चरित्राने प्राप्त होते त्या भरताला पुढील श्लोकात मंगलाचरण रूपाने वंदन करून अयोध्याकाण्ड उत्तरार्धाचा वस्तुनिर्देश

केला आहे. विशेष विस्तृत विवेचन **'यस्यांके च विभाति भूधरसुता'** या मूळ मंगलाचरण श्लोकाच्या टीकेत केले आहे.

***स्रग्धरा – यत्प्रेमाम्भोधिपारं कथमपि गमने नैव शक्तो वसिष्ठः ।***
***सुप्रेम्णा निर्जितान्तर्वचनवशमभूद्यस्य वै रामचंद्रः ॥***
***यस्य प्रेमातिरेकाद्भयवशमगमद्राममाताऽप्यरण्ये ।***
***भावं वक्तुं विदेहः स्वयमपि भरतं नैव शक्तो नतोऽस्मि ॥२॥***

**अन्वय –** यत् + प्रेम + अम्भोधि + पारम् (यत्-यस्य, ज्याच्या, प्रेमरूपी अम्भोधिः सागर, पारम्-पलीकडे, परतीराला) गमने (जाण्यास) वसिष्ठ कथम् अपि (काहीही करून) न एव शक्तः (समर्थ झाला); सुप्रेम्णा निर्जित + अन्तः वै रामचंद्रः यस्य वचन् वशम् अभूत्; यस्य प्रेम + अतिरेकात्, अरण्ये राममाता अपि भयवशम् अगमत्; (आणि यस्य) भावं वक्तुं स्वयं विदेह; अपि न एव शक्तः (तं) भरतं नतः अस्मि.

**अर्थ –** ज्याच्या प्रेमसागराच्या पार जाण्यास वसिष्ठ कोणत्याही प्रकारे मुळीच समर्थ झाले नाहीत; शुद्ध प्रेमाने (सु-प्रेम्णा) अन्तःकरण जिंकले गेलेले (निर्जितं अन्तर् अन्तकरणं यस्य) रामचंद्र ज्याच्या वचनाला वश झाले; ज्याच्या प्रेमाच्या अतिरेकाने (चित्रकूटच्या) अरण्यात (वनांत) राममाता कौसल्या सुद्धा (अपि) भयाला वश झाली (भयभीत झाली) आणि ज्याचा भाव सांगण्यास (वक्तुं) स्वतः (स्वयम्) विदेह (जनक राजा) सुद्धा (अपि) मुळीच समर्थ झाले नाहीत. त्या भरताला मी नमस्कार करतो. नमतो (नतः अस्मि) ॥२॥

**टीका : चरण १ ला - यत्प्रेमाम्भोधिपारं - वसिष्ठ** - या चरणाने दोहा २५४।१ पासून २५७ अखेर पर्यंतचा कथाभाग सूचित केला आहे. 'ऐकुनि वचना स्नेहा पाहुनि । होती विदेही सकल सभा. मुनि ॥१॥ भरत-महा-महिमा जलराशी । मुनि-मति उभी तटीं - अबलाशी ॥२॥ पार जावया उपाय पाही । नाव तराफा जहाज नाहीं ॥३॥ वर्णि कोण पर भरत महत्ता । सरशुक्तिंत ये सिंधु किं भरता ।४॥२५७॥

**चरण दुसरा : (१) सुप्रेम्णा निर्जितान्तर्वचन...रामचंद्रः** या चरणाने दोहा २५७ पासून २६४ अखेर पर्यंतचा कथाभाग सुचविला आहे. **'भरत म्हणति**

**तें करत चांगलें । राम वदुनि हें स्तब्ध राहले ॥८॥** (२५९). **'भीड सोडुनी मुदित-मन सांगा करूं तें आज ॥ सत्यसंध रघुवरवचन परिसुनि सुखी समाज'** (२६४). दशरथ वचन पाळण्यासाठी राम वनात आले; त्यांना वनातच राज्याभिषेक करविण्यास व अयोध्येत परत नेण्यास भरत चित्रकूटला आले आहेत हे माहीत असता राम वसिष्ठांस म्हणाले की भरत म्हणतील ते करणे चांगले; उचित आहे. भरताला म्हणाले, की निःसंकोचपणे तुम्ही सांगाल ते मी करीन. भरताने जर सांगितले असते की आपण अयोध्येत परत येऊन राज्यावर बसावे, तर तसे करावे लागले असते. इतके प्रभु राम भरताच्या प्रेमाने जिंकले गेले व भरताच्या वचनाला वश झाले. भक्त मोठा की भगवान मोठे याचा विचार वाचकांनी करावा; म्हणजे 'रामदास रामाहुनि मोठे' हा सिद्धान्त अयोध्याकाण्डात भरताच्या उदाहरणाने पदोपदी सत्य करून दाखविलेला स्पष्ट दिसू लागेल.

**चरण तिसरा : यस्य प्रेमातिरेकात्... राममाता.** या चरणाने २८१/३ पासून २८४ पर्यतचा कथाभाग सुचविला आहे. **'म्हणे कौसिल्ला गहिवरूनि भरतविषयी मज खंति'** (२८२) **'स्नेह सुगूढ भरत-मनिं राही । राहत, विसत भलें मज नाहीं ॥** २८४|४॥ भरताला अयोध्येत पाठविला व रामलक्ष्मण वनात राहिले तर भरताच्या अलौकिक रामप्रेमामुळे भरताची दशा दशरथांसारखीच होईल अशी भीती कौसल्येला वाटू लागली.

**चरण चौथा - (१) भावं वक्तुं विदेहः नैव शक्तः** - या चरणाने २८८/१ पासून २८९ अखेरचे विदेहाचे विचार सुचविले आहेत. **'निरवधि-गुण निरुपम पुरुष भरत भरत-सम जाण । गण्यां सुमेरु किं शेरसम कविकुल रुजायमान ॥** (२८८) धर्म, राजनीती आणि ब्रह्मविचार यात प्रवीण असणाऱ्या जनक-विदेहाच्या बुद्धीला भरताचा भाव वर्णन करता येईना. **'वर्णु न शकति कोणि वरवर्णी ! । जशि जलहीन मीनमति धरणीं** ॥२८९|९ असे जनकांस म्हणावे लागले. **(क) भरतं नतोऽस्मि** - असे जे भरतचरित्र त्याचा तंतोतंत अनुवाद करणे व त्यावर टीका लिहिणे फारच दुर्गम; त्यांची कृपा झाली तरच ते वेडेवाकडे का होईना साधणार; म्हणून येथे भरताला वंदन केले. **अनुवादककृत मंगलाचरणाची टीका संक्षेपाने येथे समाप्त.**

## सिंहावलोकन

बालकाण्डातील मुख्य विषयाचे अल्पसे सिंहावलोकन करून मग या काण्डाच्या मूल-मंगलाचरण-श्लोकांकडे वळू. मंगलानां कर्तारी, अमंगलानां हर्तारी च सीतारामचंद्री (वाणी विनायकौ); वर्णानां, अर्थसंघानां, रसानां, छंदसामपि कर्तारी सीतारामचंद्री; हें बाल मं. श्लो. १ मध्ये सांगितले. राम व सीता यांचे त्रिविध व द्विविध स्वरूप (निर्गुणनिराकार ब्रह्म राम; सगुण निराकार ब्रह्म राम : परमात्मा, परमेश्वर, शेषशायी नारायण, वा विष्णु; व विद्यामाया, मूलप्रकृति, आदिशक्ति, सीता; सगुण साकार दशरथनंदन राम व सगुणसाकार विदेह नंदिनी जानकी - सीता) नाम, गुण व धाम यांचें वर्णन बालकांडांत केलें. प्राप्यस्य ब्रह्मणो रूपम् - प्राप्त करण्याचें ब्रह्माचें त्रिविध रूप - परोक्षरीत्या बालकांडांत विविध प्रसंगांच्या निमित्ताने वर्णन केलें. या त्रिविध रूपांपैकी **निर्गुण निराकार ब्रह्म व सगुण साकार राम यांचा अपरोक्ष साक्षात्कार करून घेऊन रामभक्ति प्राप्त करून घेणें हें ध्येय आहे.**

(२) **प्रत्येक काण्ड एक स्वतंत्र सोपान** असल्यानें वसिष्ठ, कौसल्या, दशरथ, सुनयना, जनक, अयोध्यावासी, भरतादि, जनकपुरवासी व विश्वामित्रादिकांनां विश्वास व श्रद्धेच्या बळावर धर्माचरण करून, वैराग्य ज्ञान संपन्न झाल्यावर सगुण साकार रामजानकी यांचें दर्शन व प्रेमभक्ती यांची प्राप्ती कशी झाली हे पण बालकाण्डात गौणविषय रूपाने वर्णन केले; परंतु इतरांनी हे ध्येय कसे गाठावे - साधावे - याचा जो क्रम बाल मंगलाचरणाच्या दुसऱ्या श्लोकापासून सातव्या श्लोकापर्यंत सांगितला त्या क्रमाचे विस्तृत वर्णन त्या त्या श्लोकांत सुचविल्याप्रमाणे अयोध्या काण्डापासून उत्तरकाण्डापर्यंत क्रमशः केले आहे. (क) अयोध्याकाण्ड म्हणजे द्वितीयसोपान; बाल मंगलाचरणाचा दुसरा श्लोक **'भवानीशंकरौवन्दे श्रद्धाविश्वासरूपिणौ ॥ याभ्यां विना न पश्यन्ति सिद्धाः स्वान्तस्थमीश्वरम्'** हा आहे. या श्लोकावरील टीका खंड १ मध्ये वाचून पहावी आणि मग ही पुढील टीका वाचावी म्हणजे रहस्य सहज कळेल.

## श्रीतुलसीदास - कृत मंगलाचरण

### श्लोक १ ला.

*शा.वि. – 'यस्यांके च विभाति भूधर-सुता देवापगा मस्तके ।*
*भाले बालविधु - र्गले च गरलं यस्योरसि व्यालराट् ॥*
*सोऽयं भूतिविभूषणः सुरवरः सर्वाधिपः सर्वदा ।*
*शर्वः सर्वगतः शिवः शशिनिभः श्रीशंकरः पातु माम् ॥१॥*

**अन्वय :** यस्य अंके भूधर - सुता (पार्वती) विभाति; यस्य मस्तके च देवापगा (विभाति); भाले बालविधुः (विभाति); गले च गरलं (विभाति); यस्य उरसि व्यालराट विभाति; सः अयं भूतिविभूषणः, सुरवरः, सर्वाधिपः, शर्वः, सर्वगतः, शिवः, शशिनिभः श्रीशंकरः सर्वदा मां पातु.॥१॥

**अर्थ :** ज्याच्या (यस्य) मांडीवर (अंके) पर्वताची मुलगी (भूधर-पर्वत, सुता-मुलगी) पार्वती विशेष शोभत आहे; ज्याच्या मस्तकावर देवांची नदी गंगा (देव + आपगा = नदी) शोभते, कपाळावर चंद्रकोर (बाल + विधु = चंद्र, द्वितीयेचा चंद्र) विराजत आहे; ज्याच्या कंठांत (गले) हलाहल विष (गरल) शोभत आहे, ज्याच्या छातीवर सर्पांचा राजा शोभत आहे (व्याल-सर्प, राट्-राजा) तो हा चिताभस्म विभूषित (भूति - चिताभस्म वा ऐश्वर्य) सर्व देव श्रेष्ठ, सर्वांचा स्वामी (सर्व + अधिप; = स्वामी), संहारकर्ता (शर्व) सर्वव्यापक (सर्वगत – सर्वत्र असलेला), कल्याण स्वरूप (शिव) चंद्रासारखा असलेला श्रीशंकर सर्वदा माझे रक्षण करो (मां पातु) ॥१॥

**टीका :** (१) या काण्डाच्या आरंभीच शंकराचे स्मरण व वर्णन का केले? हे दुसरे काण्ड, दुसरा सोपान, बालकांडारंभी दुसरा श्लोक 'भवानी शंकरौ वंदे' हा असून त्यात शंकरांना ज्या हेतूने वंदन आहे त्याच हेतूने येथे स्मरण व वर्णन आहे. भवानी (भव + अनी) भवाची पत्नी, भवाची शक्ती. ती कोण हे येथे स्पष्ट सांगितले. भूधरसुता - गिरिकन्या - पार्वती; आणि भवानी = श्रद्धा हे 'श्रद्धाविश्वासरूपिणौ' यांत सांगितले आहे; शंकर = विश्वास. बा. मं. श्लोकांत - भवानीशंकरौः श्रद्धाविश्वासौ असा क्रम आहे. त्यावरून

कदाचित वाटेल की आधी भवानी-श्रद्धा व मग शंकर विश्वास, पण ते खरे नव्हे हे येथे दाखविले. येथे शंकरांच्या मांडीवर भूधरसुता भवानी आहे. शंकर-विश्वास आधीं असला तर मग भूधरसुता भवानी-श्रद्धा त्याच्या मांडीवर, त्याच्या आश्रयाने राहील. **आधी विश्वास व मग त्याच्या आश्रयाने श्रद्धा असा क्रम असेल तरच क्रमशः साधन केल्याने स्वान्तस्थ, ईश्वराचे दर्शन होऊ शकेल.**

(२) **हा विश्वास शं-कर (कल्याण करणारा) पाहिजे. रामाचे बालकाण्डात वर्णिलेले रूप, नाम, लीला व धाम यांवर जो दृढ विश्वास तोच शंकर - कल्याण करणारा - विश्वास होय.** दक्षसुता भवानी शंकरी नाही, कारण शंकर तिचा त्याग करतात, ती आपल्याला जाळते; म्हणून भूधर-सुता भवानी पाहिजे. भूधर = पर्वत = हिमालय पर्वत. त्याच्या सद्गुणांना प्रसवणारी (सुता) जी श्रद्धा तीच भूधरसुता भवानी, शंकरांच्या अंकावर बसून शंकरी (कल्याण करणारी) होऊ शकते. हिमालयाची निर्मलता, स्थिरता, अचंचलपणा, विशालपणा, शीतलता, तपोधामता, गंभीरता, धृति, सहनशीलता, अनेक सागरगामी महानद्यांचे उगमस्थान-माहेर, देवतांची विहार - भूमी, इत्यादी अनेक सद्गुणांनां प्रसवणारी जी श्रद्धा तीच भूधरसुता भवानी. **(क) भूधर** = भूमीला धारण करणारा, त्याची सुता = भूधरसुता. परमार्थमार्गातील विविध भूमिकांना धारण करण्याचे सामर्थ्य फक्त वरील प्रकारच्या श्रद्धेच्या ठिकाणीच असू शकते; ती शक्ती दक्षसुतेच्या अंगी असू शकत नाही. नुसती दक्षता, चतुरपणा, चिकित्सक बुद्धि परमार्थाच्या विविध भूमिकांस धारण करण्यास असमर्थ आहे. ज्ञानदीपकांत सुद्धा 'श्रद्धा सात्विक धेनु शोभना' (७।११७।९) पासूनच ज्ञानप्राप्तीच्या विविध भूमिका वर्णिल्या आहेत. **'श्रद्धेवीण धर्म कधिं न घडे । महीवीण कीं गंध सापडे ॥ (७।९०।४) 'विरतिस धर्म योग दे ज्ञाना । ज्ञान मोक्ष दे श्रुति करि गाना ॥** (३।१६।१) असा श्रद्धा, धर्म, विरती, योग, ज्ञान व मोक्ष यांचा परस्पर कारणकार्य संबंध आहे. पण श्रद्धेला शंकररूपी विश्वासाचा आश्रय पाहिजे हे वर दाखविले आहे. विश्वासाश्रित सात्विक श्रद्धा वर दाखविलेल्या प्रकारची असली तरच मग शम दम, यमनियम, व्रत, ब्रह्मचर्य, तीर्थाटन, वेदपठन, यज्ञयाग इत्यादी धर्माचरणाने वैराग्यप्राप्ति होऊ शकते; व मग वर दाखविलेल्या

योगापासून मोक्षाच्या भूमिका प्राप्त होतात; ज्ञानानंतर भक्ती प्राप्त होऊ शकते; म्हणूनच म्हटले आहे उपसंहारांत की **'बिस्वासाबिनु भक्ति ना द्रवहि न तीविण राम ॥ स्वप्निहि राम कृपेबिनु जीवा नहिं विश्राम'** (७।९०।) हा विश्वास कसा शंकर पाहिजे हे या परिच्छेदारंभीच दाखविले आहे.

(३) या काण्डाची फलश्रुति - **'सिताराम पद प्रेम होइ नविकं भवरस बिरति'** (दो. ३२६) भवरसविरति - वैराग्य प्राप्ती ही या काण्डाची फलश्रुती आहे. **पण वैराग्य हे धर्माचरणाचे फळ आहे. 'प्रथम विप्रपदिं परमा प्रीती । स्व-स्वकर्मि निरती श्रुतिरीतीं ॥ याचे फळ की विषय विरागही । मग मम धर्मि होइ अनुरागहि'** (३।१६।६-७) **(क)** या कांडांत विविध धर्मांचे पालन-आदर्श आचरण हाच मुख्य विषय आहे. राजाचा धर्म, पितृधर्म, पत्नीधर्म, मातृधर्म, पुत्रधर्म, स्वामीधर्म, सेवकधर्म, बंधुधर्म, लघुबंधुधर्म, ज्येष्ठ बंधुधर्म, सापत्न माताधर्म, पुरोहितधर्म, शिष्यधर्म इत्यादी अनेक व्यक्तिधर्मांचे परमोच्च निर्दोष आदर्श चित्रण याच काण्डात प्रामुख्याने केले आहे. एकाच व्यक्तीला एकाच दिवशी किंवा एकाच वेळी अनेक परस्पर विरोधी धर्मांचे आचरण करण्याचे प्रसंग येतात. अशा वेळी त्या त्या व्यक्तीने कोणत्या धर्माला प्रामुख्य द्यावे व कोणत्याला गौण समजावा हे ठरविणे फार कठीण असते. दशरथाला रघुवंशी राजा, पति व पिता या तीन प्रकारच्या परस्पर विरोधी धर्मांचे आचरण करण्याचा प्रसंग आला. त्यांनी रघुवंशी राजधर्माला प्रामुख्य देऊन रामास वनवासास जाऊ दिले; पुत्रप्रेमामुळे पितृधर्माचे आचरणही केले व रामविरहाने देहत्याग केला; हे करण्यात पतिधर्माला अत्यंत गौण मानावा लागला. कौसल्यादी पत्नींना पुत्रवियोगाचे दुःख सहन करावे लागले. प्रत्येक व्यक्तीपुढे असेच बिकट पेच पडले आहेत; पण त्यातून निभावून **आदर्श धर्माचरण करून, त्यागाने वैराग्य प्राप्त करून** प्रभुपद प्रीती हे ध्येय सर्वांनी गाठून, **शेवटी सर्वांना स्वान्त सुखाची प्राप्ती झाली आहे.** या प्रमाणे **विश्वास-श्रद्धारूपी शंकर भूधरसुता यांचे मंगलाचरण करणे हा मुख्य हेतु येथे आहे.**

(४) **कोणी म्हणतात** - शंकर रामभक्तीचे आचार्य म्हणून त्यांचे स्मरण येथे केले. किष्किंधा काण्डात 'कुन्देन्दीवरसुन्दरौ' या श्लोकांत लक्ष्मणाचा

उल्लेख रामापूर्वी का केला याचेही हेच उत्तर देतात की लक्ष्मण रामभक्तीचे आचार्य आहेत म्हणून प्रथम स्मरण व उल्लेख केला. राम-भक्तीचे आचार्य शंकर की लक्ष्मण? लक्ष्मण शंकरांनासुद्धा ठार मारण्याची भाषाहि बोलतात! **कोणी म्हणतात,** 'गुरुं शंकर रूपिणम्' म्हटले असल्याने त्यांचे स्मरण प्रथम केले; मग किष्किंधा, सुंदर, लंका व उत्तरकाण्डात शंकररूपिणम् गुरुचे स्मरण वा वन्दन काण्डारंभी का नाही? व सुंदर काण्ड-मंगला चरणात शंकरांना कुठेच स्थान का नाही? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे त्यास देता येत नाहीत. जिथे जो आधार लागेल तो घेऊन समाधान मानून मोकळे होणे व पुढील-मागील संदर्भाकडे डोळेझाक करून वाचकांच्या डोळ्यांत धूळफेक करणारी ही नीति आहे !

(५) **देवापगा मस्तके** - देवापगा - देवांची नदी - गंगा. 'काशीक्षेत्रं शरीरं त्रिभुवनजननी व्यापिनी ज्ञानगंगा॥' ज्ञानाचा संबंध मस्तकाशी असतो व भक्तीचा हृदयाशी असतो; म्हणून **अध्यात्म दृष्टीने** देवापगा = ज्ञानगंगा असा अर्थ होईल आणि 'ज्ञानंमहेश्वरादिच्छेत्' असा नियमच आहे. गंगासुद्धा शिवाच्या मस्तकावरून येऊन नंतरच भूमीवर आली आहे. विश्वास-श्रद्धा-धर्म-विरति-योग व ज्ञान अशी साधन परंपरा आहे. शंकर योगीश्वर व ज्ञानी आहेत हे कोणी अमान्य करणार नाहीत. 'बोधमयं शंकरम' (बा.मं.३). **(क) आधिदैविक दृष्ट्या** देवापगा - गंगा म्हणजे रामचरणामृत होय. **'ज्यापदिं सुरसरिता परमपुनीता प्रगट होई शिव शिरीं धरी ।** (१।२११ छं. ४) भाव हा की विश्वासयुक्त सात्विक श्रद्धेने धर्माचरण केले की वैराग्य प्राप्त होऊन रामचरणामृत मस्तकावर धारण करण्याची लालसा उत्पन्न होईल; म्हणजेच **'याचें (स्वधर्माचरणाचें) फल कीं विषय विराग हि । मग मम धर्मि होइ अनुरागहि'** (३।१६।७) ममधर्म = भक्तिधर्म, भागवतधर्म. मानसांतच आधार कसे भरून ठेवलेले आहेत ! **(ख) आधिभौतिक दृष्ट्या** शंकरांच्या मांडीवर एक स्त्री, पर्वताची मुलगी आणि मस्तकावर एक सुंदर स्त्री देवापगा, अत्यंत वेगवती असलेली, अशा दोन स्त्रियांचा संबंध शंकरांशी आला. तसाच कौसल्या मोठी (पहिली) व कैकयीनंतरची यांचा संबंध दशरथांशी आला. कैकयीला डोक्यावर चढविल्यामुळे अनेकांना

अनेक दुःखे भोगावी लागली व जे सकल-आनंदनिधान, सुखधाम राम, त्यांना सुद्धा इतरांचे दुःख पाहून दुःखी व्हावे लागले, हे या काण्डातच स्पष्ट दिसते. पार्वती व गंगा या दोघी रामभक्ति संपन्न असल्यामुळे त्यांच्यापासून शंकरांना व इतर कोणालाच दुःख झाले नाही. कौसल्या व कैकयी याही रामभक्ति संपन्न रामप्रेमीच पण कैकयीच्या हृदयातून रामभक्तीचे उच्चाटन केले जाताच ती डोक्यावर बसली व भयंकर उत्पाताचे निमित्त झाली. (ग) ब्रह्मपुराण अ. ७४।७५ मध्ये कथा आहे की जटेत गंगेला ठेवलेली पाहून पार्वतीने शंकरांस अनेक वेळा विनंती केली की तिला टाकून द्या; पण काही उपयोग झाला नाही. पार्वतीच्या मनात सौतीमत्सर उत्पन्न होऊन तिने विनायक (गणपती) स्कंद व सखी जया यांना हकीगत सांगून गंगा जटेतून निघून जाईल असा उपाय करण्यास सांगितले. त्यांनी गुप्त कट रचून गौतमावर गोहत्येचा आळ घालविला. ऋषिगणांचा बुद्धिभेद करून, पापमुक्तीसाठी शिवजटेतून गंगेला पृथ्वीवर आणून तिच्या प्रवाहात स्नान करण्यास ऋषींनी सांगितले. गौतमांस शंका येऊन ध्यानाने पाहिले तेव्हा ऋषिमुनींना घोर शाप दिला. अर्धा भाग गौतमी झाली व अर्धा भाग भागीरथी नंतर दीर्घ काळाने झाली आहे. गोदावरी ब्राह्मगंगा त्रिदैवत्यतीर्थ आहे. भागीरथी क्षात्रगंगा, देवतीर्थच आहे; पण ही कथा पूर्वीच्या कल्पांतील आहे. कारण त्याच पुराणात दशरथांनी ज्याचा चुकून वध केला तो श्रावण ब्राह्मण होता. त्यामुळे दशरथास तीन ब्रह्महत्या घडल्या इ. वर्णन आहे. वा. रा. स्पष्ट सांगितले आहे त्या श्रावणानेच की तो शूद्र आहे. मात्र हा अनर्थ डोक्यावर बसविलेलीने करविला नाही; मांडीवर बसणारीने करविला! (घ) ब्रह्मपुराणांतील कथेवरून हेही सिद्ध होते की 'सुर अनादि' म्हणून सीतेने जे 'भवानी पूजन' केले त्या संबंधी संशय घेण्यास जागाच राहात नाही. प्रत्यक्ष पार्वतीनेही पार्वतीसहित शिवाचे पूजन केले आहे. (हरितालिका)

(६) **भाले बाल विधुः** – 'शशि ललाटिं गंगा शिरिं सुंदर । नयन तीन उपवीत सर्पवर' (१।९२।३) बालविधु - शुद्ध द्वितीयेचा चंद्रमा. 'यमाश्रितो हि वक्रोऽपि चन्द्रः सर्वत्र वंद्यते' (१ मं.श्लो.३) 'देवापगा मस्तके' आणि 'भाले बालविधुः' याने तिसऱ्या म्हणजे अरण्यकाण्डाचा विषय सूचित केला आहे.

तसेच 'आश्रय-आश्रित' संबंधही सूचित केला आहे. श्लोक ३ च्या टीकेत तो पहावा. (क) जसे 'बाल रवि' म्हटले आहे तसेच बालविधु = पौर्णिमेच्या सायंकाली उदित होणारा, लालसर दिसणारा चंद्र असा अर्थ घेतला तर आधिदैविक अर्थ प्रकट होतो. उगविणाऱ्या सूर्याला आणि श्रीरामालाही मानसांत 'रघुवर बाल पतंग' म्हटले आहे । तसेच पूर्वदिशेला उगवणाऱ्या चंद्राला व रामाला 'शशि' म्हटले आहे । जसे 'वंदू कौसल्या दिशि प्राची ।... प्रगट जिथुनि रघुपति शशि चारू' (१।१६।४-५) म्हणून बाल = उदयास येणारा. भाव हा कि साधक ज्या वेळी श्रीरामचरणामृतास मस्तकी धारण करू लागतो अर्थात वैराग्ययुक्त होऊन रामार्चन - रामपूजादि भजन करू लागतो तेव्हा त्याच्या भालास - ललाटास राम बालविधुचा स्पर्श होऊ शकतो. अर्थात श्रीरामदर्शन होऊन तो आपले ललाट प्रभुच्या चरणांवर ठेवू शकतो. (ख) अध्यात्मदृष्टीने भाव हा आहे की त्याच्या मस्तकात 'देवापगा' - ज्ञानगंगा - हिचा प्रवाह वाहू लागतो आणि तो 'वक्रोऽपि चन्द्रः सर्वत्र वन्द्यते बनतो । 'साधुरेव स मन्तव्यः सम्यग व्यवसितोऽहि सः ।' (भ. गीता) जरी प्रथम तो 'अपि चेत् सुदुराचारः' (भ.गी.) मानसांतही प्रभूंनी असेच सांगितले आहे. 'चराचरा द्रोही नर असुनी । येइ सभय मज शरण लक्षुनी ।। त्यजुनि मोह मद विविध छलासी । सद्य साधुसम करतो त्यासी ।। (५।४८।२-३) भालावर चंद्र धारण केल्याने शोभा, शान्ति आणि शीतलता यांची प्राप्ती होते. तसेच या साधकाला अमृत = मुक्ति प्राप्त झाल्याने शोभा आणि शांतीचा लाभ होतो. 'ज्ञान मोक्ष दे श्रुति करि गाना ।।' (३।१६।१) सद्गुरुंचा आश्रित बनून अविद्या - माया निरास, ज्ञान आणि मोक्षाची प्राप्ति. हा अरण्यकाण्डाचा मुख्य विषय आहे. तोच येथे गूढार्थाने सुचविला आहे. पुढील प्रारंभीच्या चौपायात च भूधर, सरिता (आपगा) यांचा उल्लेख आहे. **'भुवन चार दश भूधर भारी'** त्या भूधरांवर जन्मणाऱ्या सुता (कन्या) सरिता. **'ऋद्धिसंपत् सरिता या'** **'सकल सुखें पुरजनां समस्तां रामचंद्र मुखचंद्र निरखतां'** (२।१।२,३,६). रामराज्यरसभंग प्रकरणात भूधर व सरिता यांचा अनेक वेळा उल्लेख आहे. दो. ३४ च्या चौपायांत तर पापपर्वत, त्यावर उगम पावणारी **रोषतरंगिणी**, विपत्तिसागर यांचे

सांगरूपकच आहे. पुढे करुणासरिता आहे. (२७५) I भरतविमल यशाचे **'नवविधु'** म्हणून वर्णन याच कांडांत आहे. भरत स्वतःला वक्र, कुटिल, कठोर समजतात, पण पित्याने दिलेल्या राज्याचा वैराग्याने त्याग करून रामचंद्राच्या (विधूच्या) पायांवर मस्तक ठेवण्यासाठी चित्रकूटास जाण्यास निघाले, त्याबरोबर ते सर्वांस प्रिय झाले व यशरूपी नवविधु प्रगट झाला आहे; यावरून स्पष्ट दिसते की या श्लोकांतील प्रत्येक वाक्य, प्रत्येक पद, **या काण्डांतील विषयाचा निर्देश (वस्तुनिर्देश) करीत आहे.**

(७) **गले च गरलम** - शंकरांनी हलाहल विष प्राशन करून देवदानवांचे संरक्षण केले. त्या वेळेपासून त्यांचा गौरवर्णी कंठ त्या विषाने नीलवर्णी झाला व ते विष त्यांचे भूषण बनले. **'जटामुकुटिं सुर सरित शिरिं लोचन नलिन विशाल ॥ नीलकंठ लावण्यनिधि भालिं चारु विधु बाल'** (१।१०६।-) **'शंभुस नामीं प्रताप सुविदित । कालकुटें फळ सुधा समर्पित'** (१।१९।८) विषयासक्ती हेच हलाहल, कालकूट विष आहे. **'विषाहुनी विष परधन भारी' 'विषय वीष पीऊनियां फुकट कां मरावे?'** असे मराठी संतही म्हणतातच. परंतु रामनाम प्रभावाने, असे हलाहल अमृतासारखे झाले. येथे रामनामनिष्ठा-रामनामरति-सुचविली. मायानिरास होऊन ज्ञान प्राप्त झाल्यावरच रामनामाची गोडी-चटक लागते. **'संत चरण रज लागतां सहज । वासनेचें बीज जळुनी जाई ॥ मग रामनामीं उपजे आवडी सुख घडोघडीं वाढों लागे'** (तुका.) वासनेचे बीज अज्ञान; ज्ञानाशिवाय नष्ट होत नाही; म्हणून ज्ञानोत्तरच रामनामाची गोडी लागते. **चौथे काण्ड किष्किंधा याच विषयाचे मुख्यतः वर्णन करते** व बा.कां. मं. श्लोक ४ या **'सीतारामगुणग्राम' हा नामपरच आहे. (क)** चंद्र अमृत स्रवणारा व गरल मृत्यू आणणारे असे दोन विरोधी पदार्थ जवळ असून शंकर शं-कर (कल्याण करणारे) राहिले. पण रामभक्ति विहीन झालेली कैकयी रामनामामृतविमुख झालेल्या मुखाने **'तैं कैकयि कटु कठोर वदते । जणू शतामर्षि विषा घालते** ॥३५।३॥ अमृतमय रामभक्तीरस, अंधतापस शाप व विषमय रामवियोग यांमुळे दशरथांचे प्राण गेले. कैकयीला आपल्या मुखाने गरळ ओकावयास लावणारा राज्यलोभ व सवतीमत्सरच, म्हणजे विषयासक्तीच; पण रामचंद्रांचा

वनवास लक्ष्मणाला जीवन साफल्य देणारा झाला. **'अहह धन्य लक्ष्मण बडुभागी । रामपदारविंद अनुरागी ॥** (७।१।३) असे भरत वचन आहे. **'भूरिभाग्य भाजन बनासि मज सह'** (२।७४।) **'राम जाति बनिं तुमचें भाग्यहि'** (७५।३) असे सुमित्रा लक्ष्मणाला म्हणाली आहे. सुमित्रा व लक्ष्मण यांच्या ठिकाणी वैराग्य व ज्ञान आहे आणि रामभक्ति आहे; म्हणून कैकयीने पाजलेले गरळ लक्ष्मणाला अमृतासारखे झाले. **'खल कामादि निकट ना वळती । ज्याचे हृदयिं भक्ति करि वसती' 'गरल सुधासम अरि हित होती । त्या मणिविण सुख कुणि न पावती'** (७।१२०।६-७) मणि = भक्तिचिंतामणि, याच्या उलट **'रामद्रोह्या कोणि रक्षि ना ॥ सुधा विष बने, श्रुणु हरियाना'** (३।२।५-६). सर्वांत जास्त हानि झाली असेल तर कैकयीचीच ! **कामक्रोधमोहअहंकारादि राक्षसांचा संहार करून रामभक्ति प्राप्त होणे हा सुंदर व लंकाकाण्डांचा विषय येथे सुचविला आहे.**

(८) **उरसि व्यालराट्** - शंकरांच्या छातीवर सर्पाचा राजा असून तो त्यांस चावत नाही, आणि रामप्रेमी कैकयीने कुबडीच्या वचनांवर विश्वास ठेवला, पतिवरील विश्वास नष्ट झाला; त्या बरोबर तिला संशयव्याळ डसला व कुतर्क लहरी येऊ लागल्या. स्वतः कैकयी सापीण बनली आहे. **'जाणों सरोष भुजंगभामिनि विषमदृष्टीं निरखिते'** (२।२५ छं.) कुबडी काळी सापीण झाली आहे. **'तरि न बदे दासी अति पापिण । श्वास सोडि काळी जणुं सापिण'** (२।२३।८) **(क) व्यालराट** शेष, **अहीश उरसि** हृदयांत **विराजत आहे**. अहीश = लक्ष्मण **'जो अमित शीर्ष अहीश महिधर लक्ष्मणहि अगजगधनी'** (२।१२६।छंद) **'हे युग बंधु शंभुउरवासी'** रामलक्ष्मण एकमेकांस सोडून रहात नाहीत. **'ब्रह्मजीवसमसखे सहज ते'** (१।२०।४) **'ब्रह्मजीवसे स्नेहि सहज वर'** (१।२१७।४) सुचविले की शंकराच्या हृदयात रामलक्ष्मणांनी वस्ती केली आहे. येथे **हृदयसिंहासनावर रामचंद्रांनी आरूढ होणे हा उत्तरकाण्डाचा विषय सुचविला. (ख)** नामप्रेमाची प्राप्ती होऊन रामभक्ति मिळाली की रामलक्ष्मण व सीता हृदयांत वस्ती करतात. या प्रमाणे विश्वासापासून आरंभ करून श्रद्धा, धर्म, वैराग्य, योग, ज्ञान नामप्रेम सगुण साक्षात्कार व प्रेमभक्तीने रामलक्ष्मणसीता यांची वस्ती ज्याच्या हृदयांत झाली तो (सः). (९) **सोऽयं भूतिविभूषणः** – मागल्या

दोन चरणांत शंकरांच्या नावाचा प्रत्यक्ष उल्लेख नाही. सः तो हा शब्द दूर असलेल्या वस्तूबद्दल वापरतात; आणि अयं शब्द जवळच्या वस्तूबद्दल वापरतात. पाच वर्षांपूर्वी रंक होता तो हा (अयं) लक्षाधीश. अशा रीतीने दोन स्थितीत, दोन स्थानांत किंवा दोन काळी असलेल्याबद्दल सोऽयं हा प्रयोग करतात. एकट्या शंकराबद्दलच हा उल्लेख आहे असे मानल्यास, येथे शंकरांच्या दोन अवस्था दर्शविलेल्या पाहिजेत, पण तशा या श्लोकांत दाखविलेल्या नाहीत. मागल्या दोन चरणांत सगुणाचे वर्णन आहे असे मानल्यास या चरणातही भूति विभूषण हे सगुणसाकाराचे वर्णन आहे; म्हणून हा उल्लेख एकट्या शंकरांबद्दल मानणे योग्य नाही. या दोन चरणांचे तीन अर्थ होतात. सः = शंकर; अयं = रामः असे दोन कर्ते घेणे जरूर आहे. भूतिविभूषणः इत्यादी सर्व विशेषणे शंकरांस व रामासही लागू आहेत. तसेच जो विश्वास व श्रद्धाविहीन असतो तो विश्वास श्रद्धायुक्त होऊन रामलक्ष्मणांनी हृदयांत निवास करीपर्यंतची एक स्थिती म्हणजे साधकावस्था आणि नंतरची स्थिती म्हणजे सिद्धावस्था, साधु, संत झाल्यानंतरची स्थिती सः अयं शब्दांनी सुचविली असे मानणे सयुक्तिक आहे. प्रथम या अर्थाच्या दृष्टीने भूतिविभूषणः वगैरे शब्दांचा अर्थ पाहू.

(क) भूति, चिताभस्म आहे. विभूषण ज्याचे ते शंकर, आणि भूतीचे विभूषण असलेला, हा अर्थ राम आणि साधू यांच्याकडे लागतो. विभूतिर्भूतिरैश्वर्य आणिमादिकम अष्टधा' (अमरे) अणिमादिक ऐश्वर्याचे विभूषण असलेला अशा साधूंनी, संतांनी, आपली सेवा घेतली तर अणिमादि विभूतींना भूषण वाटते, धन्यता वाटते. रघुवंशभूषण शब्द जसा वापरतात तसाच भूतिविभूषण येथे समजावा. अशा भक्तांचे या काण्डांतील उदाहरण भरद्वाज ऋषि होत. **'ऋद्धिसिद्धि आज्ञा शिरिं धरती । महाभाग्य कीं आपलें म्हणती'** (२।२१४।१). ज्याच्या हृदयांत रामलक्ष्मणसीता वस्ती करतात तो या सिद्धींनां तृणासमान मानतो. हाच अर्थ राम व भरत यांना लागतो. भरताची व त्याच्या सर्व समाजाची थोडी सेवा करण्यास सापडणार म्हणून ऋद्धिसिद्धी आपले महद्भाग्य मानीत आहेत. **(ख) सुरवर** - सर्व देवांत श्रेष्ठ राम **'श्रवति सदा सादर नरनारी ते सुरवर मानस अधिकारी.'** (१।३८।२) या प्रमाणे 'सुरवर' शब्द रामचरितमानस-

भक्तांनाही मानसांत वापरला आहे. **(ग) सर्वाधिपः** - सर्वांचा अधिप ईश्वर-स्वामी, **'स्वामीत्वीश्वरः पतिरीशिता । अधिभूर्नायको नेता. प्रभुः परिवृढोऽधिपः'** (अमरे) हे विशेषण राम व शंकर यांना सहज लागते, यासाठी आधार देण्याची आवश्यकता नाही. अशा भक्ताला राम वश असतात. **'रामदास रामाहुनि मोठे'** (७।१२०।१६). राम चित्रकूटला गेले त्या वेळी मेघादिकांनी त्यांची सेवा केली नाही, पण भरताची केली. 'रामदास रामाहुनि मोठे' हे प्रकरण प्रस्तावनेत पहावे. अशा साधूंना कशाचीच अपेक्षा नसते म्हणून ते सर्वाधिप आहेत.

**(१०) (क) शर्वः** - संहार करणारा, शर्व हे शिवाचे एक सार्थ नाव आहे. **'भृकुटिविलासी सृष्टिलय होती'** (३।२८।४) असे सर्व संहारक = शर्व राम ही आहेतच. **'सत्संगति करि संसृति-अंता'** (७।४५।६) 'संतदर्शन अघ वारी' (४।१७।६) **'गुरुरेव शिवः साक्षात्' 'गुरुर्देवो महेश्वरः'** या प्रमाणे संत पापसंहार व संसृति संहारक = शर्व आहेत. **(ख) सर्वगतः** — व्यापक या अर्थाने राम व शंकर यांस सहज लागतो. अवतरणांची जरूर नाही. (७।१०८।१, १।१९८।, १।११६।८; पहा) सर्वगतं यस्मात्, ज्याचे सर्व गेलेले आहे असा = परम अकिंचन, व अनिकेत. **'यास्तव पुकारती श्रुति सज्जन । हरिला प्रिय जे परम अकिंचन'** (१।२६१।३) **'अर्थ न धर्म न काम रुचि नको गतिहि निर्वाण । जन्मजन्म रति रामपदिं हें वरदान न आन'** (२।२०४) सर्वत्र गतं - गमनं यस्य स सर्वगतः, वाटेल तेथे संचार करतात. **सम मान अनादर मानुनियां । सब संत सुखी फिरती जगिं या'** (७।१४।८) **'प्रेममग्न फिरती स्वसुखानें... (ग) शिवः भद्रं** कल्याण स्वरूप; श्वःश्रेयसं **शिवंभद्रं कल्याणं** मंगलं शुभम्' (अमरे). **'चिदानंदरूपः शिवः' 'चिदानन्दसंदोह मोहापहारी'** (७।१०८।६) हे शंकरा विषयी आहे. **'चिदानंद सुखधाम शिव'** (१।७५) **'विदित राम-महिमा प्रभु चिदानन्द संदोह'** (७।५२।रा.) **'चिदानंदसंदोह राम...'** (७।६८ म). **'जाणे त्यावें तोच सुख परानंद संदोह'** (७।४६।) (परानंद व चिदानंद एकच) हे संतांबद्दल म्हटले आहे. **(घ) शशिनिभः** - चंद्रासारखा गौरवर्णी = शंकर. **'प्रगट जिथुनि रघुपति शशि चारू । विश्वसुखद खल-कमल तुषारू** (१।१६।५) **'संत उदय संतत हितकारी । विश्व सुखद इव इंदु तमारी'** (७।१२१।२१) इन्दु = शशी. **(ङ) श्रीशंकरः**

- 'श्री' शब्द मानसात शंकर शब्दाला इतर कुठेही जोडलेला नाही; म्हणून 'शंकरः पातु माम्' एवढेच वाक्य, शंकराकडे लागेल. I - श्रीशंकर = श्री लक्ष्मी, सीता, तिचे शं कल्याण करणारे, तिला शं - सुख करणारे, राम. तिच्यासाठी, तिचा प्रेमपण जाणून, धनुर्भंग केला, पाणिग्रहण केले; तिच्या इच्छेप्रमाणे वनात नेणार आहेत; परपुरुष स्पर्श होऊ नये म्हणून तिला अनलांत गुप्त ठेवणार आहेत (अरण्यकाण्डांत) वनांत तिला सुख देण्याचा सर्व प्रयत्न केला. **'सुखी सिता रामासह राही । पुरपरिजनगृह अठवण नाहीं'** (२।१४०।१). **'जशिं सीता लक्ष्मण सुख लभती । तेच कारति, रघुनाथ बोलती'** (२।१४१।१) II - श्री = मोक्षलक्ष्मी. **'मोक्षश्रिया आलंकृत । ऐसे हे संत श्रीमंत । ज्यांचे द्वारीं तिष्ठत । मोक्ष लक्ष्मी'** (दा.बो.) **'ज्ञान मोक्ष दे'** (३।१६।१) **'गुरुविण नोहे ज्ञान ज्ञान कि होइ विरागविण॥ गाती वेद पुराण सुख किं मिळे हरि भक्तिविण'** (७।८९). गुरु - संत, साधु; शं = सुख, गुरु, संत, ज्ञान-मोक्ष व सुख देणारे आहेत; म्हणून श्री-शंकर संत आहेत. **'सकल फलहि हरिभक्ति सुशोभन । संतकृपेविण कुणा हि लाभ न'** (७।१२०।१८) **'मोक्षसुख बघ खगराया । टिकुं न शके हरिभक्ति विना या'** (७।११९।६) **(च)** असा राम सर्वदा **मां पातु,** असा परम भागवत भरत मां पातु, माझे रक्षण करो. भरताचे अगम्य चरित्र वर्णन करावयाचे आहे म्हणून भरताला प्रार्थना करीत आहेत. रामचंद्रांचे नरनाट्य वर्णन करावयाचे आहे म्हणून शंकर व राम हे दोघेही रक्षण करोत. भरताचा भाव व महिमा 'शेष गणेश गिरा गति नाही' असा आहे. तो वर्णन करण्यास त्यांची कृपा पाहिजेच. त्यांची कृपा झाली की राम कृपा करणारच. **'प्रेमें स्मरा हृदयिं भरता तरि । जो गुण-शीलें वश रामा करी'** (२।२६५।८) 'भक्त-भक्तिवश रघुपति असती' (२६५।३)

(११) **सिंहावलोकन** — इतका विस्तार करावा लागला तेव्हा या श्लोकाची टीका पुरी झाली. तरी भूधराच्या सद्गुणांचे स्पष्टीकरण मानसांतील अवतरणे देऊन केले नाही; ते सती मोह प्रकरणात व उत्तरकाण्ड परिशिष्टांत **'संतविटपसरितागिरि धरणी'** या लेखांत विस्ताराने केले आहे. या एका श्लोकात या काण्डांतील भरतचरित्राचा निर्देश, मानसारंभींच्या सात श्लोकांत दाखविलेले

अनुबंधचतुष्टय; स्वान्तःसुख प्राप्तीच्या साधनांचा क्रमशः विचार व मानसारंभीच्या सात श्लोकांतील विषयांचे त्याच क्रमाने दिग्दर्शन इतक्या गोष्टी मोठ्या कौशल्याने भरून ठेवल्या आहेत आणि याला मानसांत भरपूर आधारही भरून ठेवले आहेत, हे टीकेत वर दिलेल्या अवतरणांनी कळते. राम-भरत व शंकर या तिघांचे स्मरणात्मक, प्रार्थनात्मक, मंगलाचरण केले आहे. किष्किंधा काण्डांत लक्ष्मण व राम यांचे मंगलाचरणात स्मरण केले आहे ते अगदी उघड आहे. भक्त व भगवान यांची समता येथे गूढार्थाने दाखविली आहे. '**भक्त भक्ति भगवंत गुरु नाम कथा गुण धाम । मानसिं आठ समान हीं भजत मिळे विश्राम ॥ प्रज्ञा ॥** असे ठिकठिकाणी दिसेल.

## श्लोक दुसरा

***वंशस्थ – प्रसन्नतां या न गताभिषेकतस्तथा न मम्ले वनवास दुःखतः ॥***
***मुखाम्बुजश्री रघुनन्दनस्य मे सदाऽस्तु सा मञ्जुलमंगलप्रदा ॥२॥***

**अन्वय :** या अभिषेकतः प्रसन्नतां न गता, तथा (च) वनवासदुःखतः न मम्ले सा रघुनन्दनस्य मुखाम्बुज श्रीः मे सदा मंजुल-मंगल-प्रदा अस्तु ॥२॥

शब्दार्थ : प्रसन्नतां = प्रसन्नपणाला; या = जी; गताभिषेकतः = गता + अभिषेकतः, गता = गेली, प्राप्त झाली, अभिषेकतः = अभिषेकामुळे, राज्याभिषेकाच्या बातमीमुळे, तथा - त्याप्रमाणे; वनवास + दुःखतः = वनवास दुःखतः, वनवासाच्या (बातमीच्या) दुःखामुळे; मम्ले = म्लान झाली, कोमेजली; मुखाम्बुजश्रीः - मुख कमलाची कान्ति, शोभा; सा - ती, मे - मला (मह्यम्); मंजुल = सुंदर; मंगल = कल्याण, प्रदा = प्रकर्षाने देणारी; अस्तु = असो, होवो.

**अर्थ :** रघुवंशाला आनंद देणाऱ्या रामाच्या मुखकमलाची जी कान्ति-शोभा राज्याभिषेकाच्या बातमीने प्रसन्नतेला गेली नाही (वाढली नाही) तसेच जी वनवास दुःखाने कोमेजली नाही ती मला सदासर्वदा सुंदर कल्याण प्रदान करणारी असो (होवो).

**टीका :** (१) या श्लोकाचे वृत्त वंशस्थ आहे; यालाच वंक्षस्थविल आणि

वंशस्तनित ही दुसरी नावे आहेत. या व इतर वृत्तांची लक्षणे प्रस्तावनेत दिली आहेत. **'सापेक्ष मानतीं सर्वहि छंद सहेतुक' हें प्र.प्र. ५।१० पहावें.** (क) यांत या कांण्डांतील पूर्वार्धाचा - राम चरित्राचा - वस्तुनिर्देश स्पष्टपणे केला आहे. मागील श्लोकांत किंवा या श्लोकांतही कोणालाच वंदन केले नाही. हे नुसते वस्तुनिर्देशात्मक मंगल आहे. मागील श्लोकांत गूढार्थाने भरत चरित्राचा वस्तुनिर्देश केला. म्हणजे आधी भरत चरित्राचा वस्तुनिर्देश करून मग रामचरित्राचा निर्देश केला. याने हे दाखविले की या काण्डात भरत चरित्र मुख्य आहे; आणि 'रामदास (भरत) रामाहुनि मोठे' हे या काण्डात दाखविले आहे, हे सुचविले. **'लक्ष्मण राम सिता वनिं वसती । भवनीं भरत तपें तनु कसती ॥ बघुनि उभयदिशिं वदति सर्वजन । भरत किं सर्वपरीं स्तुतिभाजन ॥'** (३२६।२-३). असे उपसंहारांत म्हटले आहे. मध्ये सुद्धा हा सिद्धान्त स्पष्ट दाखविला आहे. **'करित जाति छाया जलद सुखद वहत वर वात ॥ पथ न होइ रामा तसा जैसा भरता जात'** (२।२१६) **'पथिं जडचेतन जिव बहु नाना । ज्यां बघती प्रभु दिसले ज्यांना ॥ ते सब परम पदा – अधिकारी । भरत बघत गत भवरुज भारी,** (२१७।१-२) ऐहिक व पारमार्थिक दृष्ट्या भरत रामापेक्षा मोठे हे वरील अवतरणांवरून स्पष्ट दिसते. या प्रमाणे उपक्रमोपसंहारादि सर्व लक्षणांनी रामदास (भरत) रामाहुनी मोठे हा सिद्धान्त स्पष्ट केलेला आहे.

२. **प्रसन्नतां या न गताऽभिषेकतः** – या चरणाने रामराज्याभिषेकाची तयारी सुचविली व **न मम्ले वनवास दुःखतः** याने राज्यरसभंग व वनवासासाठी गमनादि सुचविले, म्हणजे या काण्डाच्या पूर्वार्धाचा विषय सुचविला.

**ल. डे.** (१) **मम्ले** हें म्लै म्लान होणें या धातूचे तृतीय पुरुषाचे एकवचमी आत्मनेपदी रूप आहे. म्लै धातु परस्मैपदाचा आहे, असे असता गोस्वामींनी व्याकरण विरुद्ध आत्मनेपदी प्रयोग कसा केला अशी स्वाभाविक शंका संस्कृत पंडितांस येऊन टीकांमध्ये मतमतांतरे व्यक्त झाली आहेत. 'मम्लै' पाहिजे असे म्हणतात. आर्ष प्रयोग आहे असे म्हणण्यास येथे जागा नाही; कारण मम्लौ म्हणण्याने वृत्तदोष किंवा छंदोभंग होण्यासारखा नाही. कोणी म्हणतील की पोथी लेखकाचा प्रमाद आहे. कान्हा-मात्रा देण्यास विसरला; याच भावनेने व

तु.दासांस व्याकरण दोषापासून सोडविण्यासाठी काही टीकाकारांनी 'मम्ली' पाठ घेतला आहे; पण असे करणारांनी तु.दासांच्या माथी वदतोव्याघात-दोष सदिच्छेने व न कळत कां होईना लादलाच. काही जाडे विद्वान पंडित म्हणतात की या सहा काण्डारंभींचे श्लोक संस्कृत आहेत असे समजण्याचे कारण नाही. इ-इः मम्ली पाठाने वदतोव्याघात दोष कसा उत्पन्न होतो पहा :

(२) I सुमंत्रांबरोबर राम दशरथ कैकयी निवासात गेल्यापासून वनवास दुःखामुळेच राम अनेक वेळा दुःखी, चिंताव्याकुळ झाले आहेत. **(क) 'समकारुणिक मृदु स्वभावें । प्रथम दृष्ट दुख कानिं न ठवें ॥ धरिति धीर जाणुनि समयाला'** (४०।३-४) धीर सुटण्या इतके राम दुःखी झाले होते हे यावरून ठरले. **(ख) 'अंब एक अति दुःख मला हें । अति विकल नरनायक पाहें'** (४२।५). **(ग) 'प्रजा प्रेमवश रघुपति पाहति । सदय हृदय अति दुःखा पावति'** (८५।१). **(घ) 'शीला स्नेहा ये न सोडतां । अडचणींत रघुराया पडतां ॥'** (८५।५) **(ङ) करुणामय रघुनाथ गो-पती । शीघ्र परावी पिडा पावती'** (८५।२). **(च) 'जैं जैं राम अयोध्ये स्मरती । तैं तैं जलें विलोचन भरती'** (१४१।३). **(छ) 'कृपानिधी प्रभु दुःखा पावति । धरिति धीर, ही वेळ न, जाणति'** (१४१।५) **(ज) 'पुनरपि चिंता सीतारमणा कारण कवण भरत-आगमना ॥ राम सचिंत अती, जैं ऐकति ।... स्मरती स्वभाव भरताचा जैं । न मिळे स्थिरता प्रभुचित्ता तैं ॥'** (२२७।३-४) राम चिंताव्याकुळ झाले हे त्यांच्या मुखावरून लक्ष्मणास सहज कळले. **'प्रभहदि खळबळ लक्ष्मण लक्षिति'** (२२७।६) **(झ) 'नृपगमना सुरपुरास बदले । अति दुःखी रघुनाथ जाहले । स्नेह निजहि मृतिकारण जाणति । धीर-धुरंधर विकल होति अति'** (२४७।३।४)'. हे दुःखी, व्याकुळ, चिंतातुर होण्याचे नऊ प्रसंग वनवास-दुःखानेच उत्पन्न झाले आहेत.

II या नऊ प्रसंगांकडे नीट पाहिले म्हणजे कळते की रामवनवासामुळे **दुसऱ्यांना (परस्मै) जे दुःख झालेले दिसले त्यामुळे राम दुःखी झाले आहेत.** त्यांची मुखश्री म्लान झाली आहे, धीर सुटला आहे, चिंतेने व्याकुळ झाले आहेत, चित्तांत तळमळ सुरू झाली आहे; मात्र **स्वतःच्या वनवासाने त्यांस स्वतःस लेशमात्र दुःख झाले नाही.** आत्मने = स्वतःस दुःख, चिंता, पीडा उत्पन्न होऊन

मुखश्री म्लान झाली नाही हे तितकेच खरे आहे. **'करुणामय रघुनाथ गो-पती । शीघ्र परावी पिडा पावती'** (८५।२) असे स्पष्टच सांगितले आहे. (क) 'न मम्लौ' असें परस्मैपदाचे रूप वापरले असते तर त्याचा अर्थ असा झाला असता की वनवासाने उत्पन्न झालेल्या कोणाच्याही दुःखाने राम दुःखी झाले नाहीत. **म्हणजेच राम कठोर हृदयी ठरले असते.** वर दिलेल्या नऊ प्रसंगी राम प्रत्यक्ष दुःखाकुल झाले असल्याने **'न मम्लौ'** व वरील वचने यांत विरोध उत्पन्न होऊन **'न मम्लै' हे असत्य ठरले असते.** असा विरोध उत्पन्न होऊ नये, रामचंद्रांच्या करुणामय स्वभावाला कलंक लागू नये म्हणून मुद्दाम जाणून-बुजून आत्मनेपदी प्रयोग केला. ज्या वेळी क्रियेच्या कार्याचा संबंध स्वतःशी (आत्मने) च असतो, त्या वेळी आत्मनेपदाचा उपयोग केला जातो. या नियमाच्या आधारावरच **म्लै** धातु आत्मनेपदी वापरून गूढभाव प्रकट करून अनर्थ टाळला आहे. **मम्लौ पाठाने वर दाखविल्यांप्रमाणे दुहेरी अनर्थ झाला असता. अशा, असामान्य संस्कृत पंडिताच्या अतिमानुष अलौकिक काव्यात व्याकरण दोष दिसल्यास ते दूर करण्यासाठी पाठ बदलणे किती अनर्थकारक आहे याचे हे एक उत्तम उदाहरण आहे.**

**III** वा. रा. अरण्यकांड सर्ग ४५।३८ मध्ये 'नत्वहं राघवादन्यं पदापि पुरुषं स्पृशे' असा येथल्या सारखाच आत्मनेपदी प्रयोग केला आहे; पण त्याचा गूढार्थ न समजल्यामुळे **'रामाभिरामी'** संस्कृत **टीका लेखक सुद्धा** असेच **घसरले आहेत**; पूर्वीच्या संदर्भाशी विरोध येऊन हे वाक्य खोटे ठरते हे लक्षात आले नाही. या वचनापूर्वी वा. रा. मध्ये विराधाने सीतेला उचलून नेऊन मांडीवर घेतल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. **'स रामं लक्ष्मणं चैव सीतां दृष्ट्वाथ मैथिलिम् ॥८॥ अभ्यधावत संक्रुद्ध.... अंकेनादायवैदेहीमपक्रम्यततोऽब्रवीत्॥ 'तां दृष्ट्वा राघवः सीतां विराधाङ्कगतां शुभाम् ।'** (अर. स. २।८-१०, १६) या प्रमाणे वा. रा. मध्ये सीतेला परपुरुषाचा स्पर्श आधीच चांगला झाला असता ती लक्ष्मणास म्हणते की, 'न त्वहं राघवादन्यं **पदापि पुरुषं स्पृशे'** मी राघवाशिवाय अन्य पुरुषाला पायानेसुद्धा स्पर्श करणार नाही. सीता खोटे बोलली की काय? छे ! छे ! सीतेच्या म्हणण्याचा भाव हा की मी स्वतः स्पर्श करणार नाही. विराधाने मला बळजबरीने नेली त्यास माझा इलाज नाही. **हा अर्थ दाखविण्यासाठी**

**स्पृश धातु परस्मैपदाचा असून वाल्मीकींनी आत्मनेपदी रूप वापरले आहे. 'श्रीवाल्मीकिच झाला श्री तुलसी'** (मोरोपंत) व त्यांनी **येथे अगदी तसाच म्लै धातूचा प्रयोग 'मम्ले' हा केला.**

(३) **स्वतःच्या वनगमन समाचाराने राममुख श्री (न मम्ले) कोमेजली तर नाहीच पण त्या बातमीने रघुवीरास मनात महान आनंद झाला आहे. 'नवगजेन्द्र रघुवीर-मन राज्य अलान समान ॥ सुटले जाणुनि गमन वनि मनि आनंद महान।** (२।५१). दो. ४१ व १२५ पहा.

**'पित्राज्ञें भूषण बसन त्यजुनि तात ! रघुवीर ॥ विस्मय हर्ष न जरा हृदिं नेसति वल्कल चीर'** (२।१६५) **'राग रोष ना, प्रसन्न आनन'** (१६६।१) **'विस्मय हर्ष न मुळिं रघुराया'** (२।१२।३) असे देवांनी सुद्धा म्हटले आहे. विस्मय = विषाद असा येथे अर्थ आहे. **(क)** वनवासाच्या बातमीने रघुनाथास जसा आनंद झाला तसा राज्याभिषेकाच्या समाचाराने आनंद होणे तर दूरच राहिले, पण उलट विषाद मात्र वाटला. **'शिकवुनि गुरु नृपभवनिं निघाले । राम असे मनिं विस्मित झाले ॥ एक विमल कुलिं अनुचित हें किति । त्यजुनि बंधु मोठ्या अभिषेकिति ॥ प्रेमें प्रभु-परिताप सुशोभन'** (२।१०।४,७,८).

(४) **सदाऽस्तु सा मंजुलमंगलप्रदा** – राज्याभिषेकाच्या तयारीचे वर्णन करणे कवीचा उत्साह वाढविणारे आहे. पण वनवासाचे वर्णन करणे गोस्वामीं सारख्या अति कोमल रामभक्तिमय हृदयाला अत्यंत कठीण किंबहुना अगम्य वाटले; म्हणून येथे ते वर्णन करण्यास लागणारा उत्साह, स्फूर्ति व चित्ताची अचंचलता यांची याचना कवि करीत आहेत; व या शोक सागरातून बाहेर काढून 'शेवट गोड करी असे विनवीत आहेत. **मंगल** = कल्याण, अनेक प्रकारचे असू शकते. इष्ट विषयाची प्राप्ती झाली म्हणजे कल्याण झाले असे माणसांस वाटते. इष्ट विषय अनेक व विविध असू शकतात; म्हणून मंजुल शब्दाने सुचविले की हृदयाला श्रद्धेचा व भक्तीचा पाझर फोडणारे (= सुंदर) कल्याण व्हावे अशी मागणी करीत आहेत. **मंजुल** – सुंदर = आदर (श्रद्धा) उत्पन्न करणारे व हृदयाला द्रव फोडणारे. कौसल्या, दशरथ, सीता, लक्ष्मण व भरत यांच्यासारख्या परम श्रेष्ठ रामभक्तांचे चरित्र, मोठ्या बिकट

परिस्थितीतले, वर्णन करावयाचे आहे म्हणून कवीचे हृदय श्रद्धा-भक्तिमय पाहिजेच; परंतु एवढ्यानेच भागण्यासारखे नाही; कारण लक्ष्मण-भरतांसारख्या परमवैराग्य संपन्न भक्तोत्तमांची चरित्रे चित्रण करावयाची आहेत; म्हणून पुढील श्लोकात श्री रघुनाथास वंदन करून वैराग्य संपन्न होण्याच्या इच्छेने व पुढे दोह्यांत सद्‌गुरु स्मरणाने मंगलाचरण करतील.

## श्लोक ३ रा

***इंद्रवज्रा — । नीलाम्बुज-श्यामल कोमलांगं । सीता-समारोपित-वामभागम् ॥***
***। पाणौ महासायक चारुचापं । नमामि रामं रघुवंश-नाथम् ॥३॥***

**शब्दार्थ :** नील + अम्बुज = नीलाम्बुज, नीलकमल. अम्बु = जल, अंबुज = कमल, समारोपित - स्थापित, बसविलेली, वामभाग - डावी बाजू; पाणौ - हातांत, महासायक - मोठा, अमोघ, बाण.

**अर्थ :** ज्यांचे शरीर नीलकमलासारखे श्यामल व कोमल आहे, ज्यांनी सीतेला आपल्या वामभागीं बसविली आहे; ज्यांच्या हातात मोठा बाण व सुंदर धनुष्य आहे, त्या रघुवंशनाथ रामाला मी नमन करतो. ॥३॥

**टीका :** (१) या श्लोकांत वंदनात्मक मंगलाचरण करतात. **(क) नीलाम्बुजश्यामलकोमलांगं** — हे वर्णन पूर्वी अनेक वेळा केले आहे. किष्किंधा काण्डात सुद्धा रामचंद्रांस कोमल म्हटले आहे. १।१९९ मधील **बालरूप** वर्णनांत मात्र कोमल शब्द सुद्धा नाही. पण त्या काळातीलच उत्तर काण्ड ७६ मधील बालरूप वर्णनात **'मरकतशामल मृदुल कलेवर' 'नव राजीव अरुण मृदु चरणहि'** असा दोनदा कोमलांगांचा उल्लेख आहे. **या चरणाने विश्वामित्रांबरोबर जाईपर्यंतचे बालचरित्र सुचविले.**

(२) **सीतासमारोपितवामभागम्** — याने विवाहापर्यंतचे चरित्र सुचविले. **'बसली बरासनिं रामजानकी'** (१।३२५ छं. १) हे सप्तपदी विधीनंतरचे वर्णन आहे.

(३) **पाणौ महासायक चारुचापम्** — **'पाणौबाणशरासनं -'** (अर.मं.२) **'निषंगचाप - सायकंधरं त्रिलोकनायकम्'** (३।४।३) **'बामदेव नी बसिष्ठ मुनिवर।**

**दिसतां, प्रभु महिं ठेउनि धनु शर'** (७।५।२) या चरणाने अरण्य कांडापासून उत्तर काण्डात अयोध्या गमनापर्यंतची वीर रसलीला सुचविली.

(४) **रघुवंशनाथम्** – वनगमनामुळे रघुवंशाला अनाथ करून जाणार असले तरी ते त्याला पुन्हा सनाथ करणार आहेत हे सुचविले. **'लिंबलोण करुं सुखें किं जाणे । जन परिजन पुर अनाथ करणें'** (२।५७।४) राज्यारोहणादि उत्तरकाण्ड चरित्र सुचविले आहे. या प्रमाणे **या श्लोकांत बालकाण्डापासून उत्तर काण्डापर्यंतचे रामचरित्र सुचविले आहे.**

(५) बालकाण्डाच्या मंगलाचरणांतील सात श्लोक सात काण्डाचे क्रमशः प्रतिनिधी आहेत. या काण्डांत, सुंदर लंका व उत्तर कांण्डांत मंगलाचरणात ३।३ श्लोक आहेत. अरण्य व किष्किंधा मंगलाचरणांत २/२ च श्लोक आहेत. येथे ३ श्लोक का? पुढे २/२ का? याची टीकाकारांनी दिलेली कारणे हास्यास्पद व पोरकटपणाची आहेत. श्लोकांच्या संख्येची कारणे शोधल्यास, मंगलाचरणातील दोहे-सोरठे यांच्या संख्येची कारणेही शोधून दाखविणे भाग आहे. जेथे विशेष कारण नाही तेथे कारणे शोधित बसण्याने पोरकटपणाच पदरात पडावयाचा. वस्तुनिर्देशमंगल व नमनात्मक मंगल यांसाठी कवीच्या स्फूर्तीला त्या वेळी जेवढे आवश्यक वाटले तेवढे लिहिले गेले. सुंदर काण्डांशिवाय इतर सर्व काण्डांत दोह्यांत वा सोरठ्यांतही मंगलाचरण केले आहे.

***हिं.दो. – । श्री गुरुचरन सरोज रज निज मन मुकुर सुधारि ॥***
***॥ बरनउँ रघुबर बिमल जसु जो दायक फल चारि ॥ मं. १॥***

***म.दो. – । श्री गुरुपादाम्बुज - रजें धुउन मुकुर मन फार ॥***
***॥ वर्णू रघुवर-विमल-यश जें दायक फल चार ॥ मं. १॥***

**अर्थ :** श्रीगुरुंच्या चरणकमलांच्या रजाने (धुळीने) (स्वतःचा) मनरूपी आरसा (मुकुर) पुष्कळ साफ-स्वच्छ करून (धुऊन) चार पुरुषार्थ देणारे रघुवरांचे विमल यश मी वर्णन करतो. ।।मं.दो.।।

**टीका :** (१) बालकाण्डातील गुरु वंदनात **'गुरुपद रज मृदु मंजुल अंजन । नयनामृत दृग्दोष विभंजन ॥ तत्कृत बिमल विवेकविलोचन । वर्णिन रामचरित भव मोचन ॥** (१।२।१-२). या प्रमाणे विवेक रूपी नेत्र निर्मळ करून

रामरूपाचा त्रिविध विवेक आणि बाल व विवाहचरित्र वर्णन केले. शृंगार रस प्रधान चरित्र वर्णन करताना वैराग्याची एवढी आवश्यकता वाटली नाही. **'मुकुर मलीनां नयन विहीनां रामरूप कस दिसेल दीनां'** (१।११५।४) गोस्वामींना निर्मळ विवेक विलोचन मिळाला आहे; परंतु त्यानंतर सुद्धा त्यांना वाटत आहे की, आपल्या मनरूपी आरशावर (मुकुर) कामक्रोधादि मळ व विषयमल, चढलेला आहे. **'वंचक, मिरविति रामभक्त वर । काम-कोप-कनकांचे किंकर ॥ अशांमधें जगिं गणा प्रथम मज ॥** (१।१२।३-४) काम क्रोध लोभ हे तीन महामल आहेत. हे मनावर असूनसुद्धा आतापर्यंत भागले; पण आता वैराग्य प्राप्त करून देणारी परमविरागी रामसेवकांची चरित्रे व त्यागमय रामचरित्र वर्णन करावयाचे आहे. **'अज्ञ अकोविद अंध अभागे । विषय बुरशि मन मुकुरीं लागे'** (१।११५।१) विषयासक्ति रूपी बुरशी मनावर आली आहे ती - **श्रीगुरुपादाम्बुरजें** घासून, **प्रेमभक्तिजलाने धुऊन टाकली म्हणजे मन रूपी आरसा स्वच्छ होईल.** पूर्ण वैराग्य संपन्न होईल व वैराग्यदायक चरित्रे वर्णन करण्याची शक्ती येईल. **'प्रेमभक्ति जलविण रघुवर तो । अभ्यंतर - मल कधीं न जातो.'** (७।४९।६ वसिष्ठ वचन). बालकाण्डात विवेक प्राप्त झाल्याचे सांगितले. (१।२।२).

(२) श्रद्धारूपी धर्मतरुमूळ व विवेक वैराग्यादिकांची प्राप्ति, व वृद्धी गुरु कृपेशिवाय होत नाही; म्हणून तिसऱ्या काण्डातील (अरण्य) पहिल्या श्लोकात शंकरांना विवेकजलधेः **'विवेकजलधे पुर्णेन्दुम्'** आणि **'वैराग्याम्बुजभास्करं'** म्हटले आहे. व बालकाण्ड तिसऱ्या श्लोकांत. **'बोधमयं नित्यं गुरुं शंकरम्'** म्हटले; म्हणजे गुरुच वैराग्याम्बुजभास्कर आहेत. **म्हणून येथे गुरुपदरजांचा उल्लेख केला.** कमल फुलविण्यास सूर्य समर्थ असतो, पण आधी कमळ असले पाहिजे; म्हणजे वैराग्य असले पाहिजे; ते गुरुसेवेनेच मिळू शकेल हे येथे सुचविले; कारण चौथे फळ जो मोक्ष तो विवेक वैराग्यादि असल्याशिवाय मिळत नाही. **गुरुविण नोहे ज्ञान, ज्ञान किं होइ विराग विण'** (७।८९ रा.) गुरुसेवेने श्रद्धा प्राप्त करून त्यांच्या आज्ञेप्रमाणे धर्मतरुची वृद्धी केली तरच 'भवरसविरति' त्यांच्या कृपेने व सेवेने प्राप्त होईल. **'होइ नक्कि भवरस विरति'** ही या

काण्डाची फलश्रुती आहे.

(३) **रघुवर** = राम-लक्ष्मण, भरत-शत्रुघ्न समजणे योग्य आहे. १।१९।१ च्या टीकेत 'रघुवर' शब्दांतील भाव पहावे. 'मायामानुषरूपिणौ रघुवरौ' असे रामलक्ष्मणांबद्दल (किं.मं.१) म्हटले आहे; म्हणून लक्ष्मण रघुवर आहेच; म्हणून भरत शत्रुघ्नही रघुवर ठरतातच. (१।३११।६.७ पहा) (क) चौघांच्या कमीअधिक चरित्राचा उल्लेख फक्त याच काण्डात आहे. रामभरतचरित्र या काण्डात सूर्यप्रकाशाप्रमाणे स्पष्ट अशा दोन विभागांत आहे. **लक्ष्मणचरित्र** = रामलक्ष्मण संवाद, गूहक - लक्ष्मण संवाद, (लक्ष्मण गीता) व चित्रकूटास भरतागमनसमयीचे चरित्र ही अगदी ठळक आहेत. **शत्रुघ्नाचे उघड उघड स्वतंत्र चरित्र फक्त याच काण्डात आहे.** कुबडीला लाथ मारून पाडली वगैरे, बाकी भरताबरोबर जाणेयेणेच आहे. (ख) वैराग्य पूर्णपणे प्राप्त झाले म्हणजे अर्थ व काम यांची इच्छाच रहात नाही, म्हणजेच पूर्ण प्राप्ती होते; आणि रघुवरांच्या या काण्डातील चरित्रांप्रमाणे धर्माचरण केले की गुरुकृपेने वैराग्य प्राप्त होते व वैराग्याने योग, योगाने ज्ञान व ज्ञानाने मोक्ष म्हणजे चौथे फळ (पुरुषार्थ) मिळते; पण या सर्व गोष्टी सद्‌गुरु कृपेनेच मिळतात; म्हणून येथे सद्‌गुरुपद रज वर्णनाने मंगलाचरण केले. येथे पुन्हा गुरुपद रजाचा उल्लेख का? असा प्रश्न काढून टीकाकारांनी आपापल्या कल्पनेने विविध उत्तरे दिली आहेत. कोणाचा कोणास पत्ता नाही. निराधार कल्पनांच्या पायावर बांधलेले अनुमानरूपी बंगले विविध प्रकारचे असणारच ! वरील विवेचन मान्य नसेल त्यांनी मा. पी. मध्ये विविध मते पहावी व पसंत पडेल ते घ्यावे. येथे मंगलाचरण टीका समाप्त झाली. आता या काण्डातील कथाभागाचा उपक्रम केला जाईल. त्या पूर्वी

## अयोध्या काण्डाचे वैशिष्ट्य

(१) **या काण्डाची** रचना अगदी रेखीव नियमबद्ध आहे. अशी इतर कोणत्याही काण्डाची नाही.

(२) प्रत्येक दोह्याच्या अंगभूत ८/८ चौपायाच नियमाने शेवटपर्यंत आहेत. फक्त ५, ८, २०, ६४, १७३, १८५ व २१८ यांत ७।७ च चौपाया

आहेत आणि २९ व २०२ यांत ९।९ आहेत. हे सर्व अपवाद सहेतुक आहेत. हेतू गू.चं. त्या त्या ठिकाणी दाखवते.

(३) प्रत्येक २५ व्या दोह्याच्या अंगभूत १।१ च छंद असून दोह्याच्या ऐवजी सोरठा हे कोमल वृत्त आहे. या नियमाला अपवाद १२५ वा दोहा आहे. तेथे छंद व सोरठा न येता १२६ व्यात छंद व सोरठा आहे. पुढे काण्ड समाप्तीपर्यंत अपवाद नाही. या अपवादाचे कारण गू. चंद्रिकेत दिसते.

(४) बाल. कां. ३६१ दोहे आहेत तर या कांण्डात ३२६ आहेत. मान ांत बालकाण्ड सर्वात मोठे व त्याच्या खालोखाल अयोध्या काण्डाचा विस्तार आहे. सर्वात लहान किष्किंधा काण्ड आहे.

(५) वा. रा. अयोध्या काण्डाचे ११९ सर्ग व बालकाण्डाचे ७७ सर्गच आहेत. काव्य विस्ताराच्या दृष्टीने पाहता वा. रा. अयोध्या काण्ड बा.कां.च्या सुमारे दुप्पट मोठे आहे. (क) भरताने नन्दिग्रामी निवास केल्यानंतर म्हणजेच श्रीरघुनाथाचा अयोध्येशी संबंध सुटल्याबरोबर मानसातील अयो.कां. समाप्त होते. वा.रा. मध्ये अत्री-आश्रम गमनादि भाग अयोध्या काण्डातच आहे. जयंत कथा वा. रा. प्रमाणे अयोध्या काण्डातच घडली हे वा.रा.मधील सुंदर कांण्डांतील उल्लेखाने स्पष्ट दिसते मानसांत ती कथा चित्रकूटलाच घडली असली तरी अरण्यकांण्डारंभी आहे.

(६) एवढ्या मोठ्या कांडांत वक्ता कोण व श्रोता कोण आणि कोणता संवाद चालू आहे याचा थांगपत्ता लागत नाही. सर्वत्र छंद असलेल्या सोरठ्यात (दोह्यांत) छंदांत वा सोरठ्यांत, किंवा दोन्हींत श्री 'तुलसीदास' आहेत; फक्त १२६ व्या दोह्याच्या छंदांत वा सोरठ्यांत कोणाचेच नाव नाही; कारण तुलसीदास ज्यांचे अवतार ते वाल्मीकीच तेथे वक्ते आहेत.

(७) बालकाण्ड सप्त मोक्षपुरीपैकी अयोध्यापुरी आहे; तसे दुसरे काण्ड दुसरी मोक्षपुरी मथुरा आहे. भगवान कृष्णाचा जन्म मथुरेत झाला; पण ते मथुरेतून गोकुळात व नंतर द्वारकेत गेले. तसेच प्रभु राम अयोध्येत अवतरले पण तेथून चित्रकूटास व नंतर पंचवटीत गेले. रामचरित्र व कृष्ण चरित्र यांतील साम्य व वैषम्य आणि रामचतुष्ट्य तेथ कृष्णचतुष्ट्य हे प्रस्तावनेत

'श्रीराम व श्रीकृष्ण' या प्रकरणात दाखविले आहे.

(८) बालकाण्ड व अयोध्याकाण्ड यांचा संबंध जरी अयोध्येशीच असला तरी श्रीरामचरित्रांतील हे दोन भिन्न खंड-विभाग आहेत. एकाचे दुसऱ्याशी अगदीच थोडे साम्य आहे. विवाह होऊन घरी येईपर्यंतचा एक भाग आणि गृहस्थाश्रमात प्रवेश केल्यानंतरचा दुसरा विभाग. असे दोन विभाग प्रत्येक पुरुषाच्या जीवनात (स्त्रियांच्याही) पडतात; तसेच रामचरित्रांत पडले आहेत. वा.रा. अ. रा. अग्निपुराण यांत सुद्धा विवाह होऊन घरी आल्यानंतर बा.कां. समाप्त झाले आहे. अयोध्याकाण्डाच्या पहिल्याच सर्गात 'रामाभिषेकव्यवसाय' सुरू होतो; तसाच येथे पहिल्या दोह्यांतच रामचंद्रांच्या यौवराज्याभिषेकाचा उल्लेख आहे.

(९) या कांण्डांतील सर्व (१३) हिंदी छंद हरिगीतिका या एकाच जातीचे आहेत. हा छंद आणि चौपाई, सोरठा, दोहा या वृत्तांशिवाय इतर वृत्ते या काण्डात मुळीच नाहीत. (मं.च. श्लोक सोडून) तसेच सोरठा वृत्त फक्त तेरा ठिकाणी छंदांच्या बरोबरच आहे. इतर काण्डांत दोह्याच्या अंगभूत आणखी दोहे किंवा दोहे सोरठे मधून मधून दिसतात तसे या कांडांत कुठेच नाहीत. हे काण्ड वात्सल्य, भक्ति, करुणारसाचा सागर असूनसुद्धा कोमलवृत्त सोरठा फक्त १३ ठिकाणीच !

(१०) एका दोह्याच्या अंगभूत छंदसुद्धा एकापेक्षा अधिक जसे इतर काण्डांत कुठे कुठे आहेत तसे या कांण्डांत नाहीत.

(११) बाल, अरण्य, लंका व उत्तर काण्डांत अंगभूत चौपाया मुळीच नाहीत अशी काही स्थाने आहेत; पण असे एकही उदाहरण या कांण्डांत नाही.

(१२) या काण्डांतील भाषा इतर काण्डांपेक्षा अधिक माधुर्यप्रधान आहे; तथापि भरतचरित्र सुरू झाल्यानंतर विशेषतः दोहा २०८ पासून पुढे धर्म, प्रेम, परस्पर, सीय, सीता, राम, लछिमन इत्यादी शब्दांनी अधिक कोमलता आणण्यासाठी धरम, पेम, परसपर, सिय, रामु, लखनु अशी स्वरूपे धारण केली आहेत. प्रस्तावनेत आकडेवार तुलना केली आहे; पण हे मराठीत केले नाही. मराठी शब्दांना रूपांतर करून अधिक कोमल होण्याचे धाडस करवले नाही.

(१३) बालकाण्डांत मुख्य रस जसा वात्सल्य, शृंगार व भक्ति; तसा या काण्डांत मुख्य रस करुणा, वात्सल्य व भक्ति आहे. शोक-विरह-करुणेच्या नद्या अथपासून इतिपर्यंत पुराने व जोराने वहात असून मधून-मधून त्यांना महापूर आले असून जनकविदेहासारखेसुद्धा त्यांत गटंगळ्या खात वहात जातात !

(१४) या काण्डात करुणारस प्रधान असला तरी इतर सर्वांचा मान राखला गेला आहेच. बा.कां.मध्ये जशी अनेक सांग रूपके व भाव निदर्शक अनेक उत्प्रेक्षा आहेत, तशी रूपके व उत्प्रेक्षादि अलंकार या कांडांत ठायी ठायी आहेत. मात्र या काण्डांतील रूपके बा.कां.तील काही रूपकांसारखी फार विस्तीर्ण नाहीत. अयोध्या काण्ड वाचीत असता असे वाटते की तुलसीदासांनी आपले काव्यकला सर्वस्व, अंतःकरणाची कोमलता व माधुर्यभावना इत्यादी या काण्डांत ओतून भरगच्च केले आहे. भरताचे चरित्र इतके उठावदार झाले की काव्यनायक भरतच आहे असा भास उत्पन्न होतो.

(१५) काव्य अत्यंत प्रसादयुक्त, सहज सरल, सुगम व मधुर मधुर आहे. मनुष्य स्वभावाच्या विविध पैलूंचे दिग्दर्शन आदर्शाला धक्का न लावता अत्यंत हळुवार मनाने, कोमल करांनी, परम श्रेष्ठ काव्य कलाकौशल्याने केलेले आहे.

(१६) इतर काण्डांत दोहे व चौपाया यांत चरणांतील १।१ मात्रा मुद्दाम कमी करून भावनिदर्शन केल्याची उदाहरणे कमी-अधिक प्रमाणात आहेत; परंतु तसे एकही उदाहरण या काण्डांत नाही. बालकाण्डात फक्त काही थोड्या दोह्यांतच मात्रा न्यून आहे.

(१७) प्रीतीला वश होऊन धर्मनीतीचा व शीलाचा त्याग परम दुःखद व कठीण प्रसंगीसुद्धा कोणी केलेला नाही हे प्रस्तावनेत उदाहरणांसह दाखविले आहे व टीकेत दिसेलच. नीति व शील यांना प्रीतीपेक्षा अधिक मान सर्व सज्जनांच्या चरित्रांत दिलेला आहे.

(१८) बहुतेकांच्या धर्मशीलतेची कसोटी व परीक्षा या काण्डांत झाली आहे. स्वधर्मरक्षण, रामप्रेम, त्याग व वैराग्य हे या काण्डाचे मोठे वैशिष्ट्य आहे.

(१९) या काण्डात वाक्प्रचार व सुभाषिते भरपूर आहेत व यांतील अनेक हिंदी भाषेत सहज रूढ झाली आहेत. बालकाण्डातील उत्तर भागात जो आनंद

व प्रसन्नतादि गुणांचा सागर भरला आहे तो पुढे संपूर्ण मानसात कुठेच नाही. त्याप्रमाणेच भक्तिरसाचा सागर या काण्डात जसा भरला आहे तसा इतर काण्डांत नाही; विरहाने, वियोगाने भक्ति प्रेमाला भरती आलेली आहे.

(२०) यांत उत्तरार्धाची-भरतचरित्राचीच फलश्रुति सांगितली आहे. व्रत शम, दम, यम नियम इत्यादी धर्मदलाच्या आचरणाची आवड उत्पन्न होऊन त्याने शुद्ध वैराग्य प्राप्त होईल.

(२१) या काण्डाचा प्रतिनिधी श्लोक बाल मंगलाचरणांतील दुसरा 'भवानी शंकरौ वन्दे श्रद्धाविश्वास-रूपिणौ...' हा आहे. त्याचा संबंध या काण्डांतील मं.श्लो.१ 'यस्यांकेच विभाति भूधरसुता...' याच्या टीकेत या पूर्वीच दाखविला आहे. प्रथम विश्वास, अढळ विश्वासरूपी शंकर पाहिजे. नंतर श्रद्धारूपी भवानी भूधरसुता त्या विश्वासाच्या मांडीवर आरूढ झाली पाहिजे. राम व भरत यांचा अढळ, अक्षय विश्वास आणि एकमेकांविषयी श्रद्धा = आदर किती आहे हे संपूर्ण भरतचरित्रांत अनेक वेळा स्पष्ट दिसते. दोघांचा आपापल्या धर्मावर व नीतीवर अढळ विश्वास असून दोघेही आपापल्या धर्माचे पालन परम सात्त्विक श्रद्धेने करीत असलेले दिसतात; 'श्रद्धेवीण धर्म कधि न घडे' विश्वास-श्रद्धारूपी अचळ दृढ पायांवर दोघांनी आपली धर्मरुपी विशाल, अनुपम, रमणीय, प्रलोभनीय, गगनचुंबी इमारत उभारली आहे. या धर्माचरणाचा परिणाम फल म्हणून दोघांमध्ये परम त्याग व परम विराग (बाह्य त्याग व अन्तर्वैराग्य) अत्यंत अलौकिक असे दिसून येते. 'विरतिस धर्म दे' (१|१६|९) धर्माचरणाचे फळ वैराग्यच आहे; व तेच या काण्डातील भरत चरित्राने मिळवावयाचे आहे. तीच फलश्रुति आहे. (क) राम व भरतच विश्वास श्रद्धायुक्त आचरण करून वैराग्यशील झाले असे नसून मंथरा व कैकयीशिवाय सर्वांनीच विषय भोगांचा त्याग केला आहे.

(२२) मानसशास्त्राच्या विविध अंगांचे सहज निदर्शन ठायी ठायी केलेले गू.चं. त स्पष्ट दिसेल.

(२३) करुणारस प्रधान असला तरी तो स्वधर्म निष्ठा व भगवत्प्रेम यांवर अधिष्ठित आहे.

(२४) कैकयीच्या चरित्रात स्वार्थी, राज्यलोभी, कुटिल कारस्थानी, राजकारणी व्यक्तींचा व प्रबल झालेल्या अबलांचा आदर्श अध्यारोपाने निर्माण करून, नंतर त्याचा अपवाद करून कैकयीला पूर्ण निर्दोषी ठरविलेली आहे.

(२५) इंद्रादी देवांच्या निमित्ताने स्वार्थी सत्ताधारी, लक्ष्मीपुत्र इत्यादींच्या स्वभावाचे यथार्थ चित्र सुभाषितरूप वाक्यांनी उठावदार काढलेले दिसते; पण त्याचा अपवाद-निरास मात्र केलेला दिसत नाही; कारण या दुर्गुणांचे निरसन करण्यास लागणारी भगवत्कृपा भक्तीच्या अभावी देव प्राप्त करू शकत नाहीत.

(२६) भरतासारख्या सत्पुत्रामुळेच कैकयीचा उद्धार झाला, तिला पश्चाताप झाला.

(२७) राम प्रेमभक्तीचा ताम्रपट केवळ उच्च वर्णीय स्पृश्यांनाच दिलेला नसून निषाद राज, कोळी, भिल्लसुद्धा प्रयागातील सुशिक्षित नागरांपेक्षा अधिक श्रेष्ठ रामभक्त असलेले दिसतील. प्रयाग व यमुनातट यात्राप्रकरण व चित्रकूट निवासप्रकरण पहावे.

(२८) सर्वांना सुखदायक शासनपद्धती कशी असावी हे या काण्डांत प्रामुख्याने दाखविले आहे. प्रस्तावनेत 'तुलसीशासन पद्धती' हे प्रकरण पहावे.

(२९) गुरु-शिष्यांची स्वभाव समता लक्ष्मण व निषादराज यांच्या चरित्रांत दिसते.

(३०) पूर्ण अंतस्त्यागी व पूर्ण बाह्यत्यागी असून आपले स्वत्व पूर्ण विसरून सेवक धर्माचे आदर्श चरित्र म्हणजे रामसेवामूर्ति लक्ष्मण. **लक्ष्मण चरित्र देवचरित्र म्हणून रंगविले आहे. प्रस्तावनेत 'चरित्रचित्रण' प्रकरणातील विविध चरित्रे पहावी.**

(३१) प्रपंचात राहून अन्तर्बाह्य त्यागी पण व्यावहारिक संबंध पाळणाऱ्या सेवकाचा आदर्श म्हणजे भरतचरित्र. **भरतचरित्र साधकाचे चरित्र आहे.**

(३२) उत्तम मातेचा व उत्तम राणीचा आदर्श म्हणजे 'पुनीत कौसल्या देवी.'

(३३) उत्तम राजाचा व पित्याचा आदर्श म्हणजे पुण्यपुरुष दशरथांचे चरित्र.

(३४) उत्तम जननीचा, व्यवहार चतुर पतिव्रतेचा आदर्श सुमित्रा देवी.

(३५) नीच दासीचा आदर्श कुबडी, मंथरा.

(३६) उत्तम गुरुंचा आदर्श वसिष्ठ; भरतचरित्रांत दिसतील.

(३७) भोळ्या, भोगप्रिय, अहंकारी, रागीट, पतिप्रिय रामभक्त स्त्रीचा आदर्श कैकयी !

(३८) उत्तम कन्या, उत्तम पतिव्रता व भावजय यांचा आदर्श सीता जानकी.

(३९) उत्तम पुत्र, पति, ज्येष्ठ बंधु, शिष्य इत्यादींचा आदर्श रघुनाथ राम.

(४०) उत्तम कन्या – मातापिता यांचे आदर्श सुनयना व जनक याच कांण्डांत दिसतात.

(४१) उत्तम भगवद्‌भक्त सेवकाचा आदर्श शत्रुघ्न.

(४२) उत्तम रामभक्त सचिवाचा आदर्श सुमंत्र.

(४३) उत्तम वक्तृत्वाचे आदर्श नमुने म्हणजे कैकयी मंथरा संवादातील मंथरेचे भाषण. दशरथ-कैकयी संवादांतील कैकयीचे भाषण, भरताचे अनेक ठिकाणचे भाषण आणि विशेषतः अयोध्या व चित्रकूट येथील दरबारातील व सभांतील भरताचे व वसिष्ठांचे भाषण.

(४४) 'रामदास रामाहुनि मोठे' हा सिद्धान्त भरतचरित्रांत व रामचरित्रांत वारंवार सिद्ध करून दाखविला आहे.

(४५) भक्त व भगवान यांची पूर्ण अभिन्नता या काण्डांत भरत व राम यांच्या चरित्रांत दिसते.

मानसांतील अयोध्या काण्डाचे वैशिष्ट्य जेवढे दाखवावे तेवढे थोडेच. हे सर्व आदर्श शुद्ध, अगाध प्रेमाच्या रसांत, स्वधर्मनिष्ठेच्या पायांवर, परम रमणीय प्रसाद, माधुर्यादी काव्यगुणांनी व निर्दोष, परमश्रेष्ठ काव्यात चित्रिले असल्याने **मानसातील अयोध्या काण्डासारखे अयोध्या काण्ड व काव्य जगातील कोणत्याही भाषेत किंवा देशात नाही.** सहज स्मरणाने जेवढे वैशिष्ट्य दाखविता आले तेवढे यथामति दाखविले गेले. वाचक यांत आणखी पुष्कळ भर घालू शकतील.

अयोध्याकाण्ड वैशिष्ट्य समाप्त.

●●●

आता अयोध्या काण्डातील कथेला प्रारंभ होईल :

हिं. — ***। जब तें राम ब्याहि घर आए । नित नव मंगल मोद बधाए ॥१॥***
***। भुवन चारिदस भूधर भारी । सुकृत मेघ बरषहिं सुख बारी ॥२॥***
***। रिधि सिधि संपति नदीं सुहाई । उमगि अवध अंबुधि कहुँ आई ॥३॥***
***। मनिगन पुरनर नारि सुजाती । सुचि अमोल सुंदर सब भाँती ॥४॥***

म. — ***। जैंहुनि राम विवाहुनि आले । मुद मंगल उत्सव नव चाले ॥१॥***
***। भुवन चार दश भूधर भारी । वर्षति सुकृत - मेघ सुख-वारी ॥२॥***
***। ऋद्धि सिद्धि संपत् शुभ सरिता । अयोध्यांबुधीं येती भरिता ॥३॥***
***। मणिगण सुजाति पुर नारी नर । सर्वपरीं शुचि अमोल सुंदर ॥४॥***

**अर्थ :** जेव्हापासून राम विवाह करून (घरी) आले तेव्हापासून नित्य नवे आनंदमंगलोत्सव चालू आहेत. ॥१॥ चार व दहा भुवने हे मोठे पर्वत (भूधर) होत; व सुकृतरूपी मेघ सुखरूपी जलाचा वर्षाव करू लागले. ॥२॥ ऋद्धिसिद्धी व शुभ संपत्ती (संपत्) या सरिता अयोध्यारूपी सागरात भरभरून येऊ लागल्या. ॥३॥ नगरातील उत्तम जातीचे (जन्मानेच शुभ असणारे) पुरुष व स्त्रिया उत्तम जातीचे मणिसमूह असून ते सर्व प्रकारे पवित्र, अमोल व सुंदर आहेत ॥४॥.

**टीका.चौ. १.(१) जैंहुनि राम विवाहुनि आले'** : 'राम येति घरिं यदा विवाहुनि । पुरिं आनंद वसति सब तैंहुनि ॥ (१।३६१।५) या बाल काण्डातील चौपाईचाच येथे पुन्हा उच्चार करून मागील कथासंदर्भ स्पष्टपणे सुचविला. रामचंद्र आपला व भावांचा विवाह उरकून आल्यानंतर अयोध्येत पूर्वीपेक्षा अधिक सुख-समृद्धि का निवास करू लागली? याची चर्चा वरील चौपाईच्या टीकेत पूर्वी केली आहे. **(क)** नित्य नवे आनंद मंगलोत्सव चालण्याचे मूळ कारण 'सितारामयश मंगलदायक' (१।३६१।७) हे आहे. अयोध्यावासी सर्व नारीनर नित्य नवीन उत्साहाने, नित्य नव्या उत्सवांत त्या यशाचे गान करतात हे 'कविकुलजीवन पावन-कारक जाणुनि' (१।३६१।७) या वचनाने सुचवि आहे.

**चौ. २-४(१) भुवन चार दश भूधर भारी :** या चौपाईपासून पुढील या दोह्यांतील चौपायांत रामविवाहानंतर व राज्याभिषेकाच्या तयारीपर्यंत जो (चार

वर्षांचा) काळ गेला त्यातील अयोध्येतील व चतुर्दश भुवनातील स्थितीचे अति संक्षेपाने वर्णन आहे. (क) **भुवन चार दश चौदह** = चौदा असे न म्हणता चार व दश म्हणण्यात सत्य, तप, जन व मह या चार शेवटच्या लोकांना निराळे काढून त्यांचे इतर दहा भुवनांतून श्रेष्ठत्व दाखविणे हा हेतु आहे. पुढे वनवासाच्या वर्षांचा उल्लेख सुद्धा आरंभी आरंभी चारदश असाच केला आहे. जणू चौदा भुवनातील दुःखांचा विनाश करून त्यांना सुखशांतीमय करण्यासाठीच चौदा वर्षांचा वनवास प्रभूंनी पत्करला असावा. (ख) या व पुढील दोन चौपायांत पर्वत, मेघ, पाऊस, सरिता व सागर यांचे सांगरूपक आहे. सागराच्या जलाचेच मेघ बनून ते शेकडो, हजारो कोस दूर असलेल्या पर्वतांवर वृष्टी करतात; त्या पर्वतांवर सरितांचा - नद्यांचा उगम होऊन त्या सागरापर्यंत जाऊन आपली जलरूपी संपत्ती त्यांच्यात साठवून, त्यांच्याशी एकरूप होऊन, अचल होतात. तोपर्यंत त्यांच्या जलाला स्थिरता येत नाही. 'सरिता जल जलनिधिमधिं जाउनि । होइ अचल जिव इव हरि पाउनि' (४।१४।८) सागराची इच्छा नसता नद्या आपले जल त्यांत साठवीतच राहतात. 'सागरि सरिता जाति जशा ही । जरी कामना तयास नाहीं (१।२९४।२)

(२) **सागरांतील जलच मेघात भरलेले असते.** सुकृत मेघ आहेत व 'सुखवारी' वर्षतात; म्हणून अयोध्येतील सुखच सुकृत मेघात भरलेले असते. सागर जसा अगाध, अपार, न्यूनाधिक न होणारा, जलाची इच्छा, कामना, नसलेला, अनंत जलाशय आहे; तशीच रामविवाहानंतर अयोध्या सर्व सुखांचा अगाध, अपार, अनंत, सदा परिपूर्ण, पूर्ण काम महासागर आहे. सागरातील जलच मेघ सर्व भुवने रूपी मोठ्या पर्वतांवर वर्षतात. तसेच अयोध्येत उत्पन्न होणारे सुकृत-पुण्य-मेघ सुखरूपी जल चौदा भुवने रूपी महा **पर्वतांवर** - भूधरांवर - वर्षतात.

(३) पर्वतांवर मेघानी जलाची वृष्टी केली की **तेथे** नद्या उगम पावतात तशा ऋद्धि-सिद्धी व शुभ संपत्तीरूपी शुभनद्या-महानद्या अयोध्येत जन्मलेल्या सुकृत मेघांच्या औदार्याने सर्व भुवनांत उगम पावतात; म्हणजे हे दाखविले की **अयोध्याच चौदा भुवनांतील ऋद्धिसिद्धि-संपत्ती नद्यांचे मूळ कारण आहे.**

सुखवारी, पाणी = सुख; नदी = ऋद्धी, सिद्धि व संपत्ती. नद्यांच्या मुळे मधुर पाणी मिळते; तसे ऋद्धिसिद्धी संपत्ती नद्यांतून चौदा भुवनांपासून अयोध्या सागरापर्यंतच्या सर्व भागांस ऋद्धिसिद्धीसंपत्ती जनित सुख मिळत आहे.

(४) **नद्या उगमाच्या ठिकाणी स्थिरावत नाहीत.** त्या आपला पति जो सागर (नदीपति, सरितापति) त्याला भेटण्यास धावत जातात व तेथे स्थिर होतात. तशा ऋद्धिसिद्धिसंपत्ती नद्या सुखरूपी मधुर व निर्मल पाण्याने भरलेल्या, अयोध्यारूपी आपल्या पतीला भेटण्यासाठी त्याची इच्छा नसतानाही तुडुंब भरून येत आहेत. (क) सरितांनी वाटेल तितके पाणी भरले तरी सागर नको म्हणत नाही व आपली मर्यादा ओलांडीत नाही. तसेच चौदा भुवनातील सर्व सुख ऋद्धिसिद्धिसंपत्ती अयोध्येत आणित असल्या तरी **तो सागर भरत नाही व आपली धर्म-नीतिमर्यादा सोडत नाही.**

(५) अर्थ, धर्म, काममोक्ष व त्यांच्या क्रिया शत्रुघ्न, भरत, लक्ष्मण व रामरूपाने आणि श्रुतिकीर्ति, मांडवी, उर्मिला व सीतारूपाने अयोध्येत रहात असल्याचा हा परिणाम आहे. (दो. ३२५ बा.कां. टीका पहा) (क) ऋद्धिसिद्धिसंपत्ती सरितांनी आणलेल्या सुखजलाची-पाण्याची अयोध्येला मुळीच इच्छा नाही; कारण अर्थ, धर्म, काम व मोक्ष यांच्यापेक्षा श्रेष्ठ सुख, भक्तिसुख, अयोध्येला भरपूर मिळत आहे. हे भक्तीसुख चौदा भुवनांना गोड वाटत नाही, म्हणून त्यांना अयोध्यारूपी महासागरातील अर्थ, धर्म, काम सुख देणाऱ्या ऋद्धिसिद्धी व मोक्ष सुख देणाऱ्या दैवी संपत्ती रूपी सरितांचे पाणीच गोड वाटते; परंतु या सरितासुद्धा तेथे स्थिर न राहिल्यामुळे त्यांचे ते ते सुख सुद्धा अस्थिर असते.

**'स्थळविण जळ कधिं राहुं न शकतें । यत्नकोटिही करून विविध ते ॥ तसें मोक्षसुख बघ खगराया । टिकुं न शके हरिभक्ति विना या ॥ हें समजुनि हरिभक्त सुज्ञ जे । मुक्ति अनादरिति - भक्तिसुख ते ॥ स्वामि ! मुक्ति ती रामा भजतां । येइ जबरिनें इच्छा नसतां'** (७।११९।५-७-४) अशाच या ऋद्धिसिद्धिसंपत्ती सरिता सुखरूपी पाणी घेऊन अयोध्येत येत असल्या तरी अयोध्यावासी नरनारी त्यांची उपेक्षा करीत आहेत. (ख) **ऋद्धिसिद्धिंनी अर्थ धर्म काम यांपासून**

**मिळणारे सुख मिळू शकते; व दैवीसंपत्तीने मोक्षसुख मिळू शकते,** पण ते प्रेमभक्तीवाचून स्थिर रहात नाही व ती भक्ति ब्रह्मलोकादि पाताळपर्यंतच्या चार व दहा भुवनांना खारट वाटते म्हणून तेथील ऋद्धिसिद्धिंचे सुख व दैवी संपत्तीचे सुख ही सर्व अस्थिर आहेत. **'आम्हि परम अधिकारि देवता । प्रभो । स्वार्थरत भक्ति विस्मृता ।** (६।११०।११) असे सर्व देवांचेच म्हणणे आहे. ब्रह्मदेव म्हणतात **'धिग् जीवन देव शरीर हरे ।। तव भक्तिविना भवभूलि खरे'** (६।१११।९) **(ग) चार व दहा असा भेद भुवनांत करण्यांत एक हेतु हा आहे की** इंद्र लोकापासून खालच्या (दहा) भुवनांत मोक्षसुख मिळू शकत नाही; तेथे फक्त ऋद्धिसिद्धिप्राप्त भोगसुखच मिळू शकते. महर्लोकापासून वरच्या चार लोकांत मोक्षसुखसुद्धा मिळू शकते; पण ब्रह्मलोकांतसुद्धा मोक्षसुख स्थिर राहू शकत नाही हे वर दिलेल्या ब्रह्मदेवाच्या वचनाने (६।१११।९) सिद्ध झाले आहे. ऋद्धिसिद्धिंनी नाना प्रकारची सर्व संपत्ती मिळाली तरी शुभसंपत्ती = मोक्षदायक दैवी संपत्ती मिळत नाही. **'दैवी संपत् विमोक्षाय' (भ.गी.) म्हणून ऋद्धिसिद्धि व शुभसंपत्ती असा भेद केला आहे.** इतर सर्व संपत्ती विनाशशील व अनर्थकारक असल्याने त्या अशुभ आहेत व दैवी संपत्ती मोक्षदायक ती शुभ आहे. भोगदायक सर्व संपत्तीचा अन्तर्भाव ऋद्धिसिद्धिंत होतो; म्हणून शुभ संपत् म्हणजे दैवी-संपत्ती हाच अर्थ घेणे जरूर आहे. ऋद्धिसिद्धी तर साधकाच्या ज्ञानदीपाला विझवून त्याचे अहित करणाऱ्या आहेत. 'ऋद्धिसिद्धी बहु दे बा ! धाडुनि । मतिला प्रलोभ दाविति येउनि ।। कळ बळ छळ करि समीप जाते । वीझवी दीपा अंचल वातें ।। असे बुद्धि जर परम शहाणी । तिज न लक्षिते अहित जाणुनी' (७।११८।७-९) । माया ऋद्धिसिद्धींच्या पाठीशीच असते. या ऋद्धिसिद्धी अहितकारक आहेत हे भरताच्या परम शाहण्या बुद्धीला माहीत होते म्हणून भरताने भरद्वाजाश्रमातील ऋद्धिसिद्धींनी निर्माण केलेल्या सुखभोग संपत्तिकडे सबंध रात्रीत ढुंकूनसुद्धा पाहिले नाही — याच काण्डातील दो. २१५ टीकेसहीत पहा. **(ड) 'मणिगण सुजाति पुर नारी नर... सुंदर'** — सांगरात अनेक प्रकारचे 'मणि गण - समूह' असतात. ते जरी उत्तम जातीचे, अमूल्य आणि सुंदर असले तरी 'सर्व परीं शुचि' = सर्व प्रकाराने पवित्र नसतात.

ते जड, विनाशशील, कलह - लोभ - राग - द्वेषादि उत्पादक असतात. अयोध्येतील नारीनर समूह असे अपवित्र नाहीत. ज्या मणिसमूहामुळे कामक्रोध आदींची उत्पत्ति तर होत नाहीच पण ज्यांच्या समीपसुद्धा कामादि खल येऊही शकत नाहीत असे हे अयोध्येतील मणिगण आहेत. ते सर्व अविनाशी नित्यमुक्त आहेत कारण ते सर्व भगवंताबरोबरच अविनाशी नित्य वैकुंठात जाऊन राहणारे असे 'सर्वपरीं शुभ अमोल सुंदर' असे मणि म्हणजे भक्तिचिंतामणिच आहेत. जसे - 'राम भक्ति चिंतामणी सुंदर ।... परम प्रकाशरूप दिनराती । काहीच नको दिवा घृत वाती ॥ निकट मोह दारिद्र्य येत ना । त्याला विझवी लोभ वात ना ॥४॥ प्रबल अविद्या तिमिर नासतो । सकल शलभ समुदाय हारतो ॥५॥ खल कामादि निकट ना वळती ।... गरल सुधासम अरि हित होती । 'त्या मणि विण सुख कुणि न पावती ॥ (७।१२०।२-७) या प्रमाणे **सर्व पुरनरनारी भक्तिमणिसमूह आहेत.** श्रवणादिक नवविधा भक्ति; शबरीला सांगितलेली नवविधा भक्ति, (३।३५।८ पासून ३।३६।७ पर्यंत) वाल्मीकीने सांगितलेली १४ प्रकारची भक्ति व प्रेमभक्ति असे हे भक्तिमण्यांचे विविध गण आहेत; तेच अयोध्यावासी लोक समजावे. **'श्रीगुरुपदनख-मणिगणजोती । स्मरतां दिव्य दृष्टि हृदिं होती ॥ रामचरित मणि माणिक दिसती ॥** (१।१।५-८ पहा) १।१।५ मधील मणिगण = दशविध भक्ति असाच अर्थ या टीकेत तेथे केलेला आहे. तोच अर्थ येथे मणिगण शब्दाचा आहे. अहिमणि, गजमुक्तामणि व रत्नादिमणि यांची प्राप्ती ऋद्धिसिद्धींनी सहज होते. **ऋद्धिसिद्धींचा उल्लेख करून पुन्हा 'मणिगण' म्हटले आहे म्हणून ऋद्धिसिद्धींनी न मिळणारे मणीच येथे घेणे जरूर आहे.**

(... ठे. या रूपकाचे पृथक्करण करीत गेल्याने सहज ओघानेच संपत्ती (संपुट) व मणिगण या शब्दांचे **गोस्वामीजींचे भावार्थ आजच बाहेर पडले** व या सर्व सरिता अयोध्येकडे का येतात याचे कारण मानसाधारेच सापडले. तीन ओळींच्या एका रूपकाने किती व्यापक व विस्तृत अर्थ आणि उपक्रमोपसंहाराशी सुसंगत भाव दाखवून ठेवले आहेत हे पाहिले म्हणजे तुलसी-काव्यकलेचे व या मतिमंद लेखकाच्या भाग्याचे कौतुक करावे तेवढे थोडे असेच वाटते !

हा अर्थ निघाला नसता तर शुभसंपत् व सर्वपरी शुचिमणि यांचा निर्दोष उचित अर्थ लागला नसता व पिष्टपेषण किंवा द्विरुक्ति दोष 'संपत्ती' व 'मणि' या शब्दांनी उत्पन्न केला असता; आणि या नद्या अयोध्येकडे का धावतात याचे समाधानकारक कारण सापडले नसते. हा इतका विस्तार तीन गैपायांचा झाला तेव्हा त्यातून ही गूढभाव रत्ने हाती लागली.

**ति —** ***।कहि न जाइ कछु नगर बिभूती । जनु एतनिअ बिरंचि करतूती ॥५॥***
***। सबबिधि सब पुर लोग सुखारी । रामचंद मुख चंदु निहारी ॥६॥***
***। मुदित मातु सब सखीं सहेली । फलित बिलोकि मनोरथ बेली ॥७॥***
***। राम रूपु गुन सीलु सुभाऊ । प्रमुदित होइ देखि सुनि राऊ ॥८॥***

**म. - -** ***। कांहि न वदवे नगर - विभूती । जणुं इतकिच विरंचि कर्तूती ॥५॥***
***' सकल सुखें पुरजनां समस्तां । रामचंद्र मुखचंद्र निरखतां ॥६॥***
***। पखि-साजणिंसह माता मुदिता । बघुन मनोरथ-वल्ली फलिता ॥७॥***
***। रा' - रूप - गुण - शिला स्वभावा । बघुनि परिसुनी प्रमोद राचा ॥८॥***

**अर्थ :** नगरा नी विभूती काही वर्णन करता येणे शक्य नाही. (पण असे वाटते की) विरंचि चे कर्तृत्व केवळ इतकेच आहे.।।५।। सगळ्या पुरवासी लोकांना सर्व प्रकारचे सुखे रामचंद्रांच्या मुखचंद्राच्या अवलोकनाने मिळत आहेत.।।६।। मैत्रिणी व सहचरींसह सर्व माता आपली मनोरथवल्ली फळली (सफल झाली) असे पाहून आनंदित आहेत.।।७।। रामचंद्रांचे रूप, गुण, शील व स्वभाव पाहून व ऐकून दशरथ राजाला परम आनंद होत आहे.।।८।।

**टीका. : चौ.५.(१) कांहिं न वदवे नगर बिभूती — कर्तूती —** या चौपाईत अयोध्येतील नुसत्या विभूती चे वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे. विभूती = अणिमादिक सिद्धींपासून प्राप्त होणारे ऐश्वर्य = ऋद्धिसिद्धीजनित ऐश्वर्य. ऋद्धिसिद्धी व शुभ संपत्तीच्या सरिता चौदा भुवनांतून अयोध्येत येत आहेत असे पूर्वी सांगितले. चौदा भुवने विरंचीने, ब्रह्मदेवाने निर्माण केली आहेत; म्हणून या नद्या जणू ब्रह्मदेवाने निर्माण केलेले ऐश्वर्य आपल्या बरोबर घेऊन येत आहेत. पर्वतावरून वहात निघालेल्या नद्या आपल्या पाण्याबरोबर त्या त्या भागांतील अनेक वस्तू वाहून नेतात. तसेच या नद्या करीत आहेत. या नद्या

ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्या ऐश्वर्याने अयोध्या सागर भरण्याचा प्रयत्न सतत रात्रंदिवस करीत आहेत. पण तो काही भरत नाही; म्हणजेच ब्रह्मदेवाचे कर्तृत्व अयोध्या सागराला भरू शकत नाही. अयोध्या सागरातील ऐश्वर्य ब्रह्मदेव निर्मित ऐश्वर्याने लेशमात्र वाढत नाही. रोज अत्यल्प जरी वाढले असते तरी पुष्कळ दिवसांनी भरला असता. पण तो वाढत नाही की कमी होत नाही; त्यामुळे असे वाटते की इतकेच का ब्रह्मदेवाचे कर्तृत्व? अयोध्येच्या ऐश्वर्यापुढे ब्रह्मदेवाच्या सृष्टीतील ऐश्वर्य असून नसल्यासारखे अत्यंत तुच्छ, नगण्य वाटते. सार हे की **ब्रह्मदेवाच्या सृष्टीतील ऐश्वर्याची अल्पसुद्धा इच्छा अयोध्येला नाही. अयोध्येतील ऐश्वर्य ब्रह्मदेव निर्मित नाही.** हे येथे या उत्प्रेक्षेने सुचविले. (**क**) अयोध्येत अनुपम, अलौकिक सुखाचे चार सागर आहेत पण त्यात एक महासागर आहे. अयोध्येतील लोकांना ऋद्धिसिद्धीजनित व मोक्षजनित सुखाची मुळीच इच्छा नाही. अयोध्येतील लोकांना मिळत असलेल्या परमसुखापुढे ब्रह्मदेवाच्या सृष्टीतील ब्रह्मदेवाच्या कर्तृत्वाने निर्माण केलेले ऋद्धिसिद्धी व मोक्षजनित सुख म्हणजे अर्थ, धर्म, कामसुख व मोक्षसुख अत्यंत तुच्छ वाटते. अनादरणीय वाटते. दो. १८५ पहा. अशी अयोध्येची भावना आहे. '**सुकित अनादिरि धनिकसुख ते**' अयोध्येचे परम ऐश्वर्य कोणते व कशाने परमसुख होते हे पुढील चौपाईत सांगतात. ज्या ऐश्वर्याने अयोध्येला परम सुख होते ते ऐश्वर्य अनिर्वचनीय का हेसुद्धा पुढील चौपाईवरून कळते.

**चौ. ६ : (१) सकल सुखें पुरजनां समस्तां - निरखतां - रामचंद्रांच्या मुखचंद्राच्या अवलोकनानेच अयोध्येतील लोकांना सर्व प्रकारचे सुख मिळते.** हे लोक यामुळेच सर्व प्रकारच्या सुखाने परिपूर्ण आहेत असे या चौपाईत सांगितले. ऋद्धिसिद्धी व ज्ञान संपत्ती-मोक्षश्री-रूपी ऐश्वर्याने मनुष्याला सर्व प्रकारचे सुख मिळू शकते असा ब्रह्मदेव निर्मित चतुर्दश भुवनांचा अनुभव आहे; पण अयोध्येतील लोकांच्या सर्व सुखाचे कारण राममुखचंद्रदर्शन आहे. म्हणजे रामच अयोध्येचे सर्व प्रकारचे ऐश्वर्य आहेत. राम अनिर्वचनीय म्हणून अयोध्येची विभूती अनिर्वचनीय आहे. (**ख**) **शंका** : राममुख दर्शनाने केवळ लोचनसुख, नयनानन्द लाभ होईल; पण सर्व प्रकारचे सुख कसे मिळेल?

**समाधान : 'चारी (बंधू) शील-रूप-गुण-धामहि । तदपि अधिक सुखसागर रामहि'** (१।१९८।६) **'जो आनंदसिंधु सुखराशि' 'तो सुखधाम राम तन्नाम –'** (१।१९७। ५-६) राम सर्व सुखाचे धाम, आनंदसिंधु, सुखराशी - सुखसागर आहेत. **'नाना सुप्रजळीं जी कार्यें महाजळाशयिं तीं घडती'** (सं.स.गी. २।४६). म्हणून सर्व प्रकारचे सुख मिळते. **'सर्व सुखाचे आगर । बाप रखुमादेवी वर' राम वनवासाचा अयोध्यावासी लोकांवर काय परिणाम होईल याची यावरून कल्पना करता येईल. ऋद्धिसिद्धीसंपत्ती इ. सर्व ऐश्वर्य असून त्यांचे सर्व प्रकारचे सुखच त्यांना सोडून जाईल. असेच झालेले पुढे दिसेल.**

**चौ. ७ : (१) सखि साजणिंसह माता मुदित... फलित** – या चौपाईत अंतःपुरातील स्त्रियांच्या विशेष सुखाचे वर्णन करतात. माता, त्यांच्या सखी व सहचरी (साजणी) यांची इच्छा होती की राम व बंधु यांचे विवाह होऊन सुंदर, सद्गुणी, पतिव्रता व धर्मशील सुना आपल्या डोळ्यांनी पहाव्या. ही त्यांची इच्छा सफल झाली आहे; म्हणून त्या आनंदात आहेत. पुढे कैकयी म्हणते त्या वरून मातांच्या मुख्य मनोरथवल्लीची कल्पना करता येते. **'विधि देइल जर जन्म कुमनुज । देवो सीता सून राम सुत'** (२।१५।७) **(क)** नगरांतील लोकांना राममुखचंद्र दर्शनाने सर्व प्रकारची सुखे मिळतात. ती या अंन्तःपुरातील स्त्रियांना मिळतातच, पण सीतामुखचंद्र अवलोकनाचे सुख या अन्तःपुरातील स्त्रियांना अधिक मिळते म्हणून त्यांना नगरलोकांपेक्षा अधिक विशेष आनंद मिळत आहे हे सुचविले. **ज्या प्रमाणात आनंद त्या प्रमाणात पुढे दुःख होणार !**

**(ल.डे.)** (१) तुलसीदासांनी येथे मनोरथ बेली यात मनोरथ स्त्रीलिंगी वापरला आहे; पुढे 'मनोरथ सुरतरु' म्हणणार आहेत. मनोरथ शब्द काही ठिकाणी स्त्रीलिंगी व काही ठिकाणी पुल्लिंगी वापरला आहे. १।८।६, १।१४।३; १।७४ १।२३६।४ यांत पुल्लींगी वापरला आहे व १।१४ मः २।२९।२, २।१०३।२ इत्यादींत स्त्रीलींगी वापरला आहे. (२) ('फलित' च्या जागी कोणी कोणी 'फुलित' असा पाठभेद निर्माण केला आहे; कारण वेलीला फळे येत नाहीत व फळे ही वेलींची शोभा नाही; असे ते म्हणतात. फळे येणाऱ्या वेली आहेत व त्या फळांनी लगडलेल्या वेली सुंदरही दिसतात, हे रानांतील

वेलीविषयी झाले; पण तोंडली, परवर, कारली, करडोली इत्यादी अनेक वेलींना फळे येतात हे महाराष्ट्रात तरी सर्वांना माहीत आहे. या वेलींना नुसती फुलेच आली व फळे आली नाहीत तर त्या वांझ समजून उपटून टाकल्या जातात. **नित्य जवळ, अनुभवास येणाऱ्या गोष्टींकडे माणसांचे लक्ष जात नाही !**) पुढील चौपाईत दशरथांच्या विशेष आनंदाचे वर्णन आहे. पुरुषांच्या भावना निराळ्या व स्त्रियांच्या भावना निराळ्या असतात. **मातेचे मनोरथ निराळे व पित्याचे मनोरथ निराळे असतात.** पुत्र कर्ता होऊन त्याने प्रपंचाचा भार आपल्या शिरावर घेऊन वृद्धपणी आपणास (पित्यास) विश्रांती द्यावी हा बापाचा मुख्य मनोरथ असतो. मनासारखी सून मिळावी हा मातेचा मनोरथ असतो.

**चौ. ८. (१) रामरूप - गुण - शील व स्वभाव** पाहून व ऐकून दशरथांस प्रमोद होत आहे. मातांना मोद व दशरथांना प्रमोद होत आहे; म्हणजे मातांपेक्षा दशरथांना अधिक आनंद होत आहे हे दाखविले. **(क) रूप** - नेत्रांचाच विषय असल्याने पाहता येते; पण ऐकता कसे येईल? व गुण, शील, स्वभाव नेत्रांचे विषय नसल्याने पाहता कसे येतील? अशा शंका येणे शक्य आहे. रूप ऐकणे म्हणजे रूपाची इतरांनी केलेली प्रशंसा ऐकणे. गुणशील (चरित्र) स्वभाव पाहणे म्हणजे त्याचे कार्य पाहणे व त्यावरून जाणणे; आणि लोकांनी वाखाणलेले ऐकणे. **या प्रमाणे पाहणे व ऐकणे रूप-गुण-शील-स्वभाव या सर्वांना लागू आहे. (ख)** रामचंद्रांच्या गुणशील स्वभावाचे वर्णन वा. रा. सर्ग १ मध्ये श्लो. ९-३५ यांत अगदी विस्तृत आहे. इतर राजे व प्रजा यांनी केलेले वर्णन सर्ग २।२७-४८ या श्लोकांत आहे. इतके श्लोक येथे देणे योग्य नव्हे व थोडे देऊन समाधान होण्यासारखे नाही; तथापि नमुना म्हणून थोडे दिले आहेत –

***। स हि वीर्योपपन्नश्च रूपवाननसूयकः ॥ भूमावनुपमः सूनुर्गुणैर्दशरथोपमः ॥९॥***
***। स तु नित्यं प्रशान्तात्मा मृदुपूर्वं च भाषते ॥ उच्यमानोऽपि परुषं नोत्तरं प्रतिपद्यते ॥१०॥***
***कथंचिदुपकारेण कृतेनैकेन तुष्यति ॥ न स्मरत्यपकाराणां शतमप्यात्मवत्तया ॥११। संमत - स्त्रिषु लोकेषु वसुधायाः क्षमागुणैः ॥ बुद्ध्या बृहस्पतेस्तुल्यो वीर्येणापि शचीपतेः ॥३२॥***
***(सर्ग १). रामो लोकाभिरामोऽयं शौर्यवीर्यपराक्रमैः ॥ प्रजापालनसंयुक्तो न रागोपहतेंद्रियः***

*॥४४॥ शक्तस्त्रैलोक्यमप्येको भोक्तुं किं नु महीमिमाम् ॥४५ सर्ग २ ॥.*

(२) दशरथांस विशेष आनंद होण्याचे कारण पुढील दोह्यावरून स्पष्ट होणार आहे. आपल्यापेक्षा अधिक गुणवान, प्रजावत्सल, लोकप्रिय व लोकमान्य रामाला राज्याधिकारी करून, सर्व राज्यभार त्याच्यावर टाकून, वृद्धपणाचे शेष आयुष्य उपाधिरहित स्थितीत, शांततेने, विश्रांतिसुखात व भगवंत चिंतनात घालविता येईल अशी खात्री होऊन तसे करावे असे वाटू लागले.

*हिं.दो. । सब कें उर अभिलाषु अस कहहिं मनाइ महेसु ॥*
*। आप अछत जुबराज पद रामहि देउ नरेसु ॥१॥*

*म.दो. । स्तविति महेशा प्रार्थिती सकल हृदयिं अभिलाष ।*
*॥ विद्यमान नृपती करो युवराजा रामास ॥२॥*

**अर्थ :** (अयोध्यावासी) सर्व लोकांच्या हृदयांत अभिलाषा (अभिलाष = प्रबळ इच्छा) आहे व सर्व लोक महेशाची स्तुती करून प्रार्थना करीत असतात की (दशरथ) राजाने आपण असताच रामचंद्रांस युवराजा करावे (युवराज पद द्यावे).॥१॥ दो.

**टीका : दोहा (१) सकल हृदयिं अभिलाष** – 'अभिलाषः' हा संस्कृत शब्द आहे. 'कामोऽभिलाष स्तर्षश्च' (अमरे). 'हृदयांत आहे' म्हणण्याने सुचविले की बोलून दाखविण्याचे धारिष्ट कोणाला होत नाही. का होत नाही याचे उत्तर वा.रा. दशरथांनी राजे लोकांना जो प्रश्न विचारला आहे त्यावरून कळेल. 'प्राप्य वर्षसहस्त्राणि बहून्यायूंषि जीवतः ॥ जीर्णस्यास्य शरीरस्य विश्रान्तिमभिरोचये ॥८॥ सोऽहं विश्राममिच्छामि रामं कृत्वा प्रजाहिते ॥... पुरंदरसमो वीर्ये समः परपुरंजयः ॥ तं चंद्रमिव पुष्येण युक्तं धर्मभृतां वरं । यौवराज्ये नियोक्ताऽस्मि प्रीतः पुरुषपुंगवम् ॥१२॥ यदीदं मेऽनुरूपार्थं मया साधु निमंत्रितम् ॥ भवन्तो मे ऽनुमन्यन्तां कथं वा करवाण्यहम् ॥१५॥ मी हजारो वर्षे जगून राज्यभार वहन करीत असता म्हातारा झालो आहे; आता या जीर्ण देहाला विश्रांती द्यावी असे मला वाटत आहे; तेव्हा माझ्याच सारख्या अनुरूप रामाला युवराजा बनवून विश्रांती घेण्याचे माझ्या मनाने ठरविले आहे. हे माझे मत तुम्हा सर्व सभासदांस मान्य असल्यास मला अनुमोदन द्यावे किंवा

मी काय करणे योग्य ते तुम्ही सर्वांनी विचार करून सांगावे. हे दशरथांनी दरबारात केलेल्या भाषणाचे सार आहे. त्यावर सर्वांनी विचार करून एकमत झाल्यावर सांगितले की, 'अनेक वर्ष साहस्त्रो वृद्धसस्त्वमसि पार्थिव ॥ स रामं युवराजानं अभिषिञ्चस्व पार्थिवम्' (२।२१). तेव्हा दशरथांनी त्यांस विचारले की, 'श्रुत्वैव वचनं यन्मे राघवं पतिमिच्छथ ॥ राजानः संशयोऽयं मे किमिदं ब्रूततत्त्वतः ॥ कथं नु मयि धर्मेण पृथिवीमनुशासति । भवन्तो द्रष्टुमिच्छन्ति युवराजं ममात्मजम् ॥ २४-२५ ॥ माझे भाषण ऐकताच तुम्ही राम राजा करू इच्छिता तेव्हा राजांनो ! मला संशय वाटतो; तरी असे का ते खरे सांगा. मी धर्माने पृथ्वीचे शासन करीत असतां, मी जिवंत असता माझा मुलगा राजा व्हावा असे तुम्हांस का वाटते? स्वतः दशरथाने आपला निश्चय आधी प्रगट करून सभेची संमती विचारल्यावर राजे लोकांनी अनुमोदन दिले तरीसुद्धा राजाला संशय आला व उघड बोलून दाखविला व कारण विचारले; मग न विचारतांच, पुरवासी लोकांना आपले मत सांगण्याचे धाडस कसे करवेल? लोकांनी तसे बोलून दाखविले असते तर त्याचा अर्थ असा घेतला गेला असता की दशरथ राजा लोकांना नकोसा झाला आहे; तो प्रजेचे पालनपोषण नीट करीत नाही. म्हणून रामाला युवराज करावा असे लोक म्हणतात. विनाकारण विपरीत भावना उत्पन्न होईल या भीतीने न बोलणेच श्रेयस्कर होते. भरताच्या राज्याधिकाराची कल्पनासुद्धा येथे किंवा वा.रा. मध्ये कोणाच्याही मनात आलेली नाही.

२) जसे दशरथास वाटत होते तसेच सर्व लोकांना व मातांना सुद्धा वाटत आहे. 'सुदिन सुमंगलदायक तो बरं । तुझें वचन होइल जेव्हां खरं ॥ स्वामी ज्येष्ठ बंधु लघु सेवक । हा दिनकर-कुळिं शोभन दंडक ॥ रामतिलक जर सत्य सकाळीं । देउं माग वाटे तें आली ॥' (२।१५।२-४) असे कैकयीने म्हटले आहे. (क) दशरथाने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर देता देता राजे (वा.रा.) म्हणाले की - 'आभ्यन्तरश्च बाह्यश्च पौरजानपदोजनः ॥५१॥ स्त्रियो वृद्धास्तरुणाश्च सायंप्रातः समाहिताः । सर्वान् देवान् नमस्यन्ति रामस्यार्थे मनस्विनः ॥५२॥ तेषां तद्याचितं देव त्वत्प्रसादात्समृध्यताम् ॥ राममिन्दीवरश्यामं

सर्वशत्रु निबर्हणम् ।। पश्यन्ति यौवराज्यस्थं तव राजोत्तमात्मजम् ।।५३।। नगराच्या आंतले व बाहेरचे, सर्व देशांतले लोक वृद्ध, तरुण, स्त्रिया, पुरुष रोज सकाळ-संध्याकाळ सर्व देवांना नमस्कार करून रामाला युवराज बनविण्याविषयी प्रार्थना करीत असतात. इ. (ख) मानसांत लोक सर्व देवांना प्रार्थना करीत नसून लोकांचे व दशरथांचे इष्ट देव जे शंकर, महेश त्यांना एकट्यांनाच प्रार्थना करीत आहेत. (ग) भरताच्या राज्याधिकाराविषयी मानसांत मंथरेने किंवा कैकयीने एक शब्दसुद्धा अखेरपर्यंत कोठेच उच्चारला नाही किंवा ध्वनितसुद्धा केले नाही. भरताच्या राज्याधिकारामुळेच लोक रामाविषयी उघड बोलत नव्हते असे म्हणण्यास वा. रा. किंवा मानस यांत काडीचाही आधार नाही. सर्व लोकांचे रामावर परम प्रेम आहे व राम सर्वांवर अत्यंत प्रेम करतात हेच मुख्य कारण आहे.

**हिं** ***। एक समय सब सहित समाजा । राजसभाँ रघुराजु बिराजा ॥१॥***

***। सकल सुकृत मूरति नरनाहू । राम सुजसु सुनि अतिहि उछाहू ॥२॥***

**म.** ***। एक समयिं सह सकल समाजा । राजसभे भ्राजे रघुराजा ॥१॥***

***। सकल-सुकृत-मूर्तिच नरनाहो । राम-सुयश परिसुनि सुखलाहो ॥२॥***

**अर्थ :** एके समयी रघुकुलातील राजा दशरथ आपल्या सर्व समाजासहित राजसभेत (राजदरबारात) विराजमान झाले. (बसले आहेत).।।१।। नरनाथ दशरथ (नरनाहो = नरनाथ) म्हणजे सर्व सुकृतांची प्रत्यक्ष मूर्तीच ! रामाचे सुंदर यश ऐकून त्यांस फारच उत्साह वाटला.।।२।।

**टीका.** चौ.१. (१) एक समयिं : एक वेळ, एक वार या शब्दांनी मानसात एका प्रकरणाची समाप्ती व नवीन प्रकरणाचा आरंभ सुचविला जातो. दररोज दशरथ राजा जसे राज्यसभेत बसत असत तसेच कोणा एका विशिष्ट दिवशी बसले असता काही विशेष घटना झाली. (क) कोणता दिवस ते निश्चित नसल्याने एकसमयि असे म्हटले. वा.रा.प्रमाणे 'चैत्र श्रीमान् अयं मासः पुण्यः पुष्पित काननः ।। यौवराज्याय रामस्य सर्वमेवोपकल्प्यताम्' (२।३।४) असे दशरथांनी सभेत म्हटले आहे. याने चैत्र महिना ठरतो. 'पूर्णेचतुर्दशे वर्षे पञ्चम्यां रघुनन्दनः ।। भरद्वाजाश्रमं प्राप्य ववन्दे नियतो मुनिम्

(वा.रा.यु.कां. १२७।१) **पंचमीच्या दिवशी १४ वर्षे पूर्ण झाली.** म्हणजे चैत्र शुक्ल पंचमीला राम वनवासात गेले असे ठरते व ही सभा भरली ती चैत्र शुद्ध चतुर्थी ठरते; कारण त्या दिवशीच रात्री दशरथ कैकयीच्या महालात गेले व लगेच सकाळी राम वनवास सुरू झाला; आणि सभेत निर्णय झाला त्या दिवशी पुनर्वसु नक्षत्र असल्याचा उल्लेख २।४।११ मध्ये स्पष्ट आहे. परंतु **चैत्र शुक्ल चतुर्थीला पुनर्वसु नक्षत्र असणे शक्य नाही व पंचमीला वनगमनाच्या दिवशी पुष्य नक्षत्र असल्याचा उल्लेख आहे. चैत्र शुक्ल पंचमीला पुष्य नक्षत्र असणे शक्य नाही; वैशाख शुक्ल पंचमीला ते असू शकते.** (ख) स्कंदपुराण व पद्मपुराण यांतील वनवास तिथिपत्रा प्रमाणे वैशाख शुक्ल पंचमीला चौदा वर्षे पूर्ण झाल्याचा व भरद्वाजाश्रमात परत आल्याचा उल्लेख आहे; म्हणजे वैशाख शुक्ल पंचमीला राम वनात गेले असे ठरते. **म्हणून या टीकेत पद्म पुराणातील व स्कंद पुराणातील उल्लेखांनुसार वैशाख शुक्ल पंचमी वनवासारंभाची तिथि मानली आहे.** वा.रा. रामजन्म तिथि चै. शुद्ध नवमी व पुर्नवसु नक्षत्र होते. (२) कल्पभेदांनुसार पुराणादि ग्रंथांत असे मतभेद असल्यामुळे आणि मानसांत चार कल्पातील कथांचे मिश्रण असल्याने तिथि, मास, नक्षत्र, रामसीता यांचे वय इत्यादी गोष्टींचा स्पष्ट उल्लेख कोठेच नाही. **ज्याला ज्या ग्रंथाचा आधार मानावयाचा असेल त्याने तो मानावा.**

**चौ. २. (१) सकल-सुकृत मूर्तिच नरनाहो'** — सकल सुकृतांची मूर्ति म्हणजे नरनाथ दशरथ. **'दशरथ-सुकृत चि राम सदेही'** (१।३१०।१) असे म्हटले आहे. दशरथराजा म्हणजे सुकृताची-पुण्याची-परम सीमा. वसिष्ठांनी त्यांना 'पुण्यपुरुष' म्हटले आहे. (१।२९४ च्या चौ. पहा.) म्हणून त्यांना रामस्नेहाची परमोत्तम प्राप्ती झाली आहे. 'सकल सुकृतफल रामीं स्नेहो' (१।२७।२) **(क) राम-सुयश परिसुनि सूत्साहो** - सु + उत्साहो - उत्साह, सूत्साह = अत्यंत उत्साह. ज्याच्यावर अत्यंत स्नेह असेल त्यांचे सुयशादी श्रवण करताना ऐकणाराला उत्साह वाटतो, आणखी ऐकावे असे वाटते, म्हणून राम विमल यश श्रवण करण्याने दशरथास अति उत्साह वाटला, झाला. येथे हे सुचविले की रामसुयशादिकांचे श्रवण अत्यंत उत्साहाने केले पाहिजे. (ख) पहिल्या चौपाईत

दशरथ सभेत विराजमान असल्याचा उल्लेख करून नंतर या चौपाईत रामसुयश-श्रवणाचा उल्लेख केला; व सुचविले की या सभेत सभासदांनी रामसुयश वर्णन केले; मात्र आजच्या या सभेत वसिष्ठ नाहीत व पुढे येत नाहीत. हे पुढील दोह्यावरून स्पष्ट होते.

हिं ***। नृप सब रहहिं कृपा अभिलाषें । लोकप करहिं प्रीति रुख राखें ॥३॥***
***। तिभुवन तीनि काल जग माहीं । भूरिभाग दसरथ सम नाहीं ॥४॥***
***। मंगलमूल राम सुत जासू । जो कछु कहिअ थोर सबु तासू ॥५॥***

म. ***। सर्वहि नृपति कृपा अभिलाषिति । प्रीति करिति लोकप रुचि राखिति ॥३॥***
***। त्रिभुवनिं कोणी त्रिकाळिं जगतीं । भूरिभाग्य दशरथ-सम नसती ॥४॥***
***। मंगलमूल राम सुत ज्यानां । जें वदाल तें थोडें त्यानां ॥५॥***

**अर्थ :** सर्व नृपती दशरथांच्या कृपेची अभिलाषा (इच्छा) करतात; व इंद्रादि लोकपाल (लोकप) त्यांच्यावर प्रीति करून त्यांची रुचि जाणून ती पूर्ण करतात.॥३॥ तिन्ही भुवनांत, तिन्ही काळी सर्व जगांत दशरथांसारखे अत्यंत भाग्यवान कोणीही नाहीत.॥४॥ सर्व मंगलांचे मूळ जे राम तेच ज्यांचे पुत्र बनले त्या दशरथांचे जे जे वर्णन करावे ते थोडेच.॥५॥

**टीका. चौ. ३. (१) सर्वहि नृपति कृपा अभिलाषिति** – या चौपाईचा अर्थ करताना **'सुर नर मुनि सर्वांची रीती । स्वार्थास्तव सब करिती प्रीती'** हे वचन लक्षात घेतले पाहिजे आणि **'स्वार्थी देव मलीन मन'** हे विसरता नये. सूर्यवंशी अनरण्य राजाने रावणास शाप दिला की, 'माझ्याच वंशांत उत्पन्न होणाऱ्या पुरुषाकडून तुझा वध होईल.' तेव्हापासून व रघूचा प्रभाव पाहून रावण रघुवंशांतील राजांच्या वाटेला गेला नाही. पृथ्वीवरील बहुतेक सर्व राजे रावणाने एकदा जिंकले असले तरी दशरथाच्या सार्वभौमपणाला बाध आला नव्हता. दशरथांच्या कृपाछत्राची छाया असली तर आपणास रावणाचे भय नाही असे नृपतींना वाटत होते. म्हणून राजे लोक दशरथाची कृपा इच्छित व मिळविण्याचा प्रयत्न करीत राहिले. नृपती कृपा इच्छितात यांत काही नवल नाही; परंतु –

(२) **प्रीति करिति लोकप रुचि राखिति – 'जिथें स्वार्थ निज कांहिं साधतो । त्यावर कोणिही ममता करतो ॥ अति नीचींही प्रीति करणें जाणुनि परम हित'**

(७।९५।) परमहित = हरिभक्ति, परमपरमार्थ असे अर्थ मानसांत इतरांच्यासाठी असले तरी इंद्रादि लोकपालांजवळ शब्दकोष निराळा आहे. भक्ति = हरिभक्ति परम परमार्थ हे शब्द त्यांच्या शब्दकोषांत सापडत नाहीत व कोषाचे अलंकार म्हणून कदाचित असले तरी ते त्यांना दिसत नाहीत. **सध्यां त्यांचें परमहित, परम परमार्थ; म्हणजे - रावणाच्या बंदिवासातून मुक्ति व आपल्या स्वर्गीय गतवैभवाची भक्ति पुन्हा प्राप्ति होव.** हे परमहित दशरथनन्दन रघुवीरांकडूनच होणार आहे हे त्या विबुधांनां माहीत आहे. दशरथाने स्वतः जाऊन इंद्राच्या शत्रूंना जिंकून जसे इंद्रासन स्थिर केले. रामलक्ष्मणांना विश्वामित्राबरोबर पाठवून ताटिका, सुबाहु, मारीचादिकांचा विनाश केला; त्याप्रमाणेच रामलक्ष्मणांना ससैन्य पाठवून खरदूषणादि व रावणादि निशाचरांचा वध करवितील अशी आशा इंद्रादि देवांना होती म्हणून ते आजपर्यंत दशरथांवर प्रीति करीत राहिले व त्यांच्या मनातील इच्छा (रुख कल, रुचि) जाणून ती वेळोवेळी पूर्ण करीत राहिले आहेत; पण दशरथांवरील देवांची प्रीति किती बेगडी आहे, सरड्याच्या वर्णासारखी आहे; हे आता लवकरच दिसणार आहे. '**उच्च निवास नीच कर्तूती । शकति न पाहुं पराचि विभूती** ॥ (२।२२।६) असा शिक्का सरस्वती देवीच मारणार आहे. दशरथ राजा स्वतःच्या इच्छेने रघुवीरास निशाचर-विनाशाच्या मोहिमेवर पाठवीत नाहीत अशी देवांची खात्री होतांच त्यांच्या प्रीतीचा अस्त होऊन देवांच्या स्वार्थासाठी रघुवीरास वनवासात पाठविण्याचा पाताळयंत्री कट हेच लोकपाल रचतील व जी गोष्ट दशरथप्राणहरण करणारी आहे ती करण्यातच त्यांस आनंद वाटणार आहे. म्हणूनच **स्वार्थी जीवांच्या शिरगणतींत देवांना-सुरांना-अग्रस्थान दिले आहे. 'सुर नर मुनि सर्वांची रीती । स्वार्थास्तव सब करिती प्रीती ।'**

**चौ. ४. (१) त्रिभुवनिं कोणी त्रिकाळिं जगतीं...नसती** – त्रिभुवन म्हटल्यानंतर जग शब्द कशाला अशी शंका काढून समाधानाचे अनेक नमुने टीकाकारांनी तयार केले आहेत ! (मा.पी.प!) एका ब्रह्मांडांत तीनच भुवने आहेत असे नाही. 'भुवन चार दश' असे नुकतेच म्हटलेले (२।१।२) टीकाकार विसरलेले दिसतात; पण कविराज विसरले नाहीत. जगमाहीं (जगतीं) शब्द वापरला

नसता तर याच टीकाकारांला 'भुवन चारिदस' याची आठवण झाली असती व अर्थ काढला असता की १४ – ३ = ११ भुवनांत दशरथांसारखे आहेत; असा अनर्थ केला जाऊ नये म्हणून जगतीं (जग-माहीं) शब्दाने अव्याप्ती दोष दूर केला. **'जगीं तुम्हां सम सुकृती काहीं । भूत न, नाहीं, होणें नाहीं ॥५॥ पुण्य तुम्हांधिक महान् कुणाचें । राजन् राम-सदृश सुत ज्यांचे'** (१।२९४।५-६ टी.प.) जर दशरथांसारखा भाग्यवान कोणी कोठेही नाही तर अधिक भाग्यवंताची कल्पना सुद्धा अशक्य ! २०९।७-८ व दो. पहा !

**चौ. ५. (१) मंगलमूल राम सुत ज्यानां.... त्यानां** - मागील चौपायांत दशरथांची जी महती गाइली तिचे कारण येथे सांगितले. प्रत्यक्ष ब्रह्म राम ज्यांचा पुत्र झाला त्याचे महत्त्व जेवढे वर्णन करावे तेवढे थोडेच. राम सर्व मंगलांचे-कल्याणांचे-मूळ आहेत. **'मंगलभवन अमंगलहारी' 'दशरथ-अजिर विहारी'** झाले आहेत. (१।११२।४) 'सीताराम मंगलानां कर्तारी, अमंगलानांच हर्तारी आहेत. **'मंगलायतन रामयश'** आहे. **'सितारामयश मंगल दायक'** आहे. अशी सून व असा पुत्र ज्यांना मिळाला त्यांचे भाग्य, यश, महती, गुण इत्यादी कोण व किती वर्णन करणार ! हा भाव येथे आहे. येथे दशरथमहिमा वर्णनाचा उपसंहार केला.

(२) राम विवाह करून अयोध्येत आल्यापासून यौवराज्याभिषेकाच्या विचारापर्यंतच्या मधल्या काळातील अयोध्या, अयोध्यावासी नरनारी, राममातादि अंतःपुरांतील स्त्रिया, व राजा दशरथ यांचे वर्णन येथपर्यंत केले. पुढल्या चौपाईपासून **'त्यजि राज्या त्या दूषण काहीं'** या पार्वतीच्या प्रश्नाचे उत्तर देण्यास प्रारंभ होतो. या प्रश्नाच्या उत्तराने संपूर्ण अयोध्या काण्ड व्यापले आहे. त्यात खालील प्रकरणे आहेत :

**(क) १ बद्रे** राम-अभिषेक प्रसंगा, २ मग नृपवचन राज्यरसभंगा, ३. पुरवासीजन विरह - विषाद, ४. राम लक्ष्मण संवाद, ५. विपिन गमन, ६ नाविक अनुराग, ७ वासपारसुरनदी प्रयागा, ८ प्रभुवाल्मीकी मिलन, ९ चित्रकूटी भगवंत राहिले, १० सचिवागमन, ११ नगरि नृपमरण, १२ भरतागमन, १३ भरत प्रेम, १४ नृपक्रिया, १५ जाई भरत जेथे प्रभु सुखघन.

१६ कृत रघुपतिनीं बहुविध सांत्वन, १७ सहित पादुका नगरिं निवर्तन, १८ भरत-राहणी इतक्या प्रकरणांचा उल्लेख भुशुंडीमानसांत (७।६५।१-८) केला आहे. परंतु कैकयी-मंथरा संवाद, कौसल्या-रामसंवाद, राम-सीता संवाद, लक्ष्मण-सुमित्रा संवाद, जनक दूतागमन, जनकागमन, जनक-भरत संवाद, सुनयना कौसल्यादि संवाद, जनकसुनयना संवाद, भरताची चित्रकूटगिरी यात्रा, ही महत्त्वाची सुंदर प्रकरणे मधेमधे आहेत. आता :

## राम-राज्याभिषेक-तयारी-प्रकरण (२।६-११।५)

हिं ***। रायँ सुभायँ मुकुरु कर लीन्हा । बदनु बिलोकि मुकुटु सम कीन्हा ॥६॥***
***। श्रवन समीप भए सित केसा । मनहुँ जरठपनु अस उपदेसा ॥७॥***
***। नृप जुबराजु राम कहुँ देहू । जीवन जनम लाहु किन लेहू ॥८॥***

म. ***। सहज घेइ नृप करिं मुकुराला । वदन बघुनि सम करि मुकुटाला ॥६॥***
***। श्रवण-समीप बघत सित केशां । जरठपणा जणुं करि उपदेशा ॥७॥***
***। दे युवराज्य नृपा रामाला । घे किं जन्म-जीवन-लाभाला ॥८॥***

**अर्थ :** राजाने सहज आरसा हातात घेतला व त्यात (सहज) मुख पाहून मुकुट नीटनेटका (सम) बसविला (केला).॥६॥ तेव्हा (सहज) दिसले की कानाच्या जवळचे केस पांढरे (सित) झाले आहेत (पिकलेले दिसले); व जणूकाय वृद्धपणा (जरठपणा) उपदेश करू लागला कीं - ॥७॥ राजा ! रामाला युवराज्य दे व आपल्या जन्माच्या व जीवनाच्या लाभाला घे की.॥८॥

**टीका - चौ. ६.८ (१) - सहज घेइ.... सित केशी** - या तीन चरणांशी 'सहज' शब्दाचा संबंध आहे. **आरसा सहज घेतला; सहज मुख पाहिलें; व एकाएकी पांढरे (पिकलेले) केस सहज दिसले.** या तीन गोष्टींवरून हे ठरले की १) राजाला रोजच्या रोज आरशांत पाहण्याची सवय नव्हती; तसे असते तर पांढरे केस आजच दिसले नसते. केस काही २-४ तासांत पांढरे होत नाहीत; ते हळूहळू पांढरे होतात. २) मुकुट नीटनेटका केला; यावरून असे की सभेत येण्याचा वेष करताना, चक्रवर्ती महाराजा असून, मुकुट नीट बसला आहे की वाकडा-तिकडा बसला आहे हे पाहण्याची त्यांस आवश्यकता वाटत नसे. ३)

कानांजवळचे केस पिकले आहेत याची त्याला दादच नव्हती ! चक्रवर्ती महाराजांची ही उदासीनता, हे वैराग्य ! व आजच्या तरुण वर्गाचीच काय कुमारांचीसुद्धा कपडे करताना आरसा, कंगवा, ब्रश इत्यादींचा पुनः पुन्हा उपयोग करण्याची वाढती प्रवृत्ती यांची तुलना करून पहावी; व कोणते आचरण आवश्यक व हितावह आहे याचा वाचकांनी विचार करावा. **'अलंकार मानीं तनू सज्जवीतो । मना दर्पणीं पाहुनी रंजवीतो ॥ कळेना जळे सर्पणीं रूप तेरे । हरे राम हा मंत्र सोपा जपा रे ॥** (म.बो.) हा विचार दशरथांजवळ होता; पण पांढरे डोके झालेल्या आधुनिक तरुणांच्या ठिकाणी हा नाही !

(२) आज सहज आरसा हाती आला व त्यांत मुख सहज दिसले. या दोन गोष्टी घडल्या नसत्या तर केस दृष्टीस पडले नसते व राज्याभिषेकाची इच्छाही उत्पन्न झाली नसती. परंतु 'होणारे न चुकेच होइल जरी ब्रह्मा तया आडवा.' आजच आरसा सहज उचलून घेण्याची प्रेरणा हाताला कोणी दिली? 'प्रेरक हृदिं रघुबंश-विभूषण' असे वाचकांस वाटेल. पण तसे नाही. इंद्रादी देवांनी इतके दिवस वाट पाहिली, पण आपले मनोरथ पूर्ण होण्यासारखी कृती दशरथांकडून होत नाही असे दिसले. तेव्हा हाताची देवता जो सुरपती इंद्र, सर्व लोकपालांचा अधिपती, त्याने हाताला प्रेरणा देऊन आरसा घेवविला. नेत्रांचे देव सूर्यचंद्र त्यांनी त्यांत पाहण्यास लावले व त्यांनीच पिकलेले केस राजाच्या दृष्टीस पाडले. आज वसिष्ठ दरबारात नसल्याचा फायदा या इंद्रिय देवतांनी घेतला. वसिष्ठ सभेत असते तर राजाने त्यांच्या देखत आपले मुख आरशात पाहिले नसते.

(३) **श्रवणसमीप बघत सित केशां... उपदेशा** – कृतान्त, काळ, यम हा एक दिक्पाल आहे; पण रावणाच्या पुढे त्याचे काही चालत नाही. हे सर्व लोकपाल रावणाच्या दरबारात हात जोडून उभे असतात. **'जोडुनि कर सुर विनीत दिक्पति । भृकुटी सकल सुभीत विलोकति'** (५।२०।७) म्हणून सूर्यचंद्रांनी पांढरे केसरूपी जरठपणा कानाच्या जवळ आला आहे असे दाखविले. **'कृतान्तस्य दूती जरा कर्णमूले समागत्य वक्तीति लोकाः श्रृणुध्वम् ॥ (परस्त्री परद्रव्य** काक्षांतजध्वम्) भजध्वं रमानाथ पादारविन्दम्' (सु.र.) तो (जरठपणा) जणू

उपदेश करू लागला की राजा ! आता आयुष्याचे दिवस फार थोडे राहिले; लवकर सावध हो व शक्य तितक्या लवकर जन्माचे व जीवनाचे साफल्य करून घे. 'कृतान्तकटकामलध्वज जरा दिसों लागली' (केका.) **कानांजवळचे केस पांढरे होणे, पिकणे हे जरा वार्धक्य आल्याचे लक्षण आहे.** ते केस, तो जठरपणा कृतान्ताच्या सैन्याचा पांढरा शुभ्र ध्वज आहे. पाठोपाठ कृतान्ताचे सैन्य व कृतान्त (यम, काळ, मृत्यू) येत आहेत. परंतु आज सर्व डोके पांढरे झाले तरी असा विचार मनात येत नाही की आता वृद्धपणी तरी नरदेहाची सफलता करण्याचाच प्रयत्न करू. असे डोके पिकले तरी सुद्धा तिजोरीच्या किल्ल्या व बँकेचे पुस्तक पुत्राच्या स्वाधीन करण्याच्या नुसत्या विचाराने डोके दुखू लागते ! मृत्यूपत्र करून ठेवण्याचीही इच्छा होत नाही ! **(क) दशरथांनी मात्र असे केले नाही.** कानांजवळचे केस पांढरे दिसताच सर्व प्रापंचिक जबाबदारी व राजसत्ता अत्यंत तातडीने रामचंद्रांच्या शिरावर टाकण्याचे मनात ठरविले. '**तं कर्णमूलमागत्य रामे श्रीर्न्यस्यतामिति ॥ कैकेयी शंकयेवाह पलितच्छद्मना जरा (रघुवंश)** जरठपणा कानाजवळ येऊन सांगतो.

ल.ठे. सु. रत्नाकरात, मोरोपंतांनी व रघुवंशात कालीदासांनी 'जरा' शब्द वापरला आहे. रघुवंशांत तर 'जरा' दरबारातील महाराजाच्या कानाशी येऊन सांगते. गोस्वामींनी जरा शब्द मुद्दाम वापरला नाही. जरा स्त्री आहे. जरठपणा पुरुष आहे. दशरथासारखा सम्राट भर दरबारात बसलेला असता एक स्त्री येऊन त्याच्या कानात काही सांगते हे किती योग्य आहे? पुरुषदूत येऊन कानांत सांगू लागणे योग्य की स्त्री (दूती) येऊन तिने सांगणे योग्य ! मर्यादा पालनाची केवढी दक्षता ! दशरथांबद्दल किती आदर !

**(४) रामाला युवराज कर आणि जन्मलाभ व जीवन लाभ घे पाहू** असे जणू जरठपणाने सांगितले. युवराज करणे म्हणजे आपली सर्व सत्ता त्या व्यक्तीच्या हाती सोपविणे आहे. सर्व ऐहिक प्रवृत्तींतून, उपाधींतून मोकळे होणे आहे. **(क)** सुचविले की निदान कानाजवळचे १-२ केस पांढरे झाल्याबरोबर तरी आपले सर्वस्व प्रभु रामाला समर्पण केल्यासच सकळ आनंद निधान सुखधाम व परम विश्राम प्राप्त होण्याची शक्यता आहे. या वेळी सुद्धा हे जर केले

नाही तर मनुष्य जन्माला येऊन जे मिळवावयाचे व आयुष्यातील जीवनाच्या वर्षांनी जे साधावयाचे ते साधणे अशक्य आहे. हे जर केले नाही तर वृक्षांचे जीवन व मानव जीवन यात फरक तो काय राहिला? 'तरवः किं न जीवन्ति भस्त्राः किं न श्वसन्त्यहो' '**दृतय इव श्वसन्त्यसुभृतोः** (भाग. १०।८७।१७) (**ख**) **घे किं लाभाला** - सुचविले की अजून तरि हा लाभ घे, का घेत नाहीस? नर जीवा ! हे तुझ्या हाती आहे. हा लाभ घेणे तुला सहज साध्य आहे. **मनुष्यजन्मात आल्याचा व काही वर्षे जिवंत राहण्याचा मुख्य लाभ कोणता असेल तर आपले सर्वस्व व सर्वाधिकार, सत्ता, मोठेपणा इत्यादी रामाला समर्पण करून रामचरित पहात व ऐकत राहणे हा आहे.** (ग) कौसल्येलासुद्धा असेच वाटत आहे. '**सुकृतशील-सुख-सीमा परमा । जन्मलाभ-अवधी किं निरुपमा ॥**' (२।५२।८।) नगरजनांची हीच आर्ति आहे. '**तो वांछिति नरनारि सब या प्रकारिं अत्यार्ति । जशिं चासक चातकि तृषित वृष्टि शारदी स्वाति** ॥ (२।५२) (घ) काही मानव जन्मल्याबरोबर मरतात, काही अगदी लहानपणी मरतात; त्यांना जन्माचा व जीविताचा लाभ घेता येणे शक्य नाही; पण ज्यांना कौमार्यापर्यंत जीवित लाभले ते भाग्यवान होत. त्यांनी हा लाभ कौमार्यातच घेणे उत्तम. '**कौमारं आचरेत् प्राज्ञो धर्मान् भागवतानिह (भाग ७) कौमारं पंचमाब्दांतम्**' (शि.पु.) तेव्हा नाही तर तारुण्यात तरी घेणे जरूर आहे. तेव्हा न घडले तर शेवटची मर्यादा म्हणजे तारुण्य संपून जरठपणाच्या आगमनाची ध्वजा (-कानांजवळचे केस पिकणे) फडकू लागताच हा लाभ घेणे. या वेळी जर जन्मलाभ घेणार नाहीत तर '**पावति दुःख परत्र ते शोचति शिर बडवीति ॥ काला कर्मा ईश्वरा वृथा दोष लावीति**' (७।४३।) त्यांना अशा प्रकारे पश्चात्ताप करीत बसावे लागेल आणि भगवंताशी कृतघ्न बनल्याचा व आत्मघ्नांचा दोष लागेल. (उ.कां.भक्तिगीता पहा.)

*हिं.दो.* *। यह बिचारु उर आनि नृप सुदिनु सुअवसरु पाइ ॥*
*॥ प्रेम पुलकि तन मुदित मन गुरहि सुनायउ जाइ ॥२॥*

*म.दो.* *। हा विचार मनिं करुनि नृप सुसमय सुदिन मिळून ॥*
*॥ प्रेमें पुलकित तनु मुदित विनवि गुरुस जाऊन ॥२॥*

**अर्थ :** हा विचार मनात करून सुदिन व सुसंधी मिळून, दशरथराजाचे शरीर प्रेमाने रोमांचित झाले आहे व (मनात) आनंद झाला आहे. (अशा स्थितीत) त्यांनी जाऊन गुरुवसिष्ठांना विनंती केली.।।दो.२।।

**टीका : दो. (१) हा विचार** - आपले वार्धक्य आले, आता विलंब न लावता रामाला युवराजा करून जन्माचे व जीवनाचे साफल्य करावे हा विचार, निश्चय. **(क) मनिं करुनि** - सभेत कोणाला बोलून दाखविला नाही; मनातच ठेवला. गुरु वसिष्ठांची संमती मिळाली तरच तो कृतीत उतरविणे शक्य असल्याने; त्यांची संमती व आशीर्वाद मिळण्यापूर्वी तो विचार जाहीर करणे मूर्खपणाचे ठरले असते. **(ख)** वा.रा.त आरसा, पांढरे केस व जरठपणा यांचा उल्लेख नाही. रघुवंशात व इतर रामायणात आहे. तसेच आधी वसिष्ठांची संमती न घेताच दशरथाने आपला बेत सभेत प्रगट केला आहे. सभेची संमती मिळाल्यावर मग वसिष्ठादी मुनींना राज्याभिषेक विधीची तयारी कशी करावयाची हे विचारले आहे. वा.रा.त वसिष्ठ नुसते कुलगुरु-कुलपुरोहित आहेत. मानसातील वसिष्ठ सद्‌गुरु आहेत व शासन पद्धतीत सर्वाधिकारी आहेत. 'श्रीतुलसी शासन पद्धति' हा लेख प्रस्तावनेत पहावा.

(२) **सुसमय सुदिन मिळून** - सुदिन शोधून, पाहून असे म्हटले नाही. **'सुदिन बघुनि सौडिति कल कंकण'** (१।३६०।९) (सुदिन सोधि-हिंदी) आजचा दिवस सहजा सहजी शुभ दिवस ठरला व यौवराज्याभिषेकास योग्य असा उद्याचाही ठरला. शुभ दिवसासाठी वाट पहावी लागली नाही. दरबारातून उठून बाहेर पडले ती वेळ सुद्धा वसिष्ठांकडे जाऊन त्यांस एकांतात भेटण्यास अगदी योग्य अशीच ठरली. हाताच्या देवाने - इंद्राने - आरसा हातात घेवविला तो पुढील सर्व गोष्टींचा विचार पाहूनच घेवविला. 'शुभस्य-शीघ्रम' 'धर्मस्य त्वरिता गतिः' यांचे पालन करण्यास मदत होईल अशा प्रकारे सर्वच योग सहज जुळून आले.

(३) **प्रेमें पुलकित तनु मुदित** - रामावर अत्यंत प्रेम असल्याने व उद्या राज्याभिषेक होणार या आशेने मनास खूप आनंद झाला व शरीरावर रोमांच उभे राहिले. परंतु **गुरुकडे जाण्यास निघताना हर्ष म्हणजे उत्साह झाल्याचा उल्लेख**

**नाही.** प्रयाण समयी वा कार्यारंभी होणारा हर्ष कार्यसिद्धी सूचक असतो; पण ज्यांना राम-सुयश श्रवण करताना अति उत्साह = हर्ष झाला त्यांना या वेळी हर्ष नाही. याने पुढील भविष्य सुचविले आहे. **प्र.प्र. १७१५ 'प्रयाणसमयीं वा कार्यारंभीं हर्ष'** पहावें. राजाला मात्र आनंद झाला व त्याने अनुमान केले की कार्यसिद्धी होणार. **(क) गुरुकडे जाऊन** याने सिद्ध झाले की वसिष्ठ गुरु सभेत नव्हते; ही सुसंधी इंद्राने साधली. वसिष्ठ सभेत असते तर दशरथाने आरशात पाहिलेच नसते. तसे करणे मर्यादाभंग करणारे ठरले असते. दशरथ = जीव, अयोध्या = देह वगैरे अध्यात्मपर अर्थ विसरून भागणार नाही. सद्गुरुंकडे जाऊन त्यांस आपले सुख-दुःख, मनात येणारे विचार वगैरे निवेदन करणे व स्वतःच्याच मताने कोणत्याही कार्याला प्रारंभ न करणे हे परमार्थसाधनातील फार महत्त्वाचे पथ्य आहे. **'सद्गुरु वैद्य वचनिं विश्वास'** हे तर भवरोग हरणातील मुख्यतम साधन आहे. गुरुंना काय विनंती करतात पाहू या :

हिं. *। कहइ भुआलु सुनिअ मुनिनायक । भए राम सब बिधि सब लायक ॥१॥*
*। सेवक सचिव सकल पुरबासी । जे हमारे अरि मित्र उदासी ॥२॥*
*। सबहि रामु प्रिय जेहि बिधि मोही । प्रभु असीस जनु तनु धरि सोही ॥३॥*
*। बिप्र सहित परिवार गोसाईं । करहिं छोहु सब रौरिहि नाईं ॥४॥*

म. *। श्रृणु मुनिनायक भूप म्हणाले । राम सर्वपरिं लायक झाले ॥१॥*
*। सेवक सचिव सकल पुरवासी । जे आम्हां अरि मित्र उदासी ॥२॥*
*। प्रिय मज राम तसे सर्वांप्रत । प्रभु-आशीस् जणुं तनुधर शोभत ॥३॥*
*। विप्र सहित परिवारा स्वामी ! । स्नेह करिति अपणां-सम नामी ॥४॥*

**अर्थ :** भूप (भुआल - भूपाल) म्हणाले कीं मुनिनायका ! जरा ऐकावें. राम सर्व प्रकारें लायक झाले आहेत. ॥१॥ सेवक, सचिव व सर्व पुरवासी लोक तसेच आमचे शत्रू, मित्र व आमच्याशी उदासीन असणारे असे.॥२॥ जे आहेत त्या सर्वांना राम तितकेच प्रिय आहेत. जितके मला प्रिय आहेत.॥३॥ तसेच स्वामी ! परिवारांसह सगळे विप्र आपल्या सारखेच उत्तम प्रेम रामावर करतात. ॥४॥

**टीका : चौ. १.(१) भूप म्हणाले** - भूप शब्दाने सुचविले की भू-

पालनासंबंधी काही तरी सांगणार आहेत. (क) **सर्वपरिं लायक झाले.** सुचविले की भूपाल होण्यास कधीच लायक झाले. सम्राटाच्या ठिकाणी जे जे गुण असले पाहिजेत ते ते सर्व रामाच्या ठिकाणी परिपूर्ण आहेत. हे गुण कोणते याचे विस्तृत वर्णन वा. रा. अयो. सर्ग १।२। मध्ये आहे. वीर्य, शौर्य, धैर्य, नम्रता, विद्या, विनय, सत्य, कृपालुपणा, दया, सुशील, विप्रगुरु पुजा, ब्रह्मण्य, देवत्व, औदार्य, प्रजावात्सल्य, शम, दम, तितिक्षा, श्रद्धा, धर्मपरायणता, क्षमाशीलता इत्यादी गुणांचे वर्णन असून राम धर्मज्ञ, सत्यसंध, प्रियवादी, मृदुभाषी, स्मितपूर्वभाषी, वृद्धसेवी, सर्व शास्त्रविशारद इ. असल्याचे वर्णन तेथे पहावे. १।८ च्या टीकेत त्यातील नमुना दिला आहे. (ख) हे सर्व गुण विवाहाच्या पूर्वीच प्राप्त झाले होते, पण त्या वेळी वय अवघे १४-१५ वर्षांचे होते. वयोमानाने तेवढी लायकी नव्हती. 'अबला यत्र प्रबला बालो राजा निरक्षरो मंत्री । नहि नहि तत्र सुखाशा जीवनकामोऽपि दुर्लभो भवति (सुभा.) राज्यसत्ता हाती घेण्यास व भूमीचे पालन करण्यास राम स्वतः सर्वतोपरीने उत्तम अधिकारी झाले आहेत हे सार सुचविले.

**चौ. २-३.** (१) या दोन चौपायांत सांगितले की सर्व प्रजेला राम फार प्रिय झाले आहेत यात नवल नाही; पण आम्हाला जे शत्रू मानतात त्यांना सुद्धा राम फार प्रिय झाले आहेत. नुसते सामान्य प्रिय नव्हेत तर मला जितके प्रिय आहेत तेवढे प्रिय आहेत ! भाव हा की सर्व प्रजेला व रघुवंशाच्या शत्रूंनासुद्धा वाटत आहे की राम युवराज व्हावे. (क) जी गोष्ट रघुवंशाच्या संपूर्ण इतिहासात कधी घडली नाही ती रामाच्या बाबतीत घडली. रघुवंशाला शत्रू मानणारे कोणी ना कोणी तरी असत, पण रामाला शत्रू मानणारा कोणी नाही. रघुवंशाचे शत्रू असलेल्यांना सुद्धा राम प्राणप्रिय झाले आहेत. मग इतरांस तसे वाटतील यात नवल काय? हे कसे घडले याचे उत्तर दशरथ स्वतःच देतात. (ख) **'प्रभु आशीस् जणु तनुधर शोभत' वसिष्ठ गुरुंचा देहधारी झालेला आशीर्वाद म्हणजेच राम.** ज्यांच्या एका ब्रह्मदण्डाने विश्वामित्रासारखा महाप्रतापी तपोमूर्ति, महाशत्रू राजा, मित्र बनला त्यांच्या आशीर्वादावर कोण नाही प्रेम करणार? या प्रमाणे स्वतःची इच्छा, प्रजेची इच्छा, शत्रूमित्र

उदासीनांची इच्छा राम युवराज व्हावेत अशी आहे व राम लायक झाले आहेत. परंतु ज्या भूमीचे पालन युवराजा करणार ती सर्व भूमी ब्राह्मणांची आहे. त्यांची इच्छा नसेल तर वरील सर्व अनुकूल गोष्टींची काहीच किंमत नाही; म्हणून पुढील चौपाईत ती अडचण दूर करतात. (मा.पी. मुद्दाम पहा).

**चौ. ४.** (१) सगळे ब्राह्मण व त्यांचा परिवार म्हणजे बायका, मुले इत्यादी सर्व रामावर अत्यंत प्रेम करतात. वसिष्ठांचे रामावर जितके प्रेम आहे तितकेच सर्व ब्राह्मणांचे आहे. भाव हा की राम युवराज झाले तर सर्व ब्राह्मण वर्गाला परमानंद होईल. (क) रीरिहि नाई = आपल्या सारखेच. नाई = प्रमाणे, सारखे. रीरि, रीरे, रउअे हे तिन्ही शब्द मानसात एकाच अर्थाने वापरलेले दिसतात. छोह = स्नेह, प्रेम, कृपा, दया.

रामचंद्रांच्या अभिषेकाला वसिष्ठांची संमती व आशिर्वाद मिळावा म्हणून आता गुरुचरणाचा महिमा व आपला त्या विषयी अनुभव वर्णन करतात.

**हिं** *। जे गुर चरन रेनु सिर धरहीं । ते जनु सकल बिभव बस करहीं ॥५॥*
*। मोहि सम यहु अनुभयउ न दूजें । सबु पायउँ रज पावन पूजें ॥६॥*
*। अब अभिलाषु एकु मन मोरें । पूजिहि नाथ अनुग्रह तोरें ॥७॥*
*। मुनि प्रसन्न लखि सहज सनेहू । कहेउ नरेस रजायसु देहू ॥८॥*

**म.** *। जे गुरुचरण-रेणु शिरिं धरिती । ते जणुं सकल विभव वश करिती ॥५॥*
*। मज सम हें अनुभविति न दूजे । प्राप्त सकल पावन-रज-पूजें ॥६॥*
*। मनिं अभिलाष एक मम आतां । अनुग्रहें तव पुरेल नाथा ! ॥७॥*
*। सहज-स्नेहें प्रसन्न मुनिवर - । दिसत, म्हणति 'आज्ञा द्या' नृपवर ॥८॥*

**अर्थ :** जे गुरुचरणांची धूळ (तिचा एक कण) आपल्या मस्तकावर धारण करतात ते जणू सर्व वैभवाला वश करतात.॥५॥ याचा अनुभव माझ्यासारखा इतर कोणालाही (आलेला) नाही; (कारण) आपल्या पवित्र चरणरजांच्या पूजनानेच मला सर्व काही प्राप्त झाले आहे.॥६॥ आता माझ्या मनात एकच अभिलाषा आहे व ती नाथ ! तुझ्या अनुग्रहाने पूर्ण होईल (अशी माझी खात्री आहे).॥७॥ सहज स्नेहाने मुनिश्रेष्ठ प्रसन्न झाले आहेत असे दिसताच नृपश्रेष्ठ म्हणाले की आज्ञा द्यावी ॥८॥

**टीका. चौ. ५. (१) जे गुरुचरणरेणु शिरिं धरिती** - बालकाण्डारंभी गुरुवंदन प्रकरणात (१।१।१-४) चार चौपायांत गुरुचरणरजाचे माहात्म्य वर्णिले आहे व विश्वामित्र दशरथ भेटीत (१।३०८।१-४ टी.प.) त्याची प्रतीति दाखविली आहे. बालकाण्डारंभीचे वर्णन मुख्यतः परमार्थ दृष्टीने केले आहे; येथील मुख्यतः ऐहिक सुखादि दृष्टीने केले आहे. सर्व प्रकारचे वैभव गुरुचरणरेणु शिरावर धारण केल्याने प्राप्त होते; एवढेच नव्हे तर ते वैभव वश होऊन राहते. (क) विविध प्रकारचे वैभव मिळविण्याची विविध साधने असली व त्यांनी सर्व प्रकारचे वैभव मिळाले असे गृहीत धरले, तरी वैभव-लक्ष्मी-चंचल असल्याने नेहमी जवळ राहीलच असे नाही; परंतु गुरुचरणरज सेवेने-सेवनाने जे वैभव मिळते ते जवळून जात नाही. त्याच्या प्राप्तीसाठी इतर सायास करावे लागत नाहीत. गुरुचरणरज सेवकाची इच्छा नसली तरीसुद्धा सर्व वैभव मंत्रमुग्ध महाफणी प्रमाणे त्याच्या जवळ येऊन राहते. वसिष्ठांनीच पूर्वी म्हटले आहे की, तुम्ही **'गुरु-विप्र-धेनु-सुर-सेवी । तशि पुनीत कौसल्यादेवी.'** (१।२९४ चौ.टी. पहा) **(ख) मस्तकावर ठेवणे, कपाळाला, डोळ्यांना व ह्रदयाला लावणे हे चरणरजसेवनाचे प्रकार आहेत.** या सर्वांचा उल्लेख मानसांत आहे. 'करत तिलक गुणगण वश करणी' (१।१।४) **'घडिघडि पदरज निजशिरिं धरती'** (१।३०८।१) **रज शिरिं ह्रदया नयनां लावति'** (२।२३८।४). मस्तकावर धारण करणे पूज्य, अत्यंत वंद्य आहे हे कृतीने दाखविणे आहे. ह्रदयाला लावणे प्रेमाचे निदर्शक व ह्रदय शुद्ध करणारे आणि नयनांना लावणे ज्ञान विराग नयन विमल करून त्यांना उघडणारे आहे. **(ग) जणु** - उत्प्रेक्षा सुचविली - उत्प्रेक्षा करण्यात भाव हा की 'हे वश करिती' असे म्हटले तीसुद्धा केवळ कल्पना आहे. त्यांना इतर काहीच करावे लागत नसता 'वश करिती' अशी कल्पना केली जाते. सर्व प्रभाव रज मस्तकावर धारण करण्याचाच असतो. या सिद्धान्ताला दृष्टान्त नसेल तर सिद्धान्त मिथ्या ठरतो म्हणून पुढील चौपाईत स्वतःचाच दृष्टान्त देतात. या सिद्धांताची व्याप्ती 'जे कोणी व सकल' या शब्दाने दाखविली आहे. स्त्री-पुरुष, कोणत्याही जातीचा, वर्णाचा, कोणी असो त्याला हा सिद्धान्त लागू आहे. कोणते वैभव हे सकल शब्दाने सांगितले आहे.

**चौ.६. (१) मज राम हें अनुभवति न बूजे** – दशरथ सांगतात की जे काही वैभव प्राप्त झाले आहे ते गुरुचरण रेणु सद्भावनेने, प्रेमाने व श्रद्धेने मस्तकांदिकांवर धारण करण्यानेच मिळाले आहे; ते इतर प्रयत्नांचे फळ नाही; व इतर प्रयत्नांनी मिळण्यासारखे नाही. दशरथांसारखे वैभव, सुखाचे साधन, इतर कोणालाच लाभले नाही. हे स्वतः वसिष्ठांनीच म्हटले आहे. दशरथ येथे आपल्या अनुपम भाग्याची प्रशंसा करून गुरुपदसेवेचा प्रभाव वर्णन करीत आहेत. **(क) प्राप्त सकल** – सकल वैभव व त्यापासून मिळणारे सुख तर मिळालेच; पण **वैभवाने न मिळणारे सकल सुख सुद्धा मिळाले.** रामलक्ष्मणादिकांसारखे पुत्र व सीतादिकांसारख्या सुना यांची प्राप्ती वैभवाने झालेली नाही. पुत्रावर शत्रूसुद्धा प्रेम करतात हेही वैभवाचे फळ नव्हेच; म्हणून सकल वैभव न म्हणता 'सकल' म्हटले.

**चौ. ७. (१) अतां मनीं एक (च) अभिलाष आहे** – असे दशरथ आज म्हणाले. **'पहा आज मुनिराज आपले । कृपें पूर्ण मम काम जाहले.** (१।३३०।६) असे पूर्वी दशरथांनीच म्हटले आहे. तरी आता पुन्हा एक अभिलाषा-कामना (काम) आहेच. नरजीवाचे असेच आहे. एक प्रबळ कामना पूर्ण झाली की त्या वेळी वाटते की सर्वकामना पूर्ण झाल्या, आता कांहीही इच्छा राहिली नाही. परंतु काही काळ गेला की पुन्हा एक नवी कामना उद्भवतेच. दहा इंद्रिये रूपी घोड्यांनी चालणारा व मनरूपी लगाम असलेला नर देहरूपी रथ ज्याला मिळाला आहे असा जीवदशरथ नेहमी असेच म्हणत असतो की 'आता इतकीच इच्छा आहे.' इतकी पुरली की मला आणखी काही नको; परंतु 'मनोरथानामगतिर्न विद्यते' हेच खरे. वा. रा. दशरथांनी रामचंद्रांस असेच म्हटले आहे. 'तुला राज्याभिषेक झालेला पाहणे एवढी एकच इच्छा राहिली आहे. बाकी सर्व कामना पूर्ण झाल्या. आणखी काही वर्षे जगले असते तर पुन्हा एकच इच्छा नातु व्हावा' ही उत्पन्न झाली असती. एकूण 'आशावधिं को गतः' हा सिद्धान्त येथे दाखविला आहे.

**चौ. ८.** (१) या हिंदी चौपाईचा अर्थ दोन प्रकारांनी करता येण्यासारखा आहे. कहेउ नरेस - नरेश म्हणाले हा एक अर्थ; व मुनि कहे नरेसु ! रजायसु

देहू' (आज्ञा द्या.) मुनि म्हणाले की नरेश (नृपवर) आज्ञा द्या, हा दुसरा अर्थ. हा दुसरा अर्थ घेण्यात २-३ अडचणी आहेत. वसिष्ठ गुरु असून त्यांनी 'आज्ञा द्या' असे दशरथास म्हणणे योग्य नाही, आज्ञा द्या असे वसिष्ठांनी सांगितल्यावर या चौपाईनंतर दशरथांचे उत्तर असणे जरूर होते; तसे नसून वसिष्ठच पुढील दोह्याचे वक्ते आहेत. दशरथ म्हणतात, की आपली आज्ञा मिळाली तर अभिलाषा कोणती ते सांगेन. या विनंती प्रमाणे याच्यापुढे वसिष्ठांचे भाषणच योग्य आहे. '**मुनि प्रसन्न लखि; सहज सनेहू । कहेउ नरेसु रजायसु देहू**' कहेउ क्रियापद व नरेश यांचा अत्यंत निकट संबंध आहे, आणि मुनि कहेउ यांत दूरान्वय दोष होतो. कारण कहेउ या क्रियापदापासून मुनि हा कर्ता नरेशपेक्षा पुष्कळ दूर आहे; म्हणून या तिन्ही कारणास्तव अनुवादांत दोन अर्थ होण्याला वाव ठेवलेला नाही. (क) गुरुंना किंवा थोरांना काही विचारावयाचे असल्यास प्रथम विचारण्याबद्दल परवानगी-आज्ञा-मागून ती मिळाल्यानंतर विचारावे; सांगावे, अशी नीतिमर्यादा; शिष्टाचार आहे. याचे पालन मानसांत अनेक ठिकाणी केले आहे. '**अति विनयें लाजतां स्मितानन । वदले पाहुनि गुरु-अनुशासन**' (१।२१८।४) आज्ञा मिळाल्यानंतर रामचंद्रांनी विश्वामित्रांस विचारले आहे. 'वदा काय हनुमान' अशी आज्ञा प्रभूंनी दिल्यावरच हनुमान म्हणाले '**नाथ ! भरत पुसुं इच्छिति काहीं । विचारण्या संकोच मनाही**' (७।३६।६) येथे **दशरथ आपला अभिलाष-इच्छा-सांगण्याची आज्ञा-परवानगी-मागत आहेत व** तीसुद्धा मुनि प्रसन्न आहेत असे पाहून. वसिष्ठ प्रसन्न होण्याचे कारण दशरथांच्या बोलण्यात दिसून आलेला रामावरील सहजस्नेह व गुरुपदरजाविषयी परमोच्च श्रद्धा व गुरुवरील प्रेम हे आहे.

**उपदेश** – प्रमुदित मनाने व शरीराने गुरुजनांकडे जावे ते प्रसन्न होतील असे सत्य प्रिय बोलावे, प्रसन्न झालेले दिसताच विचारण्याची आज्ञा मागावी; आणि तशी आज्ञा मिळाली की मग मुख्य विषय काढावा, असे न केल्यास कार्यहानि होण्याचा फार संभव असतो.

***हिं.दो.*** *। राजन राउर नाम जसु सब अभिमत दातार ॥*
*॥ फल अनुगामी महिप मनि मन अभिलाषु तुम्हार ॥३॥*

म.दो. । राजन् ! अपलें नाम यश पुरवि सकल कांक्षांस ॥

॥ फल-अनुगामी महिप-मणि तव मानसिं अभिलाष ॥३॥

**अर्थ :** राजा ! तुमचे नाव व यश सर्वांच्या सकल कांक्षा (इच्छा-अभिमत) पुरविणारे आहे; व तुमच्या मनात जी अभिलाषा असते ती हे महीपमणि ! फळाच्या मागोमाग जाणारी असते. (हे महिपमणि ! चारी फलें (पुरुषार्थ) तुमची अनुगामी असता तव मानसिं अभिलाष !)

**टीका दो. :** वसिष्ठ ऋषि सर्वज्ञ त्रिकालज्ञ असल्यामुळे राजाची अभिलाषा काय आहे हे त्यास सहज कळलेच आणि रामवनवासाची वेळ अगदी समीप आली आहे, हे त्यांस माहीत आहे; पण अवतार-रहस्य प्रगट करता येत नाही, म्हणून खरे सांगता येत नाही, व असत्य बोलता येत नाही; त्यामुळे दुहेरी अर्थ असलेले, व सर्वसामान्यपणे आजपर्यंत घडत आले तसे, सिद्धान्तरूप वाटणारे, राजाला दुःख होणार नाही असे व अनुकूल भासणारे भाषण करणे भाग पडत आहे. राजाने आज्ञा मागितली खरी, पण त्या बद्दल 'हो', 'नाही' न म्हणता, त्या विषयाला बगल देऊन, आपली पूर्ण संमती आहे असे राजास वाटावे अशा प्रकारचे उत्तर वसिष्ठांनी दिले आहे. (क) दशरथाने जो अर्थ ग्रहण करावा असे वसिष्ठांस वाटत आहे तो वर प्रथम दिला आहेच. वसिष्ठांच्या मनातील जो अर्थ आहे तो कंसांत दिला आहे. (ख) **अनुगामी** = मागोमाग जाणारा, अनुचर; स्वामींच्या मागे सेवक चालतात तशा तुमच्या अभिलाषा मागे व त्यांची सफलता पुढे असे तुमचे भाग्य आहे. अंधतापसाच्या शापाने पुत्रांची देणगी पुष्कळ काळ आधीच देऊन ठेवली होती; व नंतर दशरथांस अभिलाषा उत्पन्न झाली. रघुवीर विवाह कोठे, कोणाशी होणार हे आधी ठरवून विश्वामित्र निघाले; व अयोध्येस आले तो विवाहाचा विषयच तेथे चर्चिला जात होता; (वा.रा. पहा) म्हणजेच आधी कामनासिद्ध व मग कामना उत्पन्न होणे अशा गोष्टी दशरथांच्या आयुष्यात अनेक घडल्या असल्याने वसिष्ठांचे हे भाषण दुटप्पी-द्व्यर्थी आहे असे राजाला वाटणे शक्य नाही.

(२) **फल** = चार फल, अर्थ, धर्म, काम व मोक्ष ही चार फळे-चार

पुरुषार्थ, जणू काय चार पुत्ररूपाने दशरथांस प्राप्त झालेलेच आहेत. **'नृपसमीप शोभति सुत चारी । जनु धन धर्मादिक तनुधारी'** (१।३०९।२) **'जनुं लाभति भूपालमणि सक्रिय चारि फळांस'** (१।३२५) हे चार पुरुषार्थ ज्याच्या पाठीस लागले आहेत त्याच्या मनात अभिलाष ! त्याच्या मनात अभिलाषा उत्पन्न होणे शक्य नाही. भाव हा की या वेळी उत्पन्न झालेली अभिलाषा स्वाभाविक नाही; इतर कोणीतरी त्यांच्या बुद्धीस प्रेरणा देऊन ही अभिलाषा उत्पन्न केली आहे. **'प्रेरक हरिं रघुवंश विभूषण'** हे तर खरेच, पण ज्या चतुराननाने सर्व देवांच्या वतीने प्रार्थना केली व प्रभूंनी रघुवंशात अवतार घेण्याचे व देवादिकांचे दुःख दूर करण्याचे अभिवचन आकाशवाणीने दिले, ते ब्रह्मदेव बुद्धीची देवता आहेत. **'अहंकार शिव बुद्धि अज -'** (६।१५ टी.प.) त्यांनासुद्धा रावणाचा जाच आहेच. व रावणाचा वध व्हावा असे त्यांना सुद्धा मनापासून वाटत आहे; म्हणून पूर्वतयारी इंद्रसूर्यचंद्र यांनी केल्यावर त्याहून कठीण कामगिरी विरंचीनी केली. वसिष्ठांचे पिताच ब्रह्मदेव; (७।४८।६.७ पाहा) वसिष्ठांस हे सर्व रहस्य कळले आहे; परंतु रावणवध नाटकात रघुकुल गुरु व दशरथांचे गुरु म्हणून जी कामगिरी करावयाची ती चोख बजावीत आहेत, व गुप्त विचारही प्रगट करीत आहेत.

(२) दुसरा अर्थ जरि दशरथांनी घेतला तरी त्यात त्यांची महतीच वर्णिली असल्याने वाईट वाटण्याचे किंवा अवतार-रहस्य प्रगट होण्याचे कारण नाही. 'तव मानसिं अभिलाष' तुमच्या मनात अभिलाषा कोठून असणार? मला मोठेपणा देण्यासाठी तुम्ही विचारू इच्छिता इतकेच; कारण चार फळे-चारी पुरुषार्थ - तर तुमच्या मागोमाग धावत आहेत; तुम्हाला ते नको आहेत; तुम्हाला रामस्नेह पाहिजे तो प्राप्त झालेलाच आहे. चार फल = चार पुत्र हा अर्थ दशरथांच्या ध्यानीमनी येण्यासारखा नाही; कारण राम परमात्मा आहेत हे ज्ञान त्यास मुळीच नाही. असे दोन अर्थ न घेतल्यास वसिष्ठ वचन खोटे ठरले असे सिद्ध होईल. **'मी असतां हा उत्सव व्हावा । लोकीं लोचन लाभ लुटावा'** अशी आहे दशरथांची अभिलाषा. (पुढील चौ. ३ पाहा) पण दशरथ जिवंत असता हा उत्सव झाला नाही. (क) **'मन अभिलाष तुम्हार'** यांतील मन

**हे अप्रत्यय सप्तमीचे रूप** न घेतल्याने - लक्षात न आल्याने - या दोहयाचा अर्थ लावताना टीकाकारांना नाना प्रकारची शब्दांची व अर्थाची कसरत करावी लागली आहे. राजन = राज (राज्य) न इ.इ. नमुने मा.पी. मध्ये पहावे. या लेखकाला सुद्धा या दोहयाचे कोडे सुटत नव्हते पण मन = मनात हा अर्थ एकाएकी स्फुरला व कोडे उत्तम प्रकारे उलगडले. मानसांत प्रत्ययहीन सप्तमी, तृतीया इत्यादींची रूपे शेकडो ठिकाणी वापरली आहेत. (हिंदीत) १/२ टीकेत काही उदाहरणे दिली आहेत. **'मोरें मन प्रभु अस बिस्वासा'** (७।१२०।१६) मन = मनात, **'तव मन प्रीति देखि'** (७।१२८।२) **एहिं कलिकाल न साधन दूजा** (७।१३०।५) **कलिकाल = कलिकालांत = अदृश्य शक्तीने ऐन वेळी या बुद्धीत प्रकाश पाडला म्हणूनच या दोहयाचा यथार्थ या मंद बुद्धीला लावता आला** व नवीन अनुवादात खोडाखोड करावी लागली. (हस्तलिखित द्वितीयानुवाद वही २ री पृ. २६९ पहा). 'तुम्हार मन अभिलाष' असा हिंदीचा अन्वय होईल. मन व अभिलाष एकवचनी व पुल्लिंगी असल्याने तुम्हार शब्द मन व अभिलाष या दोहोंकडे सहज लागतो. अशा प्रकारचा तारेवरचा नाच या काण्डात अनेक ठिकाणी करावा लागणार हे गोस्वामींना चांगले माहीत होते; त्यामुळे शब्द-रचनेत अर्थाचा तोल जाऊ नये म्हणून काण्डारंभी मंगलाचरण दोहयांत गुरुचरणरजाने मनरूपी आरसा आधीच निर्मल करून ठेवला व येथे पुन्हा गुरुचरणरजाचा व आरशाचा उल्लेख केलाच. पुढल्या दोहयांत सुद्धा अशीच कसरत करावी लागणार आहे.

***हिं.*** ***। तब बिधि गुरु प्रसन्न जियँ जानी । बोलेउ राउ रहसि मृदु बानी ॥१॥***
***। नाथ राम करिअहिं जुबराजू । कहिअ कृपा करि करिअ समाजू ॥२॥***
***। मोहि अछत यहु होइ उछाहू । लहहिं लोग सब लोचन लाहू ॥३॥***

***म.*** ***। सर्वपरीं गुरु प्रसन्न कळुनी । वदले नृप हर्षित मृदु वचनीं ॥१॥***
***। करणें नाथ ! राम युवराजा । वदा कृपायुत 'सजवा साजा' ॥२॥***
***। मी असतां उत्सव हा व्हावा । लोकीं लोचन-लाभ लुटावा ॥३॥***

**अर्थ :** गुरु महाराज सर्व प्रकारे प्रसन्न आहेत हे कळून (जाणून) दशरथ राजा हर्षाने (रहसुनि) मृदु वचनाने बोलले. (मृदु वाणी बोलले).॥१॥ नाथ

। रामचंद्राला युवराज करावा; तरी कृपाकरून आज्ञा द्यावी कीं सर्व तयारी करा ('साज सजवा).।।२।। मी जिवंत असता हा उत्सव व्हावा व लोकांना लोचन लाभ लुटण्यास सापडावा.।।३।।

**टीका :** ल. ठे. **लोकीं :** लोकांनी. हिंदीतील **'रहसि'** हे ('हरषि' हर्षित होऊनचे वर्ण-विपर्यय करून सिद्ध केलेले रूप आहे. 'ह' चे जागी र व 'र' च्या जागी ह अशी वर्णाची उलटापालट केली आहे. **रहसना = हर्षणे** हे क्रियापद सुरदासांनी वापरले असले तरी मानसांत व विशेषतः या काण्डात त्याचा उपयोग एकाच विशिष्ट हेतूने अनेक ठिकाणी केलेला दिसतो. जिथे जिथे या शब्दाचा उपयोग केला आहे तिथे तिथे हर्षाचा विपर्यय झालेला पुढे दिसला आहे. पण असा भाव मराठीत अनुवादात उतरविणे योग्य न वाटल्याने पाठभेद म्हणून 'रहसणे' ची रूपे पाद टीपेत दिली आहेत; व ती हर्षणेच्या जागी अनुवादात वापरता येतील. २।७, २।१७।२, २।४३।१ या ठिकाणी 'हर्षणें' बद्दल रहसणे वापरले आहे.

**चौ.१.(१) सर्व परीं गुरु प्रसन्न कळुनी** – वसिष्ठांचे उत्तर ऐकून राजाला वाटले की गुरुराज आज आपल्यावर सर्वतोपरी प्रसन्न झाले आहेत. **(क) वदले नृप हर्षित.** आता आपल्या विनंतीला मान्यता मिळेल, प्रेमाने कृपाशिर्वाद मिळेल व उद्या सकाळी रामाला यौवराज्याभिषेक झालेला पाहून जन्म-जीवन-फळ मिळणार असे दशरथांस वाटले म्हणून हर्ष झाला; पण कवि म्हणतात की या हर्षाचे फळ उलट मिळणार आहे. अत्यंत शोकाची शिकार बनावे लागणार आहे. कार्यारंभी हर्ष होत असून कार्यसिद्धी तर नाहीच नाही पण उलट होणार आहे. (कार्यारंभी होणारा हर्ष कार्यसिद्धी सूचक अत्यंत शुभ शकून असतो या नियमास अपवाद नकोत म्हणून कवींनी 'रहसि' शब्द वापरला, हर्ष वापरला नाही.) 'अति विचित्र भगवंत गति' हेच खरे **'विषमप्यमृतं क्वचिद् भवेत् । अमृतं विषमीश्वरेच्छया'** ही उक्ती कवीच्या हृदयात घोळत आहे.

**चौ. २. (१) नाथ !** म्हणण्यात भाव हा की आपण स्वामी आहात; आम्ही सेवक आहोत. आपण आज्ञा दिलीत, कृपा केलीत तर ही शेवटची एक अभिलाषा पूर्ण होऊन मी सनाथ होईन. आजपर्यंत जसा मला व रघुवंशाला

सनाथ केलात तसेच आता करावे. **(क) बवा** - सांगा, आज्ञा द्यावी; भाव हा की आपण आज्ञा दिलीत तर हे सहज घडेल. **(ख) साज** = सामग्री, तयारी, यौवराज्याभिषेकाची सर्व पूर्व तयारी.

**चौ. ३. (१) मी असतां उत्सव हा व्हावा** – या वरून व दशरथांनी जी घाई चालविली आहे त्यावरून असे दिसते की आपण लवकरच मरणार अशी भीती, अशी शंका दशरथाच्या हृदयात घर करून बसली आहे. वा. रा. (२।१।४३) स्पष्ट उल्लेख आहे की **'दिव्यन्तरिक्षे भूमौच घोरमुत्पातजं भयम् । संचचक्षे च मेधावी शरीरे चात्मनो जराम्'** नाना प्रकारचे घोर उत्पात सर्वत्र होताना राजाला दिसले. **'आत्मनश्च प्रजानां च श्रेयसे च प्रियेण च । प्राप्तकाले स धर्मात्मा भक्त्या त्वरितवान् नृपः'** (२।१।४५) **(क) लोकीं लोचनलाभ लुटावा** – **'विद्यमान नृपती करो युवराजा रामास'** (२।१) अशी सर्व लोकांची इच्छा आहे हे कवींनी आधीच सांगितले आहे. राजाच्या मनात येथे हा भाव आहे की माझी इच्छा पूर्ण झाली तर ती लोकांच्या-प्रजेच्या-सुखाला कारण होणार आहे. मी मेल्यावर रामाला राज्याभिषेक झाला तरी माझी आठवण माझ्या प्रिय प्रजेला त्या वेळी होऊन राज्याभिषेकोत्सव थाटाने, परमानंदांत न होता दुखवट्याच्या दिवाळी सारखाच होईल. खरोखरच मानसांत रामराज्याभिषेक (उ.कां.) झाला आहे तो दुखवट्याच्या दिवाळी सारखाच झाला आहे. रामराज्याभिषेकाच्या वेळी अयोध्येत वाद्ये मुळीच वाजली नाहीत ! देवांनी आकाशात वाजविली आहेत; नगर लोकांनी घरोघर उत्सव केले नाहीत. त्या वेळी आरत्या, ओवाळण्या, थव्याथव्यांनी युवतींनी मंगलगान करीत जाणे इ. काहीच घडले नाही.

हिं. *। प्रभु प्रसाद सिव सबइ निबाहीं । यह लालसा एक मन माहीं ॥४॥*
*। पुनि न सोच तनु रहउ कि जाऊ । जेहिं न होइ पाछें पछिताऊ ॥५॥*
*। सुनि मुनि दशरथ बचन सुहाए । मंगल मोद मूल मन भाए ॥६॥*
*। सुनु नृप जासु बिमुख पछिताहीं । जासु भजन बिनु जरनि न जाहीं ॥७॥*
*। भयउ तुम्हार तनय सोइ स्वामी । राम पुनीत प्रेम अनुगामी ॥८॥*

म. *। शिवें प्रभु कृपें सर्व पुरविली । हौस, एक ही मनीं राहिली ॥४॥*
*। मग न शोच तनु राहो जावो । तेणें पश्चात्ताप न पावों ॥५॥*

*। नृप-शुभ-वच- मुनि-कानीं पडलें । मंगल-मोद-मूल मनिं रुचलें ॥६॥*
*। श्रुणु नृप ज्यास विमुख अनुतापति । यद्भजनाविण ताप न नाशति ॥७॥*
*। झाला तुमचा सुत तो स्वामी । राम पुनीत प्रेम अनुगामी ॥८॥*

**अर्थ :** प्रभु ! आपल्या कृपेने (प्रसादाने) शिवाने सगळी हौस पुरविली; फक्त एवढी एकच हौस (लालसा) मनात उरली आहे.॥४॥ (एवढी पुरी झाली म्हणजे) मग हा देह राहो किंवा जावो. मला वाईट वाटणार नाही. (काही चिंता, शोक, करण्याचे कारण नाही.) व तेणे करून मग पश्चात्ताप करण्याची पाळी माझ्यावर येणार नाही.॥५॥ दशरथ राजाचे सुंदर (शुभ) वचन मुनींच्या कानी पडताच; ते मंगल व मोद यांचे मूळ असल्याने वसिष्ठांस आवडले.॥६॥ (ते म्हणाले की) राजा ! ऐका ! ज्याच्याशी विरोध केला असता विरोधकांना पश्चात्ताप करावा लागतो व ज्याच्या भजनाशिवाय ताप नष्ट होत नाहीत.॥७॥ तोच पवित्र प्रेमाच्या मागे धावणारा (वश होणारा) स्वामी राम तुमचा पुत्र झाला आहे.॥८॥

**टीका : चौ. ४ (१) शिवें प्रभु कृपें सर्व हौस पुरविली – येथे हे दाखविले की सद्गुरु कृपा झाली तरच शंकर सर्व संकटे निवारण करून सर्व इच्छा पुरवितात व शिव-कल्याण-करतात. 'धन्य मुनि कृपें तुमची सारीं । बाळ ! संकटें ईश निवारी॥'** (१।३५७।१) उत्तर काण्डातील भुशुंडी कथेत शूद्रावर रुद्राचा कोप होऊन त्याला घोर शाप दिला गेला; पण त्याच्या विप्रगुरुने कृपा करून शिवाची प्रार्थना केल्याबरोबर प्रसन्न होऊन शंकरांनी इतके वर दिले की त्याच्या गुरुलाही ते मिळाले नाहीत; व त्या शूद्राचे कल्याण झाले. **(क) प्रभु** - याने सुचविले की हे कार्य सिद्धीस नेण्यास आपणच समर्थ आहात. आपण कृपा केलीत तर भगवान शिव कृपा करतील. २५५।७-८ पहा.

**चौ.५.(१) मग न शोच तनु राहो जावो** - भाव हा की मी जिवंत असता ही गोष्ट जर घडली नाही तर मी मेल्यावर मला शोक करीत रहावे लागेल व पश्चात्ताप करण्याची पाळी येईल. मला मरणाची भीती मुळीच वाटत नाही; पण इतकीच भीती वाटते की ही इच्छा पूर्ण होण्याच्या आधीच मरेन की काय? **येथेसुद्धा स्पष्ट दिसते की आपण लवकरच मरणार असे दशरथास वाटू**

**लागले आहे.** (क) वा. रा. सर्ग ४ मधे स्पष्ट उल्लेख आहे. दशरथ रामासच सांगतात, 'तुला यौवराज्याभिषेक करण्यापलीकडे माझे काही कर्तव्य उरले नाही,' इत्यादी. हे सांगितल्यावर म्हणतात, **'अपिचाद्याऽशुभान् राम स्वप्नान् पश्यामि दारुणान् । सनिर्घाता महोल्काच पततीह महास्वना ॥१७॥ अवष्टब्धं च मे राम नक्षत्रं दारुणैर्ग्रहैः । आवेदयन्ति दैवज्ञा सूर्यांगारक राहुभिः ॥ प्रायेणच निमित्तानामीदृशानां समुद्भवे ॥ राजा मृत्युमवाप्नोति घोरां वापदमृच्छति ॥१९॥ तद्यावदेव मे चेतो न विमुह्यति राघव ॥ तावदेवाभिषिच्यस्व चला हि प्राणिनां मतिः'॥२०॥** गेल्या रात्रीच अति भयंकर अशुभ स्वप्ने पडली. वीज पडून मोठी उल्का मोठा आवाज करीत पडलेली दिसली. माझ्या जन्म नक्षत्रावर सूर्य, मंगळ व राहु हे पापग्रह आलेले आहेत; अशा प्रकारच्या उत्पातांचे फळ बहुधा राजाचा मृत्यू किंवा राजा घोर आपत्तीत पडणे हे असते; म्हणून जो पर्यंत माझ्या चित्ताला विमोह उत्पन्न झाला नाही तोपर्यंत तू अभिषेक करून घे. (कारण) प्राण्यांची बुद्धि चंचल असते. हाच भाव या चौपाईत ध्वनित केला आहे.

**चौ.६. (१) नृप शुभवच... रुचले** - वसिष्ठ सर्वज्ञ, त्रिकालज्ञ आहेत, त्यामुळे रमानाथ रघुनाथास राजा करण्याची दशरथांची विनंती त्यांस आवडली. **'मंगलमूल राम'** (२।२।५) **'मंगलभवन अमंगलहारी ।... दशरथ अजिर विहारी॥** (१।११२।४) **'जो आनंदसिंधु सुखराशी'** तो राजा होणे सर्व मंगलाचे व आनंदाचे मूळ असल्याने वसिष्ठांस नृपवचन आवडले; कारण **'यथा राजा तथा प्रजा'** असे सहजच होणार. हा वाच्यार्थ झाला. **(क) गूढार्थ** – खरदूषणादि व रावणादि निशाचर अमंगलाचे व जगाच्या दुःखाचे मूळ आहेत. अयोध्या जनकपुरी इत्यादी काही अपवाद सोडून या अमंगलमूलांनी सर्वत्र अमंगलाचा, अधर्माचा प्रसार करून दुःखाचे पूर आणले आहेत. अमंगलहारी मंगलकारी रामसीता आहेत. त्यांच्या वनवासाच्या निमित्ताने विश्वमंगलकारी व विश्वदुःखदैन्यविदारी रामच बनणार आहेत हे ते जाणतात. दशरथांचे वचन या प्रमाणे विश्वाच्या मंगलाचे व मोदाचे मूळ असल्याने ते वसिष्ठांस रुचले. **राज्याभिषेकाच्या दिवशी राज्याभिषेक न होता राम वनात जाणार हे माहीत असता**

**दशरथाचे वचन मंगलमोदमूल म्हणण्यास वरील कारणाशिवाय दुसरे कारण नाही.** हे भविष्य दशरथांस माहीत असते तर त्यांनी राज्याभिषेकाचा विचार सुद्धा केला नसता. मग वसिष्ठांकडे जाऊन उच्चार करणे तर अगदीच अशक्य होते. हे भविष्य माहीत असते तर रामराज्याभिषेकाचा बेत-विचारसुद्धा त्यांना अमंगलमूल व शोकमूलच वाटला असता. **(ख)** वसिष्ठांनी अभिषेकाचा बेत रद्द करणे राजाला अत्यंत दुःखदायक वाटले असते व विश्वहिताचे मूळच तोडल्यासारखे झाले असते; परंतु दशरथांचे रामप्रेम विचारात घेता रामवियोगाने त्यांचे प्राण जाण्याचा संभव जाणून, राजाची रामाविषयीची पुत्र भावना दूर करून राम परमात्मा आहेत ही भावना जागृत करण्याचा प्रयत्न पुढील दोन चौपायांत वसिष्ठ करीत आहेत.. (ग) दशरथाच्या भाषणातील **'पश्चाताप न पावौं'** या वाक्याचा आधार घेऊन आता बोलतील.

**चौ. ७-८ (१) ज्यास विमुख अनुतापति** – याने सुचविले की तुम्ही रामविरोधी नसल्याने तुम्हाला पश्चात्ताप करावा लागणार नाही. (हा पश्चाताप रामाला राज्याभिषेक न केल्याबद्दलचा आहे.) दुसरे हे सुचविले की उद्या राज्याभिषेकाचा बेत करावा अशी रामाचीच इच्छा आहे हे वसिष्ठांनी जाणले आहे. हे रहस्य पुढे बृहस्पतीच्या मुखाने बाहेर पडले आहे; २।२१८।३ पहा. अ. रा. सर्ग ९ पहा. दशरथ रामाच्या इच्छेला विरोध करीत नाहीत म्हणून रामविरोधाबद्दल पश्चात्ताप त्यांना करावा लागणार नाही हा गूढार्थ आहे; पण वसिष्ठांनी रामेच्छेला विरोध करून दशरथांनी मनात केलेला बेत रद्द केला तर स्वतःसच पश्चाताप करावा लागेल हे वसिष्ठ जाणतात. बाह्य लौकिकार्थ हा आहे की रामराज्याभिषेकाला जे कोणी विरोध करतील त्यांना शेवटी जन्मभर पश्चातापाने जळत रहावे लागेल. कैकयीला पोटभर पश्चाताप झालाच आहे. कुबडीचे कुबड फुटून दांत पडल्यावर तिलाही खूप पश्चात्ताप झाला असेल. ती नाममात्रसुद्धा राहिली नाही रामायणात ! हे वचन दशरथांस माधुर्य भावाने सुद्धा सत्य वाटेल म्हणून आणखी स्पष्ट सांगतात.

(२) ही पश्चातापाची जळजळ, दाह, ताप ज्यांच्या भजनाशिवाय नष्ट होत नाहीत ते राम, सर्व विश्वाचे स्वामी तुमचे पुत्र झाले आहेत. हे वाक्य

मात्र स्पष्ट सांगते की राम परमात्मा आहेत; केवळ मुनष्य नाहीत; त्यांची इच्छा असेल तसेच घडेल. तेथे माझ्या प्रभुत्वाचा (सामर्थ्याचा) किंवा शंकराच्या दयेचा व प्रभावाचा काही उपयोग होणार नाही. **'राम करूं इच्छिति तें घडतें। कोणि नसे जो करी उलट तें'** यत्न करणे आमचे व तुमचे कर्तव्य आहे; रामाच्या इच्छेप्रमाणेच घडेल, हा आहे गूढार्थ. **(क) राम पुनीत - प्रेम -अनुगामी** -- परमात्मा असून पुत्र कां झाले याचे उत्तर **'पुनीत-प्रेम-अनुगामी'** या शब्दांनी दिले आहे. पुनीत प्रेमाच्या मागोमाग जाणारा, पुनीत प्रेमाचा सेवक बनणारा जो परमात्मा तोच तुमचा पुत्र राम आहे. जो अनंत ब्रह्मांडांचा स्वामी आहे तोच तुमचा पुत्र बनला आहे. येथील 'अनुगामी' शब्द व **'फलअनुगामी महिपमणि तव मानसिं अभिलाष'** (दो. ३) यांतील 'महिपमणि अनुगामी फल' व **'तुमचा अनुगामी राम सुत'** यांची तुलना करून पाहणे मोठे आनंददायक आहे.

(३) या प्रकारची ऐश्वर्य भावाची जागृती वसिष्ठांनी दशरथांस वेळोवेळी दिली आहे. **'वेदतत्त्व नृप तव सुत चारी'** (१।१९८।१) याने नामकरणाच्या वेळी जागृती दिली. **'तै वसिष्ठ विविधा समजावति'** (१।२०८।८) व आता येथे अगदी स्पष्टपणे सांगितले; परंतु मनु असताना मागून घेतलेल्या वराच्या प्रभावाने आणि अंधतापस-शाप वगैरे इतर कारणांनी हे ऐश्वर्यज्ञान राजाच्या चित्तांत शिरणे सुद्धा कठीण आहे ! आता दशरथांनी सुचविल्याप्रमाणेच आज्ञा देतात :

*हिं.दो.* *। बेगि बिलंबु न करिअ नृप साजिअ सबुइ समाजु ॥*
*। सुदिन सुमंगलु तबहिं जब रामु होहिं जुबराजु ॥४॥*

*म.दो.* *। त्वरा करा न विलंब नृप सजवा सारा साज ॥*
*॥ सुदिन सुमंगल तैं च जैं राम होति युवराज ॥४॥*

**अर्थ :** राजा ! त्वरा करा, विलंब मुळीच करू नका व (अभिषेकाचा) सर्व साज (संच, सामग्री) सजवा (तयार करा.) जेव्हा राम युवराज होतील तेव्हाच सुमंगल व तोच सुदिन ॥४॥

**टीका दो. -** (१) दोह्यांत पुन्हा तारेवरचा नाच करावा लागला आहे.

राजांच्या इच्छेला विरोध करण्याने त्याला परम दु:ख झाले असते. रामाच्या-प्रभूच्या-इच्छेशी विरोध केला गेला असता; व का नको याचे कारण सांगावे लागले असते. ते म्हणजे रामवनवासवृत्त सांगितले असते तर दशरथाने स्वेच्छेनेच हा बेत रद्द केला असता. अशा अनेक अडचणींमुळे सत्य सांगणे किंवा अभिषेकाचा बेत रद्द करणे किंवा पुढे ढकलणे, 'अशुभस्य कालहरणम्' करणे, अशक्य झाले. राजाने मुहूर्त, दिवस वगैरे काहीच विचारले नाही; व वसिष्ठांनी या दोह्यांत कोणता दिवस, वेळ इ. काही सांगितले नाही. परमात्म्याच्या कार्यास सुदिन व सुमुहूर्त, मंगल समय इ. पाहिले तरी ठीक न पाहिले तरी ठीक हा बाह्यार्थ आहे. **'तदेव लग्नं सुदिनं तदेव, ताराबलं चंद्रबलं तदेव ॥ विद्याबलं दैवबलं तदेव लक्ष्मीपते तेंऽघ्रियुगं स्मरामि'** याचेच सार **'सुदिन सुमंगल तैच जै राम होती युवराज'** यांत आहे. (क) दशरथ आपल्या मनोरथांचे मनोरे उभारण्यात गर्क असल्याने त्यांनी आपल्या मनोरथास पोषक असा जो बाह्यार्थ तोच घेणे अगदी स्वाभाविक आहे. **'आर्ताचे मनिं विवेक नसतो' 'डाव जुगाऱ्या अपला दिसतो'** (२।२५८।१). वसिष्ठ मात्र स्पष्टपणे बजावीत आहेत की सध्या युवराज होण्याची रामाची (प्रभूंची) इच्छा नाही. ज्या दिवशी ते युवराज होतील तोच सुदिन व ज्या वेळी होतील तोच मंगल मुहूर्त. या रोग्याचे पाय धरणीला लागतील तो सुदिन; याचा अर्थ अगदी उघड उघड आहे की या रोग्याचे पाय धरणीला लागणे - बरा होणे - सध्यातरी अशक्य आहे. असाच वरील वसिष्ठ-वचनाचा अर्थ अगदी उघड आहे; पण दैववशात तो राजाच्या ध्यानी आला नाही. मनाची देवता चंद्रमा आहे; तो देवांना प्रतिकूल ठरणारा अर्थ कसा घेऊ देईल? वसिष्ठांचे हे वचन इतके स्पष्ट व निर्दोष आहे की त्यावर आक्षेप घेण्यास त्यात फट नाहीच. गीतावलीत दिलेले उत्तर - **'महाराज भलो काज बिचाऱ्यो बेगि बिलंबु न कीजै । बिधि दाहिनो होइ तौ सब मिलि जनम लाहु लुटि लीजै ।'** (२।१।३) स्पष्ट असले तरी येथील दोह्यांतील वचनाएवढे सरळ व स्पष्ट नाही. दैव अनुकूल झाले तर सर्व मिळून जन्म लाभ लुटून घ्या, यात रामाच्या इच्छेचा उल्लेख नसून दैवाने विघ्न आणले जाण्याचा संभव सुचविला इतकेच. भरताच्या राज्याधिकाराचा उल्लेख येथे

वसिष्ठांनी किंवा पुढे कैकयी व मंथरा यांनी कोणत्याही प्रकारे एकदासुद्धा केलेला नाही. वा.रा. मध्येही त्याचा गंधसुद्धा नाही. म्हणून नसती, निराधार, शंका काढून समाधान करीत बसण्याचा अव्यापारेषु व्यापार करण्याची मुळीच जरूर नाही. गीतावलीत किंवा तु.दासांच्या कोणत्याही ग्रंथांत अशा शंकेला स्थानच नाही. 'रिकामा न्हावी कुडाला तुंबड्या लावी' असे करण्याची आवश्यकता नाही. **(ख) 'करणें नाथ राम युवराजा । वदा कृपायुत 'सजवा साजा'** इतकीच दशरथाची मुख्य विनंती होती व वसिष्ठांनीही अगदी त्याच शब्दांत आज्ञा दिली की 'सजवा सारा साज, त्वरा करा, विलंब न करा. (ग) वा. रा. राजाने आधी दिवस, नक्षत्र वगैरे पाहून मग सभेत जाहीर केले व नंतर वसिष्ठांना पुरोहित म्हणून काय तयारी करावयाची वगैरे विचारले आहे. पुष्य नक्षत्रावर अभिषेक करण्याचे राजानेच ठरविले आहे. **(घ) त्वरा करा** – इत्यादी सांगण्यात हेतु इतकाच की असल्या महत्त्वाच्या कार्यात केव्हा, कोणते विघ्न, विलंब केल्यामुळे येईल याचा नेम नसतो. 'धर्मस्य त्वरिता गतिः' 'चलाहि प्राणिनां मतिः' म्हणून दशरथही त्वरा करीतच आहेत.

हिं ***। मुदित महीपति मंदिर आए । सेवक सचिव सुमंत्रु बोलाए ॥१॥***
***। कहि जय जीव सीस तिन्ह नाए । भूप सुमंगल बचन सुनाए ॥२॥***
***। जौं पाँचहि मत लागै नीका । करहु हरषि हियँ रामहि टीका ॥३॥***
***। मंत्री मुदित सुनत प्रिय बानी । अभिमत बिरवँ परेउ जनु पानी ॥४॥***

म. ***। आले मंदिरिं मुदित महीपति । सेवक सुमंत्र सचिवां आणति ॥१॥***
***। ते जय जीव वदुनि शिर नमिती । भूप सुमंगल वचना कथिती ॥२॥***
***। हें मत रुचेल जर पांचांला । अभिषेकणें मुदा रामाला ॥३॥***
***। मंत्री ती प्रिय परिसुनि वाणी । मुदित नवांकुरि पडे किं पाणी ॥४॥***

**अर्थ :** महीपति आनंदाने मंदिरीं (राजवाड्यात) आले व सेवकांनी सुमंत्र व इतर सचिवांना बोलावून आणले.॥१॥ (ते आले) व जय-जीव म्हणून त्यांनी मस्तक नमविले; तेव्हा राजाने त्यांस सुंदर, मंगलमय वचन सांगितले. ॥२॥ (म्हणाले की) हे मत जर पाच जणांना रुचत असेल तर रामाला आनंदाने (यौवराज्य) अभिषेक करावा.॥३॥ ते प्रिय वचन ऐकून मंत्री असे हर्षित झाले

की जणू मनोरथरूपी रोपांवर (पावसाचे) पाणी पडावे (पाऊस पडावा).॥४॥

**टीका : चौ. १ - (१) मुदित महीपति मंदिरिं आले** – वसिष्ठ गुरुंनी मनापासून अनुमती दिली व त्वरेने अभिषेकाची तयारी करण्याची आज्ञा दिली म्हणून राजाला आनंद झाला. ते सभेत न जाता आपल्या राजवाड्यातच आले. (क) **'सेवक'** या हिंदीतील शब्दाचा अर्थ सेवकांनी असा करणे जरूर आहे. कारण राज्याभिषेकाविषयी ज्यांचे मत घ्यावयाचे त्यात सेवकांचा अंतर्भाव होणे शक्य नाही व राजाने सेवकांकडे व सचिवांकडे जाऊन त्यांना बोलावून आणणेही अशक्य व अयोग्य; म्हणून मराठीत संशयाला जागा ठेवलेली नाही.

(२) **ही सचिवांची तातडीची सभा** दशरथांच्या राजवाड्यात भरवली; हेतु हा की सचिवांची संमती मिळाली तर मग हा निश्चय जाहीर करता येईल. वा.रा. दशरथाने भर सभेतच आपला निश्चय जाहीर केला आहे; व सभेत जाहीर करण्यापूर्वीच अभिषेकाचा दिवस स्वतःच ठरवून राजे लोकांना हुकूम पाठवून आणविले आहेत. **'नाना नगर वास्तव्यान् पृथग्जानपदानपि । समानिनाय मेदिन्याः प्रधानान् पृथिवीपतिः ॥४६॥ न तु केकयराजानं जनकं वा नराधिपः ॥ त्वरया चानयामास पश्चात्तौ श्रोष्यतः प्रियम् ॥४८॥ ततः प्रविविशुः शेषा राजानो लोकसंमता'** वा.रा.मधील प्रथम सर्गातील वरील श्लोकांत सांगितले की कैकय राजाला (कैकयीच्या पित्याला) व जनक राजानांच तेवढे आणविले नाहीत. असे करण्याचे कारणही दिले आहे की, त्वरेने आणविले नाहीत; व त्यांना प्रिय असलेली गोष्ट ते पाठीमागून ऐकतील. **या वरून ठरते की रामराज्याभिषेक केकय राजालासुद्धा प्रिय वाटत होता-आहे.** कैकयीच्या पुत्राला राज्य देण्याविषयीचे अभिवचन जर तिच्या लग्नाच्या वेळी दशरथाने दिलेले असते तर केकय राजाला रामाभिषेक प्रिय वाटणे शक्य नाही. म्हणून भरताच्या राज्याधिकाराचा प्रश्न उपस्थित करण्याचे कारण नाही. कोठल्या तरी निराधार दंतकथेला महत्त्व देऊन, तो विषय जिथे तिथे घुसडून शंकासमाधानाचा धुमाकूळ घालण्याचेही कारण नाही. (क) हे लक्षात ठेवले पाहिजे की दशरथाने इतर राजांस निमंत्रणे-बोलावणी-पाठविली नाहीत; त्यांना आणले (आनिनाय). भाव हा की इतर सर्व राजे मांडलिक असल्याने 'त्वरेने ताबडतोब निघून या', असा हुकूमच पाठवून

**त्यांना आणले.** परंतु जनकराजा व्याही व केकय राजा सासरा असल्याने त्यांना हुकूम पाठवून आणणे शक्य व योग्य नव्हते. विनंतीपत्र व निमंत्रण पाठविले असते तर जावयाला व नातवाला राज्याभिषेक असल्याने विशेष तयारी करण्यास सवड मिळावी म्हणून मुहूर्त पुढे ढकलण्याची विनंती केली असती तर ती अमान्य करता आली नसती व दशरथांस तर समारंभ त्वरेने उरकून घ्यावयाचा आहे. आपले मरण फार जवळ आले आहे असे दशरथांस वाटत आहे; म्हणून केकय राजा व जनक राजा या दोघांना न बोलावणेच शहाणपणाचे आहे. जनक राजांस बोलावून केकय राजाला बोलावला नसता तर मात्र दशरथांच्या मनातील हेतूंबद्दल शंका घेता आली असती. भरताला का बोलावला नाही याचे कारण वा. रा. प्रमाणे वरील प्रमाणे आहे. दशरथाच्या भूमिकेत शिरून जे विचार करतील ते असेच म्हणतील की दशरथांनी केले तेच योग्य आहे. **(ख) मानसातील वर्णनाप्रमाणे इतर राजांना किंवा कोणालाही आणण्यास व बोलावण्यास वेळच नाही;** त्यामुळे भरताला का बोलावला नाही असा प्रश्न विचारण्यास जागाच नाही.

(२) वा.रा. प्रमाणे पाहता तेथील दशरथ राजा स्वयंसिद्ध व्यक्तिनिष्ठ शासक दिसतात. तु. दासांनी मानसांत व्यक्तिराज्याचा निर्दोष आदर्शच निर्माण केला आहे. वसिष्ठ सर्वाधिकारी आहेत; परंतु त्यांना नवीन विधेयक (बिल) मांडण्याचा अधिकार नाही; तो अधिकार फक्त राजाचाच आहे; पण त्याला प्रथम सर्वाधिकारी वसिष्ठ यांची अनुमती मिळाली पाहिजे; नंतर पूर्ण व खरे मत स्वातंत्र्य असलेल्या मंत्रिमंडळाची संमती मिळाली पाहिजे. या विषयी सविस्तर विवेचन प्रस्तावनेत **'श्रीतुलसी-शासन पद्धती' हे प्रकरण पहावे.** येथे पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाही.

**चौ. २. (१) ते जयजीव कहुनि शिर नमिती** – ही सचिवांनी राजाला नमन करण्याची पद्धती आहे. 'जय जीव' = आपला जय असो व आपण चिर दीर्घ काळ जगावे असे आशीर्वादयुक्त नुसते मस्तक नमवून हे नमन आहे. याने राजा स्वामी व सचिव सेवक हा संबंध असल्याचे दिसत नाही. **(क) भूप सुमंगल वचना कथिती** – सार हे की रामाला यौवराज्याभिषेक करण्याची

माझी प्रबळ इच्छा अशा कारणास्तव आहे व वसिष्ठ गुरुंनी अन्तःकरणपूर्वक संमती दिली आहे व त्वरेने सर्व तयारी करण्याची आज्ञा आहे इ. गोष्टी सचिवांना सांगितल्या व त्यांचे मत विचारले. वसिष्ठांची संमती असून मंत्रिमंडळाची संमती $\frac{५}{७}$ बहुमताने मिळाली नसती तर राजाला हे कार्य करता आले नसते.

**चौ.३. (१) हें मत रुचेल जर पांचांला** – पांच = पञ्च = पंच, पांचामुखी परमेश्वर ! भाव हा की मंत्रिमंडळाला हा प्रस्ताव मनःपूर्वक मान्य असेल तर रामाला युवराज करावा. राजाच्या घरी एकांतांत ही मंत्रिमंडळाची तातडीची जादा बैठक घेण्यात हेतु हा आहे की मंत्रिमंडळाने प्रस्ताव धुडकावून लावला तर प्रजेचे मत मंत्रिमंडळाविरुद्ध किंवा विरोध करणाऱ्या मंत्र्यांविरुद्ध होऊ नये; कारण सर्व प्रजेची लालसा आहे की राजा जिवंत असताच हे कार्य घडावे. पंचांनी मान्यता दिली नसती तर पंच प्रजामतविरोधी आहेत असे प्रजेस वाटले असते; म्हणून अशी गुप्त बैठक होणेच उचित आहे.

**चौ. ४. (१) मंत्री मुदित नवांकुरिं पडे किं पाणी** – मंत्री प्रजेतलेच ! आपले उखळ पांढरे करण्यासाठी निवडणुकीच्या वेळी वाटेल ती अभिवचने देऊन, पैसा पेरून त्याचे पीक कापून साठविण्यासाठी झालेले मंत्री हे नाहीत. यांनासुद्धा लालसा आहेच की रामाभिषेक शीघ्रातिशीघ्र व्हावा. सुकून जाण्याच्या मार्गास लागलेल्या या आशेच्या अंकुरांवर राजाचे भाषण म्हणजे वळिवाचा पाऊसच पडला; तेव्हा ते अंकुर टवटवीत, तजेलदार, ताठ व प्रसन्न झाले यात नवल काय? **(क) अभिमत** = इच्छा, आकांशा, आशा; **बिरव** = कोवळे रोपटे-अंकुर, **पाणी पडणे** = हे शब्द येथे भावगर्भित व क्लिष्ट आहेत. पाणी पडणे = पाऊस पडणे हा अर्थ मराठीत व हिंदीत पण आहे. **पाणी पडणे = फुकट जाणे,** नष्ट होणे हा अर्थही दोन्ही भाषांत आहे. सुचविले की मंत्रिमंडळाला आज जरी आनंद होत असला तरी त्या आनंदावर लवकरच पाणी पडणार आहे. नवीन प्रस्ताव मांडण्याचा अधिकार मंत्रिमंडळाकडे असता तर त्यांनी हे कार्य केव्हाच केले असते; पण प्रेमाच्या निमित्तानेसुद्धा शासनतंत्रांत ढवळाढवळ करण्याचे धाडस त्यांनी केले नाही.

हिं. *। बिनती सचिव करहिं कर जोरी । जिअहु जगतपति बरिस करोरी ॥५॥*
*। जग मंगल भल काजु बिचारा । बेगिअ नाथ न लाइअ बारा ॥६॥*
*। नृपहि मोद सुनि सचिव सुभाषा । बढ़त बौंड़ जनु लही सुसाखा ॥७॥*
म. *। विनति सचिव करती जोडुनि कर । जगा जगत्पति ! कोटी वत्सर ॥५॥*
*। जग-मंगलकर विचार हितकर । नको विलंब किं करणें सत्वर ॥६॥*
*। श्रवुनि, मुदित नृप, सचिव - सुभाषा । वाढत लते मिळे किं सुशाखा ॥७॥*

**अर्थ :** हात जोडून सचिव विनंती करतात की अहो जगत्पति ! आपण कोटी वर्षे जगावे.॥५॥ आपण केलेला विचार सर्व जगाचे मंगल करणारा व हितकारक आहे; (तरी) आता विलंब मुळीच नको; हे कार्य अगदी त्वरेने करावे.॥६॥ सचिवांचे सुंदर भाषण ऐकून राजाला असा आनंद झाला की जणू वाढणाऱ्या लतेला-वेलीला-सुंदर शाखेचाच आधार मिळाला.॥७॥

**टीका. : चौ. ५-६-(१)** येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की या सभेत सर्व सचिव व दशरथ यांशिवाय इतर कोणीही नाही. ही निःपक्षपाती अपक्ष मंत्रिमंडळाची गुप्त खाजगी बैठक आहे. (क) सचिवांनी हात जोडणे व 'जगत्पति' हे संबोधन, सचिवांची भावना प्रदर्शित करतात. सचिव आले तेव्हा त्यांनी हात जोडले नाहीत. दशरथ जगत्पति नाहीत, केवळ या पृथ्वीचे पती आहेत; असे असता त्यांस सचिव 'जगत्पति' म्हणाले. या वेळी सचिवांच्या बुद्धीला दशरथ केवळ पृथ्वीपती न वाटता जगत्पति = परमात्माच वाटत आहेत व त्या भावनेने त्यांनी हात जोडले. जी इच्छा पूर्ण व्हावी म्हणून सकाळ-संध्याकाळ परमात्म्याला प्रार्थना करीत होते ती इच्छा दशरथ पूर्ण करीत आहेत असे वाटले व दशरथांच्या मुखाने देवच बोलला असे वाटले.

(२) **जगा कोटी वत्सर** – वत्सर = वर्षे, याने स्पष्ट होते की दशरथांनी सचिवांपुढे केलेल्या भाषणांत स्वतःच्या मरणाची शंका प्रदर्शित केली. सचिवांना राजाचा कंटाळा आला आहे असे वाटू नये म्हणून सुद्धा हे शब्द आवश्यक आहेत. आपण राज्यभार वहन करून, धर्माने पृथ्वीचे पालन करून वृद्ध झाला आहात तेव्हा पूर्णपणे लायक पुत्रावर सर्व जबाबदारी रीतसर, यथाविधि टाकून स्वस्थपणे, शान्तीने विश्रांती घेत दीर्घ काळ जगावे व आपल्या दीर्घ कारकीर्दीतील

अनुभवांची मदत युवराजांना व आम्हाला वेळोवेळी देत जावी. (क) त्वरा करा न विलंब नृप अशी आज्ञा वसिष्ठांनी दिली आहे; तशीच विनंती सचिवांनी केली. **महत्त्वाच्या शुभ, मंगल कार्यात विशेष वाच्यता न करता ते त्वरेने पार पाडणे हितावह ठरते.** त्वरा करण्याचा विचार राजा, वसिष्ठ व सचिव या सर्वांच्याच मनात येत असून बोलूनही दाखविला जात आहे. रघुवीर विवाहाचे वऱ्हाड घेऊन जाताना त्वरेचे लोण वसिष्ठ, दशरथ, भरत इत्यादी क्रमाने असेच खाली खाली गेले आहे.

**चौ. ७. (१) सचिव - सुभाषा** = सचिवांच्या भाषणाला सु = सुष्ठु = सुंदर (भाषा) म्हणण्याचे कारण इतकेच की ते **सत्य, प्रिय, मधुर, मित, हित व शास्त्रसंत संमत आहे.** राम सर्व प्रकारे लायक आहेत हे **सत्य आहे.** राजा, प्रजा व वसिष्ठ गुरु इ. सर्वांनाच जे प्रिय आहे त्यालाच संमती दिली आहे. राम व राजा या दोघांच्या स्नेहाने भारलेले आहे म्हणून **मधुर आहे.** पाल्हाळ न करता विषयाला धरून बोलले **म्हणून मित आहे.** सर्व जगाचे मंगल करणारे आहे म्हणून **हित आहे.** व वृद्ध राजाने ज्येष्ठ पुत्राला सत्ता समर्पण करणे **शास्त्रसंत राजनीति संमत आहे. (क) बाढत लते मिले किं सुशाखा** – आरसा हाती घेतला तेव्हा ही मनोरथलता उगवली; वसिष्ठांची संमती मिळाल्याने ती जोरात वाढली पण सचिवांची सर्व प्रकारे अनुकूलता मिळाली नसती तर ती फोफावलेली मनोरथलता धुळीस मिळाली असती. वाढणाऱ्या वेलीला वृक्षाचा किंवा वृक्षाच्या शाखेचा-फांदीचा आधार मिळाला नाही, तर ती जमिनीवर लोळू लागते, मातीने भरते, जीवजंतूंनी भरते व तिची वाढ खुंटते; पण चांगल्या शाखेचा आधार मिळाला म्हणजे टवटवीत दिसते व भराभर वाढू लागते; तसेच दशरथाचे झाले व राजाची मनोरथ वल्ली फार फोफावली.

**सूचना – या दोह्यांत सातच चौपाया आहेत** असे पाहून पहिल्या दोन चौपायांनंतर, चौपाई कोणीतरी घुसडून देऊन जणू काय तुलसीदासांची चूक सुधारण्याचा प्रयत्न केला. पण कल्पित चूक सुधारण्याच्या हेतूने मोठा लंगरी खिळा मधे ठोकून घोडचूक केली गेली आहे. (प्रमुदित मोहि कहेउ गुरु आजू । रामहि राय देहु जुबराज) **ही ती प्रक्षिप्त चौपाई आहे.** जुन्या पोथ्यांत नाही;

आणि संदर्भासाठी तिची आवश्यकता नाही; आणि दशरथांच्या गळ्यांत असत्य भाषणाचे लोढणे अडकवणारी ती आहे. **'रामाला युवराज्य द्या' असे वसिष्ठांनी कुठेच सांगितले नाही.** राजाच्या इच्छेप्रमाणे राजाच्याच शब्दांत फक्त संमती देऊन त्वरा करा न विलंब' असे सांगितले आहे; पण या वेळी राज्याभिषेक होत नाही असे स्पष्टपणे सुचविले आहे.

(२) **या दोह्यांत एक चौपाई कमी कां?** राजा, वसिष्ठ, सचिव, कौसल्यादि सर्व राण्या, पुरनारी, पुरनर व विप्र या सातांची लालसा आहे की रामचंद्रास लवकर राज्याभिषेक केला जावा. यांतील राजा, वसिष्ठ व सचिव यांना आनंद झाला व होत आहे व बाकीच्यांना आता लवकरच होईल; पण एकट्या रामचंद्राची इच्छा या वेळी राज्यावर बसण्याची नाही हे वसिष्ठांनी आधीच सुचविले आहे. या बातमीने फक्त रामचंद्रांसच आनंद न होता वाईट वाटणार आहे. **'एक बिमल कुलिं अनुचित हैं किति । त्यजुनि बंधु मोठ्या अभिषेकिती'** (२।१०।७). जी गोष्ट घडणे अनुचित आहे असे रामास वाटते ती घडणे शक्यच नाही. रामाला अनुचित वाटणारे कर्म करणारांच्या पदरात मोदाच्या ऐवजी खेदच पडून शोकाचे सप्त सागरच निर्माण होणार. ज्या मनोरथाच्या शाखेवर दशरथांची प्रमोद वल्ली आज फोफावत चढत आहे. त्या शाखेवर बसून कैकयी त्या मनोरथ तरूचा बुंधाच छाटून टाकणार आहे व **सातवे दिवशी दशरथांची तनुलता गतप्राण होणार हे सुचविले आहे. 'मदिय मनोरथ सुरतरु फुलला । फळत करिणिनें कीं उन्मुळला.'** (२९।८). **'शाखें बसुनी बुंधा छाटी ।'** (४७।५) असे कैकयी बद्दल म्हटलेच आहे. **(क) आजच्या रात्रीपासून बरोबर सातव्या दिवशी रात्री दशरथांचा मृत्यू झाला आहे.** आजची **पहिली रात्र कैकयीच्या महालात** कोपगृहात जाणार. **दुसरी व रामवनवासाची पहिली तमसातीरी** (दो. ८४) **तिसरी** पण वनवासाची दुसरी शृंगवेरपुरी **गंगातीरी** (दो. ८५) **चौथी** व वनवासाची तिसरी गंगेच्या पलीकडे गूहकासहित प्रयागच्या वाटेवर **बनात एका झाडाखाली.** (दो. १०५।१-२ पाहा). **पांचवी** व वनवासातील चौथी **भरद्वाजाश्रमात** (दो. १०८) **सहाव्या दिवशी व वनवासाच्या पाचव्या** दिवशी यमुनापार गेल्यावर **निषादराजाला परत पाठविला** (दो. ११९). व तिकडे राम त्या रात्री एका

वडाच्या झाडाखाली राहून (१२४।३-४), **सातव्या दिवशी व वनवासातील साहव्या** दिवशी राम वाल्मीकींना भेटून चित्रकूटास पोचले. (१२४-१३२). इकडे **सहाव्या दिवशी व वनवासाच्या पाचव्या दिवशी** निषादराजा सकाळी यमुना तीरावरून निघाला तो **सातव्या दिवशी सकाळी शृंगवेरपुरास परत आला** व सुमंत्र निघाला तो **त्याच दिवशी** 'तमसातटिं रथ शीघ्र येतसे' (१४७/१) संध्याकाळपर्यंत सुमंत्र तमसातीरी थांबला. (१४७।४) अंधार पडल्यावर **सुमंत्र अयोध्येत शिरला** व त्याच म्हणजे आजपासून सातव्या **रात्री दशरथ मरण पावले. म्हणजेच राम ज्या रात्री चित्रकूटला प्रथम झोपले त्याच रात्री दशरथ अयोध्येत शेवटची निद्रा घेते झाले.** निषादराज यमुनातीरावरून निघाला तो प्रयागावरून लांबच्या रस्त्याने न येता मधल्या रस्त्याने आला म्हणून शृंगवेरपुरापासून प्रयागावरून ज्या प्रवासास सीतेसहित असलेल्या रघुनाथास दोन दिवस लागले तो प्रवास गुहाने एक दिवस रात्रीत केला. तो जातीचा निषाद वनातच राहणारा ! या प्रमाणे मानसांतील उल्लेखाच्या आधारेच जरासुद्धा ओढाताण न करता सिद्ध झाले की ज्या दिवशी रामराज्याभिषेकाची तयारी सुरू झाली त्या रात्रीपासून **सातव्या रात्री दशरथ अयोध्येत मरण पावले** व राम त्याच दिवशी चित्रकूटच्या राज्यावर बसले ! आता विचार करावा की क्षेपक चौपाई घुसडणारांनी उपकार केले की अपकार व गोस्वामींनी अपवाद निर्माण करून एक चौपाई कमी घालून किती गूढभाव दाखवून ठेवले ! '**गूढ राम दाखवितां कळतें । मनुज-बुद्धि-बळ येथें गळतें ॥१॥ हे लिहिण्यापूर्वी क्षण एक । कळला नव्हता अल्प विवेक ॥ कोण लिहवी गूढार्थ चंद्रिका । तूं प्रज्ञा? धी प्रेरक हरि का?॥**

***हिं.दो.*** ***। कहेउ भूप मुनिराज कर जोइ जोइ आयसु होइ ।***
***॥ राम राज अभिषेक हित बेगि करहु सोइ सोइ ॥५॥***

***म.दो.*** ***। भूप कथिति मुनिराज जी आज्ञा देतिल कांहि ॥***
***। राम-राज्य-अभिषेकिं ती त्वर पूर्ण कराहि ॥५॥***

**अर्थ** : दशरथ राजा (सचिवांस) म्हणाले की मुनिराज वसिष्ठ जी काही आज्ञा देतील ती रामराज्याभिषेकासाठी त्वरेने पूर्ण कराच ॥ दो. ५॥

**टीका दो.** : दशरथ इतकी घाई-त्वरा-कां करीत आहेत याचे कारण पूर्वीच

सांगितले आहे. वसिष्ठांची आज्ञाच आहे की **'त्वरा करा न विलंब नृप सजवा सारा साज'** (४) सचिवांनीही अशीच विनंती केली आहे; ते त्वरेचे लोण आता खाली खाली भराभर पोचेल. भरताच्या येण्याच्या भीतीने राजा असे करीत आहे असे मानणे हा अन्याय आहे. **'भरत न होउं इच्छि मुळिं नृपती'** (३६।१) असा भरताचा स्वभाव दशरथांस माहीत आहे; कैकयीच्या प्रिय सखीचे असेच मत आहे. (दो. ४५ पाहा) पुरजनांतील विवेकी लोकांचे असेच मत आहे. (दो. ४८ पहा). रघुवीर विवाहाच्या वऱ्हाडाची तयारी करताना सुद्धा त्वरेचे लोण असेच वसिष्ठांपासून खालीखाली गेले आहे. **'चला शीघ्र'** (१।२९४) वसिष्ठांची आज्ञा; **'चला शीघ्र'** (१।२९८।२) अशी दशरथांची आज्ञा भरतास. भरताने दरोग्यांना आज्ञा दिली व ते तर **'उठुनी मुदित धावले'** (१।२९८।३) तेथे त्या वेळी कोणाच्या भीतीने त्वरा केली? उत्तर कांडांत राज्याभिषेकाच्या वेळी याहीपेक्षा त्वरा केली आहे; तेथे कोणाची भीती गृहीत धरणार? **फार महत्त्वाचे सत्कार्य करण्याचे ठरविले की ते शक्य तितके त्वरेने, विलंब न करता करावे हे दाखविणे हा हेतु आहे. 'कोण वेळ येइल कैसा। नाहीं देहाचा भरंवसा' 'चला हि प्राणिनां मतिः' 'धर्मस्य त्वरिता गतिः'**

*हिं.* *। हरषि मुनीस कहेउ मृदु बानी । आनहु सकल सुतीरथ पानी ॥१॥*
*। औषध मूल फूल फल पाना । कहे नाम गनि मंगल नाना ॥२॥*
*। चामर चरम बसन बहु भाँती । रोम पाट पट अगनित जाती ॥३॥*
*। मनिगन मंगल बस्तु अनेका । जो जग जोगु भूप-अभिषेका ॥४॥*
*। बेद बिदित कहि सकल बिधाना । कहेउ रचहुँ पुर बिबिध बिताना ॥५॥*

*म.* *। म्हणति मुनीश मुदित मृदु वाणीं । आणा सर्व तीर्थ-वर-पाणी ॥१॥*
*। औषधि मूल फूल फल पानें । मंगल वस्तु कथिति अभिधानें ॥२॥*
*। चामर चर्म वसन नाना तीं । रोम पाट पट अगणित जाती ॥३॥*
*। मणिगण मंगल वस्तु अनेका । ज्या जगीं योग्य भूप - अभिषेका ॥४*
*। वेद-विहित सब वदुनि विधाना । म्हणति रचा पुरिं विविध वितानां ॥५॥*

**अर्थ :** मुनिश्रेष्ठ हर्षित होऊन मृदु वाणीने म्हणाले की सगळ्या श्रेष्ठ तीर्थांचे पाणी आणा.॥१॥ औषधि, मुळे, फुले व नाना प्रकारची फळे, पाने

वगैरे विविध मांगलिक पदार्थांची नावे सांगून ते आणा असे सांगितले. (अभिधान - नाम, नाव).॥२॥ चवऱ्या, विविध चर्म, विविध वस्त्रे व लोकरीचे, रेशमी व सुती कपडे अगणित जातींचे सांगितले.॥३॥ अनेक मांगलिक रत्नांचे समूह आणि राजाच्या राज्याभिषेकासाठी योग्य असे नानाविध मांगलिक जिन्नस (आणण्यास सांगितले).॥४॥ या प्रमाणे वेदशास्त्रोक्त विधानाप्रमाणे सर्व सांगितले व म्हणाले की नगरांत विविध प्रकारचे मंडप घालून नगर शृंगारा ॥५॥

**टीका – चौ. १** (१) मुनिराज आज्ञा देतील ती ती तयारी त्वरेने करा असे राजाने सचिवांना राजवाड्यात सांगितले. तेथे मुनिराज वसिष्ठ हजर नव्हते; मग त्यांनी सचिवांना हे सर्व कोठे व केव्हा सांगितले? सचिवांच्या बरोबर कवींनासुद्धा इतकी घाई, त्वरा झाली आहे की सचिव राजवाड्यातून निघाले, वसिष्ठाश्रमात पोचले, मुनींकडे जाऊन नमस्कार करून विनंती केली हे सर्व सांगण्यास सुद्धा वेळ नाही. सचिव राजवाड्यातून केव्हा निघाले व वसिष्ठांचे घरी केव्हा पोचले हे कळले सुद्धा नाही. जणू काय इथून उठले त्याच क्षणी वसिष्ठांसमीप जाऊन प्रार्थना केली. हे नाट्य असल्याने एवढा अध्याहार केला; सचिव पडद्याच्या पुढून एका बाजूने जातात व दुसऱ्या बाजूने दशरथ घरी जातात व पडदा वर जातो तो सचिव हात जोडून उभे आहेत व मुनींशी बोलू लागतात. (क) वा. रा. या सर्व गोष्टी एकाच राजसभेत, दरबारात झाल्या आहेत. तिथेच असलेल्या वसिष्ठांना राजानेच विनंती केली आहे (२।३।६-७) व त्यांनी तेथे सभेतच सर्व सांगितले आहे. (२।३।८-२०) सोने, रत्ने, बली, सर्वौषधि, शुभ्र फुले, फुलांचे हार, लाह्या, मधुपर्क, मध, तूप, न शिवलेली वस्त्रे व शिवलेले कपडे, रथ, सर्व आयुधे, चतुरंग सैन्य, शुभ लक्षणी हत्ती, श्वेत चवऱ्या, श्वेत पंखे, श्वेत छत्र, श्वेत ध्वज, शंभर सोन्याचे कलश, सोन्याची शिंगे असलेला वृषभ (बैल) संपूर्ण (नख, पुच्छ, मुखादि असलेले) व्याघ्र चर्म ही सर्व सामग्री सूर्योदयापूर्वी राजाच्या अग्निशालेत तयार ठेवण्यास सांगितले आहे. अन्तःपुराची व नगराची सर्व द्वारे चंदन, पुष्पहार व धूप यांनी पूजण्यास सांगितले. एक लक्ष ब्राह्मणांचा योग्य सत्कार

करून त्यांना आतृप्तिपर्यंत पुरेल इतके उत्तम अन्न, दही, दूध, तूप, लाह्यांसह पुष्कळ दक्षिणेसहित उजाडताच देण्यास सांगितले. सूर्योदयाबरोबर स्वस्तिपुण्याहवाचन करावयाचे आहे. त्यासाठी ब्राह्मणांना निमंत्रण देऊन त्यांच्यासाठी आसने मांडून ठेवावी. ध्वजा, पताका उभारा, राजमार्ग शिंपा वगैरे सांगितले आहे. तसेच राजवाड्याच्या भोवती कोणकोणाला कशा रीतीने उभे ठेवावे वगैरे सांगितले आहे.

(२) **आणा सर्व - तीर्थवर - पाणी** -- गंगा-यमुना सरस्वती इत्यादी पवित्र सरितांचे सागरांचे, संगमांचे, प्रसिद्ध तीर्थे म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सरोवरांचे, कुंडांचे वगैरे तीर्थजळ आणण्यास सांगितले. उद्या सकाळी सर्व तयारी सिद्ध पाहिजे व आज ही यादी दिली जात आहे ! पुढे सांगणार आहेत की, हे सर्व जणू काय आधीच सिद्ध केले होते इतके झटपट सर्व आणले गेले आहे. वा.रा. सुद्धा असाच उल्लेख आहे. (**क**) **पाणी** - शब्द वापरून सुचविले आहे की हे सर्व तीर्थजल राज्याभिषेकाला उपयोगी न पडता पिण्यास उपयोगी पडणार आहे. पाणी = पानीय = पिण्यास योग्य. ते सर्व शेवटी चित्रकूटावरील एका कूपातच पडले आहे ! गंगेचे पाणी पाजा असे म्हणत नाहीत. गंगा पाजा, गंगाजल पाजा असे म्हणतात.

**चौ**. २. (१) **औषधि** = सर्वौषधि (वा.रा.प.) '**मुरा मांसी वचा कुष्ठं शैलेयं रजनीद्वयम् ॥ शटी चंपक-मुस्ता च सर्वौषधिः गणः स्मृतः** ॥ मुरा = तालपर्णी (एक फार सुगंधी द्रव्य) मांसी = जटामांसी; वचा = वेखंड, कुष्ठ = कोष्टकोळिंजन, शैलेय = शिलाजित; रजनीद्वयम् = हळद व आंबेहळद; शटी = काचरी; चम्पक = नागकेशर; मुस्ता = नागरमोथा; ही सर्वौषधी द्रव्ये होत. या सर्व सुगंधी व रोगनिवारक वनस्पती (औषधी) आहेत. (**क**) मूल = शतावरी, सहस्त्रमुळी इत्यादी. फूल = पांढरी सुवासिक फुले असा अर्थ वा.रा. आधारे घेणे जरूर आहे. फल = नारळ, पूगीफळ (सुपारी) केळी वगैरे पूजेत वापरली जाणारी विविध फळे. पाने - नागवेलीची, पंचपल्लव व दूर्वा, बेल, तुलसी, शमी, विष्णुक्रान्त इ. पूजेत वापरली जाणारी पत्री. या सर्वांची नांवे सांगितली व यादी करून घेण्यास सांगितले.

**चौ. ३-४** (१) **चामर** – श्वेत चवऱ्या, व्यजनांचा उल्लेख १।३५०।४ मध्ये केला आहे. पांढरे पंखे, चर्म = अखंड व्याघ्रचर्म, जबडा, नखे, शेपटी असलेले अच्छिद्र (**क**) **अनेक वस्तु** = वा.रा. मध्ये सांगितलेले इतर सर्व पदार्थ समजावे.

**चौ.** ५ - (१) या चौपाईत उपसंहार करतात व सुचवितात की सर्व वस्तूंचा उल्लेख करीत बसलो तर ग्रंथ वाढेल व वाचकांस कंटाळा येईल. सार इतकेच वेदपुराण धर्मशास्त्राने जे जे पदार्थ सांगितले आहेत ते सर्व यथाविधि तयार ठेवण्यास सांगितले. नगर कसे शृंगारावयाचे ते दुसऱ्या चरणापासून सांगतात. चित्रविचित्र मंडप घालून मग :

***हिं.*** *। सफल रसाल पूगफल केरा । रोपहु बीथिन्ह पुर चहुँ फेरा ॥६॥*
*। रचहु मंजु मनि चौकें चारू । कहहु बनावन बेगि बजारू ॥७॥*
*। पूजहु गनपति गुर कुलदेवा । सब बिधि करहु भूमिसुर सेवा ॥८॥*

***हिं.दो.*** *। ध्वज पताक तोरन कलस सजहु तुरग रथ नाग ॥*
*। सिर धरि मुनिबर बचन सबु निज निज काजहि लाग ॥६॥*

***म.*** *। सफल रसाल पूगफल केळी । लावा पथिं नगरीं शुभ मेळीं ॥६॥*
*। रचा मंजु मणि-चौक सुचारू । सांगा शीघ्र सजा बाजारू ॥७॥*
*। पूजा गणपति गुरु कुलदेवा । करा सर्वपरि भूसुर-सेवा ॥८॥*

***दो.*** *। ध्वजपताक तोरण कलश सजा नाग रथ वाजि ॥*
*। शिरिं धरुनी मुनिवर-वचन लागति सब निज कार्जि ॥६॥*

**अर्थ :** फळे आलेले आम्रवृक्ष, सफळ पोफळी (सुपारीची झाडे) व सफळ केळी नगरातील सर्व रस्त्यांच्या दोन्ही बाजूस सुंदर ओळींनी लावा.॥६॥ मण्यांच्या रांगोळ्यांचे सुंदर चौक भरा; व बाजार त्वरेने शृंगारण्यास सांगा.॥७॥ गणपती, गुरु व कुलदेव यांचे पूजन करा; ब्राह्मणांची सर्व प्रकारे (भूसुरांची) सेवा करा (त्यांस संतुष्ट करा.)॥८॥ ध्वजापताका, तोरणे उभारा व मंगल कलश सजवा, हत्ती (नाग) घोडे (वाजि.) व रथ शृंगारा, (असे मुनिश्रेष्ठांनी सांगितले) मुनिश्रेष्ठांची आज्ञा शिरसा मान्य करून सर्व मंडळी आपापल्या कामाला लागली.॥दो.६॥

**टीका. चौ. ६-७ (१) सफल रसाल पूगफल केळी लावा** – कनक रत्नमय कृत्रिम वृक्ष लावण्यास सांगितले. या विषयी १।३४४।७.८ च्या टीकेत सविस्तर लिहिले आहे. **'सफल पूगफल कदलि रसालां । रोपिति बकुल कदंब समाला ॥ फलित सुभग तरु लवले धरणीं । मणिमय आलबाल कलकरणी ॥** हे वर्णन येथे भरीला घ्यावयाचे आहे. **(क) मणिचौक** - मणि = गजमुक्ता व रत्ने; यांच्या रांगोळ्यांचे चौक रस्त्यावरील चौकाचौकांतून भरल्याचे वर्णन पूर्वी आले आहे.

**चौ.८. (१) पूजा गणपति गुरु कुलदेवा** - गणपती प्रथम पूज्य व विघ्नेश म्हणून त्याची प्रथम पूजा करा. रांगोळीच्या प्रत्येक चौकात मंगल कलश स्थापन करून तेथे गणपतिपूजन करतात असे हिंदी टीकाकार म्हणतात. ते मान्य करण्यास काही हानी नाही. (क) नंतर गुरु पूजन करून त्यांना प्रसन्न करा व नंतर कुलदेवता - शिव-शंकर-पूजन करा. गुरुकृपा झाली तरच शंकर शं-कर (कल्याणकारी) होतात. **'शिवें प्रभु कृपें सर्व पुरविली हौस'** (४।४। टी.प.) **'रघुकुल-इष्टदेव शिव' प्र.प्र. १७।२ पहा. (ख) भूसुर सेवा** – सर्व प्रकारे करण्यास सांगितली. पूजा, अन्न, वस्त्र, दान, मान, दक्षिणा, प्रार्थना हे सेवेचे निरनिराळे प्रकार आहेत. वा.रा. **एकलक्ष** ब्राह्मणांना अन्न दक्षिणादिकांनी संतुष्ट करण्यास सांगितले आहे; त्याचाच सारांश येथे आहे. विप्र संतुष्ट झाले की सर्व देव संतुष्ट होतात. **'द्विज मख होम करिति पूजा स्तव ॥ त्यानां देव सहज वश त्यास्तव'** (१।१६९।२) ७।१०९।११ पहा. **'तपें सदा विप्रां बल भारी ॥ जर विप्रा वश करिशि नरेश । तर तव वश विधि विष्णु महेश'** (१।१६५।३-४) ३।३३ पहा. आजपर्यंत विप्र सेवेने देव संतुष्ट व वश झाले असले तरी रामाच्या इच्छेनुसार या वेळी त्यांनी कृतघ्न होण्याचे ठरविले आहे, हे पुढे सरस्वतीच्या मुखानेच कळेल.

**दोहा** – ही तोरणे म्हणजे रस्त्यांत कमानी सारखी, चौकटी सारखी, प्रवेशद्वारासारखी वगैरे तयार करतात ती होत. जी जी तयारी करणे ज्याच्याकडे होते ते ते आपापली कामगिरी करण्यास गेले. सूर्योदयाच्या पूर्वी सर्व तयारी झाली पाहिजे हे जाणून जे ते त्वरेने कामास लागले. **उत्तरकाण्डात राज्याभिषेकाची**

**तयारी याहीपेक्षा अधिक त्वरेने केली आहे.** उ.कां. दो. १० पहा.

*हिं. । जो मुनीस जेहि आयसु दीन्हा । सो तेहिं काजु प्रथम जनु कीन्हा ॥१॥*
*। बिप्र साधु सुर पूजत राजा । करत राम हित मंगल काजा ॥२॥*
*। सुनत राम अभिषेक सुहावा । बाज गहागह अवध बधावा ॥३॥*

*म. । जें ज्यां कथिले मुनीश्वरांनीं । पूर्विंच जणुं तें केलें त्यानीं ॥१॥*
*। विप्र साधु सुर पूजी राजा । रामहिता करि मंगल-काजां ॥२॥*
*। शोभन रामाभिषेक ऐकत । उत्सव - गजर नगरिं शुभ चालत ॥३॥*

**अर्थ :** मुनीश्वर वसिष्ठांनी ज्याला जे काम सांगितले ते ते त्यांनी त्यांनी जणू काय आधीच केले होते.॥१॥ राजाने विप्र साधू व देव यांची पूजा केली व रामहितासाठी मंगल कार्ये करू लागले.॥२॥ रामचंद्रांच्या सुंदर (सुखद) राज्याभिषेकाची बातमी कळताच नगरात जिकडे-तिकडे उत्सवाच्या वाद्यांचा शुभ गजर चालू झाला.॥३॥

**टीका. चौ.१ - (१) पूर्विंच जणुं तें केलें** – ज्यांनी त्यांनी आपले काम किती त्वरेने केले हे सांगण्यास उपमा नाही म्हणून येथे उत्प्रेक्षेने सांगितले. काही कार्ये खरोखरच पूर्वी झालेली असणे शक्य आहे. उदा. तीर्थजल अनेकांनी अनेक स्थानांचे पूर्वीच आणून ठेवलेले असणे अशक्य नाही. रामाभिषेक आज ना उद्या होणारच व व्हावा अशी सर्वांचीच इच्छा असल्याने चवऱ्या, चर्म इत्यादी वस्तू व इतर मंगल द्रव्ये वगैरे आधीच तयार असणे अशक्य नाही. **'परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती'** (केका.) मुनिवस्त्रे, मुनिपात्रे सुद्धा राजाच्या संग्रहात होती म्हणूनच कैकयी आयत्या वेळी ती आणून पुढे ठेवणार आहे. ऋद्धिसिद्धी-५८धारी होऊन अयोध्येत निवास करून राहिल्याच आहेत; म्हणून हे अशक्य नाही. जनकपुरीत जानोशाच्या सदनांत व भरताच्या पाहुणचाराच्या वेळी भरद्वाजाश्रमात एका पळात सर्व तयार झाले आहेच.

**चौ. २. (१) विप्र साधुसुर पूजी राजा – 'पूजा गणपति गुरु कुलदेवा । करा सर्वपरिं भूसुर-सेवा' ही वसिष्ठांची आज्ञा राजाकरता होती असे या दुसऱ्या चौपाईने ठरते. 'मंगलमूल विप्र-परितोषू ।'** (२।१२६।४) म्हणून त्यांना संतुष्ट केले. सुर शब्दाने गणपति, कुलदेव, ग्रामदेवता, वास्तुदेवता इत्यादी सर्व देवांचे

पूजन सुचविले आणि साधु शब्दाने गुरु व इतर संतांचे पूजन सुचविले. येथील उलटा क्रम वृत्ताच्या सोईसाठी आहे; गणपति, गुरु, कुलदेव व विप्र या वसिष्ठांनी सांगितलेल्या क्रमानेच पूजन केले. वसिष्ठांनी सांगितले त्यापेक्षा अधिक केले हे साधू व सुर शब्दाने सुचविले. (क) प्रत्येक चौकांत गणपतिपूजन केले असे मानल्यास ते लोकांनी केले असेच मानावे लागेल. राजाने रस्त्यारस्त्याने हिंडत चौकाचौकांतून गणपति पूजन या घाईच्या वेळी तरी करणे अगदीच अशक्य आहे. लोकांनीही गुरुविप्र सुर पूजन केले असे मानण्यासही प्रत्यवाय नाही. (ख) **रामहिता करि मंगल काजां** – विप्रसाधुसुर पूजन हे मंगल कार्यच आहे. याचकांना धनवस्त्रादि देणे, नगरवेशीचे पूजन करणे (वा.रा.प.) ही मंगलकार्येच होत.

**चौ. ३** – वसिष्ठाज्ञा होताच सचिवांनी नगर, बाजार वगैरे शृंगारण्याच्या आज्ञा देवविल्या; तेव्हा रामाभिषेक समाचार विद्युत् वेगाने नगरांत पसरला. चातक-चातकी स्वाती जलवृष्टीची जशी आतुरतेने वाट पहात असतात तसे पुरनारीनर या शुभ समाचाराची वाट पहातच होते. तत्काळ घरोघरी अभिनंदनोत्सव सुरू झाले. मंगल वाद्ये वाजू लागली व नगरी भराभर शृंगारली गेली; यात काही नवल नाही.

*हिं.* *। राम सीय तन सगुन जनाए । फरकहिं मंगल अंग सुहाए ॥४॥*
*। पुलकि सप्रेम परस्पर कहहीं । भरत आगमनु सूचक अहहीं ॥५॥*
*। भए बहुत दिन अति अवसेरी । सगुन प्रतीति भेंट प्रिय केरी ॥६॥*

*म.* *। सीता राम शकुन अनुभवती । सुंदर मंगल अंगें स्फुरतीं ॥४॥*
*। प्रेमें पुलकित वदति परस्पर । सुचविति भरतागमना प्रियकर ॥५॥*
*। गत किति दिन वाटे चुकलेसें । शकुनीं वाटे प्रिय भेटेसे ॥६॥*

**अर्थ :** राम व सीता यांची सुंदर मंगल अंगे स्फुरण पावून त्यांना शुभ शकुन अनुभवास आले.॥४॥ शरीर प्रेमाने पुलकित होऊन एकमेकांस म्हणतात की हे शुभशकुन भरताचे प्रियकर आगमन सुचवितात.॥५॥ भरत गेल्याला कितीतरी दिवस झाले (त्यामुळे) अगदी चुकल्या चुकल्यासारखे वाटत आहे; आणि शकुनांवरून वाटते की आवडत्याची भेट होणार.॥६॥

**टीका – चौ. ४. (१) सुंदर मंगल अंगें स्फुरती –** स्त्रियांचे वामांगस्फुरण शुभ शकुन आहे व पुरुषांचे दक्षिणांग स्फुरण शुभ शकुन होय. सीतेचा वाम बाहु व वाम (डावा) नेत्र स्फुरू लागला व रामाचा उजवा (दक्षिण) बाहु व उजवा डोळा स्फुरण पावला. कित्येक वेळा अंगांचे स्फुरण होते पण लक्षात येत नाही. स्फुरण होऊन ते अनुभवास आले तरच शुभ किंवा अशुभ शकुन झाला असे म्हणता येईल. स्त्रियांचे दक्षिणांग व पुरुषांचे वामांग स्फुरण अशुभ शकुन होय. येथे मंगल अंगे म्हणजे शुभ शकुन करणारी अंगे स्फुरली. **शुभांग – स्फुरणाचे फळ प्रिय असलेल्याचे आगमन व भेट हे आहे;** हे सहाव्या चौपाईत सांगितले आहे. अंगस्फुरण शकुनाचे वर्णन मानसात अनेक ठिकाणी आहे.

**चौ. ५ - (१) प्रेमें पुलकित बदति परस्पर -'** प्रत्येकाचे अंगस्फुरण ज्याला त्याला कळल्यावर मनात विचार आला की हा शकुन भरतागमन-सूचक दिसतो. भरत येणार असे वाटताच प्रत्येकाच्या अंगावर रोमांच उभे राहिले. तेव्हा रामचंद्रांनी सीतेला सांगितले की माझी दक्षिणांगे स्फुरण पावत आहेत; त्यावरून वाटते की भरत लवकरच येणार. नंतर सीतेनेही आपला अनुभव सांगितला व त्या शकुनाचे फळ भरतागमन होणारसे वाटते असे सांगितले. **येथे हे दाखविले की रामाचे भरतावर जितके प्रेम आहे तितकेच व तसेच सीतेचे आहे.** याची प्रचिती भरत चित्रकूटला गेल्यावर सीतेला वंदन करताना आली आहे. **'सीता दे आशीस् मनिं काहीं । स्नेहमग्न तनु-भान न राही ॥५॥ अनुकूला अति पाहुनि सीता । भीती स्वकल्पिता गत चिंता ॥६॥** (२।२४२।)

**चौ. ६. (१) गत किति दिन –** राम विवाहाच्या वेळी भरताचा मामा जनकपुरीतच आला होता. वरातीच्या बरोबर तो अयोध्येस आला व काही दिवसांनी कैकयीच्या (बहिणीच्या) व दशरथांच्या अनुमतीने भरताला घेऊन गेला; त्याच्या बरोबर शत्रुघ्नही गेलाच व त्यांच्या स्त्रियासुद्धा त्यांच्याबरोबर गेल्या हे सांगण्याची आवश्यकताच नाही. तेव्हापासून आतापर्यंत भरत मामाकडेच आहेत; म्हणजे कमीत कमी (वा.रा.) चार वर्षे व अ. रा. इत्यादीप्रमाणे जास्तीत जास्त १२ वर्षे तरी होऊन गेली. मानसांतील कालनिदर्शन संकेतानुसार चार वर्षेच ठरतात. बा.कां. ४३ च्या टीकेनंतर प्रतिज्ञा व प्रश्नतुलना या

लेखात पहा. या काण्डांत चौथ्या दोहयातच राज्याभिषेकाची तयारी करण्याची आज्ञा व तो होणार नाही अशी स्पष्ट सूचना वसिष्ठांनी दिली आहे. ही येथील ४ ही संख्यासुद्धा पूर्वीच्या साधार अनुमानाला पोषकच आहे. राम व भरत यांचा चार वर्षे वियोग म्हणजे काही थोडाथोडका काळ नाही. त्यामुळे राम व सीता यांना चुकल्या चुकल्या सारखे वाटणारच. मानसिक अस्वस्थता वाटणारच. अंगस्फुरण शुभ शकुनाचे फळ 'प्रियाची भेट' हे आहे. **(क)** या शकुनाचे फळ भरताचे आगमन व भरताची भेट या दोन्ही गोष्टी घडल्या. पुढे घडल्या आहेत. **हे शकुन झाल्यापासून २०-२१ दिवसांनी भरत अयोध्येत आले आहेत व शकुन झाल्यापासून ५१।५२ व्या दिवशी रामभरत भेट चित्रकूटला झाली आहे.** ही काळ गणना कशी केली हे पुढे वेळोवेळी गू. चंद्रिका दाखविते. या शुभशकुनाचे फळ इतक्या दीर्घ काळाने मिळाले हे कसे मानावे वगैरे गोष्टींचा उहापोह **'मानसांत शुभाशुभ शकुन' या प्रस्तावना प्रकरणांत** (१७।४) **केलेला आहे. अंगस्फुरणाचे फळ १ दिवसापासून ४ महिनेपर्यंत मिळाल्याची उदाहरणे मानसांत आहेत.** टीकाकारांनी वाल्मीकादि संत मीलन हे फळ दाखविले आहे. **पण ते पुढील चौपाईतील रामसीता यांच्या अति निश्चयात्मक वचनास असत्य ठरविणारे आहे !**

***हिं.*** ***। भरत सरिस को प्रिय जग माहीं । इहइ सगुन फल दूसर नाहीं ॥७॥***
***। रामहि बंधु सोच दिन राती । अंडन्हि कमठ हृदउ जेहि भाँती ॥८॥***

***मं.*** ***। कोण जगीं प्रिय सम भरताही । हेंच शकुन फल दुसरें नाहीं ॥७॥***
***। रामा निशिदिन बंधु सुचिंता । जशि अंडांची कासवि-चित्ता ॥८॥***

**अर्थ :** भरतासारखा प्रिय जगात दुसरा कोण आहे? म्हणून (ही) शकुनाचे हेच फळ, दुसरे नाही.॥७॥ कासवी जशी आपल्या अंड्यांची चिंता (चिंतन) आपल्या हृदयात करीत असते तशीच राम रात्रंदिवस भावाची (भरताची) चिंता करीत आहेत.॥८॥

**टीका - चौ. ७.** (१) या चौपाईत राम व सीता हडसून खडसून सांगतात की भरताची भेट हेच या शकुनाचे फळ आहे; कारण भरतासारखा प्रिय प्रभूला जगात कोणी नाही. दुसरे फळ नाही असे प्रभु स्वतः म्हणत असून आम्ही

दुसरे फळ दाखविणे किती उचित आहे याचा विचार वाचकांनी करावा. (क) मागल्या चौपाईत सांगितले की प्रियाची भेट हे या शकुनाचे फळ आहे. रामाला जगात पुष्कळ व्यक्ती प्रिय आहेत. तेव्हा कोण भेटणार याचा निर्णय होणे कठीण म्हणून अतिव्याप्तिदोष व चाचपडत बसण्याचा प्रसंग, टाळण्यासाठी सांगतात की भरताची भेट हेच फळ आहे, दुसरे कोणतेही नाही व कारण सांगतात की भरतासारखा प्रिय दुसरा नाही. यावरून ठरले की **अंगस्फुरणाच्या शुभशकुनाचे फळ म्हणजे अत्यंत प्रिय, प्रियतम असलेल्याची भेट - प्राप्ती हे समजावे.**

(२) **'कोण जगीं प्रिय सम भरता'** – हे स्वतः प्रभू म्हणाले आहेत. पुढे कौसल्या, वसिष्ठ, निषादराज, भरद्वाज, जनक इत्यादी सर्वांना हा अनुभव आला आहे व सर्वांनी असेच उद्गार काढले आहेत. (क) **कौसल्या - प्राणांप्राणचि राम तूजला । प्रिय तूं प्राणांहुनि रघुपतिला'** (२।१६९।१) **'रामप्रिय तूं तात नित असति वचन मन काय'** (२।१६८।) **(ख) माता, मंत्री गुरु व** सर्व प्रजा, म्हणतात की, **'साक्षात् राम प्रेममूर्ति ही ॥ तात भरत कां वदा न ऐसें । तुम्हि रामा प्रिय असां प्राणसे'** (१८४।४-५), **(ग) भरद्वाज - 'पहा भरत रघुवर मनिं काहीं । प्रेमपात्र तव सम कुणि नाहीं । प्रेम तुम्हांवर तसं रामाचें । सुखजीवनिं जगि जस मूर्खाचें ॥ मम मत हेंच किं भरत तुम्हि तर । रामस्नेह चि जणूं देहधर ॥** २।२०८।(३,६,८) **(घ) निषादराज - 'तुम्हि रामा प्रिय तुम्हांस रामहि ॥... 'प्रियतम न तुलसी कोण्हि अपणांहून रामा शपथ की'** (२०१।८।छंद) **(ज) जनकराज - 'अमित भरत महिमा श्रुणु राणी । रामा कळे, न वदवे वाणीं ॥ देवी परंतु - रघुवर-भरतीं । प्रीती प्रतीति ना तर्कवती ॥** (२८९।२,५) **(च) देवगुरु बृहस्पति - 'कोण भरतसम रामस्नेही । जग जपि राम राम जपि ज्याही'** (२।२१८।७), २।२०५।८, ७।२ 'रा' पहा ।

चौ. ८. (१) **रामा निशिदिन बंधु-सुचिंता** – राम रात्रंदिवस भरताचे चिंतन, स्मरण करीत असतात; याला दृष्टान्त इतका सुंदर दिला आहे की त्यायोगे दोघांच्या परस्पर प्रेमाचे चित्र हृदयांत दिसू लागते, पण त्याचे वर्णन करता येत नाही. समुद्रात राहणारी कासवी, जेथे समुद्राचे पाणी जाऊ शकत नाही

अशा ठिकाणी समुद्रतीराला, रेतीत खड्डा करून त्यात आपली अंडी घालते व वर माती-रेती लोटून पुन्हा पाण्यात येऊन राहते; व सतत त्या अंड्यांचे, अंड्यांतील पिलांचे, स्मरण करीत असते. तिला माहीत असते की त्यांचे चिंतन एक क्षणभर न केले तर ती मरतील. **'कूर्म-दृष्टीने सांभाळी'** असे एक संत म्हणतात. तेथे बाह्य दृष्टी हा अर्थ नसून अन्तर्दृष्टी, स्मरण, लक्ष असा अर्थ आहे. देवगुरु म्हणतातच की जग रामाचा जप करते आणि राम स्वतः भरताचा जप करतात. (२।२१८।७) भाव हा आहे की भरत इतक्या दूर, मामाकडे रामवियोगात जगला आहे तो केवळ रामकृपेच्या बळावर ! ल.ठे. - शुभशकून झाल्यावर सीता व राम यांस असे वाटले नाही की राज्याभिषेक होणार ! भरताची भेट होणार असेच त्यांस वाटले. बहुतेक सर्व राण्यांना काय वाटले ते आता सांगतात :

*हिं.दो.* ***। एहि अवसर मंगलु परम सुनि रहँसेउ रनिवासु ॥***
***॥ सोभत लखि बिधु बढ़त जनु बारिधि बीचि बिलासु ॥७॥***

*म.दो.* ***। परिसुनि मंगल परम तैं हर्षित राणिनिवास ॥***
***॥ खुलत बघुनि विधु-वृद्धि जणुं वारिधिं बीचि-विलास ॥७॥***

**अर्थ :** (राम व सीता यांना शुभशकुन झाले) त्याच वेळी (तैं) हा परम मंगलाचा समाचार राण्यांस (राणिवशांत) समजला व अंतःपुरातील सर्व राण्यांस असा परम हर्ष झाला की जणू काय चंद्राची वृद्धि पाहून सागरात लाटांचा विलास (वाढून) तो शोभू लागला. (खुलला). (वारिधिं = वारिधींत, सागरांत. ।।दो. ७।।

**टीका :** दो. (१) रामास राज्याभिषेक होणार ही वार्ता अंतःपुरात गेली तेव्हा तेथे सर्वांना जो हर्ष झाला त्याला देण्यास उपमा नाही म्हणून उत्प्रेक्षा केली आहे. सागर जसा विस्तीर्ण व नंतर गंभीर असतो तसा राणिवसा फार मोठा आहे व गंभीर आहे. चंद्राची वृद्धि झाली म्हणजे सागराला फार हर्ष होतो व त्याच्या पृष्ठ भागावर जणू हर्षाच्याच उत्तुंग लाटा एकामागून एक सारख्या उठत असतात. येथे रामचंद्रच पूर्ण चंद्र आहेत. चंद्राची पूर्ण वृद्धि झाली की तो फार शोभतो व त्याची पूर्ण वृद्धी पाहून सागराच्या भरतीचीही

पूर्ण वृद्धी होते व सागरही फार शोभतो. तसा राणिवसा फार सुशोभित, प्रसन्न दिसू लागला. सागरावर लाटांच्या मालिका उठतात व तशा राण्यांच्या अंगांवर रोमांचांच्या लहरी एकामागून एक उठू लागल्या. लाटा वर उठून खाली पडू लागल्या म्हणजे जसे तुषार उडतात तसे राणिवशांत आनंदाश्रु बिंदू गळू लागले. लाटांची गर्जना जशी ऐकू येते तसे आनंदोद्‌गार, हर्षोद्‌गार निघू लागले. **'सज्जन सकृत सिंधुसम कोसी । जासु वृद्धि बिधु पूर्ण बघोनी'** (१।८।१४) याच्या पुढल्याच दोहयाचा एक चरण येथे किती तंतोतंत लागू पडतो ते पाहिले म्हणजे काव्यरचना कौशल्याचे कौतुक वाटते. **'भाग्य अल्प अभिलाष अति'** भाव हा की ही परम मंगलाची अभिलाषा सध्या पुरी न होता, रामचंद्र मुखचंद्र आता लवकर राणीवशात न उगवता **'रघुपति बिरह बिनेश'** उगवून येथेच **'शोक समीर उसास तरंग'** असे करुणेचे वादळ होणार आहे. पौर्णिमेच्या दिवशी फार मोठी भरती आली असता अनपेक्षितपणे होणारे मोठे वादळ-तुफान तर मोठ्या जहाजाला सुद्धा बुडवून टाकते. **'तारु अयोध्या नाविक आपण । पांथिक बसले सगळे प्रिजन ॥ धीर धरां तर पावू पारा । ना तर बुडूं सहित परिवारा'** (१५४।६-७) असे कौसल्या दशरथांस म्हणालीच आहे. राणीवसा-रूपी सागर शोकसागर बनणार व अयोध्या जहाजाचा कर्णधार तांडेल, दशरथ त्या सागराच्या तळाशी जाणार, बाकीचे सर्व लोक गटंगळ्या खात खात दुःख भोगणार व १४ वर्षांनी त्यातून बाहेर पडणार. अमावास्येनंतर १४ तिथि गेल्याशिवाय पुन्हा पूर्णचंद्र-राकाशशी-उगवत नाहीच ! जेवढे लिहावे तेवढे आधार मानसांत भरलेलेच आहेत. **'राकाशशि रघुपति बघुनि नगर - सिंधु हर्षीत ॥ वाढे कोलाहल किं करि नारितरंग सहीत'** (७।३ चं) **'नारि कुमुदिनी अवध सर, रघुपति बिरह बिनेश ॥**(७।९ रा.)

ल.ठे. या वेळी कैकयी राणीवशांत नाही हें पुढील वर्णनावरून कळेलच. कैकयीला ही परमानंदाची बातमी प्रारब्धवशात् सर्वांच्या बरोबर मिळाली नाही; आणि जेव्हा मिळाली तेव्हा योग्य व्यक्तीकडून मिळाली नाही हासुद्धा दशरथाचा व अयोध्यावासी लोकांचा कर्मभोगच ! पुढील चौपायांत वर्णिलेली राणीवंशातील स्थिती मात्र कैकयीच्या बाबतीत सुद्धा अगदी तंतोतंत सारखीच दिसते.

हिं. *। प्रथम जाइ जिन्ह बचन सुनाए । भूषन बसन भूरि तिन्ह पाए ॥१॥*
*। प्रेम पुलकि तन मन अनुरागीं । मंगल कलस सजन सब लागीं ॥२॥*
*। चौकें चारु सुमित्राँ पूरी । मनिमय बिबिध भाँति अति रूरी ॥३॥*
*। आनँद मगन राम महतारी । दिए दान बहु बिप्र हँकारी ॥४॥*

म. *। जाउनि आधिं वृत्त जिहिं कथिलें । वसन भूषणें भूरि लाभले ॥१॥*
*। प्रेमें पुलकित मनिं अनुरागति । मंगल कलश सकल सजुं लागति ॥२॥*
*। रांगोळ्यांस सुमित्रा बहु भरि । अति सुंदर मणिमय नानापरि ॥३॥*
*। रामजननि आनंद-मग्न अति । दे दानां अण्वुनि विप्रांप्रति ॥४॥*

**अर्थ :** सर्वांच्या आधी जाऊन ज्यांनी (जिहिं) हा (परममंगल) समाचार कळविला त्यांना पुष्कळ वस्त्रे, भूषणे वगैरे (बक्षिसे) मिळाली.॥१॥ (ज्यांना कळले) त्या प्रेमाने पुलकित झाल्या व मनात अनुराग वाढून त्या सर्व राण्या मंगल वस्तू व मंगल कलश सजवू लागल्या.॥२॥ सुमित्रेने गजमुक्तांच्या व रत्नांच्या नाना प्रकारच्या अति सुंदर रांगोळ्या काढल्या (रांगोळ्यांनी चौक भरले).॥३॥ रामाची आई आनंदात मग्न झाली व ब्राह्मणांस बोलावून आणून तिने त्यांस नानाविध दाने दिली.॥४॥

**टीका. चौ. १. (१) आधिं वृत्त जिहिं कथिलें - भूरि लाभलें** - जिहिं = ज्यांनी प्रथम सांगितले त्यानां भूरि - पुष्कळ, भरपूर मिळाले. नंतर सांगितले त्यांना मिळाले नाही असे नाही पण पुष्कळ मिळाले नाही. (क) जिहिं (जिन्ह) या बहुवचनाने सुचविले की पुष्कळ जणांनी एकदम जाऊन प्रथम खबर दिली. **'ततृश्रुत्वा सुहृदस्तस्य रामस्य प्रियकारिणः ॥ त्वरिताः शीघ्रमागत्य कौसल्यायै न्यवेदयन् ॥ सा हिरण्यं च गाश्चैव रत्नानि विविधानि च ॥ व्यादिदेश प्रियाख्येभ्यः कौसल्या प्रमदोत्तमा ॥** (वा. रा. २।३।४७-४८) ही बातमी प्रथम जाऊन सांगणारे रामाचे मित्र होते असे वा.रा.तील वरील वचनाने ठरले. **(ख)** राणीवसा हा एक सागर आहे असे मागील दोह्यांतच सांगितले. आता रामचंद्रांचे राज्य सुरू होणार असे या सागरास समजले. हा 'सागर निज मर्यादा पाळति' (७।२३।९) असा असल्याने 'रत्न तटीं टाकिति नर पावति' असे झाले; परंतु या राणीवसा सागराने वस्त्रे, भूषणेसुद्धा बाहेर टाकली; व

ती मातृप्रेम रसाने ओली झालेली आहेत. सुंदर कांडांत सागर विप्ररूपाने रत्नांचा नजराणाच घेऊन आला आहे; पण हा राणीवसा सागर अद्भुत आहे. मागील दोह्यातील उत्प्रेक्षेचाच विस्तार चालू आहे.

**चौ. २. (१) प्रेमें पुलकित मनिं अनुरागति - लागति - पौर्णिमेला** सूर्यास्ताच्या वेळी चंद्र उगवतो. त्या वेळी सांज फुललेली असली म्हणजे तो लालिमा समुद्राच्या जलांत प्रतिबिंबित होऊन खोल पाहिले तर ते समुद्रजल आरक्तवर्ण-लालसर झालेले दिसते व वर मोठाले तरंग उठतात तसेच या राणीवसा-सागरात झाले आहे. हृदयात रामचंद्राच्या अनुरागाची लालिमा पसरली आहे व नारीरूपी तरंग मंगल कलश वगैरे सजविण्यासाठी इकडून तिकडे भराभर जात आहेत. 'नारितरंग सहीत' (७।३ चं.) तरंगांच्या हातात मोठ मोठे फेसाचे गोळे असावेत तसे राण्यांच्या हातांत चित्रित कांचन कलश आहेत. व मंगल पदार्थ आहेत.

**चौ. ३. (१)** मागील चौपाईत इतर राण्यांची सर्वसाधारण स्थिती व प्रवृत्ती सांगितली. आता मुख्य राण्या राहिल्या तीन. त्यांतील मधली सुमित्रा मंगलकार्यात पुढाकार घेणारी व विशेष प्रवृत्ती परायण दिसते. तिने त्या सागरात जिकडे तिकडे अति सुंदर रांगोळ्यांचे चौक भरले. जणू काय आकाशातील नक्षत्रांचे समूह व आकाश गंगेचे पट्टे या सागरात प्रतिबिंबित झाल्यासारखे दिसत असतील. सुमित्रा प्रवृत्ती परायण असली तरी तिची प्रवृत्ती रामप्रेममय असल्याने सात्विक आहे. ती सत्वगुण प्रधान रजोगुणी आहे.

**चौ. ४. (१)** रामाई कौसल्येचे तंत्रच निराळे. रामप्रेमात मग्न होऊन शुद्ध सत्वगुणप्रधान सत्वगुणी कार्ये ती करताना दिसते. पूजन, ध्यान, विप्रपूजन, विप्रभोजन, विप्रांस दाने देणे यांसारख्या कार्यातच ती रंगलेली असावयाची. तसेच येथे झाले. कैकयी आपल्या महालात गाद्या गिरद्यांवर लोळत झोपा काढीत ऐष आरामात गुंग असल्याने या वेळी ती राणीवंशात नाही. सत्वगुण प्रधान तमो - गुणी बुद्धीचे असेच असते. ती राणी (राजाच्या) वशांत न राहता आता राजाच राणी-वशांत जाणार आहे, त्या राणीला वश होणार आहे. हा सहज विनोद आहे !

**सूचना :** कैकयी गैरहजर राहिल्याने तिला ही बातमी अजून समजली नाही. पण लवकरच कुबडीकडून कळेल व तीसुद्धा कुबडीला पुष्कळ बक्षिसे देऊ करील. वा. रा. कैकयीने तर कुबडीला बक्षीस दिले आहे; पण ते तिने झिडकारून टाकले आहे.

हिं. *। पूजीं ग्रामदेबि सुर नागा । कहेउ बहोरि देन बलिभागा ॥५॥*
*। जेहि बिधि होइ राम कल्यानू । देहु दया करि सो बरदानू ॥६॥*
*। गावहिं मंगल कोकिल-बयनीं । बिधुबदनीं मृगसावक-नयनीं ॥७॥*

म. *। ग्रामदेवि पूजुनि सुर-नागां । म्हणे देउं पुनरपि बलिभागां ॥५॥*
*। जेणें होइ राम-कल्याण । दया करुनि तें द्या वरदान ॥६॥*
*। गाति सुमंगल कोकिल-वचना । विधुवदना मृग-शावक नयना ॥७॥*

**अर्थ :** कौसल्येने ग्रामदेवी देव व नाग यांचे पूजन करून प्रार्थना केली की (राम राज्याभिषेक झाल्यानंतर) पुन्हा बलिभाग देईन.॥५॥ (तरी जेणे) करून रामाचे कल्याण होईल असे वरदान द्या.॥६॥ कोकिळेसारखा कंठ असलेल्या, चंद्रासारखे मुख असलेल्या व हरिण-पाडसासारखे नेत्र असलेल्या (नगरनारी) सुमंगल गीते गाऊ लागल्या. ॥७॥

**टीका. चौ. ५ - (१) ग्रामदेवि पूजुनि सुर-नागां... भागां** - राजाने विप्रसाधु सुर-पूजा केली. मुख्य राणी रामजननी कौसल्या ग्रामदेवी, ग्रामदेव व नाग (सर्पाच्या वारुळाजवळ जाऊन सर्प) यांची पूजा करू लागली. प्रत्येक गावाच्या स्थापनेच्या वेळी त्या गावांची देवी व देव यांची स्थापना करतात. अशा ज्या अयोध्येच्या ग्रामदेवी, ग्रामदेव व नाग यांचे पूजन कौसल्येने केले; व प्रार्थना करून प्रत्येकास नवस केले की एवढे कार्य निर्विघ्नपणे सिद्धीस गेले की पुन्हा तुमची पूजा करून तुमची आवडती पूजादि द्रव्ये अर्पण करीन. बलिभाग = पूजासामग्री किंवा पूजेनंतर निरनिराळ्या देवतांना निरनिराळ्या प्रकारे भक्ष्यादि पदार्थ अर्पण करतात ते. कोणाला माषभक्त (उडीद व तांदुळांचा भात) बली, कोणाला दहीभाताचा इत्यादी ज्याला जो आवडतो तो बळी देईन असे नवस कौसल्येने केले. अशा वेळी स्त्रिया नाना प्रकारचे नवस करतात.

**चौ. ६. (१) जेणें होइ रामकल्याण... वरदान** - प्रार्थना व नवस करून

रामकल्याण होईल असे वरदान मागितले. या वेळी देवता प्रगट झाल्या नाहीत किंवा आशीर्वादही नाही दिले. पूर्वी **'त्यां वंदुनि मागति वरदाना । भावांसहित रामकल्याणा ॥२॥ अन्तर्हित सुर आशिस देती । पदर पसरुनी माता घेती ॥३॥** (१।३५१) असे घडले. येथे फक्त रामकल्याणच मागितले ! म्हणून देवदेवींनी आशीर्वाद दिले नाहीत; भावांसहित राम कल्याण मागणे रामचंद्रांच्या इच्छेला अनुकूल होते म्हणून देवांनी आशीर्वाद दिले; परंतु भावांना सोडून रामकल्याण रामाला मान्य नसल्यामुळे ही प्रार्थना रामाच्या इच्छेच्या विरुद्ध असल्याने, देवदेवी तरी आशीर्वाद कसे देणार? **'राम करूं इच्छिति तें घडतें । कोणि नसे जो करी उलट तें' 'एक विमल कुलिं अनुचित हें किति । त्यजुनि बंधु मोठ्या अभिषेकिति'** (२।१०।७) ही एक गोष्ट घडणे शक्य नाही हे दाखविण्यासाठी एक चौपाई या दोह्यांत कमी आहे. एक कैकयी गैरहजर आहे; तिचे वर्णन करण्यास एक चौपाई लागली असती. भाव हा की कैकयीच्या निमित्ताने ही अनुचित गोष्ट घडून दिली जाणार नाही. **हा सिद्धांत दाखविला की ज्या बाबतीत राम दया करीत नाहीत त्या बाबतीत इतर कोणतेही देव-देवता दया करू शकत नाहीत. ॥ राम जयावर कृपेस करती । सर्वहि करिति कृपा त्यावरती ॥ राम कृपा करिति न ज्या वरती ॥ दया तयावर कोणि न करती ॥** असे होते. भावांसहित रामकल्याण मागणे व देवांचे आशिर्वाद मिळणे; आणि रामकल्याण मागणे व देवांचे आशीर्वाद न मिळणे या दोन जोड्यांचा उल्लेख आणि 'एक विमलकुलि अनुचित हें किति । त्यजुनि बंधु मोठ्या अभिषेकिति' या रामवचनाचा उल्लेख करून ठेऊन केवढा मोठा व्यापक सिद्धान्त सुचविला ! येथे अंतःपुरातील वर्णन संपले.

**चौ. ७ - (१) गाति सुमंगल कोकिल वचना... नयना** - या चौपाईचा संबंध पुढील दोह्यांशी आहे. मंगल गान करणाऱ्या या स्त्रिया कोणत्या हे शब्द साम्याने समजते व या मंगलगान काय करीत आहेत हे पण समजते. **'जिथ तिथं मिळुनि थव्यांनीं भामिनि । सब नव सप्त सजुनि दुति दामिनि ॥ विधुवदनी मृगशावक लोचनि ॥ निज सुरूपें रतिमान-विमोचनि ॥ गाति सुस्वरें मंजुल मंगल ॥** (१।२९७।१-३ व पुढे पहा) या नगरवनिता असून मंगल गीते गात गात

राण्यांचे अभिनंदन करण्यासाठी थव्याथव्यानी राजवाड्याकडे चालल्या आहेत. दो. १।२९७।१ पासून दोह्यापर्यंतचा सर्व भाग येथेही लागू आहे.

*हिं. दो. । राम राज अभिषेक सुनि हियँ हरषे नर नारि ॥*
*॥ लगे सुमंगल सजन सब बिधि अनुकूल बिचारि ॥८॥*

*म.दो. । कळत राम-अभिषेक, मनिं नरनारी हर्षून ॥*
*। लागति मंगल साज सजुं विधि अनुकूल बघून ॥८॥*

**अर्थ :** रामचंद्रांच्या राज्याभिषेकाची बातमी कळतांच सर्व पुरुष व स्त्रिया यांना मनात हर्ष झाला व विधि अनुकूल आहे असे पाहून (विचाराने जाणून) सर्वजण मंगल साज सजवू लागले.॥८॥

**टीका दो. :** (१) **लागति मंगल साज सजुं** – (क) वसिष्ठांनी आज्ञा दिल्या प्रमाणे प्रथम सचिवांनी मांगलिक साज सिद्ध केले. (ख) नंतर राजाने विप्रसाधु सुरपूजन केले. (ग) सीता व राम यांस शुभशकुन झाले व त्यांचे फळ भरतागमन व भरतभेट हे निश्चित ठरले. (घ) इतर राण्या मंगल कलशादि सजवू लागल्या. (ङ) सुमित्रेने रांगोळ्या भरल्या. (च) कौसल्येने विप्र ग्रामदेवी सुर-नागांचे पूजनादी केले. (छ) पुरनारी मंगल गीते गात उत्सवाची तयारी करू लागल्या. (ज) आणि पुरनर मांगलिक साज सजवू लागले. **या आठ वर्गातील एकासच (रामचंद्रांस) हा उत्सव व्हावयास नको आहे** व भरतभेटीची लालसा आहे. **या आठ वर्गात कैकयी नाही.** बाकीच्या साती वर्गास हा उत्सव होणार या आशेने दैव अनुकूल वाटत आहे. कैकयी राणीवशांत नसल्यामुळे यात तिचा उल्लेख करता आला नाही व कोणीही कैकयीकडे जाऊन हा मंगल समाचार सांगितला नाही; मग कवि तिचा उल्लेख कोणत्या निमित्ताने करणार?

(२) **कोणालाच कैकयीची आंठवण कशी झाली नाही?** या प्रश्नाच्या उत्तरात सुद्धा भरताचा संबंध पुढे आणण्याची आवश्यकता नाही. अनेकांनी एकदम जाऊन राणीवशांत खबर दिली इतकेच मानसांत म्हटले आहे. कौसल्या, सुमित्रादी कोणाच्याच नावाचा या बाबतीत उल्लेख नाही. जसा कौसल्या व सुमित्रा यांना खबर दिल्याचा उल्लेख नाही तसा कैकयीचाही नाही. खबर दिली त्या वेळी अंत:पुरात कोण कोण राण्या हजर आहेत याची चौकशी करण्याची

आवश्यकता खबर देणारास असणे मुळीच शक्य नाही. (**क**) जो तो व जी ती उत्सवाच्या तयारीत व आनंदात मग्न ! त्यामुळे कोणत्या राण्यांना खबर कळली व कोणाला कळली नाही याचा विचार अंतःपुरात तरी कोण करणार? त्यांतही कैकयी राजाची सर्वात आवडती तेव्हा तिला हा समाचार सर्वाच्या आधी कळला असणारच असे त्या घाईतच व आनंदात वाटणे अगदी स्वाभाविक आहे. कैकयीच्या सखी (गावातल्या) आपापल्या घरी उत्सवाच्या तयारीत आनंदात मग्न असणारच. अन्तःपुरात बातमी गेली ती सुद्धा दशरथाने नाहीच धाडली. दशरथांनी फक्त सचिवांस संमती विचारताना सांगितले तेवढेच. राजापासून सेवकापर्यंत सर्व माणसे कामात गुंतली आहेत. रामानंदांत मग्न आहेत. (**ख**) कैकयी स्वतःच एकलकोंडी आणि सौंदर्याच्या व पति प्रेमाच्या अभिमानात गर्क राहून इतर राण्यांपासून फटकून वागणारी आहे हे पुढील वचनांवरून स्पष्ट होते. **'पुत्र विदेशिं, न तुम्हांहि चिंता । असे नाथवश तुम्हीं मानितां'** (२।१४।५) **'निश्चिंत किं सौभाग्य बल निज वश मानां राव'** (१७) **'सकल सवति मज ठीक सेविती । पतिबलगर्वित भरत जननि ती'** (१८।३) **'प्रिय बहु निद्रा गाद्यां गिर्या ॥'** (१४।६) ही सर्व वचने कैकयीच्या प्रिय दासीची आहेत.

(२) कैकयी जर राणीवंशात असती तर आग लावण्यासाठी त्या आगलावीच्या हाती एक मोठा पलिता आला नसता; व पुढील सर्व अनर्थ टळला असता; परंतु **'हरिइच्छा भावी बलवान् अति'** असल्यावर असे काहीतरी कारण सापडून त्याच्या पायावर कपटाची टोलेजंग इमारत कपटी, कुटिल, दुष्ट माणसे सहज रचू शकतात. **'गत पंधा दिन सजिती साज किं । तुम्हां कळें मजपासुनि आज किं'** (१९।३) हे धडधडीत खोटे कुभांड रचण्यास कुबडीला जी सवड सापडली ती केवळ कैकयीच्या इतर राण्यांशी फटकून वागण्यामुळे व **राणीवशांत १५ दिवस पाऊलही न टाकल्यामुळेच** ! परंतु **'होणारे न चुके चि होइल जरी ब्रह्मा तया आडवा'** असे हरीच्छेने घडणारे कोण बदलू शकणार? (**क**) या दोह्यांत राज्याभिषेकाच्या तयारीचा उपसंहार केला. **'शोभन रामाभिषेक ऐकत । उत्सव गजर नगरिं बहु चालत'** (७।३) यांत पुरनरनारींच्या उत्साहाचा उपक्रम केला होता. (**ख**) राम व सीता यांशिवाय इतर कोणालाच शुभशकुन झाले नाहीत;

मानसांत कोणाला अपशकुनही झाले नाहीत. देवानी पुष्पवृष्टी केली नाही की आकाशात डंके पिटले गेले नाहीत. नगरात मात्र धुमधडाका वाद्ये वाजत आहेत. शकुन तरी खोटे ठरण्यास दर्शन कसे देतील व अपशकुन तरी प्रभूच्या इच्छेविरुद्ध लोकांच्या आनंदात आताच विर्जण का घालतील? या कार्यास रामाचा मानसिक विरोध आहे हे सांगणारे प्रकरण आता सुरू होते.

हिं ***। तब नरनाहँ बसिष्ठु बोलाए । राम-धाम सिख देन पठाए ॥१॥***
***। गुर आगमनु सुनत रघुनाथा । द्वार आइ पद नायउ माथा ॥२॥***
***। सादर अरघ देइ घर आने । सोरह भाँति पूजि सनमाने ॥३॥***
***। गहे चरन सिय सहित बहोरी । बोले रामु कमल कर जोरी ॥४॥***

म. ***। वसिष्ठांस नरपति बोलाविति । रामधामिं उपदेशा लाविति ॥१॥***
***। गुर्वागमन कळत रघुनाथा । द्वारिं येति पदिं नमिती माथा ॥२॥***
***। सादर अर्घ्य देति गृहिं आणिति । षोडशपरिं पूजुनि सन्मानिति ॥३॥***
***। सीतेसह गुरु पद मग धरले । राम कमल-कर जोडुनि वदले ॥४॥***

**अर्थ :** (मग नरपतीने वसिष्ठांस बोलावून (आणवून) रामास उपदेश करण्यासाठी रामधामी (रामनिवासात) पाठविले.॥१॥ गुरु येत आहेत असे रघुनाथास कळतांच (प्रवेश) द्वाराजवळ येऊन त्यांच्या पायांवर मस्तक ठेऊन नमस्कार केला.॥२॥ आदराने अर्घ्य देऊन आदराने त्यांना घरात आणले व षोडशोपचारांनी पूजा करून त्यांचा सन्मान केला.॥३॥ (मग) सीतेसहित गुरुचे पाय धरले व कमलकर जोडून राम म्हणाले -॥४॥.

**टीका - चौ. १ - (१) वसिष्ठांस नरपति बोलावति :** असा स्पष्ट उल्लेख येथे असता 'गुरु'ला बोलावले कसे अशी शंका काढून कीस काढीत बसणे योग्य नाही. येथे 'गुरु' शब्दच वापरलेला नाही. 'गुरु' शब्द असून बोलावून आणले असा उल्लेख असता तर शंका काढणे योग्य ठरले असते. **'बोलवुं वसिष्ठ गुरुला धाडति'** (१।१९३।७) असे पूर्वी घडले आहे. तेथे कोणी शंका काढली नाही ! तेथे ज्ञानगुरु, उपासना गुरु, मंत्रगुरु असा अर्थ नसून कुलगुरु – पुरोहित, उपाध्याय असा अर्थ आहे. जनकराजांनी आपल्या कुलगुरुंस, शतानंदांस, अंतःपुरांत निरोप सांगण्यास धाडले आहेत ! तेथे कोणी अशी

शंका काढली नाही ! मानसांतील वसिष्ठांकडे तीन अधिकार आहेत; सद्‌गुरु, सर्वाधिकारी व कुलगुरु (कुलपुरोहित) सद्‌गुरु म्हणून काही विचारणे असल्यास शिष्याने व सर्वाधिकारी म्हणून संमती घेणे असेल तेव्हा राजाने, त्यांच्याकडे जाणे उचित व जरूर आहे; परंतु पुरोहित म्हणून काम असेल तेव्हा यजमानाने त्यांस बोलावणे योग्य आहे. (क) व्यवहारात एकाच व्यक्तीला निरनिराळ्या वेळी निरनिराळ्या धर्मांचे पालन करावे लागते. **ज्या धर्मांचे पालन करावयाचे असेल त्याप्रमाणे एकमेकांशी वागणे जरूर आहे.** हा आचरणाचा धार्मिक सिद्धांत येथे ग्रथित केला आहे. तो स्पष्ट करण्यासाठी वरील शंकेला तोंड दिले. न्यायाधीश न्यायासनावर बसलेला असता त्याच्या मित्राने अरेतुरे भाषा वापरणे गुन्हा ठरेल. पण न्यायालयांतून बाहेर पडून दोघेच फिरावयास गेले असता अहो-जाहो म्हटलेले त्याच न्यायाधीशाला गोड वाटणार नाही. तो म्हणेल 'काय रे ! मी येथेही न्यायाधीश आहे की तुझे माझ्यावरील प्रेम कमी झाले? न्यायासनावर बसलेल्या न्यायाधीशाला कोणी मित्र नसतो व कोणी शत्रु नसतो. **अधिकारभेदानुसार आचरणभेद करणे धर्म्य व आवश्यकही असते.** (ख) येथे पुरोहित-कुलगुरु या नात्याने बोलावले आहेत. उद्या यौवराज्याभिषेक व्हावयाचा असल्याने राम-सीता यांनी धर्मशास्त्रानुसार आजपासून उद्यापर्यंत काय काय केले पाहिजे, कसे वागले पाहिजे वगैरे उपदेश करण्यासाठी पाठविले असे वा.रा. वसिष्ठांनी दिलेल्या सूचनांवरून ठरते. (ग) सद्‌गुरु म्हणून विचारावयाचे होते तेव्हा दशरथ स्वतः गेले आहेत. (१।२९३) व सर्वाधिकारी म्हणून विचारावयाचे होते तेव्हाही स्वतःच गेले आहेत २।२ पहा.

(२) **रामधामिं** : या वेळेपर्यंत रामचंद्रांच्या महालाचा स्वतंत्र उल्लेख केला नव्हता. वरात आली त्या दिवशी कौसल्येच्या महालातच झोपले. या वरून अनुमान निघते की हे रामधाम विवाहानंतर मुद्दाम बांधविले असावे. मा. पी. टीकाकार म्हणतात की हा कैकयीचा महाल होता तो तिने सीतेला दिला वगैरे. पण या म्हणण्यास कोठलाच आधार दिलेला नाही. वा. रा. सर्ग १५।३०-४५ मध्ये या राजवाड्याचे विस्तृत वर्णन आहे; पण त्यात किंवा मागे पुढे तो कैकयीचा महाल असल्याचा किंवा त्याचे नाव कनक महाल असल्याचा

उल्लेख नाही; **आपण त्याला 'रामधाम'च म्हणू या.**

**चौ. २-३ (१) गुर्वागमन कळत रघुनाथा** - द्वारपालादिकांनी खबर दिली त्यावरून कळले. वसिष्ठ कशासाठी येत आहेत हे रघुनाथास माहीत नाही. सद्गुरु, संत, साधूंचे स्वागत गृहस्थाने कसे करावे हे येथे क्रमशः शास्त्रोक्त पद्धतीने दाखविले आहे. येथील वर्णन मानसांत इतर अनेक ठिकाणी टीकेत आधारास घेतले आहे. सादर = श्रद्धापूर्वक. **घरांत आणण्यापूर्वी अर्घ्यदान केले पाहिजे** हे येथील उल्लेखावरून स्पष्टपणे कळते. **हे विधान नीट लक्षात ठेवावे.** आसन दिल्याचा उल्लेख नसला तरी षोडशोपचारांत त्याचा अंतर्भाव होत असल्याने स्वतंत्र उल्लेख अनावश्यक आहे. **षोडशोपचार पूजेतील अर्घ्य निराळा व घरात आणण्यापूर्वी दिलेला अर्घ्य निराळा हेही विसरून चालणार नाही.** षोडशोपचारांनी पूजन केले हाच सन्मान.

**चौ. ४ - (१) सीतेसह गुरुपद मग धरले** - या पाय धरण्याचा संबंध पुढील विशेष विनंतीशी आहे. मग = षोडशोपचार पूजा परिपूर्ण झाल्यानंतर. या वेळी राम सीतेसह स्वतंत्र महालात-प्रासादांत-रहात आहेत हे येथे दाखविले. यावरून ठरते की भरतादिकांनासुद्धा असेच स्वतंत्र राजवाडे दिले असले पाहिजेत. राम वसिष्ठांशी गुरुशिष्य भावनेने वागत असल्याने पुढील विनंती करीत आहेत.

**हिं.** ***। सेवक सदन स्वामि आगमनू । मंगल मूल अमंगल दमनू ॥५॥***
***। तदपि उचित जनु बोलि सप्रीती । पठइअ काज नाथ असि नीती ॥६॥***
***। प्रभुता तजि प्रभु कीन्ह सनेहू । भयउ पुनीत आजु यहु गेहू ॥७॥***
***। आयसु होइ सो करौं गोसाईं । सेवकु लहइ स्वामि सेवकाई ॥८॥***

**म.** ***। सेवक-सदनीं स्वामि - आगमन । मंगल-मूल अमंगल-भंजन ॥५॥***
***। प्रभु ! बोलावुनि दासा प्रीतीं - । उचित धाडणें कार्या, नीती ॥६॥***
***। प्रभुता त्यजुनि नाथ परि आले । स्नेहें, आज पूत गृह झालें ॥७॥***
***। आज्ञा द्यावि करिन तें देवा । लाभ सेवका स्वामी-सेवा ॥८॥***

**अर्थ :** सेवकाच्या घरी स्वामींचे आगमन (येणें) मंगलाचे मूळ व अमंगलाचा नाश करणारे असते.॥५॥ तरीपण प्रभु ! (नाथ) दासाला बोलावून (घेऊन)

प्रीतीने कार्याला धाडणे उचित झाले असते; (कारण) तशी नीती आहे.।।६।। तथापि प्रभुत्वाचा त्याग करून नाथ स्नेहाने आले व आज हे घर पावन झाले.।।७।। काय असेल ती आज्ञा द्यावी, त्याप्रमाणे हे देवा ! मी ते करीन; कारण स्वामीची सेवा करावयास मिळणे हाच सेवकाला (मोठा) लाभ आहे.।।८।।

**टीका : चौ.५.** (१) सेवकसदनीं स्वामि-आगमन... भंजन' - या सर्व चौपाया गूढार्थमय आहेत. विश्वामित्रांसारखे क्षत्रियांचे स्वामी आले व तारका सुबाहु मारिचादी अमंगलांचा नाश होऊन मुनि विप्र वगैरेंचे मंगल झाले; तसाच प्रकार रघुनाथाने गूढार्थाने सुचविला आहे. वसिष्ठांसारखे स्वामी जातील तेथे मंगलांचे-कल्याणांचे मूळच जाते, ते प्रथम अमंगलांचा नाश करते व मंगलाचा वृक्ष वाढून फुलतो-फळतो हा बाह्यार्थ आहे. (क) **'झाला तुमचा सुत तो स्वामी । राम पुनीत प्रेम-अनुगामी'** (२।४।८) असे आजच वसिष्ठांनी दशरथांस सांगितले आहे. त्याच अर्थाने 'मी जगाचा स्वामी असून सेवकसदनीं आलों' आहे तो मंगलाची वृद्धी करण्यासाठी व अमंगलांचा विनाश करण्यासाठी. ते कार्य केल्याशिवाय राज्याभिषेक करवून घेणे इष्ट नाही हा आहे मुख्य गूढार्थ. वसिष्ठ कशासाठी आले आहेत हे ऐश्वर्यभावाने जाणले आहे.

**चौ. ६. (१) प्रभु ! बोलावुनि दासा प्रीतीं-उचित धाडणे कार्या नीती -** आपण स्वामी असून सेवकाच्या घरी आलात त्या अर्थी या सेवकाला काहीतरी फार महत्त्वाची व तातडीची कामगिरी सांगण्यासाठीच आला असाल; परंतु आपण स्वतः न येता या दासाला बोलावणे पाठवून कार्याला धाडला असतात तर अधिक योग्य झाले असते; कारण त्यात स्वामींचा मान राखला गेला असता. नीतीसुद्धा अशीच आहे की सेवकाला आज्ञा देण्यासाठी स्वामीने त्याच्या घरी जाण्याची आवश्यकता नाही. हा बाह्यार्थ आहे. (क) बोलावून घेऊन उद्दिष्ट कार्यासाठी वनात धाडणे हेच उचित आहे. असे केल्यानेच नीतीचे रक्षण होणार आहे. या वेळी राज्याभिषेक करवून घेणे अनीती ठरेल; कारण त्यामुळे अनीति प्रवर्तकांचा विनाश सहज करता येणार नाही. **'करिति अनीति न वदली जाई । सीदति विप्र धरा सुर गाई'** (१।१२१।७) हा गूढार्थ आहे. दोघेही सर्वज्ञ सर्वदर्शी असल्याने गूढार्थ व बाह्यार्थ त्यांस सहज

कळण्यासारखे आहेत. **वसिष्ठांस सुचवून ठेवले की वनगमनाच्या बाबतीत आपण विरोध करू नये. उदासीन असावे.**

**चौ. ७ - (१) प्रभुता त्यजुनि नाथ घरि आले-स्नेहें** - सेवकाच्या, शिष्याच्या घरी न बोलावता गुरुने येणे म्हणजे आपले गुरुत्व, आपला मोठेपणा विसरणे आहे. स्नेह अशा प्रकारे मोठेपणा विसरावयास लावतो. सुचविले की माझ्यावरील अगाध प्रेमामुळे आज आपण या घरी आलात. प्रेम नेमांना गुंडाळून ठेवते; प्रेमात लहान मोठा ही भावना उरत नाही. गूढ भाव हा की मी आपले प्रभुत्व विसरून, बाजूस ठेऊन, जो या घरी (दशरथाच्या) आलो आहे तो आपल्या सारख्यांच्या मजवरील प्रेमामुळे आलो आहे. **(ख) आज पूत गृह झालें** - येथे माझे गृह म्हटले नाही. आज शब्दाने सुचविले की राम 'रामधामात' राहण्यास आल्यापासून वसिष्ठ आजच प्रथम आले.

**चौ. ८. (१) लाभ सेवका स्वामीसेवा** - येथे सेवक धर्माचे सार व भूषण सुचविले आहे. 'आज्ञे सम न सुसाहिब सेवा । तो प्रसाद जन लाभो देवा' (२।३०१।४) हे भरताचे वचन आहे. दोघांचे मत एक ! **(क) आज्ञा द्यावि करिन तें देवा** - मी जे करण्यासाठी सेवकसदनी आलो आहे ते करण्याची मला आज्ञा द्यावी. ती आज्ञा देण्यानेच माझ्या सेवेचा खरा लाभ सेवकांना होणार आहे. हे सुचवून ठेवण्याचे कारण इतकेच की कैकयीच्या निमित्ताने पितृवचन-पालनासाठी वनवासात निघता आले. तरी वसिष्ठांनीच जर सांगितले की वनात जाऊ नका तर सर्व अवतार कार्यासच खीळ बसेल; माधुर्य भावात प्रवेश झाल्यावर स्नेहवश होऊन वसिष्ठांनी असे सांगणे अशक्य नव्हते. भरताच्या प्रेमाला वश होऊन एकदा सांगितलेच आहे की भरताची रुची राखणेच श्रेयस्कर आहे. (ख) रामचंद्रांची ही सूचना वसिष्ठांनी चित्रकूटच्या सभांतून अक्षरशः पाळली आहे; तेवढ्यासाठी अवताररहस्यसुद्धा बरेच प्रगट केले आहे. '**धर्मधुरीण भानुकुलभानू । राजा, स्वबश, राम भगवानू ॥३॥ सत्यसंध पाले श्रुतिसेतू । राम जन्म जगमंगलहेतू ॥ (मंगलमूल) 'गुरु-पितु-मातु-वचन अनुसारी । खलदलदलन देवहितकारी ॥ नीति-प्रीति-परमार्थ-स्वार्था । कुणि न राम-सम जाणि यथार्था ।... 'पहा विचार करून मनासी । रामाज्ञाच शिरी सर्वांसी ॥८॥**

**रामाज्ञा रुचि राखणें हितकर हें आम्हांस** ॥२।२५४॥ नंतर भरताने वसिष्ठांच्या प्रभावाचे वर्णन केल्यावर वसिष्ठ भरतास सांगतात की **'ताता ! रामकृपें हें सत्यहि । सिद्धि रामविमुखा स्वप्नीं नहि ॥ २५६।१॥** भाव हा आहे की माझ्याकडून पूर्वी प्रारब्धाचे लेख पुसले गेले हे खरे; पण ते रामकृपेच्या बळावरच घडले; परंतु आता मी रामाच्या इच्छेविरुद्ध करू लागलो तर ते सिद्धीस जाणार नाही. चौ. ६ च्या टीकेत ठळक अक्षरांत वसिष्ठांस दिलेली सूचना व वरील २५६।१ हे वचन यांची तुलना करून पहावी म्हणजे चित्रकूटला गेल्यावर रामचंद्रांस अयोध्येस नेण्याच्या बाबतीत टोलवा टोलव करून आपल्यावरील जबाबदारी दुसऱ्या कोणावर तरी का ढकलीत राहिले याचा बरोबर उलगडा होईल.

***हिं.दो.*** ***। सुनि सनेह साने बचन मुनि रघुबरहि प्रसंस ॥***
***। राम कस न तुम्ह कहहु अस हंस बंस अवतंस ॥१॥***

***म.दो.*** ***। परिसुनि मुनि सुस्निग्ध वच प्रशंसि रघुवीरास ॥***
***। हंस-वंश-अवतंस ! या कां न वदा वचनास ॥१॥***

**अर्थ :** अत्यंत स्नेहमय (सु - स्निग्ध) भाषण ऐकून मुनि रघुवीराची प्रशंसा करीत म्हणाले की राम ! तुम्ही सूर्यवंशाचे शिरोमणि असे भाषण का बरे करणार नाही?

**टीका :** दो. (१) **सुस्निग्ध** - सु-अति, स्निग्ध = स्नेहाने भिजलेले, स्नेहमय; **हंस** = सूर्य, हंसःस्यान्मानसौकासि । **निर्लोभनृप-विष्ण्वर्क (विष्णु, अर्क) परमात्मनि** मत्सरे । योगिभेदे मंत्रभेदे शारीरमरुदन्तरे । तुरंगमप्रभेदेच' (अ.व्या.सु.) निर्लोभनृप = हंस हा अर्थ सुद्धा येथे चांगला बसतो. हंस ! हे संबोधन घेतले म्हणजे परमात्मा हा गूढार्थ बाहेर पडतो व रघुनाथ वचनातील गूढार्थ वसिष्ठांस समजला अशी सूचनाही दिली जाते. हंस ! वंश अवतंस ! असा पदच्छेद येथे करावा. (**क**) परशुरामानेसुद्धा रामलक्ष्मणांच्या वचनकौशल्याची प्रशंसा केली आहे. **'जयति वचन-रचना अति नागर'** (१।२८५।३) **'कसं न वदा असं रघुकुलकेतू । पालक सतत तुम्हीं श्रुतिसेतू'** (२।१२६।८) असे वाल्मीकी म्हणतात. हाच भाव येथे आहे. धर्ममर्यादांचे पालन करण्यासाठीच तुम्ही

अवतार घेतला असल्याने शिष्य धर्माचे आचरण कसे करावे हे आपल्या कृतीने व भाषणाने दाखवून दिलेत. अत्रि मुनि अरण्यकांडांत असेच म्हणतात. ३।६।४-६ पहा. किष्किंधा कांडांत हनुमान म्हणतात **'स्वामी पुसलें म्यां न्यायें मम । तुम्हिही पुसतां कसे नरासम'** (४।२।८) अशा अर्थाची वचने शेष तीन काण्डांत सुद्धा सापडतील. किंवा असे चरित्र केलेले आढळेल. वाचकांनी शोध घ्यावा. वसिष्ठ ज्या कार्यासाठी आले आहेत त्याचा उपक्रम आता करतात.

***हिं.*** ***। बरनि राम गुन सीलु सुभाऊ । बोले प्रेम पुलकि मुनिराऊ ॥१॥***
***। भूप सजेउ अभिषेक समाजू । चाहत देन तुम्हहि जुबराजू ॥२॥***
***। राम करहु सब संजम आजू । जौं बिधि कुसल निबाहै काजू ॥३॥***

***म.*** ***। राम शील गुण स्वभाव वानुनि । वदले प्रेमें पुलकांकित मुनि ॥१॥***
***। भूप करिति अभिषेक - सुसाजा । तुम्हा करू इच्छिति युवराजा ॥२॥***
***। राम करा सब संयम आजीं । जर निभावि विधि कुशल किं काजीं ॥३॥***

**अर्थ :** (या प्रमाणेच) रामचंद्रांच्या गुणशील स्वभावाची प्रशंसा करून (वानुनि) प्रेमाने रोमांचित झालेले मुनि प्रेमाने म्हणाले. ॥१॥ भूपतींनी अभिषेकाची सर्व तयारी केली असून तुम्हाला युवराज करण्याची त्यांची इच्छा आहे.॥२॥ (म्हणून) राम ! आज सर्व प्रकारचा संयम करावा; दैवाने जर निभावून नेले तर कार्यात कुशल लाभेल.॥३॥

**टीका : चौ. १ - (१) राम-शील-गुण-स्वभाव वानुनि** - वरील दोहयांत स्नेह व वचनचातुर्य यांचे दिग्दर्शन केले. येथे शील गुण व कोमल स्वभाव यांचा उल्लेख केला. स्वभाव संकोची, कोमल व सरळ असल्याचे वर्णन प्रत्येक काण्डात आहे. **"मानसांत श्रीराम स्वभाव'** प्र. प्र. १३।२ पहा अवतरणे देऊन येथे विस्तार नको. **(क) प्रेमें पुलकित** - रामराज्याभिषेक होणार या बद्दल हर्ष झाला. अभिषेकाची तयारी कशी काय करावयाची हे सांगताना हर्ष झाला होता. **'म्हणति मुनीश मुदित मृदुवाणीं'** (२।६।१) तसाच अभिषेकाविषयी बोलताना येथे झाला; हा बाह्यार्थ आहे. गूढार्थ हा की अभिषेक तर होत नाहीच पण राम वनवासात जाणार व दशरथास मरण येणार यामुळे भावी विरहाने वाईट वाटले.

**चौ. २-३ - (१) भूप करिती अभिषेक तुसाजा** - सुचविले की राजानांच ही इच्छा झाली; त्यांनी सामग्री तयार करण्याची आज्ञा मागितली व ती मी आपली इच्छा जाणून दिली; व त्या प्रमाणे राजांनी सर्व तयारी करून मला इकडे पाठविले आहे. (क) राज्याभिषेकाचा दिवस व मुहूर्त कोणता ते दुसऱ्या चौपाइने स्पष्ट होत नाही; पण **'आज संयम करा'** याने सुचविले की उद्या राज्याभिषेक करण्याचे ठरले आहे.

(२) **सब संयम करा** - ज्या क्षत्रिय दांपत्याला राज्याभिषेक करावयाचा असेल त्यांनी पूर्व दिवशी काही व्रत, उपवास व नियमादिकांचे पालन करावयाचे असते ते सर्व करा असे येथे अति संक्षेपाने सांगितले. वा. रा. सर्ग ४,५ व ६ मध्ये या विषयी थोडा बहुत स्पष्ट उल्लेख आहे. (क) प्रथम दशरथांनी सभेतच रामचंद्रास सांगितले की - **'तस्मात्त्वयाद्य प्रभृति निशेयं नियतात्मना । सह वध्वोपवस्तव्या दर्भप्रस्तर शायिना'** वधूसहित जितेंद्रिय राहून आजची रात्र दर्भांच्या शय्येवर काढावी. (ख) नंतर दशरथांच्या सांगण्यावरून वसिष्ठ रथाने रामधामी गेले आहेत. योग्य सत्कार वगैरे केला गेल्यावर वसिष्ठ सांगतात - **'प्रसन्नस्ते पिता राम यौवराज्यमवाप्स्यसि । उपवासं भवानद्य करोतु सह सीतया (२।५।९) यांतील यौवराज्य तुम्हास मिळेल हे वसिष्ठ वचन असत्य ठरले आहे. तसे मानसांत घडले नाही.** सीतेसह उपवास व उपवासाचा विधी, व्रताचे नियम वगैरे सांगून वसिष्ठ परत गेले. **(घ)** वसिष्ठ गेल्यावर राम **'स्नातो नियतमानसः ॥ सह पत्न्या विशालाक्ष्या नारायणमुपागमत् ॥ 'प्रगृह्य शिरसा पात्रीं हविषोविधिवत्ततः॥ महते दैवतायाज्यं जुहाव ज्वलितेऽनले ॥ शेषंच हविषस्तस्य प्राश्याशास्यात्मनः प्रियम् ॥ ध्यायन् नारायणं देवं स्वास्तीर्णे कुशसंस्तरे ॥ वाग्यतः सहवैदेह्या भूत्वा नियतमानसः ॥ श्रीमत्यायतने विष्णोः शिश्ये नरवरात्मजः ॥४॥**
सारांश : सीतेसह स्नानकरून एकाग्र चित्ताने नारायणाचे ध्यान करून हविष्याने होमहवन करून शेष राहिलेले हविष्य दोघांनी प्राशन केले. नंतर विष्णु मंदिरात दोघांनी मौन व जितेंद्रिय राहून कुशशय्येवर शयन केले. पुढे एक प्रहर रात्र राहिल्यावर उठून स्नानसंध्या, नित्यक्षेम, नारायणाचे ध्यान वगैरे करून ब्राह्मणांकडून स्वस्ति पुण्याहवाचन करविले. राम सीता यांनी हे जे व्रतोपवासादि

केले त्याचाच उपदेश वसिष्ठांनी येथे केला व सर्व संयम म्हणजे वर लिहिल्याप्रमाणे व्रताचरण होय.

(३) **जर निभावि बिधि** - सुचविले की हे राज्याभिषेक कार्य सिद्धीस जाईल की नाही हे सांगता येत नाही. दैवानेच निभावून नेले तर होईल व कुशल घडेल. भाव हा की राज्याभिषेक होणार नाही व आमचे सर्वांचे अकुशल होणार. राम निघून गेले की मग कुशल कोठले? **(क) अ.रा.** वसिष्ठांनी रामचंद्रास सांगितले आहे की तुम्ही देवकार्यासाठी, भक्तांच्या भक्तीला सफल करण्यासाठी व रावणवधासाठी अवतार घेतला आहे हे मला माहीत आहे; पण तुमच्या कार्यात व्यत्यय येऊ नये म्हणून व्यवहारात मी तुमचा गुरु व तुम्ही माझे शिष्य; हा संबंध लक्षात ठेऊनच वागत जाईन. (अ.रा. २।२।२४-२५) तेच नाट्य येथे आहे व पुढेही पाळले आहे; पण वरच्यासारखे उघड उघड न बोलता !

*हिं* ***। गुरु सिख देइ राय पहिं गयऊ । राम हृदयँ अस बिसमउ भयऊ ॥४॥***
***। जनमे एक संग सब भाई । भोजन सयन केलि लरिकाई ॥५॥***
***। करनबेध उपबीत बिआहा । संग संग सब भए उछाहा ॥६॥***
***। बिमल बंस यहु अनुचित एकू । बंधु बिहाइ बड़ेहि अभिषेकू ॥७॥***

*म.* ***। शिकवुनि गुरु नृपभवनिं निघाले । राम असे मनिं बिस्मित झाले ॥४॥***
***। सर्वे जन्मलों बंधु चारि जण । खाणें निजणें बालकेलि पण ॥५॥***
***। कर्णवेध उपनयन विवाहां । सर्व बरोबर कृत उत्साहां ॥६॥***
***। एक विमल कुलिं अनुचित हें किति । त्यजुनि बंधु मोठ्या अभिषेकिति ॥७॥***

**अर्थ :** उपदेश करून (शिकवण देऊन) गुरु राजाकडे निघाले (गेले). इकडे रामचंद्रांच्या मनात विस्मय (खेद) उत्पन्न झाला की - ॥४॥ आम्ही चौघे भाऊ बरोबर जन्मास आलो; जेवणखाण, झोपणे, खेळ, बाललीला इत्यादी सर्व बरोबर करीत राहिलो ॥५॥ कान टोचणे, मुंज, लग्न इ. सर्व संस्कार व उत्सव सर्वांचे बरोबर झाले.॥६॥ (पण) या विमल वंशांत ही एक(च) गोष्ट अनुचित होतं आहे की इतर भावांना सोडून मोठ्यालाच राज्याभिषेक करीत आहेत.॥७॥

**टीका : चौ. ४ - (१) गुरु** - येथे वसिष्ठ, पुरोहित वगैरे न म्हणता

'गुरु' म्हटले; कारण की राजाने पुरोहित म्हणून पाठविले असले तरी राम त्यांच्याशी गुरु भावनेनेच वागले. गुरु समजूनच रामचंद्रांनी निरोप दिला: सांगितलेले कर्म कसे केले वगैरे सांगण्यासाठी राजाकडे गेले ते पुरोहित नात्याने गेले. 'वसिष्ठोऽपि नृपं गत्वा कृतं सर्व न्यवेदयत्' (अ.रा. २।२।३९) (क) मानसांत बिस्मय शब्द आश्चर्य किंवा सखेदाश्चर्य किंवा खेद, विषाद या अर्थाने वापरलेला आहे. येथे सखेदाश्चर्य असा अर्थ आहे.

**चौ.५-६.** (१) यांत हे सांगितले की जन्मापासून विवाहापर्यंतचे सर्व संस्कार व व्यवहार चौघाही भावांचे बरोबर झाले. भाव हा की एकाचा संस्कार केला व दुसऱ्याचा केला नाही असे झाले नाही. बरोबर म्हणजे एकाच क्षणाला असा अर्थ नाही. बालकाण्डातील वर्णनावरून स्पष्ट दिसते की फार तर एकेका दिवसाच्या अंतराने सर्व संस्कार, विधी, झाले. खाणे-जेवणे इत्यादी व्यवहार तर अगदी एकाच वेळी होत होते. त्या प्रमाणे राज्याभिषेक सुद्धा चौघांना व्हावयास पाहिजे होता असे रघुनाथास वाटत आहे.

**चौ. ७. (१) एक बिमल कुलिं अनुचित हें किति** — एकट्या मोठ्या भावालाच सगळे राज्य अर्पण करण्याची ही एक प्रथा तेवढी या विमल सूर्यकुळाला शोभण्यासारखी नाही; बाकी सर्व गोष्टींत हा वंश पूर्वीपासूनच निर्मळ आहे असा अर्थ करणेच योग्य आहे. प्रश्न राज्याभिषेकाचा आहे. कोणाला दिवाण, कोणाला सरसेनापती इत्यादी अधिकार देऊन मोठ्याला राज्य देणे योग्य असा पळवाटेचा अर्थ यातून काढणे इष्ट नाही असे वा. रा. उत्तरकांड अवलोकन केल्याने ठरते. ज्येष्ठ पुत्राला युवराज करावा व तोच पुढे राजा व्हावा अशी प्रथा सूर्यवंशांत आहे. मनुस्मृती तेच सांगते. स्वतः मनु राजाने एकाच मुलाला साम्राज्य समर्पण केले व तो स्वतः वनात गेला; असे मनुशतरूपाख्यानात आधीच वर्णिले आहे. प्रतापभानूच्या कथेत सुद्धा तसेच आहे. 'एकोऽहि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीन्दोः किरणेष्विवाङ्कः' चंद्राला विमल म्हटले आहे. १।३१६।३। या प्रमाणे हा दोष या वेळेपर्यंत चंद्रातील डागासारखा या वंशात राहिला असला तरी तो पुढे राहू नये असे रघुनाथास वाटत आहे. प्रत्येक भावाला कुठल्या तरी देशाचा राजा करावा असे रघुवीरास

परमोत्कृष्ट बंधुप्रेमामुळे वाटत आहे. ते स्वतः राज्यावर बसल्यानंतर त्यांनी लक्ष्मणास युवराज करण्याचे ठरविले; पण तो मान्य करीना म्हणून भरताला अयोध्येचा युवराज केला. पुढे शत्रुघ्नाला मधुपुरीचे राज्य दिले. भरताच्या पुत्रांना गंधर्व देशाचे दोन विभाग करून राज्ये दिली. तशीच बाकीच्यांच्या व स्वतःच्या पुत्रांस सुद्धा दिली. यावरून रघुनाथाची इच्छा काय होती हे स्पष्ट दिसते. दशरथ राजांनी चौघांनाही राज्ये द्यावी व ही नवी प्रथा सुरू करावी असे रघुनाथास वाटत आहे. पूर्वपरंपरा, शास्त्र व लौकिकरीत्या एकट्यासच सर्व राज्य देणे योग्य असले तर बंधुप्रेमाच्या दृष्टीने व सुखोपभोग, ऐश्वर्य, मान-सन्मान इ. दृष्टीने सर्व भावांना सारखेच मोठे करावे, राजे करावे हीच श्रीरघुनाथाची इच्छा आहे. (क) विमल व अनुचित यांचा समन्वय कसा ते वर दाखविलेच. रघुनाथास असे का वाटले याचे कारण पुढील चौपाईत दिले आहे. राजनीतिशास्त्र व कुलपरंपरा आणि धर्मशास्त्र दृष्टीने ज्येष्ठ पुत्रास राज्याभिषेक करणे अनुचित नाही अशी साक्ष मंथरा व कैकयी यांनी सुद्धा दिली आहे. येथे बंधु शब्दाने भरतच समजणे चूक आहे. (२) कोणी म्हणतील की वनातून आल्यावर रामचंद्रांनी एकट्यालाच अभिषेक का करून घेतला? राज्य दशरथाचे ते त्यांनी वचनाने भरताला दिले. भरताने त्याचा स्वीकार न करता रामाचे राज्य म्हणून चालविले. पण दशरथ व कैकयी यांच्या वचनाप्रमाणे राज्याभिषेकापूर्वी रघुनाथाचा राज्यावर हक्क नव्हता. वसिष्ठगुरु, भरत, सचिव व विप्र यांनी रामास राज्याभिषेक करण्याचे ठरविले. राज्याभिषेकाने सत्ता हाती आली तेव्हा त्यातील काही भाग दुसऱ्यांस देण्यास अडचण राहिली नाही; म्हणून क्रमशः हळुहळू नवी प्रथा पाडली हे वा.रा. वरून स्पष्ट आहे. परंतु ही नवी प्रथा पुढे तशीच चालू न राहता ज्येष्ठ पुत्राला किंवा तो अपात्र असल्यास दुसऱ्या एखाद्या सत्पात्र पुत्रास राज्य देण्याची पहिली प्रथाच चालू राहिली.

**हिं.** *। प्रभु सप्रेम पछितानि सुहाई । हरउ भगत मन कै कुटिलाई ॥८॥*

**दो.** *। तेहि अवसर आए लखन मगन प्रेम आनंद ॥*

*॥ सनमाने प्रिय बचन कहि रघुकुल कैरव चंद ॥१०॥*

म. ***। प्रेमें प्रभु - परिताप सुशोभन । भक्त-मनाचे हरो कुटिलपण ॥८॥***

दो. ***। लक्ष्मण अवसरिं येति त्या प्रेम-मग्न सानंद ॥***

***। प्रिय वचनें सन्मानिती रघुकुल-कैरवचंद ॥१०॥***

**अर्थ :** प्रभूचा हा प्रेमजनित सुंदर परिताप भक्तांच्या मनाचा कुटिलपणा हरण करो.॥८॥ त्याच वेळी आनंदित व प्रेममग्न झालेले लक्ष्मण (रामाकडे) आले व रघुकुल कैरवचंद्राने प्रिय वचनानी त्यांचा सन्मान केला. ॥दो.१०॥

**टीका. चौ. ८ (१) पछितानि :** पछितावा = पश्चात्ताप, अनुताप असा शब्दार्थ आहे; पण रघुनाथास पश्चात्ताप होण्यास त्यांनी काही चूक केलेली नाही म्हणून चौथ्या चौपाईतील विस्मय = खेदयुक्त आश्चर्य असा जो अर्थ आहे त्यातील खेद-विषाद-परिताप = पछितानि असा येथे अर्थ आहे. कैरव = चंद्रविकासी कमले, कुमुदे. **(क) प्रभु-परिताप सुशोभन** - हा खेद प्रभूला जरी दुःखदायक असला तरी फार चांगला आहे. कारण तो प्रेमाने-बंधु प्रेमाने उत्पन्न झाला आहे. बंधुप्रेमाचा आदर्श निर्माण करून कौटुंबिक स्वास्थ्य टिकविण्यास तो उपयोगी पडणारा आहे. भावाचा हिस्सा त्याला मिळू न देता स्वतःच उपभोग घेण्याची प्रवृत्ती मोठ्या भावात उत्पन्न होत असेल तर त्यांनी रामचंद्रांच्या या विषादाचा विचार करावा म्हणजे त्यांस कळेल की सर्व राज्यावर स्वतःचा कायदेशीर हक्क असून, विद्यमान राजा (पिता) तो हक्क ताब्यात देत असून धाकट्या भावांचा हक्क, वारसा नसतानाही रामचंद्रांना ते राज्य नकोसे वाटू लागले. मग भाऊबंधांच्या न्याय्य हक्कांवर पाणी फिरविणे किती योग्य आहे? अशा विचाराने भक्त मनाचा कुटिलपणा तरी नष्ट होईल. **(ख) भक्तमनांचा** म्हणण्यात भाव हा की प्रभूला जे आवडते ते करणे व आवडत नाही ते न करणे हा भक्ताचा धर्म आहे. असे वागल्यानेच रामकृपा होईल व असे वागतील त्यांसच रामभक्त म्हणता येईल. धनसंपत्तीच्या लोभाने, द्वेषमत्सरादीने, जे भाऊबंदांच्या न्याय्य हक्कांवर गदा आणतील ते भक्त न ठरता रामविरोधी ठरतील. रामविरोधाने कधी कुशल होत नाही. वालीने सुग्रीवाचा निष्कारण छळ केला. रावणाने बिभीषणाला हाकलून लावला. कौरवांनी पांडवांना त्यांचा वारसा न देता कपटाने छळ केला, त्याचा परिणाम काय झाला

तो विश्वविदित आहे. याचा विचार निदान रामभक्त म्हणविणारांनी तरी करावा व भावांवर पुत्रांप्रमाणे प्रेम करावे. असे घडले तरच रामभक्त म्हणविण्यात काही अर्थ आहे; नाहीतर रामभक्त व दुर्योधन, कंस यांत फरक तो काय? (ग) वडील भावाच्या कर्तव्याचा विचार प्रभूच्या वरील विषादावरून करावा आणि धाकट्या व सावत्र भावाच्या कर्तव्याचा विचार लक्ष्मण व भरत यांच्या चरित्रांवरून शिकता येईल. या चौपाईचे येथे केलेले विवरण मान्य नसेल त्यांच्यासाठी मा. पी.मध्ये विविध मते आहेत.

**दो.** (१) धाकट्या भावांना राज्य देत नाहीत म्हणून राम मनात खट्टू झाले आहेत. तोच, वडील भावाला सर्व राज्य मिळणार या आनंदाने उड्या मारीत बंधुप्रेमात मग्न होऊन धाकटा, सावत्र भाऊ, लक्ष्मण मोठ्या भावाच्या दर्शनास आला ! कवीच्या नाट्य काव्य प्रतिभेची व महाकाव्य कलाकौशल्याची येथे वाहवा करावीशी वाटते ! परस्पर विरुद्ध भावना हृदयात वावरत असलेल्या या दोन बंधूंना येथे एकत्र आणण्याबद्दल कवीला जेवढी शाबासकी द्यावी तेवढी थोडीच. भरत असता तर तोसुद्धा या समाचाराने अत्यंत प्रफुल्लीत होऊन असाच आला असता. **मोठ्याच्या ठिकाणी पूर्ण वात्सल्य भाव तर धाकट्याच्या ठिकाणी पूर्ण दास्यभाव आहे. दोघांनाही राज्यलोभ, धनलोभ, सत्तालोभ इ. तिळमात्र नाही हे दिसले.** कवींनी येथे सुचविले की रघुवंशांतील प्रथा जर अनुचित असती तर लक्ष्मण आनंदमग्न व प्रेममग्न होऊन आला नसता ! (क) राज्य मिळणार, सर्व सत्ताधीश होणार, म्हणून सत्ताहीन ठरलेल्या धाकट्या सावत्र भावाचा अपमान केला नाही. एवढेच नव्हे तर त्याचा सन्मान केला. पूर्वीच्या वात्सल्यभावात यत्किंचित्सुद्धा न्यूनता आली नाही; उलट धाकट्या भावाला पूर्वीपेक्षा अधिक मान दिला. **खरे मनाचे मोठे (महात्मा) लोक वाढत्या मोठेपणाबरोबर अधिक विनम्र व अधिक निरहंकारी बनतात पण खोटे लोकांचा अहंकार व उर्मटपणा वाढत्या मोठेपणाच्या शतपटीने वाढतो व नम्रता त्याच्या व्यस्त प्रमाणात वाढते** ! रावण, दुर्योधन चरित्रे पहावीत !

(२) **सन्मान कसा केला** - राम म्हणाले, 'सुमित्रानंदवर्धना बाळा लक्ष्मणा ! उद्या मला यौवराज्याभिषेक करण्याचे राजांनी ठरविले आहे. पण मी केवळ

निमित्तमात्र आहे; कर्ता भोक्ता खरा तूच होणार बाबा ! कारण तू माझा बाह्य प्राण आहेस. माझ्या नावाने या समुद्र वलयांकित पृथ्वीचे तूच शासन कर. ही राज्यलक्ष्मी तुझ्या भाग्यानेच माझ्याकडे येऊ बघत आहे; तेव्हा वांछित भोग व राज्यफल यथेष्ट भोग बरं ! माझं जीवन व मिळणारं राज्य तुझंच आहे. (अ.रा. २।२।३७-३८) वरील अर्थ मानसांतील परिस्थितीस अनुसरून १/२ शब्द अधिक घालून दिला आहे. वा. रा. २।४ मध्ये म्हटले आहे - **'लक्ष्मणेमां मयासार्धं प्रशाधि त्वं वसुन्धराम् ॥ द्वितीयं मेऽन्तरात्मानं त्वामियं श्रीरुपस्थिता ॥ सौमित्रे भुंक्ष्व भोगांस्त्वं इष्टान् राज्यफलानिच । जीवितं चापि राज्यं च त्वदर्थमभिकामये'** (४३,४४) याचा सारांशही वरील अर्थात आहेच.

(३) **रघुकुल-कैरवचंद्र - चंद** = चंद्र - पण या चंद्राला कैकयीकृति राहू लवकरच ग्रासून तो अयोध्येत दिसणार नाही असे करणार; तोच कैकयीकृति राहू दशरथ राजारूपी भानुकुल-भानूला पक्का गिळून ग्रस्तास्तंगत करणार ! रघुपतिविरहदिनेश अयोध्येत उगवून अयोध्या तलाव व रघुकुलकैरवे यांना आपल्या प्रचंड तापाने अत्यंत संतप्त करून, दीन, दुःखी, कष्टी करणार ! रघुपतिविरहदिनेशाचा अस्त झाल्याशिवाय, रघुकुल कैरवचंद्र अयोध्येत दिसणार नाही. (७।९ रा. पहा) चंद्र उगवला म्हणजे कैरवे फुलतात; तसे सर्व रघुकुल राज्याभिषेकाच्या समाचाराने परम प्रसन्न झाले आहे. रामचंद्रांच्या सुधामय वचन किरणांनी लक्ष्मणचकोर किशोराला तर फारच आल्हाद वाटला. रघुपतीला मिळणाऱ्या राज्याचा खरा भोक्ता खरोखर लक्ष्मण आहे हे पुढे गू. चंद्रिकेत दिसेल व रघुपतीला जे राज्य मिळणार आहे ते लक्ष्मणाच्या महद् भाग्यानेच असे सुमित्रादेवीच सांगणार आहे.

***श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय १ ला समाप्त.***



# अध्याय दुसरा

हिं. । बाजहिं बाजने बिबिध बिधाना । पुर प्रमोदु नहिं जाई बखाना ॥१॥
। भरत आगमनु सकल मनावहिं । आवहुँ बेगि नयन फलु पावहिं ॥२॥
। हाटबाट घर गलीं अथाईं । कहहिं परसपर लोग लोगाईं ॥३॥
। कालि लगन भलि केतिक बारा । पूजिहि बिधि अभिलाषु हमारा ॥४॥
। कनक सिंघासन सीय समेता । बैठहिं रामु होइ चित चेता ॥५॥

म. । वाजति वाद्यें विविध विधानां । पुरीं प्रमोद जाइ वदला ना ॥१॥
। सकलहि भरतागमना प्रार्थिति । झट येवोत नयनफल पावति ॥२॥
। हाटिं वाटिं उपवर्बिं घरिं दारीं । पुरुष परस्पर वदती नारी ॥३॥
। उद्यां मुहूर्त विलंब न फार किं । पुरविल विधि अभिलाषा सार किं ॥४॥
। कांचन-सिंहासनिं सह सीते । बसतां राम, किं होइ मनीं तें ॥५॥

**अर्थ :** विविध वाद्ये विविध प्रकारांनी वाजत आहेत व नगरांत जो आनंद (भरला) आहे त्याचे वर्णन केले जाणे अशक्य आहे.॥१॥ सर्व लोक भरताच्या आगमनासाठी प्रार्थना करीत म्हणत आहेत की भरत चटकन येवोत; म्हणजे नेत्रांचे साफल्य पावतील. ॥२॥ बाजारांत, रस्त्यांत (वाटिं), बोळांत, घरीदारी (सर्वत्र) पुरुष व स्त्रिया आपापसांत म्हणत आहेत की.॥३॥ उद्याच तर मुहूर्त आहे. आता कुठे फार वेळ आहे ! तरी विधाता आपल्या सर्व अभिलाषांचे सार (मुख्य इच्छा) पूर्ण करणारच.॥४॥ (एकदां) सोन्याच्या सिंहासनावर सीतेसह राम बसले की आपल्या मनातले (मनासारखे, पूर्ण) झाले.॥५॥.

**टीका - चौ. १-२- (१) वाजति वाद्यें विविध विधानां** - नगरांतील उत्सवाचे वर्णन **'नरनारी हर्षून ॥ लागति मंगल साज सजुं विधि अनुकूल बघून'** (दो. ८) येथे सोडले होते ते येथे पुन्हा हाती घेतात. विविध वाद्ये - **'डंके पिटिति पणव वर वाजति । ध्वनि शंखादि वाजि गज गाजति ॥ झांझा डिंडिम मृदंग सुस्वर । वाजति सणया-राग मनोहर'** (१।३४४।१-२) **'विविधा वाद्यें वाजुं लागलीं'**

(१।३४६।३) (क) **पुरीं प्रमोद जाइ बरला ना** - वा. रा. २।५।१५-२० व सर्ग ६।१०-२८ यांत अयोध्येतील लोकांच्या उत्साहाचे व आनंदाचे वर्णन आहे. रस्त्यांनी पुरुषांची इतकी गर्दी झाली आहे की रस्त्याने चालत जाणे कठीण आहे. लोकांचे हर्षोद्गार व गलबला यांनी सागराच्या गर्जनेसारखा ध्वनी निघत आहे. केव्हा एकदा सूर्योदय होतो व केव्हा एकदा रामराज्याभिषेक डोळ्यांनी पाहतो असे लोकांस झाले आहे. इ. वा. रा. पाहणे.

(२) **सकलहि भरतागमना प्रार्थति** - भरत नाही हे लोकांना खटकत आहे; पण बोलावणे पाठवून आणणे शक्य नसल्याने राजा तरी काय करणार? असं म्हणत लोक देवदेवतांना प्रार्थना, नवस करीत आहेत की वाटेल ते करून भरतास सकाळपर्यंत आणलेत तर आम्हास फार आनंद होईल व त्यांच्या डोळ्यांचे पारणे फिटेल ! सर्व लोकांचे भरतावर प्रेम आहे व भरताचे रामावर अत्यंत प्रेम आहे हे लोकांस माहीत आहे हे येथे दाखविले. (क) भरताचा राज्यावर अधिकार असता व भरताचे अभिषेकाच्या आधी येणे रामराज्याभिषेकात विघ्नकारक ठरणारे असते तर लोकांनी अशा प्रार्थना केल्या असत्या का? याचा विचार वाचकांनी करावा.

**चौ. ३.४** (१) **'हाटिंबाटिं... नारी** - जिथे कुठे २।४ पुरुष किंवा २।४ स्त्रिया जमतात तेथे चर्चेला दुसरा विषयच नाही. केव्हा रात्र सरते व केव्हा उजाडते असे लोकांना झाले आहे. (क) **पुरविल बिधि अभिलाषासार** - विधि = विधाता, अनुकूल आहे, दैव अनुकूल आहे असे लोकांना वाटत आहे; त्यामुळे एकमेकांस धीर देऊन सांगतात की आता वेळ तो किती राहिला; आजची रात्र गेली की झाले. दैव अनुकूल आहे तेव्हा आपली इच्छा आता पूर्ण होणारच यात शंका कशाला? याने दाखविले की लोक अति उत्सुक झाले आहेत. त्यामुळे अधीर झाले आहेत. एक रात्र म्हणजे कितीतरी दीर्घ काळ! असे वाटू लागले आहे. तेव्हा त्यांच्यातीलच कोणी धीर देत आहेत. त्यांचे वर्णन चौथ्या व पाचव्या चौपाईत केले आहे.

**चौ. ५** - (१) **कांचन सिंहासनिं** - आता सोन्याचे सिंहासन पाहण्यास मिळणे तर अशक्यवत झाले आहे. चांदीची सिंहासने काही काही मठांत व

देवालयांत आहेत. खुर्चीसारखे दोन हात व चार पाय असलेले व पाय सोडून वर बसता येईल इतके किंवा अधिक उंच हे आसन असते. पायांचा खालचा आकार सिंहाच्या पाया (पंजा) सारखा असतो व हातांच्या पुढल्या टोकांचा आकार सिंहाच्या मुखासारखा असतो. बहुधा लाकडाचे सिंहासन करून ते चांदीच्या किंवा इतर धातूच्या पत्र्यांनी मढवलेले असते. असे करण्याचे येथे कारण नाही. शुद्ध सोन्याचेच हे सिंहासन असणार ! (क) **होइ मनीं तें** - लोकांचा भाव हा आहे की आम्हाला अर्थ, धर्म, काम, मोक्ष, ऋद्धिसिद्धी इ. कांऽऽही नको. आम्ही दुसरे काही मागत नाही. फक्त राम व सीता यांना राजसिंहासनावर बसलेले पाहिले म्हणजे जीवन जन्मसफलता झाली ! हे सर्व अभिलाषांचे सार आहे.

***राज्याभिषेक तयारी प्रकरण समाप्त.***



# राज्यरसभंग प्रकरण

हिं. *। सकल कहहिं कब होइहि काली । बिघन मनावहिं देव कुचाली ॥६॥*
*। तिन्हहि सोहाइ न अवध बधावा । चोरहि चंदिनि राति न भावा ॥७॥*
*। सारद बोलि बिनय सुर करहीं । बारहिं बार पाय लै परहीं ॥८॥*

दो. *। बिपति हमारि बिलोकि बड़ि मातु करिअ सोइ आजु ॥*
*॥ रामु जाहिं बन राजु तजि होइ सकल सुरकाजु ॥११॥*

म. *। उजाडेल कधिं सर्वहि म्हणती । देव कुचाळी विघ्न विनवंती ॥६॥*
*। नगरोत्सव त्यां क्षण बघवे ना । चोरा चांदणी रात्र रुचेना ॥७॥*
*। आवाहुनि शारदे विनवती । घडि घडि धरिती पाया पडती ॥८॥*

म.दो. *। अमची बघुनि विपत्ति अति आइ ! असे कर आज ॥*
*। जाति राम राज्या त्यजुनि वनिं, होइल सुरकाज ॥११॥*

**अर्थ :** केव्हा एकदा उजाडेल असे सर्व लोक (नगरांत) म्हणत आहेत; परंतु कुचाळकी करणारे देव विघ्नांची (राज्याभिषेकांत विघ्न आणण्याची) प्रार्थना करीत आहेत.॥६॥ अयोध्येतील आनंदोत्सव त्यांना मुळीच बघवत नाही. (कारण) चोराला चांदणी रात्र आवडत नाहीच.॥७॥ शारदेला बोलावून (आवाहन करून) वारंवार तिचे पाय धरून, तिच्या पायांवर लोळण घेऊन ते विनवू लागले ॥९॥ की आई ! आमची अति विपत्ती पाहून तू आजच्या आज असे कर की राम राज्याचा त्याग करून वनांत जातील व देवांचे (सर्व) कार्य साधेल.॥दो.॥

**टीका - सिंहावलोकन –** मागील प्रकरणात भक्तिमान सज्जन मानवांचे चरित्र थोडक्यात मोठ्या कौशल्याने रेखाटले. त्यात राजा व प्रजा यांचे संबंध कसे असावे; वार्धक्याची सूचना शरीराने दिली म्हणजे मुख्य चालकाने (कुटुंब, गांव, देश इ. च्या) काय करावे, धार्मिक कार्य किती त्वरेने करावे, राजनैतिक-धार्मिक कार्यात गुप्तता व सावधगिरी किती राखावी, गुरुशिष्य, पुरोहित, यजमान, मंत्री, राजा यांचे संबंध व व्यवहार कसे चालावे; राज्याभिषेकापूर्वी

कशी काय तयारी करावी; जे सोंग घेतले असेल त्याची बजावणी (कृती) व्यवहार-धर्म-नीति-मर्यादा न ओलांडता कशी करावी; मोठ्यांचे मर्मरक्षण करतानासुद्धा असत्य भाषण कसे टाळावे इत्यादी अनेक मानव-व्यवहारांचे वर्णन केले. (क) आता या राज्यरसभंग वर्णनात प्रतिष्ठित, स्वार्थी, अभक्त लोकांचा स्वभाव; कुटिल, कपटी, दुर्जन दासींचा स्वभाव, त्यांच्या संगतीचा भोळ्या-भावड्या स्त्रियांवर व विशेषतः श्रीमंत, कीर्तीमान, प्रसिद्ध कुळातील स्त्रियांवर होणारा परिणाम, स्त्रीजित, बहुभार्यीक असलेल्या प्रेमळ, शूर, वीर, धर्मनिष्ठ उच्च कुळातील सज्जन पुरुषांवर होणारा परिणाम इत्यादी अनेक चित्रे पुढे रंगविली आहेत. शब्द सामर्थ्याला कपट, मत्सर, असत्य भाषण, हावभाव इत्यादींची जोड मिळाली म्हणजे कसे विपरित परिणाम होतात व त्यांचा प्रभाव किती दूरवर पडतो आणि प्रबळ झालेली एक अबला कसे उत्पात करू शकते याचे आदर्श चित्रण येथून पुढे केलेले दिसेल.

**चौ. ६ - (१) उजाडेल कधि सर्वहि म्हणती । देव कुचाळी विघ्न विनवती** - या चौपाईत कविराज सुचवितात की **हे चित्र माणसाचे पहा व हे चित्र देवांचे पहा.** दिव्य, पूज्यवंद्य, परम अधिकारी समजल्या जाणारांचे ते चित्र ! अयोध्येतील मानव रात्र लवकर संपावी व सूर्योदय लवकर व्हावा म्हणून नवस प्रार्थना करताहेत; उद्याचा दिवस आताच उजाडेल तर फार चांगले. एकेक क्षणाचा विलंब असह्य वाटत आहे; तर देवांचे याच्या अगदी उलट ! रामराज्याभिषेकात विघ्न यावे, ते आजच्या रात्रीत यावे, ते विघ्न उत्पन्न झाल्याशिवाय उजाडूच नये अशी त्यांची जीव तोडून खटपट चालू आहे ! **एकाच चौपाईत हा विरोध भरून ठेवल्याने तो जितका उठावदार, भडक व प्रभावी ठरतो तितका ही दोन वाक्ये दूर दूर वापरल्याने ठरला नसता.**

**चौ. ७ - (१) चोरां चांदणी रात्र रुचेना** - चोरांना चांदणी रात्र पाहवत नाही; त्यांना अंधारी अमावस्येची रात्र आवडते; तसा देवांना अयोध्येतील आनंदोत्सव एक क्षणभर सुद्धा बघवेनासा झाला. चोराला वाटते की चंद्र मावळावा, म्हणजे पक्का काळोख पडेल व मग चोरी करणे सोपे जाईल. बहुधा सुखाचे साधन धन मिळविण्यासाठीच चोरी करतात. देव चोर ठरले, राम चंद्र

आहे, राज्याभिषेक-उत्सवाचा परमानंद हे पौर्णिमेचे चांदणे पडले आहे. देवांचे सुखसाधन जे वैभव, सत्ता व संपत्ती ती रावणाच्या ताब्यात गेली आहे. ती मिळविण्यासाठी त्यांना चोरी करावयाची आहे अयोध्येत ! अयोध्येतील राज्याभिषेकोत्सव चांदणे नाहीसे करावयाचे आहे. रघुवीर राका शशीला चोरून अरण्यात न्यावयाचा आहे. तेथे त्याच्या लख्ख चांदण्याने राक्षसरूपी चोरांच्या चोऱ्या-दरोडे बंद पडतील व प्रथम देवांची भीती नष्ट होईल.

चौ. ८. (१) **आवाहुनि शारदे प्रार्थती** - शारदेला-सरस्वतीला बोलावली. देवांनी विचारविनिमय करून ही चोरी करण्याचा बिनतोड, बिन धोक्याचा मार्ग ठरविला. सारदा (शारदा) च हे कार्य करू शकेल, इतरांस साधणार नाही असे त्या गुप्त खलबतांत ठरले. म्हणून तिचे आवाहन केले. तिला वाटले की रामराज्याभिषेकाच्या वेळी स्तुती करण्यासाठी एखादे गोड काव्य करून पाहिजे असेल म्हणून यांनी माझे स्मरण केले; म्हणून ती आली धावत. **'भवतीस्तव बिधिभवना त्यागुनि । स्मरत शारदा येते धाउनि'** (१।११।४) परंतु **'गिरा शिरा पिटि अनुतापानें'** (१।११।७) असे आता होणार आहे. **(क) स्वार्थसाधू, परहितविघातक, दुराचरणी, मोठे लोक आपला स्वार्थ साधण्यासाठी बायकांच्या सुद्धा किती व कसे पाया पडतील व पडतात हे येथे दाखविले आहे.** आपले काम-स्वार्थ साधेपर्यंत वाटेल तितके विनम्र बनतील, नाकदुऱ्या काढतील. शंकरांची समाधी उतरविण्यासाठी कामदेवाला बळी देऊन रतीला विधवा बनविली. वृत्रासुराचा वध करण्यासाठी दधीची ऋषीला मरावयास लावून त्याच्या पत्नीला पुत्र नसतानाच विधवा केली. आता शारदेला पुढे करून आपण आपला स्वार्थ साधून पुन्हा नामानिराळे ! या उत्सवाच्या गजरांत, धामधुमीत, राणीवशांत प्रवेश करून सद्बुद्धीची चोरी प्रथम करून दुर्बुद्धी देऊन यावयाचे आहे.

**दोहा** - (२) **आइ !** सरस्वतीला पान्हा फुटावा, दया यावी, म्हणून आई, आई म्हणून तिला हाका मारू लागले; व एवढे काम करच असे निर्लज्जपणाने सांगितले. **स्वतः कष्ट सोसून, खस्ता काढून, सुख देणारी आईच असू शकते; बापाच्याने ते होणे नाही;** म्हणून या वेळी बापाकडे - ब्रह्मदेवाकडे देव गेले नाहीत. (सरसवती-) सरस्वतीच ती; तिला पान्हा फुटण्यास वेळ लागणार नाही

व ती सार देईल. (सार-दा-शारदा-सारद (हिं.)) अशी देवांची खात्री आहे. **शारदेचे आवाहन करण्याचे काम देवगुरु बृहस्पतींनीच केले असे पुढील त्यांच्या वचनावरून ठरते. 'छल शोधुनि यत्ना करा सर्व साधलें, जाइ'** (२।२१७।) अशी विनंती इंद्रादी देवांनी रामभरत भेटच होऊ न देण्यासाठी (२१७।८) बृहस्पतीला केल्यावर ते म्हणतात - **'तै कृत काहिं रामरुचि बघुनी । हानि अतां कीं कुचाळ करुनी'** याने ठरते की या वेळी देवांनी केलेल्या कुचाळकीत देवगुरु बृहस्पतीसुद्धा सामील होते. एवढेही सांगितले की राम वनात जाण्याची पक्की तयारी आज रात्रीच्या रात्रीत झाली पाहिजे. चोरी करण्याची सोईची मुख्य वेळ रात्रच. हल्ली भारतात दिवसा ढवळ्या चोऱ्या होतात ही गोष्ट कलीचा प्रभाव आहे ! **कलीचा प्रभाव पडला म्हणजे संरक्षकांच्या प्रकाशाचा अभाव होतो,** म्हणजे सूर्य असून सुद्धा रात्रच होते. राज्याभिषेक होण्यापूर्वी हे घडले पाहिजे. राज्याभिषेक सूर्य चांगला उगवल्यावरच होणार आहे. **(क) अध्यात्मपर अर्थ** - स्वराज्याभिषेक, स्वानंद-साम्राज्याभिषेकसुद्धा रात्र असेपर्यंत होऊच शकत नाही. **'ज्ञानभानुस्तमोऽपहृत्'** ज्ञानसूर्य उगवल्याशिवाय प्रत्यगात्म्याला ब्रह्मसाम्राज्याभिषेक कोण करणार? वसिष्ठांसारखे गुरु अभिषेककर्ते असले तरी सूर्योदय झाल्याशिवाय त्यांनासुद्धा काही करता येत नाही. **'गुरुविण नोहे ज्ञान ज्ञान किं होइ विराग विण'** (७।८९ रा.) **'अरुणेनेव बोधेन पूर्वसंतमसेहृते ॥ ततआविर्भवेदात्मा मेघापायेंशुमानिव** (आत्मबोध) देहात्मबुद्धिवत आत्मबुद्धि दृढ होण्यापूर्वी व्यावहारिक उपाधीत पडल्यास वैराग्याच्या अभावी ज्ञान दृढ होत नाही. 'त्यागेन एके अमृतत्त्वम् आनशुः'

(२) **अति बिपति** - म्हणण्यात हेतु आहे की रामवनवासाने अयोध्येत विपत्ति पडेल हे खरे पण आमची अति विपत्ती आहे. आम्ही चौदा महायुगे आपत्ती भोगीत आहोत. त्या मानाने १४ वर्षे विपत्तीत काढणे म्हणजे काहीच नाही. नगाऱ्याच्या आवाजापुढे टिमकीचे काय महत्त्व ! आम्ही तुझी बालके व अयोध्यावासीही तुझी बालकेच. त्यांनी इतके दिवस खूप सुख भोगले आहे व १४ वर्षानंतर तर अपार सुख भोगतील. 'सुखं हि दुःखान्यनूभूय शोभते'. त्यांनी अगदी अल्पकाळ दुःख भोगले तरी चालेल. पुष्कळांसाठी थोड्यांकडे

दुर्लक्ष करणे, मोठ्यांच्या सुखासाठी छोट्यांना दुःख भोगावयास लावणे, म्हणजेच आम्ही देव व ते मानव हा भेद लक्षात घेणे जरूर आहे.

(३) **राम राज्य त्यजुनि वनिं जाति, असें कर** - जाति = जातील. असे घडले तरच सुरकार्य होईल. राज्य त्याग करून अयोध्येतच किंवा जवळपास राहून भागणार नाही. सुरकार्य होणार नाही. त्या सरस्वतीला अगदी शब्दांनी बांधून घेत आहेत. पाठीमागून सबब सांगण्यास फट राहू नये अशी खबरदारी घेत आहेत. **अशा वेळी कार्यकर्त्याला सूचना-आज्ञा देताना किती सावध राहिले पाहिजे हे येथे दाखविले.** भरताला राज्य देतो पण रामाला वनवास कशाला? रामाने गुरुगृही रहावे, वगैरे उपसूचना निष्ठुरपणे फेटाळल्या गेल्या याचे बीज देवांच्या या प्रार्थनेत आहे. राम चित्रकूटला फार दिवस राहू नयेत म्हणून तेथे जाऊन देवांनी रडगाणे गाइलेच आहे.

हिं. *। सुनि सुर बिनय ठाढि पछिताती । भइउँ सरोज बिपिन हिमराती ॥१॥*
*। देखि देव पुनि कहहिं निहोरी । मातु तोहि नहिं थोरिउ खोरी ॥२॥*
*। बिसमय हरष रहित रघुराऊ । तुम्ह जानहु सब राम प्रभाऊ ॥३॥*
*। जीव करम बस सुख दुख भागी । जाइअ अवध देव हित लागी ॥४॥*

म. *। पस्तावत उभि बिनंति परिसुनी । हिमनिशि झाले मी सरोजवनिं ॥१॥*
*। प्रार्थिति पाहुनि देव पुन्हां ते । दोष न अल्प यांत तुज माते ! ॥२॥*
*। विस्मय हर्ष न मुळिं रघुराजा । तुज सब रामप्रभाव उमजा ॥३॥*
*। सुखदुःखें, कर्में जीवां तंव । जा कीं अयोध्ये देव-हितास्तव ॥४॥*

**अर्थ :** देवांची विनंती ऐकून शारदा उभ्यानेच पश्चात्ताप करू लागली की मी सरोवरातील कमलवनाला हिमरात्रच झाले! ॥१॥ (तिची ती दशा) पाहून देव पुन्हा प्रार्थना करतात की आई, यांत तुझ्याकडे मुळीच दोष नाही.॥२॥ रघुराज (राम) हर्षविषाद (विस्मय) रहीत आहेत. रामाचा सर्व प्रभाव तुम्ही जाणतांच.॥३॥ (बरें) जीवांना जी सुखदुःखे होतात ती तर त्यांच्या कर्मानि मिळतात; म्हणून देवांच्या हितासाठी तूं अयोध्येत जा की.॥४॥

**टीका : चौ. १ - (१) पस्तावत उभी** - देवांनी सरस्वतीचे आवाहन करून तिला बोलावली खरी, पण तिला बसण्यास आसन सुद्धा दिले नाही; ती

आल्यापासून उभीच आहे. ती आल्याबरोबर देवांनी आपले रडगाणे सुरू केले. पश्चात्ताप हा की मी आले नसते तर फार बरे झाले असते. राम प्रभूला वनात धाडणे सोपे नाही व बरेही नाही व तुमचे कार्य करीत नाही असे म्हणणेही योग्य नाही. **'कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति'** आई, माते ! म्हणून शरणे आलेल्यांचा परित्याग करणेही योग्य नाही. (क) **हिमनिशि झाल्वें मी सरोजवनिं** - अयोध्या तलाव-सरोवर-आहे. नरनारी त्यात वाढलेली कमले आहेत. रामराज्याभिषेक बंद पाडणे म्हणजे अंधारी रात्र पाडण्यासारखे असून रामचंद्रांस वनात धाडणे म्हणजे त्या रात्रीत हिमपात आहे. हिम पडले म्हणजे कमले थंडीने जळून गेल्यासारखी होतात. तशीच दशा अयोध्यावासी निष्पाप, धर्मशील, भक्तिमान लोकांची होणार ! हे करणे मला शोभण्यासारखे नाही.

**चौ. २** - (१) **पाहुनि पुन्हा प्रार्थिति** - तिची ती चिंताक्रान्त, पश्चात्तापयुक्त मुद्रा पाहून देवांना वाटले की ही नाही म्हणणार व देव कार्याचा नाश करणार; म्हणून पुन्हा प्रार्थना करू लागले. म्हणाले असतील की माते ! आम्हा बालकांच्या महान आपत्तींकडे पाहून तू एवढे कर च; आम्ही तुझे उपकार जन्मजन्मांतरी विसरणार नाही; वगैरे. (क) **दोष न अल्प यांत तुज माते** - यांत तुझ्याकडे काहीच दोष येण्यासारखा नाही. तू त्या सर्व आपत्तींची जननी आहेस असे कोणाला वाटणार नाही; कारण तू केलेस असे कोणाला समजणारच नाही. परंतु भरद्वाज, वसिष्ठ इ. ऋषींना हे समजणार आहे. **'तात ! न कैकयि दोषि, मत्त गिरा मतिस फिरवून'** (२।२०६) असे भरद्वाज भरतास म्हणाले आहेत. (ख) **पुन्हा** - पूर्वी एकदा प्रार्थना केली आहे म्हणून पुन्हा शब्द घातला. **स्वार्थी, कपटी, कुटिल, लोक आपले कार्य साधेपर्यंत नीचालासुद्धा शंभर वेळा प्रार्थना करतील !**

**चौ. ३** - (१) **विस्मय हर्ष न मुळिं रघुरावा** - तू म्हणशील की जन्मापासून परम ऐश्वर्यात व सुखात वाढलेल्या, ज्यानी दुःख कानानी सुद्धा ऐकले नाही अशा रामचंद्रांस वनांत पाठविले तर त्यांस दुःख, विषाद, कष्ट होतील व त्यांचे कारण मी ठरेन; पण रघुराऊ = रघुराव - रामचंद्र हर्ष, विषाद-रहित आहेत. त्यांना कोणत्याही गोष्टीने हर्ष होत नाही किंवा दुःख होत नाही. 'हर्ष खेद

नी ज्ञाना ज्ञानहि । जीव-धर्म मी हा अभिमानही' 'व्यापी ब्रह्म राम जग जाणे । परमानंद परेश पुराणें' (१।११६।७-८) राम जीव नाहीत म्हणून हर्षविषाद रहित आहेत. देव आपली बाजू कशी मांडीत आहेत पहा. **रामचंद्रांस स्वतःच्या आपत्तींनी विषाद होत नाही व स्वतःच्या लाभाने हर्ष होत नाही हे खरे असले तरी दुसऱ्यांच्या, भक्तांच्या दुःखाने ते दुःखी होतात हे सत्य देवांनी लपवून ठेवले. हे कुटिल स्वभावाचे लक्षणच आहे.** वनवासनिमित्ताने रामचंद्रांना दुःख, चिंता इत्यादी झाल्याची नऊ उदाहरणे मं.श्लो.२ 'मम्ले' च्या टीकेत दिली आहेत. **(क) तुज सब रामप्रभाव ठावा** - ठावा-ठाऊक (आहे). राम कर्मभोग भोगणारे जीव नसून परमात्मा आहेत. ब्रह्म आहेत हे तुला ठाऊक आहे. म्हणशील की दशरथादी कोट्यवधी सज्जनांना दुःख दिल्याचा दोष मला लागणारच तर ऐक.

**चौ. ४. (१) सुखदुःखें, कर्मे, जीवां तंव** - ते सर्व लोक सज्जन, भक्त असले तरी जीव आहेत. जीव जी सुखदुःखे भोगतात ती त्यांच्या कर्माचे फळ म्हणूनच भोगावी लागतात. त्यात दुसरा कोणी दोषी नसतो. **'जो करिं जसें तसें फळ चाखित'** (२।२१९।४). **'कोणि कुणा सुख-दुःख न दाता । निजकृत कर्मभोग ते भ्राता'** (२।९२।४) **हा विचार सुख दुःख भोगणारांनी करावयाचा असतो. दुसऱ्यांच्या दुःखांचे निमित्त बनणारांनी हा विचार करावयाचा नसतो; पण स्वार्थी, मोठे लोक आपल्याला अनुकूल तेवढेच सिद्धान्त पुढे करीत असतात.** न्यायासनासमोर वकील जशी बाजू मांडतात तसेच देव आपली स्वतःची वकिली करीत आहेत. वकील लोक सत्याचा अपलाप करण्यास, असत्य सत्य भासविण्यात, अर्धसत्य सत्य म्हणून पुढे करण्यास जरा सुद्धा कचरत नाहीत; तसेच देव या प्रसंगी करीत आहेत. ही आर्तवचने आहेत. त्यांच्याकडे अक्षरशः बघणे बरे नाही. **येन केन प्रकारेण शारदेला वश करून घेणे इतकाच यात हेतु आहे.** 'तुज सब रामप्रभाव ठावा' हे कोणालाच शक्य नाही; परंतु **स्वार्थसाधू, कपटी, कुटिल, प्रतिष्ठित समजले जाणारे, बडे अधिकारी लोक स्वतःच्या स्वार्थासाठी कोणते अकार्य करणार नाहीत?** ते अत्यंत कुरूपाला सुद्धा क्षणभर मदनाचा पुतळा म्हणण्यास मागे सरणार नाहीत; म्हणून येथे सुचवून ठेवले की अशा स्वार्थसाधू प्रतिष्ठितांच्या शब्दांना मान देताना पूर्ण विचार करावा. त्यांच्या

प्रत्येक वचनात सत्य किती व सत्याचा भास किती याची छाननी करावी. नाहीतर असले लोक पाव्हण्याच्या हातून काळा साप मारविण्यासाठीच त्याची ऐसपैस स्तुती करून त्यास हरभऱ्याच्या झाडावर चढवून, पाडण्यास व मग स्वतःच दात काढीत बसण्यास कमी करीत नाहीत. **स्वार्थसाधू, प्रतिष्ठित, व भक्तिहीन व्यक्ती खरे बोलतील असा विश्वास धरणे विघातक असते.** त्यांना एकच गोष्ट दिसत असते. 'डाव जुगाऱ्यां अपला दिसतो' तशीच एकच गोष्ट देवांना दिसत आहे व तीच कर म्हणून शारदेच्या पाया पडत आहेत. देवांच्या हितासाठी अयोध्येस जा व राम वनात जातील असे कर म्हणजे झाले.

(२) देव स्वतः जीवच आहेत; मग जो नियम अयोध्येतील लोकांसाठी त्यांना आठवला, तो त्यांनी स्वतःस का लावला नाही? आपल्या पूर्व कर्माचे फळ आपणास मिळत आहे. आपले दुःख आपणच भोगले पाहिजे, ते कमी करण्यासाठी सज्जनांस-दुसऱ्यास-दुःखाच्या वणव्यांत ढकलणे बरे नाही असा सज्जनांसारखा विचार केला असता तर काय बिघडले असते? परंतु **खोटे असलेले जे मोठे असतात त्यांच्या जवळ दोन शास्त्रे व दोन प्रकारची शस्त्रे असतात. स्वतःच्या सुखासाठी आचरण करण्याचे शास्त्र निराळे व दुसऱ्यांना उपदेश करण्याचे शास्त्र निराळे. सत्य, अहिंसा इत्यादी शस्त्रे दुसऱ्यांच्या हातात देण्यासाठी आणि स्वतःचे मुख्य शस्त्र स्वार्थ.** 'वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा' असे म्हणतात. तशीच **स्वार्थसाधू बड्यांची नीती अनेकरूप असते.** अजून शारदा हो म्हणत नाही असे पाहून आता वारंवार पायधरणी करून भीड घालतील.

हिं. *। बार बार गहि चरन सँकोची । चली बिचारि बिबुध मति पोची ॥५॥*
*। ऊँच निवास नीच करतूती । देखि न सकहिं पराइ बिभूती ॥६॥*
*। आगिल काजु बिचारि बहोरी । करिहहिं चाह कुसल कबि मोरी ॥७॥*
*। हरषि हृदयँ दसरथ पुर आई । जनु ग्रह दसा दुसह दुखदाई ॥८॥*

म. *। धृत पद कितिदां भीड घातली । 'विबुध नीचधी' गणुनि चालली ॥५॥*
*। उच्च निवास नीच कर्तूती । शकति न पाहुं पराधि विभूती ॥६॥*
*। कार्य पुढिल मग आणि मानसीं । कुशल कवी विनवितील मजसी ॥७॥*
*। दशरथ-पुरिं ये चित्तिं सहर्षा । दुःसह दुःखद जणूं ग्रहदशा ॥८॥*

**अर्थ** : (देवांनी) वारंवार - कितीदातरी - शारदेचे पाय धरले व तिला मीड घातली; (तेव्हा) विबुधांची (देवांची) बुद्धी (धी) नीच (पोची-पोचट, तुच्छ) आहे असे समजून ती निघाली.।।५।। (विचार करते की) यांचे निवासस्थान उच्च असून करणी-कृती-मात्र अगदी नीच आहे; कारण यांना दुसऱ्यांचे ऐश्वर्य-सुख-भरभराट बघवत नाही.।।६।। मग तिने पुढील कार्याचा विचार मनात आणला की कुशल कवी (यामुळे) मला विनवणी करतील.।।७।। (वाईटांतून स्वतःस हा मोठा लाभ होईल म्हणून देव कार्य करण्यास हरकत नाही) ती, हर्षित चित्ताने दशरथपुरीत जणू दुःसह दुःखद ग्रहदशाच आली.।।८।।

**टीका.** : **चौ. ५ - (१) पुनि पद किंतिदां मीड घातली** - अनेक वेळा पाय धरले, दोन वेळा विनवणी केली तरी शारदा प्रसन्न दिसेना; तेव्हा देव घाबरले; पण निराश न होतां पाया पडण्याचा व विनवण्या करण्याचा सपाटा लावला. म्हणाले असतील की मातेलाच जर आम्हा बालकांची कीव नाही आली तर आम्ही कोणाच्या तोंडाकडे पहावे? माणसांचा सुद्धा दंडक आहे की **'शरणागतास जे त्यजिति निज अनहित मानून ।। ते नर पामर पापमय हानि त्यांस देखून'** (५।४३) तूं च वाग्देवीनेच आमचा देवांचा असा त्याग करण्याचे मनात आणल्यावर आमचे कसे होणार? इत्यादी साखर पेरणी करून घातली मीड. असली स्वार्थी, खोटी, मोठी माणसे मीड घालून आपले कार्य साधण्यात चिकाटी सोडीत नाहीत. बोलण्यात फार कुशल असतात; त्यामुळे इच्छा नसली तरी समोरच्या व्यक्तीस वाटते की अशा मोठ्या लोकांना किती वेळा नाक घासायला लावायचे, जाऊ द्या; दुसऱ्यांच्या हितासाठी आपल्याला वाईटपणा येईल एवढेच ना ! तसेच येथे झाले. (क) **पोची** = पोचट, हलकट, तुच्छ, नीच. विबुध = विशेष बुध, विशेष बुद्धिमान, विशेष ज्ञानी असा शब्दार्थ आहे. अशांची बुद्धि हलकट असावी हे आश्चर्य आहे ! भाव हा की यांचे हे कृत्य 'विबुध' नावाला काळीमा लावणारे आहे. विबुध = देव 'अमरा निर्जरा देवास्त्रिदशा विबुधाः सुराः' (अमरे).

**चौ. ६ - (१) उच्च निवास नीच करतूती** - स्वर्गासारख्या उच्च स्थानी ते राहतात. जे स्थान मिळवण्यासाठी महीवरील माणसे नाना प्रकारची तपश्चर्या

व कष्ट करतात, धर्माचरण, पुण्य करतात, अहिंसा सत्यादि यमांचे पालन करतात, तीच माणसे या उच्च स्थानी आली म्हणजे कशी निर्दय, स्वार्थी, कपटी, कुटिल, विषयी बनतात हे पाहण्यासारखे आहे. "**अलुच्यीं पदीं थोरली विस्मती हा बोल आहे खरा**" निवडणुकीच्या वेळची नम्रता, धनत्याग, परोपकाराची, देशहिताची, राष्ट्रहिताची भाषा निवडून आल्यावर राहते का पहावी. मंत्री झाल्यावर आणखी बदल होतो व मुख्यमंत्री झाल्यावर तर काय सांगावे ! अर्थात् **अपवाद असतातच. भगवद्भक्त नसलेली माणसे जसजशी उच्चपदी चढतील तसतशी त्यांची मति अधिकाधिक नीच बनत जाते हे त्यांस कळत नाही व ते मान्य करणार नाहीत.** (क) **शकति न पहुं परसवि विभूती** - दुसऱ्यांचा उत्कर्ष, भरभराट सहन न होणे हे नीच बुद्धीचे लक्षण आहे. हा मानसक्षय रोग आहे. '**क्षय जळणे परसुख पाहतां**' (७।१२१।३४). मत्सर, द्वेष, लोभ, कपट, कुटिलता इ. नीच बुद्धीची लक्षणे असून हे सर्व असाध्य मानसरोग आहेत.

**चौ. ७** - (१) **कुशल कबी बिनबितील मजसी** - शारदासुद्धा अगदी निःस्वार्थी आहे असे मानण्याचे कारण नाही व स्तुतिप्रिय आहे हे येथे दाखविले. शारदा विचार करू लागली की रामवनवासाने अद्भुत रामचरित्र निर्माण होईल; त्याचे काव्यमान करण्याची इच्छा कुशल कवींना होईल; मग काव्यारंभी मला विनंती, प्रार्थना करतील, माझे स्मरण करतील; हे या वाईटातून चांगले बाहेर पडणार. यांत स्पष्ट दिसते की कविजनांच्या विनंत्या प्रार्थनांचा लोभ शारदेला हे कार्य करण्यास प्रवृत्त करीत आहे. तिला असे नाही वाटले की प्रभु वनात गेल्याने अनेकांच्या नेत्रांची सफलता होईल. अनेक जीवांचा उद्धार होईल. ऋषिमुनींच्या तपाची व ज्ञानाची सफलता होईल; अधर्म विनाश होऊन धर्मसंस्थापना होईल; अति विचित्र प्रभु चरित्र तयार होऊन त्याच्या श्रवण-कथन गानाने दीनांच्या उद्धाराचा मार्ग अगदी सोपा होईलच. 'अंतरीचें धावे स्वभावे बाहेरीं' पण वरील भाषण स्वगत आहे !

**चौ. ८** - (१) **दशरथपुरें ये चिंतिं सहर्षा** - दशरथपुर हा सामासिक शब्द भावगर्भित आहे. दशरथ राजाच्या व नगरवासी लोकांच्या प्रारब्धाने ही दुर्दैवी घटना घडत आहे. दशरथाचे ग्रह फार प्रतिकूल आहेत. (मरण किंवा घोर

विपत्ति सूचक उत्पात दशरथाने अनुभवले आहेत.) दशरथाने, तरुण असता, शब्दवेधी बाणाने निष्कारण एका तपस्व्याची चुकून हत्त्या केली व त्याच्या बापाने शाप दिला. तो शाप सत्य होण्याची वेळ जवळ आली आहे. चौघांपैकी एकही पुत्र जवळ नसेल तेव्हा पुत्र शोकाने-विरहाने-दशरथांस मरण यावयाचे असल्याने रामराज्याभिषेकाची इच्छा अशा वेळी व अशा प्रकारे झाली की, भरत-शत्रुघ्न हे दोन पुत्र अनायासेच दूर गेलेले आहेत व त्यांना आणण्याइतका वेळ नाही. राहिलेले दोघे दूर धाडून दिल्याशिवाय शाप खरा होणे शक्य नाही. राजाने केलेल्या पापाचे व पुण्याचेही भागीदार प्रजाजन असतातच; म्हणून **दशरथ व त्यांचे पुर अयोध्या यांच्या प्रारब्धाच्या प्रेरणेने शारदा अयोध्येत आली.** (क) राम राजा झाल्याशिवाय 'रामपुर' म्हणता येत नाही व त्यांच्या प्रभावाचे पूर्ण फळ प्रजेला मिळणे शक्य नाही. राम राजा झाले असते तर हे काही शारदेला करताच आले नसते. मंथरा व कैकयी यांचा बुद्धिभेद झाला नसता, हे जाणूनच देवानी इतकी घाई केली व शारदा स्वर्गातून परभारे आली.

(२) **बिबिं सहर्षा** - हर्ष का झाला याचे कारण वरच्या चौपाईच्या टीकेत आधीच दिले आहे. कुशल कवी प्रार्थना करतील स्वतःचे महत्त्व, प्रतिष्ठा भविष्य काळी वाढेल हे जाणून हर्ष झाला. (क) **दुःसह दुःखद जणूं ग्रहदशा'** - दुःसह दुःख देणारी ग्रहदशाच जणू दशरथ पुरीत आली. ग्रहदशा आलेली डोळ्यांनी दिसत नाही; तशीच शारदा अदृश्य रूपाने आली. दशरथपुर व ग्रहदशा यांचा उल्लेख एकत्र करून सुचविले की दशरथाची ग्रहदशा आली. रामाच्या ग्रहदशेचा संबंध सुचवावयाचा असता तर रामपुरी आली असे म्हटले असते. ज्याची ग्रहदशा प्रतिकूल असेल त्याला दुःखाचा मुख्य वाटा उचलावा लागतो व त्याच्या संसर्गाने त्या मानाने कमी असे दुःख इतरांस भोगावे लागते. राम स्वतःच्या दुःखाने दुःखी होत नाहीत हे 'न मम्ले वनवास दुःखतः' असे मंगलाचरणांतही सांगितले आहे. हर्ष विषादरहित रघुराव आहेत असे देवांनीही सांगितले आहे. पुढे कौसल्याही भरतास सांगणार आहे. (दो. १६५) वनगमनामुळे उलट रामचंद्रांस हर्षच झाला आहे. (दो. ५१). आता ही ग्रहदशा काय करते पहा -

हिं.दो. *। नामु मंथरा मंदमति चेरी कैकइ केरि ॥*
*। अजस पेटारी ताहि करि गई गिरा मति फेरि ॥१२॥*

म.दो. *। कैकयि-दासी मंदधी नाम मंथरा जीस ॥*
*। अयश-पेटि तिज करि गिरा फिरवुनि जाइ मतीस ॥१२॥*

**अर्थ :** मंथरा नावाची कैकयीची एक मंदबुद्धी दासी आहे. तिला अपयशाची पेटी बनवून गिरा (शारदा) बुद्धि फिरवून गेली. ॥दो.१२॥

**टीका : (१) मंथरा** - हे नाव सार्थ आहे. चालताना पायांना क्लेश होत असल्याने मंद मंद चालणारा = मन्थर. मन्थं राति, किंवा मन्थति पादौ - ताक करण्याच्या रवीप्रमाणे घुसळीत पाय टाकून चालणारा = मन्थर. मथि हिंसा संक्लेशनयोः (अ.व्या.सु.) मन्थर :... पृथौ वक्रेऽभिधेयवत् (मेदिनी) मन्थर शब्द विशेषणासारखा वापरतात. मन्थर = वक्र, वाकडा, कुटिल. 'मन्दगामी तु मन्थरः' (अमरे) हे सर्व अर्थ व शब्द मंथरेला वापरलेले पुढे दिसतील. पेटारी - पेटिका, पेटी = साठवून ठेवण्याचे साधन. **(क) अयश पेटि तिय गिरा करि** - पेटीत जिन्नस जसे गुप्त ठेवावे तसे अपयश तिच्यात भरून ठेवले. तिला अपयशपात्र केली. कोणी कारणावाचून अपयशपात्र बनत नाही. कारण दिसतेच असे नाही; पण कारणावाचून कार्य घडत नाही. अपयशाचे कारण पाप असते. **'अपयशलाभ किं जेवें पाप न'** (७।११२।७) मन्थरा व कैकयी यांनी कोणते पाप केले होते हे कळणे जरूर आहे. पाप या जन्मांतले असेल किंवा पूर्व जन्मातले असेल; पण पापाशिवाय अपयश मिळत नाही, अकीर्ती होत नाही.

## (२) मन्थरा

**'ज्ञातिदासी यतोजाता कैकेय्यास्तु सहोषिता** (वा.रा. २।७।१) ज्ञातिदासी = मातृगृह दासी, यतोजाता - अविज्ञात मातापितृका - जिची आई कोण व बाप कोण हे कोणासच माहीत नाही अशी. जन्मल्या बरोबर जी मुले गटारात किंवा रस्त्यात टाकलेली जिवंत सापडतात त्यांचे आई-बाप कोण हे कसे कळणार? अशीच ही मंथरा होती. प.पु. उल्लेख आहे की **'मंथरानाम कार्यार्थमप्सराः**

**प्रेषिता सुरैः ॥ दासी कथन कैकेयै दत्ता केकयभूभृता ॥** देवांनी आपल्या कार्यासाठी पाठविलेली एक अप्सरा केकय राजाने कैकयीच्या बरोबर तिची दासी म्हणून दिली होती. (क) पूर्व जन्मांत ही प्रल्हादपुत्र विरोचनाची कन्या होती. हिने दैत्यांना साह्य केले तेव्हा देवांनी इन्द्राला विनंती केली की हिला ठार मारावी; पण स्त्री वध करण्यास इन्द्र तयार झाला नाही. देव विष्णूकडे गेले तेव्हा विष्णूने इन्द्रास सांगितले की **'आततायिनमायान्तं हन्यादेवाऽविचारयन्'** आततायीचा वध करण्यात कोण काय याचा विचार करू नये; तेव्हा इंद्राने तिच्यावर वज्रप्रहार केला. वज्र लागून ती पडली. कुबड निघाले. पाचांनीही कुबडी झाली व विष्णूला व दैत्यांना शिव्या देत, मी तुमचा सूड घेईन वगैरे म्हणत ती मेली. ती जन्मास आली ती 'यतोजाता' व केकय राजाच्या घरी दासी म्हणून होती. (वा.रा. २।७।१). ती कैकयीच्या बरोबर अयोध्येत आली. पूर्व जन्मातील वैर भावनेने तिला इकडे आणली व आततायी कृत्ये करून पूर्व जन्मात जे पाप केले होते त्या पापामुळे आता ती अपयशाची पेटी बनली. (मा.पी.मधून) **मन्थरा = मळमळ करणारी** हे नाव सार्थ झालेले स्पष्ट दिसेल. सर्व दुःखांचे मूळ मंथरा आहे हे अयोध्येत कोणालाही कळले नाही. पेटीत ठेवलेली वस्तू बाहेर दिसत नाही तसेच त्या वेळी घडले; पण नंतर सर्वदर्शी, सर्वज्ञ कवींना खरे कारण कळले.

### (३) कैकयीच्याच नावाला कलंक का लागला?

**कैकयी कुमारिका असता तिने केलेले पाप व त्याने मिळालेला शाप हेच कारण** आहे. विवाहाच्या पूर्वीची सहज घटना आहे. तिला लहानपणापासूनच आपल्या सौंदर्याचा गर्व होता. एके दिवशी ती गच्चीवर उभी असता एक अत्यंत कुरूप ब्राह्मण राजद्वारातून राजवाड्यात शिरताना तिला दिसला; व तिला किळस आला. राजाने त्याचा आदर सत्कार करून त्याला राजवाड्यातच जागा दिली. तो ब्राह्मण ध्यानस्थ असता कैकयीने आपल्या डाव्या हाताने त्याच्या तोंडाला काजळ फासले. ते तेव्हा ब्राह्मणाला कळले नाही. नंतर आचमन वगैरे करताना तोंडाला हात लागला तो हाताला कालिमा लागलेली दिसली. आरशात पाहता

तोंडालाच काजळ फासलेले दिसले. तेव्हा त्याने शाप दिला की ज्या कोणी माझ्या तोंडाला काजळ फासले त्या व्यक्तीच्या नावाला कारण नसता काळीमा लागेल. हे कैकयीला किंवा कोणालाच कळले नाही. पुढे कैकयीने मातेच्या आज्ञेने त्या ब्राह्मणास पूजासाहित्याने भरलेले ताट आणून दिले. तेव्हा त्याने आशिर्वाद दिला की, तुझा हा (उजवा) हात वज्रापेक्षाही कठीण होईल. या आशीर्वादाचे फळ म्हणजे रथाच्या आसाच्या जागी उजवा हात घातला तरी तो मोडला नाही. त्याचे फळ दशरथाने दोन वर माग म्हणून सांगितले. तो शाप व ते दोन वरच तिच्या तोंडाला अपकीर्तीचे काजळ फासण्यास आता कारण होणार आहेत. **अशीच कथा रामविजयात आहे.**

(४) मंथरा व कैकयी एकाच कार्यामुळे अकीर्ति पात्र बनणार असल्याने त्यांचा असा संबंध लहानपणापासून जुळला. मंथरा पूर्व पापाने व वैरभावनेमुळे कैकयीची प्रिय दासी सहज झाली; व तिच्या बरोबर अयोध्येत पाठविली गेली. समान संस्कार, समान कार्य घडविण्यासाठी त्या त्या व्यक्तींना न कळत एकत्र कसे आणतात हे यावरून दिसेल. **'पूर्वजन्मसंस्कार' प्र.प्र. ११।२ पहा.** पाप संस्कारांचा परिणाम जसा होतो तसा पुण्यसंस्कारांचाही होतो. थट्टेने केलेल्या चेष्टेचा परिणाम किती भयंकर होतो व कल्पान्तापर्यंत अपकीर्ती कशी होते हे कैकयीच्या चरित्रावरून सहज कळते.

(क) अवतार नाटकांतसुद्धा एखाद्या व्यक्तीला अकीर्तिभाजन बनणाऱ्या पात्राचे काम का करावे लागते यालासुद्धा पूर्वीची किंवा पूर्व जन्मांतली कारणे असतात; असे न झाले तर परमेश्वराकडे वैषम्य व नैर्घृण्य (निर्दयता) दोष येतील; परंतु कारणाशिवाय कार्य घडत नाही हा अबाधित सिद्धान्त आहे.

(५) गिरा - शारदा; ही ब्रह्मदेवाची शक्ती आहे. ब्रह्मदेव बुद्धीची देवता आहे. गिरेने - शारदेने - मंथरेच्या बुद्धीत असलेले पूर्व जन्मातील वैरभावाचे संस्कार जागृत केले. गिराशब्दाने सुचविले की मंथरा आपल्या गिरेच्या-वाणीच्या-सामर्थ्याने, कैकयीच्या पापाचे फळ-अकीर्ति पदरात घेण्यास तिला प्रवृत्त करणार; व पूर्व जन्मात मरताना जी वाणी उच्चारली होती ती भगवंताच्या बाबतीत खरी करून दाखविल. पुढे शत्रुघ्नासारख्या परम

भागवतभक्ताचा चरणस्पर्श झाला म्हणजे पापमुक्त होईल व कृष्णावतारात पुन्हा कुबडी-कुब्जा-बनून भक्त बनेल. पूर्व जन्मात दुष्ट-दैत्य स्वभावाची या जन्मात कुलशीलहीन कुटुंब दासी, शरीराने वक्रा तशी हृदयाने वक्रा असा तिचा अधिकार जाणूनच शारदेने तिला हाताशी धरली. बुद्धि फिरल्याचा तत्काळ परिणाम पहा -

हिं. *। दीख मंथरा नगरु बनावा । मंजुल मंगल बाज बधावा ॥१॥*
*। पूछेसि लोगन्ह काह उछाहू । राम तिलक सुनि भा उर दाहू ॥२॥*
*। करइ बिचारु कुबुद्धि कुजाती । होइ अकाजु कवनि बिधि राती ॥३॥*
*। देखि लागि मधु कुटिल किराती । जिमि गवँ तकइ लेउँ केहि भाँती ॥४॥*

म. *। शृंगारित पुर बघत मंथरा । मंजुल मंगल उत्सव-गजरा ॥१॥*
*। पुसे जनां कीं उत्सव कसला । राम-तिलक ऐकुनि उर जळला ॥२॥*
*। कुमति कुजाति विचारा ती करि । रात्रिंच होइ अकार्य कशापरिं ॥३॥*
*। पाहुनि पोळें किराति कुटिला । कसें मिळे कीं चिंति युक्तिला ॥४॥*

**अर्थ :** मंथरा दासीने सहज पाहिले तो सर्व नगर शृंगारलेले दिसले व जिकडे तिकडे मंगलोत्सवांचा मंजुळ गजर ऐकू आला.॥१॥ तिने लोकांना विचारले की कसला उत्सव आहे? रामराज्याभिषेक होणार आहे असे ऐकताच तिच्या छातीत आग पेटली.॥२॥ ती दुर्बुद्धि व नीच जातीची दासी विचार करू लागली की आज रात्रीच्या रात्री या कार्याचे बारा कसे वाजवावे बरे?॥३॥ एखादी कुटिल किराती-भिल्लीण-मधाचे (मोठे) पोळे-मोहोळ लागलेले पाहून विचार करते की हे पदरात पाडून घेण्यास काय युक्ती करावी बरं? (तशी मंथरा विचार करू लागली).॥४॥

**टीका : चौ. १ - (१) शृंगारित पुर बघत मंथरा** - शारदा बुद्धिभेद करून गेल्याबरोबर मंथरा सहज त्या राजवाड्याच्या गच्चीवर चढली तो तिला सर्व नगरी शृंगारलेली दिसली. **'प्रासादं चंद्रसंकाशं आरुरोह यदृच्छया** (वा. रा. २।७।१) **'सापि कुब्जा त्रिवक्राऽपि प्रासादाग्रमथारुहत् ॥ नगरं परितोदृष्ट्वा सर्वतः समलंकृतम्'** (अ.रा. २।२।४७) (क) नगरी चहूकडे कशी शृंगारली आहे व घरोघर मंगलोत्सव वाद्ये वाजत आहेत याचे वर्णन पूर्वी केले आहे.

**चौ. २-(१) पुसे जनां कीं उत्सव कसला** - एकाएकी नगर शृंगारलेले पाहून व उत्सव वाद्ये सर्व नगरांत जिकडे तिकडे वाजत असलेली ऐकून, एवढा मोठा उत्सव कसला अशी जिज्ञासा उत्पन्न झाली व जे कोणी दिसतील त्यांना सहज विचारले; हे अगदी स्वाभाविकपणे घडले. रामचंद्रांच्या धात्रीला विचारले असे वा. रा. आहे; पण येथे 'लोगन्ह' लोकांना असा स्पष्ट उल्लेख असल्याने तो अर्थ घेता येत नाही. नीच दासी असल्याने पुरुषांस विचारण्यास लाजली नाही.

**(क) रामतिलक ऐकुनि उर जळला** - उद्या सकाळी रामाला राज्याभिषेक होणार इतके कानी पडताच मंथरेच्या आत आग पेटली. सर्व नरनारींनी हा समाचार ऐकला तेव्हा त्यांना हर्ष झाला. परंतु हिला अत्यंत संताप आला. पूर्वजन्मातील वैरभावना जागृत झाल्याने पूर्वाजन्मस्मृती नसता व राम भगवान आहेत हे माहीत नसतानाही राम तिला वैरी वाटू लागले. वैऱ्याचे कल्याण, उत्कर्ष, भरभराट होणार, अधिकार प्रतिष्ठा वाढणार व आपल्याला त्याच्या सत्तेखाली रहावे लागणार हे भविष्य पुढे उभे राहिले; हे वैरबुद्धीला कसे सहन होणार? मंथरेला पूर्वी मंदधी-मंदमती म्हटले आहे. ऋण, हत्या व वैरभावना जन्मजन्मांतरांत पिशाच योनीतसुद्धा, अज्ञानी जीवाच्या बरोबरच जन्माला येतात. पण अनुकूल परिस्थिती प्राप्त होईपर्यंत त्यांचे कार्य दिसून येत नाही. या तीन गोष्टींचा बदला घेण्यासाठी कित्येक जीव तर पिशाच योनीत जन्मून सूड घेण्यासाठी एक जन्म नव्हे तर त्या व्यक्तीच्या अनेक जन्मांत छळ करतात.

**चौ. ३. (१) कुमति कुजाति विचारा ती करि... कशापरिं** - तत्काळ विचार सुरू झाला की उत्सव बंद पाडून राज्याभिषेकात विघ्न करणे आपले कर्तव्य आहे. आधीच मंदमति त्यात जन्म अत्यंत नीच प्रकारे झालेला (कुजाति) त्यात सरस्वतीने बुद्धि फिरविलेली, मग काय विचारावे, कुमति उत्पन्न झाली. दुर्बुद्धीचे कार्यच आहे की मित्र शत्रू वाटतात व शत्रू मित्र वाटतात; हित अहित वाटते व अहित हित वाटते. **'तव ह्रदिं कुमति वसे उलटी तरि । अहितांहित मानितां मित्र अरि'** (५|४०|७) कुमति = कुबुद्धि, दुर्बुद्धि, उत्पन्न झाली की चांगले, कल्याण करणारे असते तितके वाईट व अकल्याण करणारे वाटू लागते; हे तमोगुणाचे लक्षण आहे. 'अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसाऽऽवृता

॥ सर्वार्थान् विपरितांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी' (भ. गी.) (क) **'पादौ गृहीत्वा रामेण कर्षिता सापराधतः तेन वैरेण सा रामं वनवासं च कांक्षति'** (अ. पु. ६।८) तिने केलेल्या अपराधामुळे रामचंद्रांनी एकदा तिच्या तंगड्या धरून तिला फरपटत ओढली होती; त्या पूर्व वैरामुळे ती रामाला वनवास देऊ इच्छित आहे. (ही दंतकथा माहीत होती पण आधार मिळाला नव्हता. तो पाठीमागून अग्निपुराणात मिळाला). (ख) **कुजाति - 'मणिगण सुजाति पुरनारीनर । सकल सुचि अमोल सुंदर'** नगरलोक सुजातिचे आहेत तर ही कुजातीची आहे. जाति = जन्म. लोक सुंदर शुचि = सुमती आहेत, तर ही कुमति, मंथरा तीन ठिकाणी वाकलेली, कुरूप आहे. लोक अमूल्य भक्तिमणी आहेत तर ही नीच कुटिल दासी आहे. सार हे की नगरातील लोकांच्या उलट हिची प्रत्येक गोष्ट आहे. त्यामुळेच लोकांना जे परम सुख वाटत आहे, परम मंगलकारक, जीवन सफलता करणारे वाटत आहे, तेच हिला तापदायक, अमंगल वाटू लागले आहे व ते घडू न देण्यातच जन्माची सफलता वाटत आहे. 'विनाशकाले विपरीत बुद्धिः' ती ही अशीच.

(२) **रातिंच होइ अकाजु कवनपरि** - अकार्य - विरुद्ध कार्य - आज रात्रीच्या रात्रीच झाले पाहिजे असे मनाशी ठरविले; कारण उद्या सूर्योदयानंतर राज्याभिषेक होणार आहे हे लोकांकडून कळले आहे. पण स्वतःच्या हाती सत्ता मुळीच नाही, सर्व लोक हिच्या मताच्या अगदी विरुद्ध. नगरातील नरनारींजवळ एक चकार शब्द उलट उच्चारणे अशक्य आहे हे सर्व माहीत आहे; पण ती निराश झाली नाही. विचार करू लागली.

चौ. ४ - (१) **किराति पोळें पाहुनि** - पोळे = मधाचे मोहोळ, एखाद्या किरातीला, भिल्लीणीला दिसले की तिच्या तोंडाला पाणी सुटते. येथे आग्या मधमाशांचे मोहोळ समजणे योग्य आहे. हा दृष्टान्त अत्यंत समर्पक आहे; पण हे पोळे किती अडचणीच्या जागी असते, कसे केव्हा काढतात, काढताना साधने काय लागतात, किती सावध असावे लागते हे सर्व तंत्र ज्याला इत्थंभूत माहीत असेल तोच हा दृष्टान्त निर्दोषरित्या वापरू शकेल. या वरून दिसते की गोस्वामींची व्यवहाराशी फारकत झाली नव्हती व ते उत्तम सृष्टि निरीक्षक

होते. (क) **अयोध्या हे वन** - अरण्य आहे. भिल्लीणी वनात सहज हिंडत असता त्यांच्या एखादे फार मोठे मोहोळ दृष्टीस पडते. रामराज्याभिषेक पोळे आहे. दशरथ राजा व नगर नारीनर यांच्या मनोरथ-सुरतरूंच्या फुलांत रामराज्याभिषेकानंदरूपी मध उत्पन्न झाला आहे. राजमहाल व राजा हे अगम्य स्थान आहे, जेथे हे मोहोळ लागले आहे. दशरथ, कौसल्या व पुरनरनारी या आग्या मधमाशांनी ते व्यापले आहे. या मधमाशांना विरुद्ध शब्दरूपी नुसती वाऱ्याची झुळुक लागली तरी त्या या कुबडी भिल्लीणीवर तुटून पडतील. या माशा चिडल्या म्हणजे फार भयंकर खुनशी असतात. कित्येक मैलपर्यंत पाठलाग करतात; पाण्यात शिरल्यावर सुद्धा त्या पिच्छा सोडित नाहीत. डोक्याला डसतात. त्या डसल्या म्हणजे त्यांच्या विषारी नांग्या माणसाच्या अंगांत मोडून राहतात. पुष्कळ माशा चावल्या तर मनुष्य मरतोसुद्धा; हे फार मोठे पोळे काढावयाचे म्हणजे मोठे जीवावरचे काम असते. माशांनी कष्टाने साठवून, जपून ठेवलेला मध अन्यायाने, फसवून, चोरून त्यांच्या तोंडाशी आलेला काढून घ्यावयाचा असतो. हे काम रात्रीच अगदी चाहूल न लागू देता करावे लागते; कारण रात्री या माशांना तितके चांगले दिसत नाही. हे मोहोळ डोंगराच्या अति उंच कपारीला, जेथे मनुष्य सहसा जाऊ शकत नाही, फार वारा लागत नाही अशा अती दुर्गम आणि एकांत ठिकाणी असते. रामराज्याभिषेक मोहोळ कौसल्येच्या अंतःपुरात तयार झाले; असे या कुबडी भिल्लीणीला वाटत आहे. तेथे रात्री प्रवेश करून कार्य साधणे अशक्य, अति दुर्गम वाटत आहे. पण भिल्लीणी मोठ्या युक्तिबाज व साहसी, कुटील, क्रूर असतात. त्या मोहोळ लागलेल्या कड्याच्या वरच्या बाजूस वाढलेल्या मोठ्या वृक्षाचा आश्रय घेऊन वर चढतात. त्याला भली भक्कम झोल्यासारखी दोरी बांधतात; त्यावर एखाद्या धीट पुरुषाला बसवून तो झोला खाली सोडतात; तो मोहोळाच्या समोर आला की त्या माणसाच्या-पुरुषाच्या हातून एका लांब काठीला बांधलेल्या विळ्याने ते मोहोळ कापवितात. खाली घोंगड्या पसरलेल्या असतात त्यावर ते पडते. राज्याभिषेक-समाचार कैकयीला कळू न देणे (न कळणे) हा कड्यावरील वृक्ष या भिल्लीणीला चांगला आधार सापडला. कैकयीचा भोळी बुद्धीरूपी भक्कम

दोरीचा झोला करून ती या वृक्षाला बांधील. सवती मत्सर रूपी किराताला त्यावर बसवील. क्रोधाचे सोंगरूपी कळक त्या मत्सर किराताला हाती धरण्यास सांगेल; दोन वरांचे अभिवचन राजाकडून घेणे हा दुधारी विळा त्याच्या हातात देईल. राजाकडून रामशपथ घेवविणे म्हणजे विळा त्या कळकाला घट्ट बांधणे; आणि मग दोन वर (भरताला राज्य व रामाला वनवास) मागणे म्हणजे त्या दुधारी विळ्याने हे मोहोळ कापून पाडणे असा ठाम विचार तिने केला. **'कृशतनु दुःखी उदास वदनें । जणूं विकल माशा मध-हरणें'** (२।७६।४) असे अयोध्यावासी लोक नंतर झाले आहेतच. जो मध कौसल्या व सर्व प्रजाजनांच्या मुखांत जाणार होता तो काढून घेऊन कैकयीच्या हाती देऊन तिच्यामुळे आपणही यथेच्छ भोगावा ही या भिल्लीणीची लालसा आहे. ठाणे जिल्ह्यातील वैतरणा नदीच्या उंच खडकाळ कपारीला लागलेली फार विशाल, २/३ हांडे मध निघेल एवढी मोहोळं पायी प्रवासात १९३२ च्या पूर्वी इगतपुरीहून खंडाळ्यास जाताना दृष्टीस पडली तेव्हा त्या वनातील भिल्ल, कोळी यांना विचारता मोहोळ काढण्याची इत्यंभूत माहिती मिळाली होती; म्हणून अशा प्रकारे या रूपकाचा सांगोपांग विस्तार करणे शक्य झाले.

**पाहुनि पोळें किराति कुटिला । कसें मिळे कीं चिंति युक्तिला ॥**

| मधाचे मोहोळ काढणे | क्रम | रामराज्य रसभंग करणे |
|---|---|---|
| भिल्लीण | १ | कुबडी दासी |
| वन | २ | अयोध्या |
| दुर्गम स्थान | ३ | राजवाडा, राजा |
| मोहोळ | ४ | राम राज्याभिषेक |
| मधमाशा | ५ | दशरथ-कौसल्या व पुर नरनारी इत्यादी. |
| मध | ६ | अभिषेकोत्सव - आनंद - मनोरथ |

| | | |
|---|---|---|
| कपारीवरील जवळचे झाड | ७ | कैकयीला अभिषेक समाचार कोणी न सांगणे |
| दोरी वा झोला | ८ | कैकयीची भोळी बुद्धि |
| झोल्यावर बसणारा किरात | ९ | सवती मत्सर |
| कळकाची काठी | १० | (कैकयीने क्रोधाचे सोंग घेणे) क्रोध |
| दुधारी विळा | ११ | दोन वरांचे अभिवचन राजाजवळून घेणे |
| विळा काठीला घट्ट बांधणे | १२ | राजाकडून रामशपथ घेवविणे |
| बाहेरची बोथट धार (विळ्याची) | १३ | भरताला राज्य हा वर मागणे |
| आंतल्या तीक्ष्ण धारेने मोहोळ कापणे | १४ | राम वनवास वर मागणे |
| रात्री काढतात | १५ | रात्रीतच अकार्य साधावयाचे आहे. |

मोहोळ काढताना विळा वापरतात त्याला आतल्या बाजूनेच तीक्ष्ण धार असते; पण येथे एक फार दुःखद न वाटणारा व दुसरा अगदी व्याकुळ करणारा वर मागावयाचा असल्याने दुधारी विळा मानावा लागला. आता ही भिल्लीण कार्याला सुरुवात करील.

हिं. *। भरत मातु पहिं गइ बिलखानी । का अनमनि हसि कह हँसि रानी ॥५॥*
*। उतरु देइ न लेइ उसासू । नारि चरित करि ढारइ आँसू ॥६॥*
*। हँसि कह रानि गालु बड़ तोरें । दीन्ह लखन सिख अस मन मोरें ॥७॥*
*। तबहुँ न बोल चेरि बड़ि पापिनि । छाड़इ स्वास कारि जनु साँपिनि ॥८॥*

म. *। भरतजननि-पाशीं उदास गत । राणी हसत म्हणे कां दुश्चित ॥५॥*
*। देइ न उत्तर घेइ उसासू । नारिचरित करि ढाळी आंसू ॥६॥*
*। राणि हसे किं लांब तव जिभली । गमे लक्ष्मणें शिक्षा दिधली ॥७॥*
*। तरि न वदे दासी अति पापिण । श्वास सोडि जणुं काळी सापिण ॥८॥*

**अर्थ :** (मग कुबडी) उदास होऊन भरताच्या आईकडे गेली; तेव्हा राणी हसून म्हणाली की तू अशी दुश्चित-उदास (चिंतातुर) का आहेस? (हसि = असि, हँसि = हसून) ॥५॥ परंतु ती काही उत्तर देईना, दीर्घ श्वास घेऊ लागली व नारीचरित्र करीत अश्रू ढाळू लागली.॥६॥ (तेव्हा) राणी हसत हसत म्हणाली की, तुझी जिभली (जीभ) लांब आहे, म्हणून मला वाटते की लक्ष्मणाने तुला शिक्षा केली असावी.॥७॥ तरीसुद्धा ती दासी, महा पापिण, काही बोलेना; व जणू काळ्या सापिणी (नागिणी) सारखी (जोराने) श्वास सोडू लागली.॥८॥

**टीका :** येथून पुढे कुटील, कुमती, कुजाती, दुष्ट स्वभावाच्या, नीच स्त्रीचरित्राचे चित्र फारच अनुपम असे रंगविले आहे. **मंथरेने कैकयीचा बुद्धिभेद केल्याचे वर्णन सर्वच रामायणात असले तरी अशा स्त्रियांच्या चरित्राचे इतके सुंदर स्वभाव चित्रण इतर कोणत्याही ग्रंथात नाही.**

**चौ. ५. (१) भरत जननिपासीं उदास गत** - हृदयात वैराची आग पेटलेली आहे व रामवैर साधणे आहे त्याच्या तोंडावर प्रथम क्रोधाचा विकार दिसला पाहिजे; पण क्रोध, द्वेष, सूड हे जागृत झालेले भाव दाबून ठेवून शोकाचे-विषादाचे-चित्र मुखावर काढून कुबडी भरत जननीकडे गेली. हेतु हा की अशी खिन्न, चिंतातुर, उदास पाहिली की भोळी कैकयी तिच्या प्रेमळ स्वभावानुसार विचारणारच. त्याचे उत्तर बराच वेळ न देता, दुःखी, शोकाकुल माणसाला, काय झाले असे कोणी प्रेमाने विचारल्यावर त्याला शोकाचा उमाळा येतो व तो हुंदके देऊ लागतो. तसे केले म्हणजे पुन्हा कारण विचारणार; त्यावर सुद्धा उत्तर न देता अधिक व्याकुळता आली म्हणजे राणीला काहीतरी अकुशलची शंका येणार व ती सर्वांचे कुशल विचारणार; तसे झाले म्हणजे भरताच्या नावाने द्वेष मत्सराचे बीज पेरण्यास हृदयभूमी नांगरता येईल असे तिने मनात ठरविले. या चार चौपायांत येथपर्यंतची तिच्या हेतूंची कल्पना दिसते.

(२) **भरतजननि (भरत मातु)** म्हणण्याने सुचविले की भरताचे हित हे निमित्त करून ही दासी आपला डाव साधणार. तिचे तोंड उतरलेले, खिन्न, चिंतातूर पाहतांच तिच्या अपेक्षेप्रमाणे प्रेमळ व हास्यविनोदप्रिय भोळ्या कैकयीने

कारण विचारलेच. त्या बरोबर हिला जणू काय शोकाचा उमाळा आला आणि लागली दीर्घ श्वास घ्यायला.

**चौ. ६. (१) नारिचरित करि** - याने सुचविले की कुबडी हे सगळे जाणून बुजून भरतमातेला आपल्या जाळ्यात पकडण्यासाठी करीत आहे. अशा व्यक्तींना व विशेष करून अशा स्त्रियांना शोकाचे नक्राश्रू तेव्हाच आणता येतात. (क) मागल्या व पुढल्या चौपाईतील कैकयीच्या हास्यावरून ठरते की असल्या कुलहीन, कुजाती, कुरूप, मंदमती दासीशी हास्य, विनोद, थट्टा करण्याची संवय कैकयीला होती. मोठ्या कुळातील, श्रीमंत घराण्यातील, स्त्रियांत हा एक दोष पुष्कळ वेळा पाहण्यास सापडतो की असल्या नीच दासींशी, सेवकांशी त्यांची विशेष सलगी असते. हा दोष पुष्कळ वेळा कुळाला आग लावण्यास व कलहाचे बीज पेरण्यास पोषक ठरतो.

**चौ. ७ (१) लांब तब जिभली** - तुला तोंडाळपणा करण्याची व व्यर्थ तोरा मिरवण्याची सवय आहे. तिला दुःखाने अश्रू ढाळताना पाहून राणीला वाटले की ही कोणाला तरी टाकून बोलली असेल व लक्ष्मणाने तिला शिक्षा केली असेल. हिच्यावर चांगला रागावला असेल. (क) या चौपाईवरून ही एक गोष्ट सिद्ध होते की **कुबडी तोंडाळ आहे हे कैकयीला माहीत आहे**. ती कोणाचाही विनाकारण अपमान करते ही खात्री आहे. असे माहीत असून स्वतः फार सुंदर असून फार कुरूप असलेल्या फटकळ तोंडाच्या, मर्यादाहीन वागणाऱ्या अशा दासीला जवळ बाळगली व मुख्य दासी केली ती केवळ माहेरच्या प्रेमामुळे ! (ख) दशरथ-राजनीति निपुण धर्मशील असून त्यानी तिला राहू दिली यावरून ठरते की **कैकयीचे मन दुखविण्याचे धैर्य महाराजांच्या ठिकाणी नाही.** दशरथांसारख्याला कुबडीच्या स्वभावातील महादोष न कळणे अशक्य आहे. **(ग) तिसरी गोष्ट ही की दासदासी, सेवक इत्यादींपैकी कोणी अन्याय, अपराध केल्यास त्यांना योग्य शासन फक्त लक्ष्मणच करीत असतात.** हा लक्ष्मणाचा स्वभाव धनुर्मख मंडपात जनक व भृगुपती यांच्या विषयीसुद्धा सडेतोड बोलण्याने व्यक्त झालाच आहे.

**चौ. ८. (१) तरि न बदे दासी अति पापिण** - एवढे विचारले तरी कुबडी

बोलत नाही, म्हणून कवि तिला पापीण म्हणाले. कैकयीला फासात अडकवण्यासाठी, तिला चिंतेत पाडण्याच्या पापबुद्धीने बोलत नाही व शोकाचे नाटक करीत आहे रामाला वनवासात पाठविण्यासाठी म्हणून पापीण ठरतेच. लक्ष्मणाने शिक्षा केली का? या प्रश्नाचे उत्तर न देता ती जोराने श्वास सोडू लागली. यावरून राणीला वाटणे साहजिकच आहे की लक्ष्मणाने शिक्षा केली हे कारण एवढ्या शोकास व न बोलण्यास पुरेसे नाही. मला दुःखद वाटणारी काहीतरी गोष्ट घडली असावी; पण मला सांगण्याचे धैर्य हिला भीतीने होत नाही. त्यामुळे अशी शोकाकुल झाली आहे. भोळ्या, प्रेमळ, भावनाप्रधान खुशालचंद माणसाच्या भावना बदलून त्याच्या ठिकाणी आपल्याला पाहिजे ती भावना, तो मनोविकार उत्पन्न करण्यासाठी अशा नीच, कपटी स्त्रिया नारीचरित्र नाटक कसे करतात याचा पहिला नमुना - श्रीगणेशा येथे दाखविला. (क) **कालि जनुं सापिण** - हे म्हणण्यात भाव हा की हे या कुबडीचे शोकाचे सुसकारे नसून मनात क्षुब्ध झालेल्या कृष्णसर्पिणीचे विषारी फूत्कार आहेत हे भाबड्या कैकयीला अजून कळले नाही. कृष्णसर्प इतर नागांपेक्षा अधिक दुष्ट व खुनशी असतो. पण कृष्णसर्पीण त्याच्यापेक्षाही भयंकर असते. तिला सहज कोणाचा ढका लागला तरी ती क्रुद्ध होऊन फूत्कारू लागते व मर्मी दंश करण्याची संधी पहात असते. येथे उत्प्रेक्षा करण्याचे कारण हेच की सापीण ज्याला चावेल तोच मरतो पण ही चावणार कैकयीच्या कानाला व मरणार दशरथ राजा; आणि क्लेशांच्या लहरी सोसाव्या लागणार सर्व प्रजेला १४ वर्षे! 'सर्पः क्रूरः खलः क्रूरः सर्पात् क्रूरतरः खलः अन्यस्य दशति श्रोत्रं अन्यः प्राणैर्विमुज्यते' (सु.र.) हे खल सर्पाचे वैशिष्ट्य आहे.

*हिं. दो. । सभय रानि कह कहसि किन कुसल रामु महिपालु ।*
*॥ लखनु भरतु रिपुदमनु सुनि भा कुबरी उर सालु ॥१३॥*

*म. दो. । सभय पुसे कां वदसि ना? कुशल राम महिपाल ॥*
*। लक्ष्मण भरत रिपुघ्न वद तैं कुबडी-उरिं जाळ ॥१३॥*

**अर्थ :** राणी भयभीत होऊन विचारते की तू बोलत का नाहीस? राम, महिपाल, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न कुशल आहेत ना? सांग (सांग) पाहू. तेव्हा

(हे ऐकून) कुबडीच्या उरात जाळ झाला. (सालु - दुःख, त्रास, ईर्षा).

**टीका. दो. - (१) राणी** शब्द अनुवादात घालता आला नाही; तथापि संदर्भावरून सहज समजण्यासारखा आहे. **सभय - घाबरलेली.** सापिणीचे फूत्कार मोठ्या थोरल्या वाड्यात, पुरुष बाहेर असता कोमळ स्त्री स्वभावाच्या स्त्रियांच्या कानी पडले की घाबरणारच. राणी घाबरावी म्हणून तर कुबडीने एवढे सगळे नाटक चालविले आहे. राणीला शंका आली की घरातील मंडळींपैकी कोणावर काही वाईट प्रसंग ओढवला ! (क) येथे जो नामांचा अनुक्रम दिला आहे त्यात रामलक्ष्मणांच्या मध्ये महिपाल घातले आहेत. महीपाल, रामलक्ष्मण व भरत, शत्रुघ्न असा क्रम मोठेपणा व साहचर्य यांच्या विचाराने हवा होता; पण राणीने जो क्रम वापरला आहे तो तिच्या प्रेमाच्या व तदनुसार चिंतेच्या उत्कटतेच्या प्रमाणात वापरला आहे. दाखविले की, **कैकयीचे प्रेम दशरथापेक्षा, स्वतःच्या पतीपेक्षा, सावत्रपुत्र रामावर जास्त आहे. सर्वात जास्त प्रेम रामावर आहे.** खालोखाल दशरथावर आहे. **लक्ष्मणावर भरतापेक्षा जास्त प्रेम आहे** हेही दाखविलेच. असे कैकयीचे प्रेम असता कुटिल, कुजाती, दुष्ट, नीच दासीच्या संगतीने किती आश्चर्यकारक स्थित्यंतर हळुहळू झाले हे पुढे दाखवावयाचे आहे. कैकयीच्या रामप्रेमाची प्रचिती पुढे आणखी दाखविली आहे. व कैकयीला स्वभावतः निर्दोषी ठरविली आहे. इतर रामायणातसुद्धा जवळ जवळ असेच दिसेल. वा.रा. भरताने कैकयीचा पुष्कळच अधिक्षेप केल्यावरसुद्धा कैकयीने भरत राजा असल्याचे भाट वगैरेंकडून वर्णन करविले आहे. अद्‌भुत रामायणात व भावार्थ रामायणात मात्र वनवासातून राम परत येऊन राज्याभिषेक झाल्यावर सुद्धा तिचा दुष्ट स्वभावच रेखाटला आहे. (ख) **तैं कुबरी-उरि जाळ** - राम हे नाव व त्यांचे कुशल सर्वांच्या आधी, ही कल्पना हे शब्द कुबडीच्या हृदयाला ज्वाळा लावणारे झाले. तिचे हृदय अत्यंत व्यथित झाले; पण ही सर्व आग, ही सर्व हृदयव्यथा, तोंडावरसुद्धा दिसू न देता हृदयातच दाबून ठेऊन ती आता तोंड उघडणार ! भिल्लीण आपल्या मधुर गानाने मृगीला मोहीत करून फासात पकडणार. **मोहोळ कापण्यासाठी बांधण्यास लागणारी भक्कम दुहेरी दोरी आपल्या कब्जात घेण्याच्या दीर्घ प्रयत्नास ती आता लागणार !**

हिं. । कत सिख देइ हमहि कोउ माई । गालु करब केहि कर बलु पाई ॥१॥
। रामहि छाड़ि कुसल केहि आजू । जेहि जनेसु देइ जुबराजू ॥२॥
। भयउ कौसिलहि बिधि अति दाहिन । देखत गरब रहत उर नाहिन ॥३॥

म. । कोण करि मज शिक्षा, कां बरं । माइ ! तोंड करु कवण बळावर ॥१॥
। कोण कुशल रामाविण आज किं । ज्या जनेश करतो युवराज किं ॥२॥
। कौसल्येला अति उजवा विधि । पाहुन राहि न गर्व मनामधिं ॥३॥

**अर्थ** : मला कोण शिक्षा करणार व कां करील बरं? बरं हे आई ! मी तोंड तरी कोणाच्या बळावर करणार? ज्याला **जनाधिप** आज युवराजा **करीत आहे** त्या रामाशिवाय आज दुसरा कोण कुशल असणार ! ॥२॥ विधाता कौसल्येला आज अत्यंत अनुकूल (उजवा) झाला आहे. व हे पाहून गर्व तिच्या मनात रहात-मावत नाही. (व तिला पाहून कोणाच्या मनात गर्व उरत नाही).॥३॥

**टीका.** - कुबडी आता मंदमती राहिली नसून कुमती अति पापीण झाली आहे. ज्याचे अन्न खाते, ज्याच्या राज्यात राहते त्याला दुःखाच्या खाईत लोटण्याचा कसून प्रयत्न करणारी, कुटिल कारस्थानी, बृहस्पतीसारखी भाषणपटु, चाणक्यापेक्षा कुटिल राजनीतिपटु, धूर्त, अत्यंत सावधान राहणारी, इंगितज्ञ, हावभाव करण्यात व मनातील विकार लपवून ठेवण्यात परम प्रवीण व कृष्णसर्पिणीपेक्षा दुष्ट अशी विलक्षण स्त्री बनली आहे. तू उदास, चिंतातूर का या राणीच्या पहिल्या प्रश्नाचे उत्तर न देता तिला घाबरी करून दुसरा, तिसरा प्रश्न विचारण्यास भाग पाडते. तिसऱ्या प्रश्नावरून नक्की कळले की हिचे रामावर पतीपेक्षा व भरतापेक्षाही अधिक व अत्यंत उत्कट प्रेम आहे व भरतापेक्षा पतीवर अधिक प्रेम आहे. कार्य साधणे फार कठीण आहे. अत्यंत निर्मळ अगाध प्रेमाचे रूपांतर अत्यंत मलिन; कठोर, द्वेषात, वैरात व सुडाच्या भावनेत करावयाचे आहे, म्हणून पूर्ण विवेकाने राणीच्या भावनांचा ठाव घेत घेत द्वेषाचे, वैराचे व सवती मत्सराचे विषारी बीज़ पेरण्यासाठी भूमी नांगरण्याचा प्रयत्न धूर्तपणाने करीत आहे. भयभीत होऊन विचारलेल्या (तिसऱ्या) प्रश्नाचे उत्तर न देता, पहिल्या प्रश्नाचे उत्तर देण्याचे टाळून दुसऱ्या

प्रश्नाचे उत्तर प्रथम देते. भयाचा पारा थोडा आणखी वाढावा हा हेतु आहे.

**चौ. १ - (१) गमे लक्ष्मणें शिक्षा दिधली** - या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर येथे देते. राणीच्या या दुसऱ्या प्रश्नाने, आडपडद्याने बोलण्यास आधार मिळाला. तिच्या म्हणण्याचा भाव हा की तोंडाळपणा करून मी आजपर्यंत कोणाचा अपमान केला नाही असे मी म्हणत नाही; पण मातेचा मुलीला जसा पाठिंबा असतो तसा तुमचा होता. तुमच्या बळावर मी बोलत असे म्हणून ते इतके दिवस निभले. आईप्रमाणे माझी बाजू तुम्ही घेत होतात व तुमच्या हाती सत्ता होती. पण मी आता **कोणाच्या बळावर तोंड करू?** कोणाचाच आधार मला राहिला नाही. तोंड करण्याला तोंडच राहिले नाही; तर मग लक्ष्मण काय किंवा इतर कोणी काय, मला शिक्षा का करील? मी कोणाला बोलले नाही व कोणी शिक्षा केली नाही असे सरळ न सांगता द्राविडी-प्राणायामाने सांगण्यात भाव हा आहे की तुमचीच किंमत आता काडी मात्र राहिली नाही; मग तुमच्या दासीला कोणी विचारणार नाही हे मला माहीत आहे.

**चौ. २ - (१)** वरील दगड टाकण्याने मत्सराचा शिंतोडा राणीच्या कोमल पण सत्ता गर्विष्ठ हृदयावर उडविण्याचा प्रयत्न केला खरा पण तो सफल झालेला दिसत नाही. नवीन प्रश्न विचारीत नाही असे ठरले; पण कोणी शिक्षा केली नाही हे कळताच भीतीचा पारा वर चढलेला कुबडीला राणीच्या मुखावर दिसला म्हणून तिसऱ्या प्रश्नाचे उत्तर फार धूर्तपणाने देत आहे. रामावर प्रगाढ प्रेम आहे. राजावर गाढ प्रेम आहे व त्यामुळे द्वेषमत्सराचे बीज रुजणार नाही हे जाणून थोडा नांगर फिरविण्याचा प्रयत्न हळूच करते. राम आदि सर्वांचे कुशल आहे घाबरलात का असे न म्हणता, **भरताचे कुशल नाही हे सुचविण्यासाठी** म्हणाली की आज रामाशिवाय इतर कोणाचे कुशल आहे असे म्हणवत नाही. आपण रामाचा द्वेष करतो असे राणीला वाटू नये म्हणून कैकयीला आवडणारी गोष्ट सांगते की रामाला राजा युवराजपद देत आहे. राणीच्या हृदयात किती फरक पडला हे नक्की कळण्यासाठी राम व राजा यांच्या विषयी बहुवचन न वापरता अपमानास्पद असे एकवचन वापरले. जिन्हहि = ज्यांना, व देहिं = देतात, करिति-करीत आहेत असे न म्हणता जेहि, देहि ज्याला करीत आहे,

करतो, असे शब्द वापरले; पण हा पतीचा दासीने तोंडावर केलेला अपमान ऐकून सतीला राग आला नाही खरा, तथापि भरताचे व इतरांचे कुशल नाही असा स्पष्ट अर्थ होत असता भीती वाढलेली दिसली नाही, तेव्हा ताडले की रामराज्याभिषेकाच्या बातमीच्या आनंदांत एकवचनाकडे लक्ष गेले नाही व त्यामुळे भरताच्या अकुशलाची शंका आली नाही. म्हणून आता पवित्रा बदलते. कौसल्येचा आधार घेते व सवती मत्सराची बाजू एकदा चाचपून पाहते.

**चौ. ३ (१) बिधि** - विधाता, दैव; उजवा - अनुकूल, राहणे - मावणे किंवा उरणे. कौसल्येला पट्टराणी पद मिळाले म्हणून दैव अनुकूल, रामचंद्र ज्येष्ठ पुत्र झाला म्हणून अनुकूल व आता तर पुत्राला - रामाला राज्याभिषेक होणार म्हणून अति अनुकूल. कैकयीला फार सौंदर्य देऊन राजाची प्रियतमा बनविली म्हणून दैव अनुकूल व भरतासारखा प्रति रामच पुत्र दिला म्हणून अनुकूल; म्हणजे येथपर्यंत, आजपर्यंत दोघींना दैवसारखे अनुकूल होते; परंतु आज कौसल्येला कैकयीपेक्षा दैव अति अनुकूल झाले. भरत येथे नसताच राज्याभिषेक होणार व तो पाहण्याचे सुखसुद्धा भरताला नाही ! इतर कोणत्याही राणीपेक्षा कौसल्येला दैव अधिक अनुकूल झाले आहे. भरतमातेच्या मनात ठसवायचे आहे की तुझे दैव फिरले, तुझ्यावरील राजाचे प्रेम कमी झाले; पण फार धूर्त व सावधान असल्यामुळे एकदम तसे स्पष्ट म्हणत नाही. आडून बाण मारून बघत आहे की बोचतो की नाही. थोडा जरी बोचला तरी तसाच दुसरा तीक्ष्ण मारून काम साधेल; पण मुळीच बोचला नाही असे दिसले तर निराळे अस्त्र वापरू असा तिचा विचार आहे. 'होति राम युवराज उद्यां जर। विपब्दिज विधि पेरि तुम्हांतर' (२।१९।६) असे स्पष्ट सांगण्यास अजून बराच अवकाश आहे.

**(२) पाहुन राहि न गर्व मनामधिं** - कौसल्येला दैव अति अनुकूल झाले आहे हा बाण अगदीच बोथट ठरला. राणीला मुळीच बोचला नाही; म्हणून थोडा अधिक तिखट बाण मारते; पण आडूनच मारून, चाचपून पाहते की सवती मत्सरास जागा करता येते की नाही? या चरणाचे दोन अर्थ वर दिलेच आहेत. आपण सर्व राण्यांत फार सुंदर व पतीचे आपल्यावर अति प्रेम आहे

हे माहीत असल्याने कैकयीला फार गर्व झाला आहे, हे कुबडी जाणते; म्हणून म्हणते की कौसल्येला इतका गर्व झाला आहे की तो जणू उतास जात आहे. तिचा तो गर्व पाहिला म्हणजे इतर कोणाही राणीचा गर्व नामशेष होईल. तिचा गर्व उरांत राहत नाही यांत ही खोच आहे की ती आता इतर सर्व राण्यांचा पाणउतारा करू लागली आहे. तिचा पुत्रच राजा होणार म्हणजे ती राजमाता बनणार व इतर राण्यांचा राणीपणासुद्धा उरणार नाही. हे ठरले व मग गर्व, ताठा, मद उतू जाईल यात नवल काय ! येथे कुबडीने धडधडीत असत्याचा आधार घेतला. सवतीचा गर्व स्त्रियांना असह्य होतो; आणि गर्विष्ठ स्त्रियांना तर तो अत्यंत असह्य होतो हे अशा धूर्त दासींना चांगले माहीत असते. 'पतिबल-गर्वित भरतजननि ती' (२।१८।३). कैकयी फार मानी व गर्विष्ठ आहे. तिला सवतीचा गर्व सहन होणार नाही अशी या तिच्या दासीची खात्री आहे. त्यामुळे अजून काहीच परिणाम झालेला दिसला नाही तरी त्याच मात्रेचे आणखी वळसे निराळ्या अनुपानात देऊन पाहते -

हिं. ***। देखहु कस न जाइ सब सोभा । जो अवलोकि मोर मन छोभा ॥४॥***
***। पूत बिदेस न सोचु तुम्हारें । जानति हहु बस नाहु हमारें ॥५॥***
***। नींद बहुत प्रिय सेज तुराई । लखहु न भूप कपट चतुराई ॥६॥***

म. ***। जाउन कां न बघां सब शोभा । पाहुन मम मन पावे क्षोभा ॥४॥***
***। पुत्र विदेशिं तुम्हांहि न चिंता । असे नाथ वश, तुम्हीं मानितां ॥५॥***
***। प्रिय बहु निद्रा गाद्यां गिर्दा । नेणां भूप-कपट-चातुर्या ॥६॥***

**अर्थ :** तुम्ही जाऊन सगळी शोभा का नाही पहात? (एकदा बघा तर खऱ्या); ती शोभा पाहून माझे मन तर क्षुब्ध झाले.॥४॥ तुमचा पुत्र तर विदेशात आहे आणि तुम्हाला सुद्धा काही चिंता नाही ! (कारण इतकेच की) तुम्हाला वाटले तुम्ही आपल्या मानता की पति आपल्या मुठीत आहे.॥५॥ शय्येवर गाद्या गिरद्यांत लोळत पडून झोपा काढणे तुम्हाला फार प्रिय आहे; (त्यामुळे) राजाचे कपट चातुर्य तुम्हाला कळत नाही.॥६॥

**टीका. - चौ. ४ - (१) जाउन कां न बघां सब शोभा** - माझ्या म्हणण्यावर तुमचा विश्वास नसेल तर स्वतः जाऊन् का नाही पहात? आजची नगरीची

व कौसल्येची शोभा अपूर्व आहे. आजची नगरीची सर्व शोभा म्हणजे कौसल्येच्या भाग्याचीच परम शोभा आहे. (क) **पाहुन मम मन पावे क्षोभा** - भाव हा की मी एक तुमची क्षुद्र दासी असून ती कौसल्येची शोभा व तो गर्व मलासुद्धा पाहवला नाही. माझे मन सुद्धा क्षुब्ध झाले. मग तुमचे होईल यात नवल काय? सवती मत्सराचा हा वळसा दिला तरी काहीच परिणाम नाही असे पाहून पुत्रवात्सल्य जागृत करून राम व दशरथ यांच्यापेक्षा भरत अधिक प्रिय वाटावा म्हणून सुतवात्सल्यजनक सुतशेखराची मात्रा देते.

**चौ. ५** - (१) **पुत्र बिदेसिं तुम्हांहि न चिंता** - हिंदीत तुम्हारे = तुम्हाला इतकाच स्पष्टार्थ आहे; पण त्यातील भाव 'हि' शब्दाने मराठीत अधिक स्पष्ट केला. भाव हा आहे की तुमचा मुलगा परदेशात आहे याची चिंता कौसल्येला असणे शक्य नाही. राजाचे प्रेम रामावर अधिक आहे हे या राज्याभिषेक तयारीवरून दिसतेच. राजाला जर भरताची चिंता असती, भरतावर प्रेम असते तर अशा मोठ्या, अपूर्व उत्सवाला त्याला का आणला नसता? भरत व राम यांचे अन्योन्य शुद्ध प्रेम आहे, तरी राजाला त्याची आठवणसुद्धा झाली नसेल. पण तुम्ही त्याची प्रत्यक्ष जन्मदाती आई असून तुम्हाला सुद्धा त्याची चिंता असू नये हे मोठे आश्चर्यच आहे. मी तुमची दासी असून मला सुद्धा भरताची चिंता लागली आहे पण तुम्हाला काहीच वाटत नाही हे फारच विलक्षण आहे. आपल्या मनात क्षोभ का याचे उत्तर हळूच सुचवून ठेवले. सवती मत्सर व पतिद्वेष यांचा एकेक लहानसा वळसा मिळवून पुत्रवात्सल्य जनक मात्रा कर्णपुटांत पाजली पण ती हृदयापर्यंत गेली नाही असे दिसताच पतिप्रेमविघातक संशय विषमात्रा देते. (क) **असे नाथवश तुम्हीं मानित्तां** - पति 'माझ्या मुठीत आहे' असे तुम्हाला वाटते तो भ्रम आहे. राजा तुम्हाला वश नाही हे भरताला न आणण्यावरून स्पष्ट दिसते.

**चौ. ६** - (१) **प्रिय बहु निद्रा... भूपकपट-चातुर्या** - तुम्ही आपल्या झोपा काढीत पडलेल्या असता. त्यामुळे तुम्हाला राजाचे वागणे-बोलणे, चालणे खरेच वाटते पण ते सगळे कपटाने केलेले चातुर्य आहे. भाव हा की तुमच्या मागे राजा व कौसल्या काय काय कपट रचतात ते तुम्हाला कळत नाही. ओळखू

येत नाही. राम व दशरथ यांच्यावरील प्रेम सवतीमत्सराच्या साह्याने नष्ट करण्याचा हा प्रयत्न सुरू झाला आहे; पण फार धूर्तपणाने. (क) **कवींनी येथे दाखविले की राजा कैकयीच्या मुठीत राहणारा आहे; त्याबद्दल कैकयीला अभिमान आहे. ती एकलकोंडी तमोगुणयुक्त, सत्वगुण प्रधान आहे.** चार वर्षे (बारा वर्षे काहींच्या मते) भरत घरी नाही या बद्दल तिला काहीच वाटत नाही; व आपल्याच देहसौख्यात, ऐष आरामात अभिमानात गर्क राहणारी ती आहे. कुबडीच्या या वाग्जालाचा राणीवर काहीच परिणाम झाला नाही व राणीचे रामप्रेम व पतिनिष्ठा अजून दृढमूल आहेत हे आता स्पष्ट दिसेल.

हिं. ***। सुनि प्रिय बचन मलिन मनु जानी । झुकी रानि अब रहु अरगानी ॥७॥***
***। पुनि अस कबहुँ कहसि घरफोरी । तब धरि जीभ कढावउँ तोरी ॥८॥***

दो. ***। काने खोरे कूबरे कुटिल कुचाली जानि ॥***
***। तिय बिसेषि पुनि चेरि कहि भरतमातु मुसुकानि ॥१४॥***

म. ***। प्रिय वच परी मलिन मन जाणत । गप्प रहा, राणी दरडावत ॥७॥***
***। घरफोडे ! कधिं असें वदसि जर । जीभ काढविन तव ओढुनि बरं ॥८॥***

दो. ***। कुबडे काणे पांगळे कुटिल कुचाळचि खास ॥***
***। स्त्री त्यांतही दासी म्हणत भरतजननि करि हास ॥१४॥***

**अर्थ :** (कुबडीचे) वचन प्रिय वाटले पण राणीने जाणले की हिचे मन मलीन आहे; (म्हणून) राणी तिला दरडावीत म्हणाली - 'आता गप्प रहा (तोंड बंद कर !)॥७॥ घरफोडे ! पुन्हा कधी असे बोललीस तर (लक्षात ठेव) तुझी ही जीभ मी ओढून काढवीन बरं. (गय नाही करणार)॥८॥ कुबडे, काणे (एकाक्ष) व पांगळे (खोरे) लोक कुटिल व कुचाळक्या करणारे असतात हे ठरलेलेच; त्यात तू स्त्री आणि त्यातही दासी ! असे म्हणून भरत माता हसली.॥दो.१४॥

**टीका. - चौ. ७ - (१) प्रिय वच, परी मलिन मन** - रामाला राज्याभिषेक होणार हे वचन कैकयीला प्रिय वाटणारे आहे. बाकीच्या भाषणातील तिचा हेतु कैकयीने जाणला म्हणून ती तिला पापीण-दुष्ट (मलिन मन) वाटली. वरवर कैकयीचे हित दाखवून कौसल्येशी वैर साधणे, राजाला कपटी ठरवून त्याच्यावरील प्रेम उडविणे व रामराज्यामुळे कैकयीचे अहित होणार असे भासविणे हे

कुबडीच्या मनातील डाव कैकयीने ओळखले व तिला रागही आला. **(क) गप्प रहा, राणी वरखबत** - एक शुद्र, कुज़ाती दासी असून दशरथासारख्या सम्राट पतीला अगदी तोंडावर कपटी म्हणाली हे कोणती पतिप्रेमी राणी सहन करू शकेल? दोन पावले जोराने टाकून, तर्जनी नाकाजवळ नेऊन रागाने म्हणाली की बस्स कर. खबरदार ! एक चकार शब्द काढशील तर, बंद कर तोंड !!

**चौ. ८. (१) घरफोडे** - गृहकलह माजवून आमच्या कुळाचा सत्यानाश करण्याची तुझी इच्छा आहे काय? आज ओळखली मी तुला. एक वेळ क्षमा करते; पुन्हा असे कधी बोलशील तर तुझी ही लांब जीभ माझ्या समक्ष अशी ओढून काढून छाटून टाकीन.

**दो. - (१) काणे** - एका डोळ्याने आंधळे; यांना थट्टेने शुक्राचार्य म्हणतात. हे फार कुटिल कारस्थानी असतात असा अद्यापही बहुधा अनुभव येतो. **'क्वचित् काणो भवेत् साधुः' कुबडे** - वृद्धावस्था नसून पाठीला कुबड असलेले. हे नेहमी खाली मान घालून बोलतात पण महा धूर्त, कलागती लावणारे व विनाकारण भानगडी उत्पन्न करणारे असतात. पांगळ्यांचेही असेच. मंथरा कुबडी आहे, स्त्री आहे व दासी आहे. स्त्रियांनासुद्धा बहुधा लावालावी, निंदा इ. कुचाळक्या करण्याची सवय असते. दासी तर त्यातल्या अर्कच ! मंथरेच्या ठिकाणी हे त्रिदोष कुपित झाले ,आहेत. त्रिदोष - सन्निपातच झाला आहे ! असे म्हणून राणी हसली. हसण्यात हेतु हा की आपण रागावलो असे दासीला वाटू नये व थट्टा केली असे वाटावे. रागावण्याचे कार्य तर व्हावे पण तिला वाईट वाटू नये हा हसण्यातील हेतु आहे. **कैकयीचे हृदय किती कोमल आहे हे येथे दाखविले. हेच हृदय किती कठोर, निष्ठूर झाले हे पुढे दाखवतील.** दासी कपटी, खट्याळ, कुटील आहे व घरभेदेपणा करू पहात आहे हे स्पष्टपणे कळल्यावर तिला तेथून हाकलून दिली असती किंवा स्वतः उठून रामराज्याभिषेकाची बातमी खरी की खोटी हे पाहण्यासाठी अंतःपुरात गेली असती तर पुढील सर्व अनर्थ टळला असता; पण **'आलें देवाजीच्या मना । तेथें कोणाचें चाले ना ।'** आता तिला गोंजारू लागते व त्यामुळेच जाळ्यात अडकते.

हिं. । प्रियबादिनि सिख दीन्हिउँ तोही । सपनेहुँ तो पर कोपु न मोही ॥१॥
। सुदिनु सुमंगल दायकु सोई । तोर कहा फुर जेहि दिन होई ॥२॥
। जेठ स्वामि सेवक लघु भाई । यह दिनकर कुल रीति सुहाई ॥३॥
। राम तिलकु जौं साँचेहुँ काली । देउँ मागु मन भावत आली ॥४॥

म. । प्रियवादिनि बोललें तुला जरि । स्वप्निहि नहिं मज कोप तुझ्यावरि ॥१॥
। सुदिन सुमंगल-दायक तो बरं । तुझें वचन होइल जेव्हां खरं ॥२॥
। स्वामी ज्येष्ठ बंधु लघु सेवक । हा दिनकर-कुलिं शोभन दंडक ॥३॥
। राम तिलक जर सत्य सकाळीं । देउं माग वाटे तें आली ! ॥४॥

**अर्थ :** प्रिय वादिनी ! मी तुला रागाने बोलले (शिक्षा केली) हे खरे पण माझ्या मनात-स्वप्नातसुद्धा तुझ्यावर कोप येणे शक्य नाही.॥१॥ तू म्हणालीस ते ज्या दिवशी खरे (फुर-सत्य) होईल तोच सुदिन व तोच सर्व मंगलदायक होय.॥२॥ ज्येष्ठ पुत्र स्वामी व्हावा व त्याच्या धाकट्या भावांनी त्याचे सेवक बनावे अशीच सूर्यवंशांतील सुंदर रीत आहे.॥३॥ जर खरोखरीच उद्या सकाळी रामराज्याभिषेक असेल तर हे सखी ! (आली) तुला वाटेल ते माग मी तुला देते.॥४॥

**टीका. चौ. १** - (१) फार प्रिय व आनंदाची बातमी सांगणाऱ्या आपल्या प्रिय दासीला-बक्षीस न देता आपण तिच्यावर रागावलो हे बरे झाले नाही असे कैकयीच्या कोमल हृदयास वाटत आहे म्हणून तिची समजूत घालण्याचा प्रयत्न कैकयी करीत आहे. (क) सिख = शिक्षा, दंड, आणि सिख = उपदेश, शिकवण. 'रामधाम सिख देत पठाए' यांत 'उपदेश' अर्थ आहे व 'दीन्ह लखन सिख' यांत दंड, शिक्षा, शासन असा अर्थ आहे. दोन्ही अर्थ तंतोतंत सांगणारा एक शब्द मराठीत नाही. 'बोलणे' हा शब्द साधारण जवळच्या अर्थाचा आहे. बोलणे = रागावणे, रागे भरणे; व कानउघाडणी करणे हे दोन्ही अर्थ येथे आहेत. भाव हा की मी नुसती रागाने बोलले पण मनात मुळीच क्रोध नाही. तू भलतेच बोलून नर्कात पडू लागलीस म्हणून रागाने बोलून तुला सावध करणे माझे कर्तव्य होते. तो राग पोटातला नसून फक्त ओठातला होता. मला फार प्रिय वाटणारी गोष्ट तू बोललीस, मग मी तुझ्यावर रागावेन कशी?

**चौ. २ - (१) सुदिन सुमंगल.... जेव्हा खरं'** - या चौपाईत स्पष्ट दिसते की रामराज्याभिषेकाची गोष्ट जी कुबडीने सांगितली ती खरी नसावी असे राणीला वाटत आहे. तसे असते तर मला कळविलेच असते; पण तुझे शब्द मी सुमंगलदायक समजते. रामराज्याभिषेक ज्या दिवशी होईल तो सुदिन व तो सुमंगलदायक यात शंका नाही. वसिष्ठांच्या वचनासारखे हे दुहेरी अर्थाने कैकयी बोलली नाही. तरी वाग्देवी शारदा दुसरा अर्थ सांगत आहे. 'कोण कुशल रामाविण' असे जे कुबडी म्हणाली त्यावर हे उत्तर आहे की रामराज्याभिषेक होण्यानेच सर्वांचे उत्तम (सुमंगल) कल्याण, कुशल होणार आहे.

**चौ. ३. (१) स्वामी ज्येष्ठ बंधु लघु सेवक....दंडक** - रामराज्याभिषेक करणे शास्त्रसंमत आहे एवढेच नव्हे तर आमच्या सूर्य कुळातील रीतच अशी आहे की मोठ्या भावाने राजा व्हावे व बाकीच्या (धाकट्या) भावानी त्याची सेवा करावी. शास्त्राप्रमाणे वागून कुलपरंपरांचे संरक्षण केल्याने अकल्याण कधीच होत नाही. रामराज्याभिषेक होणे धर्म्य व इष्ट आहे.

**चौ. ४. (१) रामतिलक जर सत्य सकाळीं** - उद्या सकाळीच रामराज्याभिषेक होणार हे जर खरे असेल तर तुझ्या तोंडात साखर पडो ! ही परमानंदाची गोष्ट आहे. तू म्हणशील ते व म्हणशील तितके बक्षीस मी तुला देते. **(क) जर सत्य** - भाव हा की तुझे म्हणणे मला खरे वाटत नाही.पण खरे असेल तर वाटेल ते माग. बातमी खरी न वाटण्याचे कारण हेच की राजांनी सर्वांच्या आधी ही बातमी स्वतःच मला सांगितली असती किंवा अंतःपुरातून कळली असती असे तिला वाटत आहे. **(ख) आली !** - ही बातमी जर खरी असेल तर तू माझी नुसती दासी न राहता सखी (आली) झालीस म्हणून समज. बातमी कोणी सांगितलेली नाही या एका मुद्यावरच कुबडीला आपले सर्व कुभांड रचता येणार आहे.

*हिं.* *। कौसल्या सम सब महतारी । रामहि सहज सुभायँ पिआरीं ॥५॥*

*। मो पर करहिं सनेह बिसेषी । मैं करि प्रीति परीछा देखी ।६॥*

*। जौं बिधि जनमु देइ करि छोहू । होहुँ राम सिय पूत पुतोहू ॥७॥*

*। प्रान तें अधिक राम प्रिय मोरें । तिन्ह कें तिलक छोभु कस तोरें ॥८॥*

म. *। कौसल्येसम माता सर्वहि । प्रिय रामाला स्वभाव सहजहि ॥५॥*
*। स्नेह विशेष करिति माझ्यावर । प्रेम-परीक्षा केली म्यां बरं ॥६॥*
*। विधि देइल जर जन्म कृपायुत । देवो सीता सून राम सुत ॥७॥*
*। राम मला प्रिय प्राणांहुनि तर । त्यांत तिलक कां क्षोभ तुला बरं? ॥८॥*

**अर्थ :** रामचंद्रांना सर्वच माता कौसल्येसारख्या (इतक्याच) सहज स्वभावानेच (हि) प्रिय आहेत.॥५॥ (पण) ते माझ्यावर विशेष स्नेह (इतरांपेक्षा, कौसल्येपेक्षाही) करतात. (आणि) मी ही (त्यांच्या) प्रेमाची-प्रीतीची परीक्षा करून पाहिली आहे.॥६॥ कृपायुक्त होऊन विधाता जर जन्म देणार असेल तर त्याने (मला) राम पुत्र द्यावा व सीता सून (पुत्रवधू-पुतोहू) द्यावी.॥७॥ मला तर राम प्राणांपेक्षाही अधिक प्रिय आहेत; त्यांचा राज्यतिलक (राज्याभिषेक सोहळा) आहे तर तुलाच क्षोभ होण्याचे कारण काय बरं?॥८॥

**टीका. - चौ. ५ - (१) कौसल्ये सम माता सर्वहि प्रिय रामाला - 'कौसल्येला अति उजवा विधि'** या कुबडीच्या म्हणण्यावर हे उत्तर आहे. तू म्हणतेस तसे मुळीच नाही. सर्वच मातांना विधि अति उजवा आहे; कारण सर्वच मातांवर राम सारखे प्रेम करतात. त्यामुळे सर्वच मातांना राम आपलाच पुत्र वाटतात. राम प्रेम करतात ते केवळ कर्तव्य म्हणून नव्हे; त्यांचा उपजत स्वभावच तसा आहे. मातासुद्धा त्यांच्यावर स्वभावताच प्रेम करतात. **'प्रेम द्यावे प्रेम घ्यावे'** हा स्वभाव आहे प्रेमाचा.

**चौ.६.(१) स्नेह विशेष करिति माझ्यावर** - माझ्यावर रामचंद्रांचे जितके प्रेम आहे तितके कौसल्येवर सुद्धा नाही. हे मी नुसते अनुमानाने सांगते असे नाही. त्यांच्या माझ्यावरील प्रेमाची मी परीक्षा घेतली आहे. **'सिथिल सनेहँ कहै कौसिला सुमित्राजू सों । मैंन लखी सौति सखी ! भगिनी ज्यों सेइ है । कहै मोहि मैया, कहौं मैं न मैया, भरत की बलैया ले हौं भैया ! तेरी मैया कैकेई है ॥** (कवि. २।३।१). स्नेहाने शिथिल झालेली कौसल्या सुमित्रेला म्हणते की कैकयीला कधी सवत मानलीच नाही. नेहमी बहिणीसारखी तिची सेवा केली. राम जेव्हा मला मैया ! = आई ! म्हणे तेव्हा मी त्याला म्हणत असे की मी भरताची आई आहे. तुझी नाही. तुझी आई कैकयी आहे. कैकयी येथे जे म्हणाली ते अक्षरशः

खरे आहे. पुढे राम कैकयी संवादांत राम कैकयीला 'जननी' म्हणून संबोधितात. चित्रकूटला सर्व राण्या गेल्या तेव्हा व राम अयोध्येत परत आल्यावर कैकयीलाच प्रथम भेटतात व तिच्या महालात प्रथम जातात. भरत कैकयीला दोष देतात तेव्हा राम त्यांची चांगली कान-उघाडणी करतात.

**चौ. ७. (१) विधि देइल जर जन्म कृपायुत...** सुत - यांत दाखविले की कैकयीचे प्रेम रामापेक्षा भरतावर कमी आहे. या जन्मात भरत व माण्डवी पुत्र व पुत्रवधू आहेत; पण पुढल्या जन्मात राम माझा स्वतःचा पुत्र व्हावा व सीता स्वतःची सून व्हावी. या जन्मी रामावर भरतापेक्षा जास्त प्रेम असल्याने पुढील जन्मी रामपुत्र होणे शक्य असले तरी जन्म कर्माधीन असतो. कर्मानुसार विधाता जन्म देतो; म्हणून त्याचा व त्याच्या कृपेचा उल्लेख केला.

**चौ. ८. (१) मला राम प्राणांहुनि प्रिय** - अध्यात्म दृष्टीने राम सर्वांनाच प्राणाहून प्रिय आहेत. **'हे प्रिय सर्वा, जितके प्राणी'** (१।२१६।७) असे विश्वामित्रांनी जनकांच्या प्रश्नाचे उत्तर दिले आहे. **'ब्रह्म नेति जें निगमिं गाइलें। उभय वेष कीं धरुनि पावलें'** (१।२१६।५) असे जनक राजाने विचारले होते. राम = ब्रह्म, आत्मा. तो प्राणांचा प्राण जीवाचा जीव आहे; पण हे सर्वांना माहीत नसते. त्यामुळे **'प्रिय न तनू प्राणांहुनि कांहीं'** (१।२०८।४) असे सर्वांना वाटते. **(ब)** पतीला प्राणनाथ म्हणतात. पति प्राणांसारखा प्रिय वाटणे हा सतीचा धर्म आहे. तसे दशरथ या राणीला प्राणांसारखे प्रिय आहेत; पण राम प्राणांहून प्रिय आहेत, म्हणजे पतीपेक्षाही अधिक प्रिय आहेत. म्हणूनच १३ व्या दोह्यांत राम-महिपाल-लक्ष्मण-भरत-शत्रुघ्न या क्रमाने कुशल विचारले. ल.ठे... कैकयी आपल्या भाषणात रामाबद्दलसुद्धा आदरार्थी बहुवचन वापरीत आहे; पण त्या कुबडीने राम व दशरथ या दोघांनाही एकवचन वापरले ! दुष्ट दासीचे धारिष्ट ! सरस्वतीने दासीची बुद्धी फिरवली व त्या प्रमाणे दासीकडून उत्तम प्रकारे प्रयत्न केला जात असून कैकयीचे रामप्रेम व रामाविषयी आदर तिळमात्र कमी होत नाही असे पाहून देवांनी आपल्या मायेचा प्रयोग केला. त्याचा परिणाम हळुहळु आता दिसेल व सुरमायावश झाल्याचा स्पष्ट उल्लेख पुढील दोह्यांत करतील; पण सुरमायेने आपला प्रभाव

या चौपाईच्या उत्तरार्धातच पाडला हे कैकयीच्या पुढील प्रश्नांवरून ठरते.

(२) **त्यांस तिलक कां क्षोभ तुला बरं** - तू माझी प्रिय दासी, मला राम प्राणांपेक्षाही जास्त प्रिय आहेत; तर तुलाही तसेच प्रिय वाटले पाहिजेत; पण तू म्हणालीस की 'पाहुन मम मन पावे क्षोभा' ते काय म्हणून? हा प्रश्न रागाने, त्वेषाने विचारलेला नाही. या प्रश्नावरून ठरते की एका मनाच्या विचाराप्रमाणे कैकयी आजपर्यंतची वस्तुस्थिती वर्णन करीत आहे; पण तिचे दुसरे मन सांगत आहे की प्रिय दासी असे जे बोलली ते कारणाशिवायच बोलली का? काहीतरी सबळ कारण असलेच पाहिजे. या विचाराबरोबरच मन म्हणते की ही गोष्ट आपल्याला कोणीच कशी कळविली नाही? या प्रश्नानेही हातभार लावला व शंका उत्पन्न झाली की खरोखरच काही कृष्णकारस्थान रचले आहे की काय? या शंकेचा छडा लावण्यासाठी कुबडीला हा प्रश्न विचारला. त्या धूर्त, चाणाक्ष, दुष्ट दासीने ओळखले की जमीन बी पेरण्यालायक होत चालली आहे. आपण उत्तर न देण्याने आणखी नांगरली जाईल. विनवण्या करून विचारील, तेव्हा मग झाडू चांगली. कुबडी उत्तर देत नाही असे पाहून भावनाप्रधान राणी अधीर झाली व शपथ घालून विचारते. असा काही संशय नसता तर या नीच दासीला एवढा आग्रह धरून विचारण्याचे कारणच नव्हते. सुरमायेने प्रभाव पाडला.

***हिं.दो. । भरत सपथ तोहि सत्य कहु परिहरि कपट दुराउ ॥***
***। हरष समय बिसमउ करसि कारन मोहि सुनाउ ॥१५॥***

***म.दो. । भरत शपथ तुज सत्य वद छल-कपटा टाकून ॥***
***। हर्षसमयिं विस्मय करिशि हेतु टाक सांगून ॥१५॥***

**अर्थ** : तुला भरताची शपथ आहे, लपवालपव (छल) व कपट टाकून खरं-खरं बोल व हर्षाच्या वेळी तू विषाद करतेस ह्याचे कारण काय ते सांगून टाक. (मला ऐकू दे, कळू दे). ॥१५॥

**टीका. दो.** - (१) कुबडीचे प्रत्येक वाक्य कैकयीच्या हृदयात तिला दिसू लागले. हिला उत्सव पाहून क्षोभ का? रामाशिवाय इतर कोणाचे कुशल नाही असे मोघम का म्हणाली? भरताचे काही अकुशल हिला कळले तर नाही?

'पुत्र विदेशिं तुम्हांहि न चिंता' असे अस्पष्ट का म्हणाली? चिंता करण्यासारखी काही भरताची दशा हिला कळली आहे की काय? हिला भरताची चिंता माझ्यापेक्षा अधिक का वाटावी? 'नेणां भूप-कपट-चातुर्य' असें गुळमुळीत का बोलली? काही कपट तर रचले गेले नाही ना? आजपर्यंत ही असे कधी बोलली नाही; व आजच असे आडून आडून सर्वच गुळमुळीत का बोलते? बरं राज्याभिषेकोत्सव ठरला असल्याशिवाय ही खोटे कसे सांगेल? व खोटेच असते तर जाऊन का बघत नाही असे का म्हणाली असती? मग माझ्यापासून ही बातमी राम, महिपाल, लक्ष्मण, दासदासी, सखी इ. सर्वांनीच का लपवून ठेवली? बक्षिसाच्या आशेने कोणीच कसे कळविण्यास आले नाही? इत्यादी संशय-कल्लोळ गुप्तपणे हृदयात थैमान घालू लागले तेव्हा अधीर झाली व शपथपूर्वक विचारते –

(२) **भरतशपथ** - कैकयीला राम प्रियतम असता भरताची शपथ का घातली? शपथ मानली नाही तर निश्चितपणे ठरते की ज्या व्यक्तीची शपथ घातली त्या व्यक्तीबद्दल ती शपथ मोडणाराच्या ठिकाणी प्रेम व आदर मुळीच नाही. कुबडीचे भरतावर जास्त प्रेम आहे असे ती दाखवीत आहे व रामावर तिचे प्रेम मुळीच दिसत नाही. या शपथेमुळे एक तर ही बोलू लागेल किंवा खरीच दुष्ट आहे हे सिद्ध होईल, हे जाणून भरतशपथ घातली. **(क) छल** = लपवालपव, गुळमुळीत, आडून पाडून बोलणे असा अर्थ येथे आहे. अशा छलाचा व कपटाचा त्याग केल्याशिवाय सत्य बोलता येत नाही. येथे हर्षाच्या विरुद्ध खेद, विषाद = विस्मय हा अर्थ आहे. **(ख)** हा प्रश्न राणीने विचारला नसता तर कुबडीची सर्व वशीकरण विद्या निरुपयोगी ठरली असती. पण 'बुद्धि : कर्मानुसारिणी' आणि सुरमाया प्रेरक असल्याने असे घडले. या प्रश्नांवरून कुबडीने ताडले की संशयसर्प वर्मी डसला आहे पण अजून कुतर्क लहरी येऊ लागल्या नाहीत; आता ओढून ताणून धरून कार्य साधण्यास चांगली संधी मिळाली - घरफोडी व जीभ काढवीन या कैकयीच्या शब्दांचा आधार घेऊन कुनारी चरित्राचे प्रदर्शन कुबडी आता फारच उत्तम करील –

हिं. *। एकहिं बार आस सब पूजी । अब कछु कहब जीभ करि दूजी ॥१॥*
*। फोरै जोगु कपारु अभागा । भलेउ कहत दुख रउरेहि लागा ॥२॥*
*। कहहिं झूठि फुरि बात बनाई । ते प्रिय तुम्हहि करुइ मैं माई ॥३॥*
*। हमहुँ कहब अब ठकुरसोहाती । नाहिं त मौन रहब दिनु राती ॥४॥*

म. *। सकल एकदां आशा पुरली । अतां दुजी करुनी वदुं जिभली ॥१॥*
*। फोडाया शिर योग्य अभागें । भलें वदत अपणां कटु लागे ॥२॥*
*। बनवुनि सत्य असत्या वदते । ते प्रिय अपणां मी कटु गमतें ॥३॥*
*। तोंडपुजेपण मी हि करीन किं । ना तरि निशिदिन मौन धरीन किं ॥४॥*

**अर्थ** - (कुबडी म्हणाली) एकदाच माझी सगळी आशा पुरी झाली. आता पुन्हा (काही) बोलायचं म्हणजे दुसरी जीभ करूनच बोललं पाहिजे.।।१।। माझं हे अभागी डोसकं फोडून टाकण्यालाच योग्य आहे. कारण मी चांगले सांगत असता आपल्याला कडू-वाईट वाटले.।।२।। जे खोट्याचे खरे करून बोलणारे (वदते-बोलणारे) आहेत ते तुम्हाला प्रिय-गोड वाटतात व मी कडू वाटते.।।३।। (माझं तरी काय अडलंय!) मी सुद्धा आता तोंडपुजेपणाच करीत जाईन; नाहीतर आपली रात्रंदिवस मौनच राहीन की.।।४।।

**टीका. - चौ. १-(१) सकल एकदां आशा पुरली** - तुमच्यावर येणाऱ्या दुर्धर दुःखाची गोष्ट एकदा बोलले तेवढी पुरे झाली. वाटत होतं की तुमचं होणारं अहित टाकून चांगलं हित करावं; पण त्याचे बक्षीस म्हणजे पहिल्याच तडाक्याला माझी जीभच तुम्ही ओढून कापून काढली. आता तुमच्या प्रश्नाचे उत्तर देण्यास दुसरी जीभ तयार केली पाहिजे. आता खरे बोलले की ही जीभ गेलीच. भाव हा की गप्प रहा नाहीतर जीभ काढवून टाकीन असे म्हणालात ते तुमच्या याच जिभेने म्हणालात की आता नवी आणलीत? गप्प रहा म्हणून दरडावून आता तुम्हीच म्हणता की बोल, खरं सांग. याचा अर्थ काय? मी खरे बोलले तरी तुम्हाला ते पहिल्याने जसे खोटे वाटले तसेच वाटणार; व मी खरे बोलणारी असल्याने मला पहिल्यासारखेच बोलावे लागणार व मग तुम्ही काढवणार माझी जीभ ! एवढे आडलंय काय माझं !

**चौ. २. (१) फोडाया शिर योग्य अभागें** - तुम्हाला, स्वामिनीला दोष देण्यात

काय अर्थ ! माझेच भाग्य खोटे; म्हणून तर माझ्या अभाग्याची बातमी मला ऐकावी लागली व अभाग्य माझ्या डोळ्यांना सहज दृष्टीस पडले. तुमची दासी म्हणून ते माझे अभाग्य; मालकिणीचे अभाग्य उगवलं की मग दासीचे भाग्य कुठून फुलणार? तुमच्या भल्याची गोष्ट सांगायला गेले तर माझ्यावरच घसरलात. तुमचाच तेवढा मला आधार, नी (आणि) तुमचे हितचिंतन केल्याशिवाय या माझ्या अभागी डोसक्याला राहवत नाही. त्यामुळे जिभेला बोलावे लागले. तेव्हा अपराधी आहे हे माझं टाळकं. ते फोडून टाकणंच अगदी योग्य आहे. **हिताचे सांगत असता ऐकणाराला ते अहितकर वाटणे हे बोलणाराचेच दुर्भाग्य होय. 'मत हितकर तुज रुचे न तैसें । काळवशा कटु भेषज जैसें ।** (६|१०|५) असे उघड बोलण्यास अवकाश आहे म्हणून सर्व दोष आपल्याच दैवाला देते. **अभागी माणसाला उपदेश करण्याची पाळी एखाद्यावर येणे हे त्या उपदेशकाचे अभाग्यच !** पेरलेले बी न उगवणे हे अभाग्याशिवाय कसे घडणार? (क) या चौपाईतील पहिल्या चरणात माझे किंवा तुमचे हे शब्द नसल्याने 'फोडाया शिर योग्य अभागें' हा चरण कैकयीकडेही चांगला लागतो. तुमच्या हिताचे मी सांगत असता ते तुम्हाला रुचत नाही व दुःखद वाटते यावरून तुमचे कपाळ फोडण्यालायक अभागे आहे; तुमच्या कपाळी अभाग्यच लिहिलेले दिसते !

**चौ. ३. (१) सत्य असत्या बनवुनि वदते । ते अपणां प्रिय; - येथे सामान्यपणे अधिकारी, सत्ताधीश गर्भश्रीमंत, लोकांच्या स्वभावाचे चित्र रेखाटले आहे.** वदते = वदणारे - खऱ्याचे खोटे व खोट्याचे खरे करून सांगणारे वक्ते अशा लोकांना प्रिय असतात. भाव हा की **प्रिय बोलणारे असत्यवादी असले तरी ते गोड वाटतात व सत्य बोलणारे अप्रिय बोलतील ते द्वेष्य ठरतात, ते डोळ्यांत सलू लागतात.** म्हणजेच हांजी हांजी करणारे तोंडपुजे स्वार्थसाधू लोक जगाला प्रिय वाटतात. तसेच तुमचे आहे असे ठरले, असे कुबडी म्हणते. आपण स्वतः असत्य बोलती आहे व पुष्कळ असत्य बोलणार आहे ते खरे मानले जावे व कोणी खरे सांगेल ते खोटे वाटावे म्हणून राणीचे अंतःकरण चांगले भारून ठेवीत आहे. माझ्याशिवाय सत्य वक्ते कोणी नाहीत. बाकी सर्व तोंडपुजे, स्वार्थी, लबाड, दांभिक आहेत हे पक्के ठसवीत आहे. कौसल्येला

गर्व झाला आहे. राजा कपटचातुर्य करतो हे धादांत खोटे बोलली आहे व पुढे पुष्कळ असत्य बोलावयाचे आहे. ते सर्व खरे वाटून रामाला वनवासास पाठविण्यास राणी तयार होईल हे ध्येय गाठावयाचे आहे व त्यासाठी राणीची खरी एकच हितचिंतक व सत्याची प्रत्यक्ष मूर्ती म्हणजे मंथरा हा शिक्का मारून घ्यावयाचा आहे. त्याचा हा पाया भरला जात आहे. **'सुलभाः पुरुषा राजन् सततं प्रियवादिनः । अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः'** (वा.रा. ३।३७।२) **'प्रियवाणी ऐकति जे बदती । ऐसे जगिं नर निकाय असती ॥ वचन परमहित कर्ण-कठोरही । श्रोते वक्ते प्रभु नर अल्पही'** (६।९।८-९) असे रावणपुत्र प्रहस्ताने रावणास भर दरबारात सांगितले आहे. मी दासी असून तुम्हाला अप्रिय होऊन माझे कसे चालेल; म्हणून - **चौ. ४. (१) तोंडपुजेपण मी हि करीन** किं - यापुढे मीसुद्धा तोंडदेखले बोलत जाईन म्हणजे तुम्हाला वाईट वाटणार नाही व तुम्हाला मी अप्रिय ठरणार नाही. पण मला ते मुळीच आवडत नाही. कधी तसे केले नाही; कारण ते माझ्या स्वभावातच नाही. बरे मी तुमच्या सतत संगतीत राहणारी त्यामुळे उपजत स्वभावानुसार एखादे वेळी अप्रिय बोलून जाणे अशक्य नाही; म्हणून तोंडपुजेपणा करणे साधत नाही असे वाटले तर मी आपली रात्रंदिवस मौनच राहीन मग तर होईल ना तुमच्या मनासारखे? मी माझ्याच तोंडाला कुलूप घातले की तुम्हाला दुःख नाही. मला वाईटपणा नाही व खोटे बोलल्याचे महापाप मला लागणार नाही. अशा प्रसंगी सत्यवादी सेवकाची मोठी कठीण स्थिती असते. तो स्वतःच्या पायांवर उभा राहणारा धट्टाकट्टा असला तर अशा मालकाच्या सेवेला राहणारच नाही. मीसुद्धा आत्ता या क्षणाला निघून गेले असते पण पडली मोठी भाग्याची ! पहा तर खरी :

***हिं.*** ***। करि कुरूप बिधि परबस कीन्हा । बवा सो लुनिअ लहिअ जो दीन्हा ॥५॥***
***। कोउ नृप होउ हमहि का हानी । चेरि छाड़ि अब होब कि रानी ॥६॥***
***। जारै जोगु सुभाउ हमारा । अनभल देखि न जाइ तुम्हारा ॥७॥***
***। तातें कछुक बात अनुसारी । छमिअ देबि बड़ि चूक हमारी ॥८॥***

***म.*** ***। करुनि कुरूप विधी परवश करि । उप्त उगवतें दत्त मिळे परि ॥५॥***
***। नृप हो कोणि अम्हां का हानी । सुटुन दासिपण होणं कि राणी? ॥६॥***

*। योग्य जाळण्या स्वभाव अमचा । बघण्या क्षम ना तोटा तुमचा ॥७॥*
*। बदलों म्हणून अल्प तें काहीं । क्षमणें देवी ! चूक महा ही ॥८॥*

**अर्थ :** विधात्याने कुरूप करून मला पराधीन करून ठेवली आहे. परंतु (परि) जे पेरले असते तेच उगवते व दिले असेल तसे मिळते.॥५॥ (त्यांस काही इलाज नाही.) कोणी का राजा होईना त्यात आमची काय हानी आहे (कोणी राजा झाला तरी) दासीपणा सुटून मी राणी का होणार आहे? (मात्र राणीपणा सुटून आपण दासी व्हाल)॥६॥ आमचा हा स्वभाव आग लावण्यास योग्य आहे कारण तो तुमचे अहित (तोटा) पाहण्यास समर्थ (क्षम) नाही. (पाहू शकत नाही.) (तुमचे अहित पाहू शकत नाही म्हणून आमचा स्वभाव (दुसऱ्यांस) जाळण्यास योग्य आहे हा गूढार्थ).॥७॥ म्हणून तर आम्ही काही थोडेसे बोलून गेलो तरी देवी ! ही आमची मोठी चूक झाली ती आपण क्षमा करावी.॥८॥ (आता अशी चूक होऊ नये म्हणून मौन राहू म्हणजे झाले.)

**टीका. चौ. ५ (१) करुनि कुरूप बिधि परबश करि -** माझे नशीब इतके सिकंदर की एक तर विधात्याने मला तुमच्या सारखी सुंदर केली नाही. कुबडी, तीन ठिकाणी कुबडी केली; (भराभर चालवत नाही !) कुलहीन दासी बनवली आणि तुमच्या स्वाधीन केली. ज्यांचे हित करावे त्यांनीच आमच्यावर घसरावे, हे आमचे प्रारब्ध ! पण करावे तसे भरावे; विधाता तरी काय करणार? पूर्वी चांगले दिले असले तर आता चांगले मिळायचे. (क) गूढ भाव हा की मी कुरूप म्हणून पराधीन झाले; पण तुम्ही अत्यंत सुरूप म्हणून राणी होऊनसुद्धा पराधीन होणार ! पण तुमच्या प्रारब्धात तेच असले तर चुकणार कसे? प्रारब्धानुसार उलटी बुद्धी व्हायचीच.

**चौ. ६ - (१) 'नृप हो कोणि अम्हां का हानी -** क्षोभ कां झाला याचे येथे आगळवे उत्तर आहे. राम राजा झाला म्हणून आमची पराधीनता वाढेल असे नाही; आणि भरत राजा झाला म्हणजे आम्ही सुंदर होऊ व भरत आम्हाला एखाद्या मांडलीक राजाची पट्टराणी करतील असेही नाही. आमच्या कपाळचा दासीपणा काही चुकत नाही. तेव्हा कोणी का राजा होईना - राम होवो की भरत, शत्रुघ्न, लक्ष्मण होवोत. आम्हाला लाभ नाही नी हानी नाही.

दासी एके दासीच राहणार. परंतु राम राजा झाला तर तुम्ही सुंदर राणी असून दासी व्हाल म्हणून माझा क्षोम झाला. 'अम्हां का हानी' यांत ध्वनी आहे की तुमची हानी आहे. कोणती ते दुसऱ्या अर्थाने वर दाखविले आहे. स्वतःचा गुप्त स्वार्थ हा आहे की भरताला राज्य मिळवून दिले म्हणजे कैकयी राणीचीसुद्धा मी राणी होईन. ती माझ्या मुठीत राहील, माझी पराधीनता जाईल हा मोठा लाभ होईल. राम राजा झाला तर आमची हानी नाही, तुमची (दोघांची) आहे. भरत राजा झाला तर लाभ तुम्हाला व आम्हालाही. भरत अयोध्येत आल्यावर कुबडी नटून-सजून समोर आली ती याच भावनेने.

**चौ. ७ (१) योग्य जाळण्या स्वभाव आमचा** - ही स्वभावोक्ती आहे. आग लागो माझ्या स्वभावाला, असे स्त्रिया अशा वेळी म्हणावयाच्याच. भाव हा की आपले हित होऊ नये, असे तुम्हाला वाटत असता आम्हाला मनात जळण्याचे काही कारण नाही; पण आमच्या स्वभावामुळे आमच्या मनात क्षोभ झाला. हा स्वभाव जर जाळता आला असता तर तुमची दुरुत्तरे सहन करावी लागली नसती. राजा मरो राणी सती जावो उपाध्यायाचे काय बिघडते? पण स्वभावाला औषध नाही. 'स्वभावो दुरतिक्रमऽः' म्हणतात ते अगदी खरे ! **(क) कोणाला जाळण्यास योग्य** याचा स्पष्ट उल्लेख नाही; म्हणून गूढ भाव हा आहे की तुमचा तोटा होऊ नये असे तुम्हाला वाटत असल्यास आमचा स्वभाव तुमच्या वैऱ्यांच्या सुखाला जाळण्यास योग्य आहे; त्याचा तुम्ही योग्य फायदा करून घ्या व होणारा तोटा, हानी वाचवा. येथे स्पष्ट सुचविले की आमच्या चित्तात जो क्षोभ झाला तो तुमचे अकल्याण-वाईट होणार अशी खात्री झाली म्हणून झाला. सुचविले की आम्ही स्वामिनिष्ठ सेवक आहोत. तुम्ही म्हणालात तशी कुचाळखोर दासी नाही. कुरूप, कुबड प्रारब्धाने मिळाले आहे. ते बदलता येत नाही.

**चौ. ८ (१) बदलों अल्पसें काहीं** – भाव हा की आणखी पुष्कळ गोष्टी सांगण्यासारख्या आहेत. सांगितले ते उगाच थोडेसे, ते काहीच नाही. परंतु **ज्याला जे आवडत नाही व खोटे वाटते ते त्याला अधिकार नसणाराने सांगणे चूक आहे.** (क) देवी - आपण देवी आहात; **'क्षमाशीलाहि देवाः' स्खलनशीला**

मनुष्याः' देवदेवी क्षमाशील असतात आणि मनुष्ये चुका करतात. आम्ही तर स्त्री, कुबडी आणि दासी आमच्याकडून अगदी घोडचूक झाली यात काही नवल नाही. आपण क्षमा करावी. आता पुन्हा असली चूक होणार नाही अशी खबरदारी घेऊ. भाव हा की आता आणखी बोलणे, खरे सांगणे म्हणजे चुकांचा महासागरच पदरात घेणे आहे; म्हणून तुम्ही काही विचारू नये नी आम्ही काही सांगू नये. आम्हाला काय करायचे वाईटपणा घेऊन ! तुम्ही नी तुमचं प्रारब्ध, काय व्हायचे ते होईल व काय होणार ते दिसतेच आहे म्हणा !

*हिं.दो.* *। गूढ कपट प्रिय बचन सुनि तीय अधरबुधि रानि ॥*

*॥ सुरमाया बस बैरिनिहि सुहृद जानि पतिआनि ॥१६॥*

*म. दो.* *। गोड गूढ कपटी वचें, स्त्री तामसमति राणि - ॥*

*॥ सुरमाया-वश, वैरिणिसि सुहृद्, प्रतीती मानि ॥१६॥*

**अर्थ :** गोड (प्रिय) गूढ व कपटी वचनांमुळे व सुरमायावश झाल्याने, स्त्री, तामस बुद्धी राणी वैरिणीला सुहृद समजली आणि तिच्यावर विश्वास ठेवती झाली ॥१६॥ (सुहृद् मानि आणि प्रतीती मानि असा अन्वय) ॥दो. १६॥

**टीका - (१) दो. गोड गूढ कपटीवचें** - कुबडीला कैकयीने बजावले होते की कपट व छल (लपवालपव) सोडून खरे सांग; म्हणून तिने कपट व छल यांचा त्याग केला असे नाही. ऐकणाराला त्यात कपटाचा अंश सहज दिसणार नाही इतके ते गुप्त ठेवले. गूढ कसे व गूढार्थ काय हे मागील टीकेत प्रत्येक ठिकाणी दाखविले आहे. **(क) गोड** - प्रिय एवढ्याचमुळे की प्रत्येक वचनात राणीच्या हितकर्तृत्वाचा डांगोरा उघड उघड पिटला आहे. स्वतःच्या भाग्याची निंदा, चूक झाली म्हणणे, क्षमा मागणे हे सर्व कपट आहे. सुरमाया = देव माया = गिरा, शारदा. **'तात ! न कैकइ दोषि, गत गिरा मतिस फिरवून'** (२।२०६) असे सर्वज्ञ सर्वदर्शी भरद्वाज भरतास पुढे म्हणाले आहेत. शारदारूपी सुरमायेने आपला प्रभाव कैकयीवर केव्हा पाडला हे टीकेत पूर्वीच दाखविले आहे. ख. डे. मागील तीन चौपायांत कुबडी स्वतःला मोठी समजू लागली आहे हे तिने स्वतःबद्दल अनेक वचन वापरण्यावरून दिसते. प्रथम बोलताना केव्हा

एकवचन (मी) व केव्हा बहुवचन (हम, आम्ही) वापरले आहे. पण दुसऱ्या भाषणात स्वतःबद्दल **बहुवचन वापरून राणीशी बरोबरीचे, सुहृदाचे, सखीचे नाते सुचविले आहे**. कैकयीने 'आली' म्हटले. (चौ. १५।४) त्याचा फायदा घेतला. आता कैकयी तिला दासी न समजता सखी-सुहृद् - हितकर्ती समजू लागली. **(ख) स्त्री, तामसमति, राणि, सुरमायावश** - कुबडीच्या वचनावर विश्वास का बसला याचे कारण सांगतात. एकतर स्त्री, स्त्रीस्वभाव; त्यात तामस मति = तमोगुणी बुद्धि असलेली; त्यात राणी आणि त्यातही सुरमायेने बुद्धी फिरविलेली. (गत गिरा मतिस फिरवून २।२०६) या सर्व गोष्टींमुळे दासीचे कपट ओळखता आले नाही. **भोळ्या माणसांना धूर्तांचे कपट कळत नाही.** (ग) अधरबुधि (हिं.) यात अधर हे विशेषण आहे. याचा अर्थ संस्कृतमध्ये हीन, हलका, खालचा; म्हणून अधर = खालच्या प्रतीची, बुद्धी असलेली = अधरबुद्धि, खालच्या प्रतीची बुद्धी = तमोगुणी, तामस; म्हणून तामसमति = तमोगुणी बुद्धी असलेली. सत्व, रज, तम आदी गुणांचा उतरता क्रम आहे. सर्वात खालचा तमोगुण. देवी शब्दाने पूर्वी सत्वगुण सुचविला आहे व येथे तमोगुण सांगितला. सत्वगुणाचे कार्य रामप्रेम प्रथम दिसले व आता तमोगुणी मतीचे - कुमतीचे. कार्य शत्रूला हितकर्ता समजणे हे दिसू लागले. '**तव हृदिं बसे कुमति उलटी, तरि । अहिता हित मानितां मित्र अरि**' (५।४०।७) कुबडी वैरीण असून राणी तिला सुहृद (मित्र, हितकर्ती) मानू लागली. सत्वगुणप्रधान तमोगुणी बुद्धीचे प्रतीक कैकयी आहे हे पूर्वीच सांगितले आहे. (घ) सुरमायेने सत्वगुण निष्क्रिय करून तमोगुणाला गती दिली. त्याचे कार्य '**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसाऽऽवृता । सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी**' (भ.गी.) आहे. याचे कार्य अज्ञान, मोह (भ्रम) निद्रा, क्रोध, भय, मद, विषाद इत्यादी आहेत. हे सर्व कैकयीच्या ठिकाणी प्रगट झालेले आता हळुहळु दिसतील. वैरीण आहे हे ओळखता आले नाही हे **अज्ञान** आहे. सुहृद वाटू लागली हा **भ्रम**, विपरीत भावना आहे; उलट भावना आहे. राम सर्वांचे सुहृद आहेत ते आता शत्रू वाटू लागतील. कृष्ण सर्पिण असून तशी ओळखता आली नाही हे अज्ञान आणि सुवासिक फुलांची सुखदायक माळ वाटली हा भ्रम, विपरीत

ज्ञान. स्त्री असल्याने सहज जडता दोष असावयाचाच. 'नारि सहज जड अज्ञ' (१।५७ रा.)

(२) कुबडीने केलेल्या या दुसऱ्या भाषणात राम, कौसल्या किंवा राजा यांची उघड उघड निंदा मागच्यासारखी नाही. पण या भाषणाने **दासी भिल्लीणीच्या हाती राणीची भोळी, तमोगुणी बुद्धिरूपी बळकट दोरी सापडली. आता ही दोरी राज्याभिषेक वार्ता राणीला न कळणे या झाडाला बांधली की मत्सररूपी भिल्लाला वर बसविण्यास वेळ लागणार नाही.** (१३।४ तु.प.)

**हिं.** ***। सादर पुनि पुनि पूँछति ओही । सबरी गान मृगी जनु मोही ॥१॥***

***। तसि मति फिरी अहइ जसि भाबी । रहसी चेरि घात जनु फाबी ॥२॥***

**म.** ***। घडि घडि सादर तिला विचारित । शबरी-गानिं मृगी जणुं मोहित ॥१॥***

***। जेविं भावि तेवीं मति फिरली । घाव चुके न किं दासि हर्षली ॥२॥***

**अर्थ** : राणी वारंवार आदराने तिला अशी विचारीत आहे की जणू शबरीच्या - भिल्लीणीच्या गाण्याने हरिणीच मोहित झालेली आहे.॥१॥ प्रारब्धाप्रमाणे राणीची बुद्धि फिरली व आपला घाव चुकला नाही असे वाटून कुबडीला हर्ष झाला.॥२॥ (हर्षली = रहसली. ४।१ टी.प.)

**टीका. चौ. १ - (१) घडि घडि सादर विचारित** - ज्या राणीने जिला गप्प रहा म्हणून दरडावली, कुबडी, कुचाळ, स्त्री, दासी (दो.१४) म्हणून उपहास केला तीच राणी त्याच कुबडीला आदराने पुनः पुन्हा विचारीत आहे, विनवित आहे. तिने स्पष्ट बोलावे म्हणून ! याचेच नाव वश होणे. केवढा शब्दशक्तिचा व सुरमायेचा प्रभाव ! **(क) शबरी** - शबर, भिल्ल, जातीची स्त्री - भिल्लीण. शबर व किरात या म्लेंच्छ जाती = चांडाल भेद आहेत. फासेपारधी म्हणजे शबर असे त्यांच्या धंधावरून म्हणता येईल. पूर्वी किराती = भिल्लीण म्हटले आहे. (१३।४ पहा) शबरी भिल्लीण प्रसिद्धच आहे. 'भेदाः किरात शबर पुलिन्दा म्लेंच्छजातयः' (अमरे). **म्लेंच्छ कोण? 'गोमांसभक्षको यस्तु लोकबाह्यंच भाषते ॥ सर्वाऽऽचारविहीनोऽसौ म्लेंच्छ इत्यभिधीयते' (सूतसंहिता) (ख) फासेपारधी** (भिल्लांची एक जात) वनात फास-पाश-मांडून ठेऊन बाजूला राहून गाणी गाऊ लागतात. मांडलेला फास गुप्त असतो. हरिणे गाण्याच्या नादाला लुब्ध होऊन

लांबून धावत येतात, व मांडलेल्या फासात उभी राहिली तरी त्यांना समजत नाही. फासाचे टोक शबरी जवळ असते. हरिण फासात सापडले असे पाहताच ती फासाचे टोक फार चपलतेने ओढते. आवळते व तो फास त्या हरिण-हरिणींना घट्ट बांधून टाकतो. त्यांना पळून जाता येत नाही. फासेपारधी पशु व पक्षी यांना जिवंत पकडतात. निरनिराळ्या प्राण्यांना पकडण्याचे फास व युक्त्या निरनिराळ्या असतात. हरिणांना मोहित करण्यास गायन ही युक्ती वापरतात. (ग) राणी व दासी स्त्रिया आहेत म्हणून मृगी व शबरी हे स्त्रीलिंगी शब्द वापरले. हरिणींना पकडण्यात गाण्याचे काम बहुधा फासे पारधिणी करतात. पहिल्या वेळचे कुबडीचे भाषण गाण्यासारखे मधुर नव्हते; पण या भाषणात राणीचे हित हाच मुख्य विषय उघड उघड प्रतिपादन केला. 'देवी' म्हटले व क्षमा मागितली. यामुळे राणी तिच्या शब्दांवर मुग्ध झाली. मोहीत झाली. मोह हेच तमोगुणाचे मुख्य लक्षण आहे. (घ) हरिणीला पुढील परिणाम जसा कळत नाही तसेच राणीचे झाले आहे. कुबडीच्या गोड गोड पण कपटी गूढ शब्दांवर विश्वास ठेवणे म्हणजेच मोहित होणे. ती हरिणी जशी ठार मारली जाते किंवा मरेपर्यंत बंधनात व पारतंत्र्यात राहते (विकल्यावर व विक्रीपर्यंत). तसेच राणीचे जीवन मानरहित, पराधीन होणार हे सुचविले. सुशील स्त्रियांना वैधव्य मरणाहून अधिक दुःखद वाटते व अकीर्ती तर कोटि मृत्यूंपेक्षा अधिक दाहक असते. 'संभावितास अपयश लाहो । मरण कोटिसम दारुण दाहो.' (२।९५।७).

**चौ.२ - (१) जी राणी कुबडीची जीभ ओढून काढण्याची धमकी देत होती तीच इतकी मोहित कशी झाली? 'जेहिं भावि तेवीं मति फिरली' - 'हरि इच्छा, भावी बलवान् अति'** (१।५६।६) असे महेश्वर शंकरास सुद्धा म्हणावे लागले. सती-भवानी-देवीचीसुद्धा बुद्धि फिरली ! मग ही राणी तर बिचारी भोळी. छक्के-पंजे माहीत नसलेली. टक्के-टोणपे न खाल्लेली परमोत्तम सुखात व ऐश्वर्यात, लाडात वाढलेली अल्लड स्त्री; तिचा बिचारीचा काय दोष? रामायणातील मनुष्यपात्रात अत्यंत कीव करण्यासारखी, मरेपर्यंत सर्व बाजूंनी दुर्दशा जर कोणाची झाली असेल तर कैकयीची. बाकी सर्वांच्या दुर्दशेला, दुःखांना मुदत

व अंत आहे. कीर्तीचा अनुपम सुगंध आहे. रामप्रेमभक्तीचा ओलावा आहे. पण तेल नाही तूप नाही, हाती धुपाटण्याचे तुकडे मरेपर्यंत वाट्यास आले फक्त कैकयीच्या ! **व याला कारण एकच; आपल्या सौंदर्याच्या मदाने कुरूप विप्राचा निष्कारण केलेला अपमान** ! त्याचे फळ कुरूप कुबडीच्या निमित्ताने अपमान, अकीर्ती, निंदा इ. रूपाने अनंत पट होऊन तिच्या पदरात पडत आहे. **'हासत कर्म करावे भोगावे रडत तेंचि परिणामीं'** म्हणूनच शंकर त्या शूद्रास सांगतात की **'आतां कर न विप्र अपमान हि । जाण किं संत अनंत समान हि'** (७।१०९।१२) विप्रशाप प्रभावाने विप्राचा वरसुद्धा शापानुकूल ठरला. कारण की आधी शाप दिला गेला व नंतर वर दिला. **नल-वानराला ऋषींनी दिलेला शाप वररूप ठरून कीर्तिदायक झाला. याचे कारण सत्संगती** ! व **कैकयीला मिळालेला वर शापरूप ठरला याचे कारण कुसंगति** ! म्हणूनच पुढे कवि कैकयी संबंधानेच म्हणतात, **'कोण न नासे मिळुनि कुसंगति । नाहिं चतुरता उरत नीचमतिं** ।।२।२४।८।।

(२) **घाव चुके न किं वाटि हर्षली** - कैकयीच्या वृत्तीत एकाएकी पडलेला हा फरक पाहून कुबडीला वाटले, खात्री झाली की आपला घाव बरोबर लागला. त्याने निश्चियात्मक बुद्धिला पळविली व संशय, भीती व चिंता यांची चिन्हे मुखावर उमटविली आहेत. दशरथावरील श्रद्धा उडून माझ्यावर बसली आहे. आता आपले कार्य साधणार असे वाटले म्हणून कुबडीला हर्ष झाला. या हर्षाने कुबडी खल ठरली. **दुसऱ्याच्या अहिताने हर्ष होणे हे खल लक्षण आहे.** 'परहित हानि लाभ त्यां वाटत । हर्ष विनाशिं विषादहि नांदत' (१।४।२) कुसंगतीचा परिणाम असला, भोळेपणाचे व पूर्व पापाचे फळ असले, रामावतारातील मुख्य कार्यास मदत होणार असली तरी लोक कल्पान्तापर्यंत कैकयीलाच खल म्हणणार. भरतसुद्धा आर्त दशेत तसेच म्हणणार !

**उपदेश** - सुसंगति, सत्संगति मिळाली नाही तरी कुसंगतीपासून फार दूर राहण्याचा प्रयत्न प्रत्येकाने केला पाहिजे हे या दोन स्त्रियांच्या चरित्रांवरून शिकावयाचे आहे. विशेषतः उच्च कुळांतील धनाढ्य स्त्रियांनी अशा दासदासींशी सलगी करणे तर सर्वनाशाचे सोपे साधन आहे.

हिं. ।'तुम्ह पूँछहु मैं कहत डेराऊँ । धरेहु मोर घरफोरी नाऊँ ॥३॥
।सजि प्रतीति बहुबिधि गढ़ि छोली । अवध साढ़साती तब बोली ॥४॥

म. ।पुसा तुम्हीं भय वदण्या गमतें । घरफोडी मज दिलें नाम तें ॥३॥
।प्रचिति करुनि नव कुभांड रचते । पुरसाडेसाती तैं वदते ॥४॥

**अर्थ** : तुम्ही मला विचारता पण मला बोलण्याची भीती वाटते कारण तुम्ही आधीच माझे घरफोडी हे नाव ठेवले आहे.॥३॥ (या प्रमाणे बोलून राणीच्या मनात) विश्वास (प्रतीति - प्रचिति) उत्पन्न करून तिने नवीन कुभांड रचले व अयोध्यापुरीची साडेसाती बोलू लागली.॥४॥

**टीका. - चौ. ३. (१) पुसा तुम्हीं भय वदण्या गमतें** - वारंवार आदराने विचारले असतांही न बोलण्याचे कारण सांगते. आपला अपमान करावा असा माझा हेतु नाही; परंतु तुम्ही माझी जीभ काढविण्याची धमकी दिली असल्याने व तुमच्या हाती सत्ता असून मी अनाथ असल्याने आपली जीभ गेली तर आपले कसे होईल अशी धास्ती (भीती) मला वाटते व त्यामुळे बोलण्यास धीर होत नाही. **(क)** त्यातही एकदा माझे नाव घरफोडी असे ठेवले आहे. मला जे खरे सांगायचे आहे ते पहिल्यासारखेच असल्याने आणखी नव्या नव्या पदव्या किती व काय मिळतील याचीही धास्ती वाटते. बरे अशा पदव्या मिळाल्या म्हणजे मला बाहेर पाऊल टाकता येणार नाही व दासीचे कामही करता येणार नाही. आणि तुम्ही टाकलीत तर उपाशी मरावे लागेल. पण दासीने स्वामिनीची आज्ञा पाळलीच पाहिजे म्हणून बोलणे भाग आहे.

**चौ. ४ - (१) प्रचिति करुनि** - पहिल्या भाषणाने दासी राणीचा विश्वास संपादन करू शकली नाही; म्हणून राणीच्याच शब्दांचा आधार घेऊन पवित्रा बदलून तिने राणीला पूर्ण विश्वासात घेतली. ती इतकी की कुबडीचे प्रत्येक वचन व त्यातील प्रत्येक शब्द म्हणजे ब्रह्मवाक्य वाटण्याइतकी तिच्या अंतःकरणाची तयारी केली. पुढील कार्य कसे साधावयाचे याचा चांगला विचार केला. **(क) नव कुभांड रचते** - अनेक नवीन काल्पनिक खोटे आरोप कोणावर, कसे लादावयाचे व त्याने पतिद्वेष, कौसल्याद्रोह, रामविरोध, राज्यलोभ इत्यादी भावनांनी राणीचे हृदय कसे भारावयाचे हे सर्व मनात ठरविले. याचेच नाव

कुभांड रचले व आता घरफोडी, घरभेदी बोलण्यास सुरुवात करील. **प्रथम** ती कौसल्येच्या महालात लागलेले **मोहोळ काढणारी मिल्लीण बनली**. मोहोळ अंतःपुरात असल्याने व रात्री तेथे सहज प्रवेश होणे कठीण असल्याने ती घरफोडी बनली; नंतर कैकयीमृगीला मोहित करणारी व अयोध्यापुरीची साडेसाती बनली.

(२) **अयोध्येची साडेसाती** - पूर्वी सरस्वतीला 'दुःसह दुःखद ग्रहदशा' (१२।८) म्हटले आहे. साडेसाती सर्वांच्या परिचयाची असलेली शनि ग्रहाच्या योगाने तीस वर्षांत एकदा येऊन साडेसात वर्ष टिकणारी व अत्यंत दुःखद होऊ शकणारी ग्रहदशाच आहे. इतर ग्रह व विशेषतः मूळचा गुरु अनुकूल असून साडेसातीच्या वेळी अनुकूल असेल तर काही राशींची साडेसाती लाभदायक ठरते. कर्कराशीच्या साडेसातीत विशेष क्लेश होतात. राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न या चौघांची कर्क रासच आहे. रामचंद्रांच्या जन्मकुंडलीत गुरु, शनि, मंगळ व रवि हे अनुक्रमे १, ४, ७, १० या केंद्रांत आहेत. या चार उच्चीच्या ग्रहांचे मुळातच परस्पर केंद्र व प्रतियोग हे कुयोग आहेत. चंद्र-शनि, वामकेंद्र योग आहे. शनि उच्चीचा व चंद्र स्वगृहीचा लग्नी आहे. वा. रा. प्रमाणे १८ वे वर्ष लागल्यावर राम वनवास प्रसंग आला आहे. १८ व्या वर्षी शनि मूळच्या रवीवरून दशमातून जातो. म्हणजे मेष राशीत शेवटच्या चरणांत असणार म्हणजे राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न यांपैकी कोणालाही साडेसाती असणे शक्य नाही. पण दशरथांची वृषभ रास असल्याने दशरथांसच साडेसाती आहे. राजाची साडेसाती त्याच्या प्रजेला व कुटुंबाला अंशतः भोगावी लागतेच म्हणूनच पुरीची - अयोध्येची साडेसाती म्हटले आहे ते योग्यच आहे. रामचंद्रांना साडेसाती असती तर अवध साडेसाती म्हणता आले नसते. शनि बारावा आला की साडेसातीचा प्रारंभ होतो व तिसरा झाला म्हणजे साडेसाती संपते. राशी परत्वे कोणती तरी अडीच वर्षे त्रासदायक होण्याचा संभव असतो. **मात्र हे लक्षात ठेवावे की जन्मकालीन ग्रहांची विशिष्ट अनुकूल परिस्थिती असेल तर साडेसाती मुळीच त्रासदायक होत नाही.** कित्येकांना तर भरपूर फायदा होतो व पुष्कळ सुख मिळते. मूळचे ग्रह बलवान, उच्चीचे असून चंद्र गुरु

शुभयोग असेल तर त्या व्यक्तीस विशेष त्रास होत नाही. रामचंद्रांच्या कुंडलीत लग्नी स्वगृहीचा चंद्र उच्चीच्या गुरुने युक्त असल्यामुळे त्यांना स्वतःस शारीरिक क्लेश झाले नाहीत. **साडेसाती या नावाने घाबरण्याचे कारण नाही** व नुसते शनिवारचे एकभुक्त उपवास केल्याने साडेसातीची पीडा टळेल असे नाही. तसे मानणे केवळ भ्रम आहे. दशरथांचे जन्म नक्षत्र रोहिणी; सूर्य मंगळ व राहू यांनी रुद्ध झाले असल्याचा वा.रा. उल्लेख आहे. तो मागे टीकेत दिला आहे. (४|५ टीकेत वा.रा. २|४|१७-१८ पहा).

हिं *। प्रिय सिय राम कहा तुम्ह रानी । रामहि तुम्ह प्रिय सो फुरि बानी ॥५॥*
*। रहा प्रथम अब ते दिन बीते । समउ फिरें रिपु होहीं पिरीते ॥६॥*
*। भानु कमल कुल पोषनिहारा । बिनु जल जारि करइ सोइ छारा ॥७॥*
*। जरि तुम्हारि चह सवति उखारी । रुँधहु करि उपाउ बर बारी ॥८॥*

म. *। सीता राम म्हणां प्रिय राणी । रामा प्रिय तुम्हीं सत्य चि वाणी ॥५॥*
*। असे प्रथम; ते दिवस गत अतां । मित्र होति रिपु काळ बदलतां ॥६॥*
*। भानु कमलकुल - पोषणकर्ता । होइ जलाविण त्यां संहर्ता ॥७॥*
*। सवत बघे करुं तव उन्मूलन । अडवा, घालुन यत्न-सुकुंपण ॥८॥*

**अर्थ :** राणीसाहेब ! सीता व राम तुम्हाला प्रिय व रामाला तुम्ही प्रिय असे जे तुम्ही म्हणालात ते अगदी खरे.॥५॥ (पण) असे पहिल्याने - पूर्वी होते (असे); आता ते दिवस गेले. काळ बदलला (फिरला) म्हणजे मित्र शत्रू बनतात. (व शत्रू मित्र बनतात).॥६॥ सूर्य कमलांच्या संमूहांचे पोषण करणारा असतो (हे खरे) पण तोच पाण्याच्या अभावी त्यांना जाळून खाक (राख) करतो.॥७॥ तुमची सवत तुम्हाला मुळासुद्धा उपटून टाकू पहात आहे. तरी (वेळीच) उपाय रूपी दृढ कुंपण (बारी) घालून तिला अडवा. (तिच्या विरुद्ध प्रयत्न करून आपले संरक्षण करा.)॥८॥

**टीका. चौ.** ५ (१) एखाद्याच्या भावनेत उलटापालट करावयाची असली म्हणजे वक्त्याने कसे बोलावे याचा आदर्श नमुना येथे आहे. वक्तृत्वकलेचा एक अति प्रभावी व विस्तृत नमुना येथील कुबडीच्या भाषणात आहे. राणीला जे प्रिय आहे त्याचा तसाच स्पष्ट उल्लेख प्रथम करते व नंतर पण, परंतु,

मध्ये आणून हळूहळू विरुद्ध भावना जागृत करीत आहे. १५।५-८ या चौपायांत कैकयी जे म्हणाली ते या चौपाईने मान्य करते. पण पुढल्याच चौपाईत त्यावर पाणी फिरवते व त्याला व्यवहारातला सहज पटेल असा सुंदर दृष्टांत देते. (क) मुख्य महत्त्वाचा आहे दुसरा चरण. **'रामा प्रिय तुम्हिं सत्य चि वाणी'** - सांगायचे आहे की रामाचे तुमच्यावर विशेष प्रेम आहे असे जे तुम्ही म्हणालात तो केवळ भ्रम आहे. वस्तुस्थिती त्याच्या अगदी उलट आहे. 'चतुर-कपट सरला ना कळते' हे सुचवायचे आहे ते पुढल्या चौपाईत सुचवील. तुमचे सीतारामांवर अगदी शुद्ध प्रेम आहे हे मात्र अगदी खरे म्हणून तर तुम्ही त्यांच्या राज्याभिषेकाची बातमी ऐकताच मला मी मागेन ते देण्यास तयार झाल्यात.

**चौ. ६. (१) असे प्रथम** - पूर्वी, लहानपणी, होते हे अगदी खरे. भाव हा की आता त्याचे तुमच्यावर मुळीच प्रेम नाही व असेल तरी कसे? व असावे अशी जगरुढी विरुद्ध अपेक्षा तरी का करावी कोणी? लहानपणी आईबापांवर प्रेम असणे स्वाभाविक असते. आता सर्व भाऊ मोठे झाले; ज्याला त्याला आपला स्वार्थ कशांत आहे हे चांगले कळू लागले. विवाह झाले. बायकांवर प्रेम बसले की स्वतःच्या आईबापांवरचे सुद्धा कमी होते. मग इतरांवरचे कमी होईल यात नवल काय? सर्वांत अत्यंत सुंदर पत्नी मिळाली याबद्दल रामाला अहंकार वाटायचाच. आता तर काय स्वतःला राज्य मिळणार ! सर्व सत्ता एकट्याच्या हाती येणार. तेव्हा बाकीचे सर्व भाऊ शत्रूसारखे मनात वाटू लागणारच. भाऊ म्हणजे वडिलार्जित इस्टेटीचा एक भागीदार असेच वाटणे अगदी स्वाभाविक आहे. हे काही सत्य युग नाही ! मग शत्रूवर प्रेम करणारे शत्रू वाटायचेच. **'रिपुरिणलेश न करिंय उरबाबा'** (२२९।२) ही तर राजनीती आहे. म्हणूनच सुभाषितकार म्हणतात की **'न कश्चित् कस्यचिन्मित्रं न कश्चित्कस्यचित् रिपुः ॥ कारणेन हि जायन्ते मित्राणि रिपवस्तथा'**

(२) **मित्र होति रिपु काल बदलतां** - काळाच्या ओघांत विचित्र घटना बनतात. कधी मित्र शत्रू बनतात तर कधी शत्रू मित्र बनतात. काळ अनुकूल असला की पूर्वीचे शत्रूसुद्धा मित्र होतात. पण काल प्रतिकूल झाला, फिरला,

दैव फिरले की मित्र शत्रू बनतात. फार काय **'पुत्रादपिधनभाजां भीतिः'** कौसल्येला काळ अति उजवा आला आहे आणि रामाशिवाय कोणाचेही कुशल नाही असे मी नुसते सुचविले ते एवढ्याचसाठी. यावरून काय ते समजा. रामाचे तुमच्यावर पहिल्यासारखे प्रेम आहे का? प्रेम असते तर राज्याभिषेकाची बातमी तुम्हास सांगणे जरूर होते की नाही? मित्रत्व-प्रेम- कायम टिकत नाही व मित्रसुद्धा शत्रू बनतात हे निसर्गातसुद्धा पाहण्यास सापडते.

चौ. ७ - (१) सूर्यच कमळांना फुलवितो. सूर्याच्या योगानेच कमळे वाढतात; पण तलावातील पाणी आटून गेले म्हणजे तोच सूर्य त्या कमळांना मारून टाकतो की नाही? सुभाषितरत्न भांडागारात १/२ श्लोक याच अर्थाचे फार सुंदर आहेत. **'येनांचलेन सरसीरुह लोचनाया स्वातः प्रभूत पवनादुदये प्रदीपः ।। तेनैव सोऽस्तसमयेऽस्तमयं विनीतः क्रुद्धे विधौ भजति मित्रममित्रभावम्।।** दिवा लावण्याच्या वेळी (त्याच्या उदय काळी) सुंदर स्त्रिया आपल्या लुगड्याच्या ज्या पदराने फार वाऱ्यापासून त्याचे संरक्षण करतात त्याच स्त्रिया त्याच पदराने, त्याच्या अस्तसमयी वारा घालून त्याला अस्ताला नेतात. (विझवितात). दैवाचा क्रोध झाला म्हणजे मित्र असतात ते असेच शत्रू बनतात. **'वनानि दहतो वन्हेः सखा भवति मारुतः ।। स एव दीपनाशाय कृशे कस्यास्ति सौहृदम्'** हा श्लोक तुम्हाला सुद्धा माहीत असेलच.

**चौ. ८. (१) सवत बधे करु तव उन्मूलन** - राम शत्रू बनला आहे एवढे सुचवून समाधान झाले नाही. राम शत्रु बनण्यास प्रेरक कोण हे येथे सुचवीत आहे. कौसल्या तुमची सवत आहे. ती तुमचे मुळापासून उच्चाटन करू पहात आहे. राज्य हे तुमच्या सुखाचे व सत्तेचे मूळ आहे. दशरथ राजे आहेत म्हणून तुम्ही राणी आहात. राज्य रामाला देवविले की तुमचा राणीपणा संपला. कौसल्या राजमाता झाली की सत्ता तिच्या हाती येणारच. मग आजपर्यंत लपवून ठेवलेल्या वैराचे उट्टे काढल्याशिवाय का ती राहील? यातील अर्थ पुढे अधिक स्पष्ट सांगेल. येथे कैकयीला लता मानली आहे. ती दशरथ राजारूपी तरुवर चढून शक्तिमान, प्रसन्न व निश्चिंत आहे. कारण राजा स्वतःच तिचे प्रेमाने लाडाने पोषण व पालन करीत आहे. राज्य रामाकडे गेल्यावर जुन्या

म्हाताऱ्या राजाचे काही चालणार नाही. ती कौसल्या तुम्हाला केव्हाच उपटून टाकील. कौसल्येला हत्तीण मानली आहे. राजाच्या प्रेमाचे व सत्तेचे मजबूत कुंपण तुमच्या भोवती आहे म्हणून तिला काही करता येत नाही. म्हणून आताच, वेळीच चांगला यत्नरूपी भक्कम कुंपण घालून तिला आडवा, विरोध करा. तिला तुमच्याविरुद्ध काही करता येणार नाही असे करा म्हणजे झाले. पुढे दशरथाने कैकयीला करिणीची उपमा दिलीच आहे. **'मदिव मनोरथ सुरतरु फुलला । फळत करिणिनें कीं उन्मुळला'** (२९।८) **'भामिनि ! सांगु उपाय करा जर'** (२१।८) असे पुढे योग्य वेळी म्हणणार आहे. **(क)** या चार चौपायात ठसविले की राम तुमचा शत्रु बनला आहे. त्याच्या आईने तुमचा विनाश करण्यासाठी हा राज्याभिषेकाचा बेत ठरविला आहे. कौसल्या हाडवैरीण आहे हे ठसविले. कौसल्येने आपला डाव कसा साधला व राजा कसा कपटी आहे हे आता ठसवील.

***हिं. दो.*** ***। तुम्हहि न सोचु सोहाग बल निज बस जानहु राउ ॥***
***॥ मन मलीन मुह मीठ नृपु राउर सरल सुभाउ ॥१७॥***

***म. दो.*** ***। निश्चिंत चि सौभाग्य बल निजवश मानां राव ॥***
***॥ चित्त मलिन मुख-मधुर नृप अपला उजू स्वभाव ॥१७॥***

**अर्थ :** सौभाग्याच्या बळावर तुम्ही अगदी निश्चिंत आहात; व राजा आपल्याला वश आहे असे तुम्ही मानता. पण राजा चित्ताने मलीन (पापी,कपटी) असून तोंड मात्र गोड आहे व तुमचा स्वभाव आहे सरळ. (उजू, निष्कपट).।।दो.१७।।

**टीका : दो. (१)** स्त्रियांचे सर्व बळ म्हणजे त्यांचे सौभाग्य, म्हणजे त्यांचा पति. तुम्ही पतीच्या बळावर अगदी निश्चिंत पडलेल्या असता. राजे तुमच्याच महालात झोपतात, तुमच्या मनासारखे करतात व तुमच्याशी अत्यंत प्रेमाने बोलतात-चालतात. त्यामुळे तुम्हाला वाटते की माझ्यासारखी कोणी भाग्यवान नाही व पति, राजा आपल्या मुठीत आहे. या जोरावर तुम्ही कोणाला जुमानित नाही व तुमच्या सरळ स्वभावामुळे तुमच्या पाठीमागे कशी कारस्थाने रचली जातात याची तुम्हाला दाद नाही. **(क)** राजाचे खरे प्रेम आहे कौसल्येवर.

मनाने त्यांचा ओढा तिकडे. पण तुम्हाला संशय येऊ नये म्हणून तुमच्याशी अगदी गोड गोड बोलतात व ते तुम्हाला तुमच्या सरळ स्वभावामुळे खरे वाटते. राजे कपटी, आतल्या गाठीचे व तुम्ही भोळ्या त्यामुळे त्यांचे कपट तुम्हाला कळत नाही इतकेच. **'अनिष्टे सुभगाकारे सौभाग्येन विकल्पसे । चलंहि तव सौभाग्यं नद्याःस्रोत इवोष्णगे॥** वा.रा. २।७।१५॥ सुभगा खलु कौसल्या यस्याः पुत्रोऽभिषेक्ष्यते' (२।८।९).'**'धर्मवादी शठोभर्ता श्लक्ष्णवादीच दारुणः शुद्धभावेन जानीषे तेनैवमतिसंधिता'** (वा.रा. २।७।२४) याच श्लोकांचे सार अगदी सौम्य पण प्रभावी शब्दांत वरील दोहऱ्यांत दिसते.

हिं *। चतुर गँभीर राम महतारी । बीचु पाइ निज बात सँवारी ॥१॥*
*। पठए भरतु भूप ननिअउरें । राम मातु मत जानब रउरें ॥२॥*
*। सेवहिं सकल सवति मोहि नीकें । गरबित भरत मातु बल पी कें ॥३॥*
*। सालु तुम्हार कौसिलहि माई । कपट चतुर नहिं होई जनाई ॥४॥*

म. *। चतुर गभीर राम-माताही । स्वार्थ साधि जैं सुसंधि पाही ॥१॥*
*। आजोळीं भरतास धाडले । रामजननिमतिं जाणां घडलें ॥२॥*
*। सकल सवति मज ठीक सेविती । पतिबल-गर्वित भरतजननि ती ॥३॥*
*॥ कौसल्ये मनिं तुम्हीं बहु सलतां । कपट चतुर येई न ओळखतां ॥४॥*

**अर्थ :** रामाची आई सुद्धा चतुर (धूर्त) व गंभीर (पाताळयंत्री) आहे. सुसंधी पाहून तिने आपला स्वार्थ साधला.॥१॥ राजाने भरतास आजोळी पाठविले ते राममातेच्या मतानेच असे तुम्ही नक्की समजा.॥२॥ सगळ्या सवती माझी चांगली सेवा करतात; (पण) भरताची आई मात्र पतीच्या बळाने गर्विष्ठ (असल्याने घमेंडित) आहे. ॥३॥ (म्हणून) कौसल्येच्या मनात तुम्ही फार सलत आहात; पण कपट करण्यात चतुर (कपट चतुर) असणारी माणसे ओळखता येत नाहीत (त्यांचे कपट ओळखतां येत नाही) ॥४॥.

**टीका. चौ. १ - (१) चतुर गभीर राम-माताही** - चतुर = धूर्त, स्वार्थ साधण्यात हुशार. गभीर (गंभीर) - खोल, पाताळ यंत्री आपल्या मनाचा - विचारांचा ठाव कोणास लागू न देणारा. (क) सुसंधि पाही - भरत पुष्कळ वर्षे येथे नसल्याने राजाचे त्याच्यावरील प्रेम कमी होऊन रामावर अत्यंत वाढले

आहे, ही सुसंधी सापडली. विरहाने जसे प्रेम वाढते तसे दीर्घकाळ दूर राहिल्याने ते कमीही होते. (ख) राम-माताही - यांतील 'ही' शब्द मुळात नाही; पण मुळातील गूढभाव अधिक स्पष्ट करण्यासाठी घातला आहे. ही = सुद्धा - जसे दशरथ कपट करण्यात चतूर आहेत तशीच राम-माता सुद्धा आहे. दशरथांच्या कपट चातुर्याचे वर्णन मागील दोह्यांत व 'नेणां भूप - कपट चातुर्या' (१४।६) यांत केले आहे. (ग) राम आणि त्याची माता सुद्धा चतुर व गंभीर आहे. रामाविषयी असा गर्भित उल्लेख वा. रा. २।८।७-८ मध्ये आहे.

**चौ. २ - (१) ननिअउर** = आजोळ, ननिहाल (हिं.) नाना = आईचा बाप, मातामह. राजा कपट चतुर आणि राम व त्याची माता चतुर व गंभीर - पाताळयंत्री आहेत; हे सांगून आता सांगते की कौसल्या दशरथांनी संगनमत करून कौसल्येच्या आग्रहास्तवच भरताला मामाबरोबर पाठविला. यात तिळमात्र शंका नाही. तसे नसते आणि रामाचे भरतावर पहिल्यासारखे प्रेम असते तर या राज्याभिषेकाच्या वेळी त्यांना का आणविले नसते? **(क)** कुबडीने केलेली राम, दशरथ व कौसल्या यां विषयीची इतर विधाने जशी धादांत कुभांड आहेत तसेच हे म्हणणे आहे. वा.रा. प्रमाणे कैकयीचा भाऊ भरताला नेण्यासाठी मुद्दाम आला होता; व त्याच्या अत्यंत आग्रहावरून कैकयीच्या पूर्ण संमतीने दशरथाने त्यास पाठविले. त्यांच्या बरोबर शत्रुघ्नही गेला. कौसल्येने असे का केले याचे कारण सांगते :

**चौ. ३-४ - (१) सकल सवति मज ठीक सेविती...'** सर्व सवती मनापासून सेवा करतात; पण तुम्ही मात्र कौसल्येची सेवा करीत नाही; त्यामुळे तिला वाटते की हिचा गर्वज्वर उतरवून हिला सेवा करावयास लावीन तरच मी कौसल्या. तुमच्यावर राजाचे प्रेम आहे ते पण तिला पाहवत नाही. रामाला राज्य मिळाले म्हणजे मग पाहीन कशी नाही सेवा करीत ती, असे तिला झाले आहे. अगदी प्रथम **'पाहुन राहि न गर्व मनामधिं'** (१४।३) असे जे कौसल्येविषयी म्हटले त्या गर्वाचाच निराळ्या प्रकारे येथे सवतीमत्सर उत्पन्न करण्यासाठी अधिक प्रभावी भाषेत उल्लेख केला आहे.

(२) **कौसल्ये मनिं तुम्हिं बहु सलतां** - तुम्ही तिची सेवा करीत नाही म्हणून तुम्ही तिच्या मनात सलत आहात. आणि तुमचा काटा काढण्यासाठी तिचा सर्व खटाटोप चालू आहे; पण तो तुम्हाला कसा कळणार. (क) **कपट-चतुर येइ न ओळखतां** - 'चतुर कपट' असा पाठभेद मानसपीयूष मध्ये आहे; पण कपटचतुर हाच पाठ योग्य आहे. 'नेणां भूप-कपटचातुर्या' (१४।६) यांत पूर्वी कपट करण्यातील चातुर्य असाच अर्थ आहे. राममाता कपट करण्यात चतुर आहे हे कोणाला ओळखता येत नाही. मग तुम्ही भोळ्या, एकलकोंड्या असल्याने तुम्हाला कसे कळेल?

***हिं.*** ***। राजहि तुम्ह पर प्रेमु बिसेषी । सवति सुभाउ सकइ नहिं देखी ॥५॥***
***। रचि प्रपंचु भूपहि अपनाई । राम तिलक हित लगन धराई ॥६॥***
***। यह कुल उचित राम कहुँ टीका । सबहि सोहाइ मोहि सुठि नीका ॥७॥***
***। आगिलि बात समुझि डरु मोही । देउ दैउ फिरि सो फलु ओही ॥८॥***

***म.*** ***। प्रेम नृपाचें फार तुम्हांवरि । पाहुं न शकते सवती-मत्सरिं ॥५॥***
***। कपट रचुनि भूपा वश वळवी । रामाभिषेक - लग्ना ठरवी ॥६॥***
***। या कुळिं उचित राम - अभिषेकहि । सर्वां रुचतो मला विशेखहि ॥७॥***
***। बघुनि भविष्य भयें चळचळतें । देवो दैव उलट तिज फळ तें ॥८॥***

**अर्थ :** राजाचे तुमच्यावर फार (विशेष) प्रेम आहे हे तिला सवतीमत्सराने पाहवत नाही.॥५॥ म्हणून तिने कपट रचून राजांना वश करून घेतले आणि रामराज्याभिषेकासाठी मुहूर्त (लग्न) सुद्धा ठरविला.॥६॥ या कुळाला योग्यच आहे की रामाला राज्याभिषेक करावा. सर्व लोकांना ते प्रिय आहे व मला तर विशेष (विशेख) च बरे वाटते.॥७॥ (परंतु) भविष्यकाळाकडे पाहिले म्हणजे भयाने थरकांप सुटतो ! ते फळ दैव तिलाच उलट देवो.॥८॥

**टीका - चौ.** ५ - (१) कैकयीची स्तुति व कौसल्या राम व दशरथ यांची निंदा करीत तिघांना ही कपटी ठरवीत सवतीमत्सराची उत्पत्ती करण्याचा क्रमशः यशस्वी प्रयत्न चालू आहे. सेवा करीत नाही हे सलण्याचे एक कारण सांगितले. येथे दुसरे सांगते की तुमच्यावरील राजाचे विशेष प्रेम तिला बघवत नाहीसे झाल्याने तुम्ही तिच्या डोळ्यांत विशेषच खुपता. याचेच नाव सवतीमत्सर. हा

**सवतीचा स्वभाव येथे दाखविला. (क)** येथे कुबडीच्या कपटाचे कुबड खरोखर फुटले आहे; पण राणी सुरमायेने मोहित झालेली असल्याने कुबडीच्या भाषणातील विसंगती - परस्पर विरोध - तिच्या ध्यानात आला नाही. मागे म्हणाली की, राजाचे खरे प्रेम तुमच्यावर नाही. (दो. १७ पहा) व येथे म्हणते की राजाचे तुमच्यावर विशेष प्रेम आहे. कैकयी मागल्या चौपाईतील मुद्दाच आपल्या मनात घोळीत आहे. प्रतापभानु चरित्रात कपटमुनीच्या भाषणांत तर त्याचे दंभ सहज कळण्यासारखी विसंगती पदोपदी आहे; परंतु बाह्य भपक्यावर भुलून ज्यांनी आपली बुद्धि गहाण टाकलेली असते **त्यांच्या ठिकाणी प्रारब्धवशात पूर्वापार संदर्भाचा विचार करण्याची शक्तीच उरत नाही.** ते त्या वक्तृत्व प्रवाहाच्या धारेबरोबर वहात जात असतात व मागे वळून पाहण्याची ताकदच रहात नाही.

**चौ. ६. (१) कपट रचुनि भूपा बश बळवी** - तुमचा काटा उपटून टाकण्यासाठी नाना प्रकारचे कुभांड रचून राजाला वश करून घेतला आणि राज्याभिषेकाचा मुहूर्तसुद्धा ठरवून टाकला. भरत येण्याच्या आधी राम राजा झाला व सत्ता हाती आली की सगळ्यांचा काटा काढता येईल, हा आहे हेतु. तुम्हाला सुद्धा हा बेत कळू दिला नाही. तुमच्यावर एवढे प्रेम असून राजाने ही अजून तुम्हास दाद लागू दिली नाही. यावरून स्पष्ट ठरले की राजा तुमच्या मुठीतून निसटून कौसल्येच्या मुठीत गेला आहे. राम अतिशय प्रिय झाले तेव्हा राममाता जास्त प्रिय वाटणारच. रामाला राज्याभिषेक होऊ नये असे माझे मुळीच मत नाही. 'नृप हो कोणि अम्हां का हानी'

**चौ. ७ - (१) या कुळिं उचित राम-अभिषेकहि** - या तुमच्या रविकुळात अशी परंपराच आहे की ज्येष्ठ पुत्राला राज्य द्यायचं. **'स्वामी ज्येष्ठ बंधु लघु सेवक हा दिनकर कुळिं शोभन दंडक'** (१५।३) असे जे तुम्ही म्हणालात ते खरे आहे. कुलपरंपरा चालवावी असे कोण म्हणणार नाही? सर्व प्रजेला सुद्धा रामराज्यच आवडत आहे असे नगरात चाललेले उत्सव सांगतात. मला तर रामराज्य होणे विशेषच प्रिय वाटते. रामवैर कैकयीच्या हृदयात दृढमूल होण्यापूर्वी रामराज्याभिषेकाविरुद्ध बोललेले उलटा परिणाम करते हे पूर्वानुभवावरून कुबडीला कळले आहे. रामकैकयी यांच्या आपसातील प्रेमाचे वर्णन असेच केले

आहे. येथे सुद्धा विसंगती उघड आहे. उत्सव चाललेले पाहून माझ्या मनात क्षोभ झाला असे हिनेच म्हटले आहे.

**चौ. ८ - (१) बघुनि भविष्य भयें चळचळतें... फळ तें** - कैकयीच्या काळजास हात घालणारी भाषा या चौपाईत आहे. स्वतःला इतरांपेक्षाही अधिक प्रिय आहे असे म्हणते. पण भविष्याचा विचार मनात आला की भयाने चळचळते. या म्हणण्यातील गूढ भाव हा आहे की तुमच्या भविष्याचा विचार केला की थरकाप सुटतो. भोळ्या राणीला असे वाटावे की राम राजा झाला की आपल्यावर भयानक संकट कोसळणार ! मोघम बोलण्याने राणी पुन्हा काहीतरी विचारणार तेव्हा मग शेल्के अमोघ बाण बाहेर काढू हा हेतू आहे. **(क) देवो दैव उलट तिज फळ तें** - जे फळ तुमच्या पदरात पडावे म्हणून कौसल्येने प्रयत्न चालविला आहे ते फळ कौसल्येच्या पदरात पडावे; आणि जे फळ स्वतास मिळावे असे तिला वाटत आहे ते फळ तुम्ही पदरात घ्यावे. दुसऱ्यांसाठी खड्डा खणला की त्यानेच त्यात पडावे हेच योग्य ! या चरणाने तर राणीची त्रेधाच उडाली असेल; व वाटू लागले असेल की कौसल्येने काहीतरी मोठा कट माझ्याविरुद्ध रचला असला पाहिजे. तिला विधी अति उजवा झाला आहे. तो उलटावा, कौसल्येला दैवाने संकटात पाडावी व कैकयीला आनंदाच्या, भाग्याच्या व वैभवाच्या मेरु शिखरावर चढवावी !

**हिं.दो.** ***। रचि पचि कोटिक कुटिलपन कीन्हेसि कपट प्रबोधु ॥***
***॥ कहिसि कथा सत सवति कै जेहि बिधि बाढ़ बिरोधु ॥१८॥***

**म.दो.** ***॥ रचुनि कथा कोटी कुटिल कपटाचा करि बोध ॥***
***॥ सवति - कथा शत सांगुनी वाढवि मनीं विरोध ॥१८॥***

**अर्थ :** (कोटि, शत हे शब्द अनेकत्व वाचक आहेत. अक्षरशः अर्थ घेणे अनर्थ ठरेल). पुष्कळ (कोटि) कुटिल काल्पनिक कथा बनवून सांगून कपटाची जाणीव (बोध) राणीला करून दिली; व सवतींच्या कितीक गोष्टी सांगून राणीच्या मनात विरोध वाढविला. (विरोध वाढेल अशा सांगितल्या.)॥दो.१८॥

**टीका दो. :** राणी उजू-ऋजु स्वभावाची, म्हणून कौसल्येने चालविलेले कपट तिला ओळखता आले नाही. कौसल्या अत्यंत कपटी आहे हे राणीला

अनेक कपोल कल्पित कथा, घटना सांगून पटवून दिले. सवत कपटी आहे अशी कैकयीची खात्री करून दिली. मग सवती मत्सराच्या कित्येक गोष्टी सांगून त्यात कपटी सवतीचा सूड कसा घेतला गेला हेही सांगितले व अशा कथांनी कौसल्याविरोध बुद्धि, कौसल्येचा सूड घेण्याची इच्छा निर्माण केली. सुरुचि व सुमति ध्रुवाच्या माता, चंद्राच्या २७ स्त्रिया, चित्रकेतु राजाच्या हजार स्त्रिया कद्रूविनता इत्यादी सवतींच्या गोष्टी सांगितल्या. **या प्रमाणे कैकयीची कुमतिरूपी भक्कम दोरी कुबडी भिल्लीणीच्या हाती आली आहे.** आता ही दोरी ज्याला बांधावयाची तो वृक्ष व सवतीमत्सररूपी धीट भिल्ल यांना पैदा करील.

*हिं.* ***। भावी बस प्रतीति उर आई । पूँछ रानि पुनि सपथ देवाई ॥१॥***

***। का पूँछहु तुम्ह अबहुँ न जाना । निज हित अनहित पसु पहिचाना ॥२॥***

***। भयउ पाखु दिन सजत समाजू । तुम्ह पाई सुधि मोहि सन आजू ॥३॥***

*म.* ***। येइ भाविवश मनीं प्रतीती । पुन्हां घालुनी शपथ पुसे ती ॥१॥***

***। काय पुसां, तुम्हिं अझुनि न जाणां । कळतें निज हित अहित पशूंनां ॥२॥***

***। गत पंधरा दिन सजिती साज किं । तुम्हां कळे मजपासुनि आज किं ॥३॥***

**अर्थ :** दैववशात कैकयीच्या मनात प्रतीति आली (पूर्ण खात्री झाली) व तिने पुन्हा शपथ घालून विचारले.॥१॥ (तेव्हा दासी म्हणाली) काय पुसता काय? अजून नाही कळलं तुम्हाला. आपले हित व अहित पशूंना सुद्धा कळते.॥२॥ गेले पंधरा दिवस (पंध्रवडा) तयारी चालली आहे की; परंतु तुम्हाला आजच (आणि तेही) माझ्याकडूनच कळले.॥३॥

**टीका. चौ. (१) येइ भाविवश मनीं प्रतीती** - 'कौसल्या कुटिल, कपटी दांभिक आहे व मी तिच्या डोळ्यात सलते आहे' असा दृढ विश्वास कैकयीच्या मनात उत्पन्न झाला. कौसल्या व कैकयी यांचे बहिणीसारखे सरळ आचरण व शुद्ध प्रेम होते हे कौसल्येच्या व कैकयीच्या वचनांवरून स्पष्ट आहे. असे असता एका क्षुद्र दासीने रचलेल्या कुभांडांवर कैकयीचा दृढ विश्वास बसला हे आश्चर्य आहे. पण सर्वांचेच प्रारब्ध हीन असल्यामुळे, कर्मभोग बळानेच तिला अशी इच्छा उत्पन्न झाली. हे आधिभौतिक कारण आहे हे 'भाविवश' शब्दाने सुचविले आहे. (क) **आधि दैविक कारण** - आपणास एकट्यालाच

राज्याभिषेक करतात असा जो विषाद रामचंद्रांना वाटला तोच अधिदैविक दृष्टीने या सर्व घटनांचे मूळ आहे. मूळ जमिनीत असते. मुख्य मूळ (Toproot) तर आजूबाजूस न जाता झाडाच्या बरोबर खाली सरळ जाते. आजूबाजूस खणूनसुद्धा ते दिसत नाही. रावणादिकांचा वध मुद्दाम आक्रमण करून करावयाचा नसून त्यांनी आगळिक केली म्हणजे उघड उघड युद्ध करून करावयाचा आहे व नारदाचा शाप खरा करावयाचा आहे. तेवढ्यासाठी अरण्यात सीतेसह जाऊन राहणे आवश्यक आहे. हा अवतार हेतु दशरथांस सांगणे शक्य नाही व ते परवानगी देणार नाहीत. अ.रा. ब्रह्मदेवाचा निरोपच आला आहे की राज्याभिषेक करून घेतल्यास अवतारहेतु सफल होणार नाही. म्हणजेच असे ठरले की रामाने मानसिक विरोध केला नसता तर राज्याभिषेक झाला असता. म्हणजेच शारदा, कुबडी व कैकयी यांनी जे केले ते करण्याची बुद्धि त्यांस झाली नसती. देवांनी जे कारस्थान केले व शारदेकडून करविले ते देवगुरु बृहस्पतींच्या संमतीने व बृहस्पतींनी संमती दिली रामाची इच्छा जाणून **'तैं कृत कांहिं राम रुचि बघुनी । हानि अता कीं कुचाळ करुनी'** (२।२१८।३) यावरून स्पष्ट झाले की देवांना व मंथरेला जी बुद्धि झाली ती प्रभूच्या इच्छेनेच व कैकयीचा कुबडीच्या वचनांवर जो विश्वास बसला तोही रामाच्या इंच्छेनेच. या दोघींचे पूर्व कर्म अपयश पात्र बनण्यास पूर्ण अनुकूल असल्याने त्या दोघी निमित्त झाल्या. **'राम करं इच्छिति तें घडतें । कोणि नसे जो करी उलटतें'** पूर्वी रामवसिष्ठ संवादात हे रामेच्छा रहस्य टीकेत स्पष्ट केलेच आहे.

(२) **पुन्हा घालुनी शपथ पुसे ती** - 'बघुनि भविष्य भयें चळचळतें' इत्यादी (मागील चौ. ८) कुबडी जे म्हणाली ते अस्पष्ट, मोघम असल्याने ते भविष्य कोणते व कोणते फळ कौसल्या माझ्या पदरात टाकू पहात आहे ते स्पष्ट सांग तुला भरताची शपथ आहे, असे राणीने दासीला विचारले. पूर्वी (दो.१५) एकदा भरत शपथ घालून विचारले होते म्हणून येथे 'पुन्हा' म्हटले व त्या वचनाची आठवण दिली. ल.ठे. लबाड, पोटभरू, भटके ज्योतिषि व दांभिक गुरु, संत, बोवा इ. लोक अशाच प्रकारे गूढभाषेत भयाच्या डोंगराचे दडपण

समोरील माणसाच्या उरावर टाकतात. त्याने तो घाबरून, अधीर होऊन प्रश्न विचारू लागतो व मग काहीतरी मोठ्या संकटाचा उल्लेख करतात. ते निवारण करण्याचा उपाय ती व्यक्ती विचारते तेव्हा मग काहीतरी गंडा, दोरा, ताईत, अंगारा यांच्या निमित्ताने पैसे उकळून निघून जातात. पण् त्या माणसाच्या मनात चिंता व भीती यांची आग ती मुदत उलटून जाईपर्यंत होतच राहते. काकतालीय न्यायाने संकट आले नाही म्हणजे त्या दांभिकांवर विश्वास बसतो; पण येणार नसलेलेच संकट येणार आहे असे सांगितले गेले असल्याने ते येत नाहीच. यदा कदाचित् आलेच तर आपले दुर्दैव म्हणून, फसलेले लोक स्वस्थ बसतात. हे मुद्दाम लिहिण्याचे कारण, हल्ली यांचा सुळसुळाट फार झाला आहे. तरी वाचकांनी सावध असावे. अशा लोकांच्या पाशांत श्रीमंतांच्या स्वतंत्रता मिळालेल्या स्त्रिया तर मुख्य शिकार बनतातच पण चांगले दुहेरी तिहेरी पदवीधरसुद्धा फसतात !

**चौ. २. (१) काय पुसां तुम्हि अझुनि न जाणां... पशूनां** - आता राणी कुबडीच्या पक्की मुठींत सापडली; मऊ भाताप्रमाणे दाबून वाटेल त्या आकाराची मूद पाडता येईल अशी तिची खात्री झाली. आता दासी अदबीची किंवा बरोबरीची भाषा न वापरता शिरजोरीची भाषा वापरू लागते. पहिल्या फटक्याला **सम्राटाच्या प्रियतम राणीला पशूपेक्षासुद्धा अक्कलमंद ठरविली !** भाव हा की '**कळे हिताहित पशुपक्षां तंव । ज्ञान-गुणागर तर तनु मानव ॥' पशूंनां स्वतंत्र बुद्धि नसूनसुद्धा 'मुनिगण-निकट विहगमृग जमती । बाधक वधिक विलोकुनि पळती'** (२।२६४।४,३). आणि तुम्ही उच्च कुळांतल्या, महाराणी, व मनुष्य असून तुम्हाला कसे कळत नाही कौसल्येने काय भय उपस्थित केले आहे ते? उलट मी हितकर्ती असून मला घरफोडी, कुचाळखोर, कपटी वगैरे शेलका आहेर केलात ! **ल.ठे. - नीच जातिहीन, दुष्ट दासींशी सलगी केल्याने आज ही दासी किती उद्दामपणाने एका सम्राट पत्नीला पशूपेक्षां हीन ठरवीत आहे !**

**चौ. ३. (१) गत पंद्रा दिन सजिती साज किं** - त्या भयाचा व कौसल्येच्या कुटिलपणाचा एकदम उलगडा न करता एक नवे कुभांड रचून प्रारंभ करते. नगर शृंगारणे वगैरे तयारी १५ दिवस चालली असता तुम्हाला अद्याप काहीच

कसे कळले नाही? आज मी सांगितले तेव्हा कळले. राणी पंधरवड्यात आपल्या महालातून बाहेर डोकावली सुद्धा नाही याची चांगली आठवण करून दासीने हे कुभांड रचले. हे विधान धडधडीत अगदी खोटे आहे. ८/१० तास सुद्धा झाले नाहीत आणि पंधरा दिवस झाले म्हणून हेतुपूर्वक दडपून दिले. पुढील सर्व आगलावेपणाचा आधार हे एक वाक्य आहे. कैकयीचे अंतःकरण इतके भारून ठेवले आहे की कोणी आपले हृदय फाडून सत्य दाखविले तरी ते असत्य वाटणार. राज्याभिषेकाची बातमी या राणीला कोणीही सांगितली नाही. हा भक्कम आधार दासीला मिळाला. या आधाररूपी वृक्षालाच आता कैकयीची कुमति बनलेली भोळी बुद्धिरूपी दोरी बांधली गेलीच म्हणून समजा. आता लवकरच सवतीमत्सररूपी भिल्लाला या दोरीवर बसवील. (क) भाव हा की रामलक्ष्मण रोज तुमच्या दर्शनास येतात पण १५ दिवसांत याबद्दल एक अक्षर चुकून तरी बोलले का? महाराज रोज संध्याकाळपासून सकाळपर्यंत तुमच्या जवळ असतात, बोलतात, गप्पा मारतात, गोंजारतात, तुमचे लाड पुरवतात पण त्यांनीसुद्धा हे तुमच्यापासून लपवून ठेवले ! त्या सवतीचे तुमच्यावर जर बहिणीसारखे प्रेम होते तर आपल्या परमानंदाची बातमी आपल्या धाकट्या बहिणीला सांगण्यास किंवा दासीबरोबर कळविण्यास काय हरकत होती? पण मुद्दाम लपवून ठेवण्याचा त्या तिघा-चौघांनी कट करून सर्व प्रजेला व सेवकांना, दासदासींना सक्त गुप्त ताकीद दिली असली तर नगरातील व अंतपुरातील तुमच्यावर प्रेम करणारी माणसे तरी आपले जीवित धोक्यात घालून कशाला सांगतील मुद्दाम येऊन? पंधरा दिवसांत तुमची आठवण कोणासच झाली नसेल हे शक्य आहे काय? बोलावणे पाठवून पंधरा दिवसांत काय भरताला आणता आला नसता? भरताचे रामावर व कौसल्येवर किती अगाध प्रेम आहे ! त्यांना किती वाईट वाटेल बरं ! पण तुम्हा दोघांना खड्यासारखी किंवा दुधातील माशीसारखी बाहेर फेकण्यासाठीच जर हा डाव तिने रचला आहे तर त्यांना इतक्या दूर कोण कळवणार? दंडाच्या भयाला भुतंसुद्धा भितात. (ख) रामविवाहाचा समाचार जसा वसिष्ठांची संमति व आज्ञा मिळाल्यावर राजाने अंतपुरात जाऊन सर्व राण्यांना एकत्र जमवून

सांगितला तसा हा समाचार वसिष्ठ व सचिव यांची संमती मिळाल्यावर सांगितला असता तर हा सर्व अनर्थ टळला असता. पुढे दशरथ स्वतःच कैकयीला म्हणतात, **'मी कृत तुज पुसल्याविण सगळें । म्हणुन मनोरथ धुळीस मिळाले'** (२।३२।२) पण **'होणारें न चुकेंचि होइल जरी ब्रह्मातया आडवा'. 'हरि इच्छा भावी बलवान् अति' 'राम करूं इच्छिति तें घडतें । कोणि नसे जो करी उलट तें' 'प्रेरक हृदिं रघुवंश-विभूषण'** असे असल्यामुळे कैकयीला कळविण्याची बुद्धी कोणासच झाली नाही. राजाने कौसल्येला किंवा कोणत्याच राणीला कळविले नाही. नगरी शृंगारण्याचे जे कार्य झाले आहे ते करण्यास १५ दिवस सहज लागतील असे कोणीही परगावचा कुशल कारागीर म्हणाला असता. या एकाच पायावर घरफोडीला सर्व कुभांड रचता आले. (ग) येथे कैकयीला एक शंका यावयास पाहिजे होती की पंधरा दिवस तयारी चालू आहे हे जर तुला माहीत होते तर तू कां नाही मला पहिल्याच दिवशी सांगितलेस? पण या शंकेचे उत्तर देण्यास सबळ पुरावा तिने आधीच तयार करून ठेवला आहे. **'पुसे जनां कीं उत्सव कसला' 'शृंगारित पुर बघत मंथरा'** (२३।२।१) या दोन्ही गोष्टी आजच घडल्या आहेत. या पूर्वी नगर शृंगारलेच नव्हते. ती म्हणणार की मी आज सहज गच्चीवर गेले, तेव्हा आश्चर्य वाटले म्हणून लोकांना विचारले तेव्हा त्यांनी सांगितले की १५ दिवस सतत खपलो तेव्हा आज जेमतेम वेळेवर काम पुरे झाले. मी तरी १५/२० दिवसांत आजच सहज वर गेले. तुम्ही बाहेर डोकावणार नाहीत त्यामुळे मीही बाहेर पडले नव्हते. पण दैवाने खैर केली म्हणून आज तरी वर जाण्याची बुद्धि झाली ! नाहीतर रामराज्याभिषेक उरकून गेला असता तरी आपल्याला थांगपत्ता लागला नसता व अगदी अकल्पित अचानकपणे तुमच्यावर भयाचा डोंगर कोसळला असता. हा प्रश्न कैकयीने विचारला सुद्धा असता पण तसा तिने विचारावा अशी कुबडीची इच्छा नसल्याने ती तिला बोलण्यास सवडच देत नाही व आपले वाग्जाळ जोरात पसरीत राहणार !

*हिं. । आइअ पहिरिअ राज तुम्हारें । सत्य कहें नहिं दोषु हमारें ॥४॥*
*। जौं असत्य कछु कहब बनाई । तौ बिधि देइहि हमहि सजाई ॥५॥*

*। रामहि तिलक कालि जौं भयऊ । तुम्ह कहुँ बिपति बीज बिधि बयऊ ॥६॥*
*। रेख खँचाइ कहउँ बलु भाषी । भामिनि भइहु दूध कइ माखी ॥७॥*
*। जौं सुत सहित करहु सेवकाई । तौ घर रहहु न आन उपाई ॥८॥*

म. *। राज्यिं नेसणें खाणें तुमचे । सत्य सांगणें चूक न अमचें ॥४॥*
*। मृषा रचुनि जर सांगुं आपणां । विधि करील आम्हां किं शासना ॥५॥*
*। होति राम युवराज उद्यां जर । विपद्बिज विधि पेरि तुम्हां तर ॥६॥*
*। वज्रलेख वदुं संशय ना तिल । झालां भामिनि माशि दुधांतील ॥७॥*
*। दास्या सुनु-समेत करा जर । अन्य उपाय न, घरीं रहां तर ॥८॥*

**अर्थ :** तुमच्या राज्यात आम्ही खावं-प्यावं व वस्त्रे-प्रावरणे वापरावी; मग आम्ही (तुमच्या हितासाठी निर्भयपणे) सत्य सांगणे काही आमची चूक नाही. (दोष नाही, कर्तव्यच आहे.)॥४॥ जर काही असत्य बनवून सांगितले, तर दैव (विधि) आम्हाला शिक्षा करीलच की.॥५॥ उद्या जर का रामाला राज्याभिषेक झाला तर दैवाने तुमच्यासाठी विपत्तीचे बीज पेरलेच (म्हणून समजा).॥६॥ मी वज्रलेख म्हणून सांगते, तिळमात्र संशय नाही, की भामिनी! तुम्ही दुधातील माशी झालातच (म्हणून समजा)॥७॥ तुम्ही तुमच्या मुलासह जर दास्य केलेत (सवतीचे) तरच घरात रहाल (राहता येईल) नाहीतर दुसरा काही सुद्धा उपाय नाही.॥८॥

**टीका. चौ. ४ -** (१) राज्यिं नेसणें खाणें तुमचे - तुम्ही आमचे पालनपोषण सर्व प्रकारे करता तेव्हा तुमचे हित साधणे आमचे कर्तव्य आहे. १८६।५ पहा. ते हित साधण्यासाठी खऱ्या गोष्टी सांगितल्याशिवाय गत्यंतर नाही. सत्य सांगितले की कौसल्या व राम यांचे अहित-अकल्याण होणार; व न सांगितले तर तुमचे, माझ्या पोशिंद्यांचे अहित होणार. अशा धर्मसंकटात सापडल्यावर अन्नदात्या पालकाच्या हितासाठी सत्य बोलणे काही चुकीचे नाही. कारण तो पोषितांचा स्वधर्म आहे. ज्या सत्याच्या योगाने कोणाचे अकल्याण होणार असेल, नाश होणार असेल ते सत्य सांगणे हा दोष आहे ! म्हणून ही सफाई कुबडी करीत आहे व जणू धर्मराजाचा अवतारच बनत आहे. (क) दुसरी एक गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी म्हणजे दासी आता मी, मला असे न

म्हणता **आम्ही, आमचे, असे आदरार्थी बहुवचन स्वतःसाठी वापरीत आहे.** हा फरक राणीला पशूहून मूर्ख ठरविल्यावर पडला आहे. अजून राणीला, तू, तुझे म्हणू लागली नाही ! दासीला वाटू लागले की मी आता राणीच्या बरोबरीची झाले. भरताला राज्य मिळवून देऊन रामाला वनवासात पाठविला म्हणजे कैकयी तिला राणीसारखाच मान देणार. फार काय तिला डोक्यावर घेऊन नाचणार. राणी म्हणणार आहे की **'विधि वांछा जर पुरवि सकाळी ॥ नेत्र पुतळि तुज करीन आली ॥'** (२३।३) डोक्यावर घेऊन नाचण्यापेक्षा डोळ्यांतील बाहुली बनविणे विशेष मानाचे आहे, प्रेमाचे आहे. **(ख) राज्यीं तुमचें** - राजे तुमच्या तंत्राने चालत असल्याने सध्या अयोध्येत तुमचे राज्य आहे. **नाव राजाचे, राज्य राणीचे.** कुबडीचे हे विधान तोंडदेखले नसून सत्य आहे हे मानसातील खालील वचनांनी सिद्ध होते. **परिसुनि 'कोप' भवनि भय राया । सुके, टाकवे पुढे न पाया'** (२५।१) **'प्रिये अहित तव कोण करी तरि । द्विशिर कोण, यम कुणा पाशि धरि ॥** (२।२६।१) **रंक कोण वद करूं नरेशहि । कुणा नृपा वद देउं विदेशहि ॥ मारूं शकेन ही अमरा तव अरि कोण कीट पामर मानव तरि'** (२६।२,३,५) **प्रिये प्राण सुत सर्वहि मम जें । प्रजा सपरिजन तव वश समजे'॥** यावरून समजेल की कौसल्यादि राण्या कैकयीला किती भिऊन वागत असतील ! राणी रागावली आहे व दशरथांशी बोलत नाही एवढ्यावरूनच इतके सर्व करण्याची राजाची तयारी आहे !

(२) **वा.रा.** ठिकठिकाणी असलेल्या उल्लेखांवरून हे सार निघते की दशरथाकडून कौसल्येला सुखाचा कोरडा शब्दसुद्धा मिळत नव्हता, इतकेच नव्हे तर कैकयीचे नोकर-चाकर, दास-दासीसुद्धा राम वनवासास जाण्यापूर्वीच, कौसल्येचा उघड उघड अपमान करीत असत. कैकयी नेहमी निष्कारण संतापलेली असे व कौसल्येला कठोर शब्द बोलत असे. (२।२०।३८-४४) **'त्वयि संनिहितेऽप्येवं अहमासं निराकृता । किं पुनः प्रोषिते तात ध्रुवं मरणमेव मे'** (२।२०।४१) तू अयोध्येत असतासुद्धा माझा अपमान व तिरस्कार केला जात होता. मग तू वनात गेल्यावर काय होईल? मरण येणार हे निश्चित' असे कौसल्या रामास म्हणाली आहे. **'विनास्य रामं सुभगा लब्ध काता समाहिता ।**

**त्रासमिष्यति मांभूयो दुष्यहिरिव वेश्मनि'** (२।४३।३१). मानसकारांनी मात्र कैकयीचे पूर्वचरित्र अगदी निर्दोष दाखविले आहे. कोणाच्याही तोंडी कैकयीच्या पूर्वचरित्राबद्दल एकसुद्धा दुर्गुण घातला नाही.

**चौ.५ - (१) विधि करील आम्हां किं शासना** - येथे कुबडीचे मन तिला खात आहे, हे उघड दिसते. पुढे शत्रुघ्नाचे निमित्त करून दैवाने तिला चांगलीच शिक्षा केली आहे.

**चौ. ६, ७, ८ - (१) होति राम युवराज उद्यां जर** - भाव हा की आम्ही शक्य तो प्रयत्न करून तसे होऊ देणार नाही. **'करी स्वामिहित सेवक तोही'** पण कदाचित कर्मधर्मसंयोगाने राम युवराज झालेच तर किती भयंकर परिणाम होईल. तुमचे किती अकल्याण होईल. हे आम्हाला स्पष्ट दिसत असता तुम्हाला न सांगणे चूक आहे. तुमच्यावर विपत्ती कोसळण्यास प्रारंभ झालाच म्हणून समजावे. (२) **दुधांतिल माशी** - दुधांत माशी पडली तर कोणी दूध काही फेकून देत नाहीत. पण त्या माशीला हातात धरून चटकन बाहेर फेकून देतात. यात ती बहुधा जगत नाही. जगलीच तरी नीट उडता येत नाही. तुम्हाला हातात धरून, घराच्या, गावाच्या बाहेर हाकलून दिल्या जातील. तुमच्या कोमल तनुची, माशीच्या पंखांप्रमाणेच, कोणी पर्वा करणार नाहीत. **भामिनी** = कोपिष्ट सुंदर स्त्री असा येथे अर्थ आहे. 'कोपना सैव भामिनी' (अमरे) (३) **दास्या सुनु-समेत करा जर** - सुनु = सुत = पुत्र, असे व्हायला नको असेल तर उद्यापासून तुम्ही राम व कौसल्या यांची सेवा दासीप्रमाणे केली पाहिजे. भरताने दास व तुम्ही दासी झाले पाहिजेत. नाहीतर हाकलून दिल्या जाल. दुसरा उपाय नाही उपयोगी पडणार. भाव हा की तुमचं राज्य आहे, हाती पूर्ण सत्ता आहे तोच रामाला राज्याभिषेक होऊ देऊ नका. सवतीचे दास्य पुत्रासकट करणे गोड वाटत असेल तर माझे काही म्हणणे नाही. खुशाल होऊ द्या रामराज्याभिषेक. या गोष्टी व्हायला नको असतील तर काय केले पाहिजे हे येथे नुसते ध्वनित केले आहे. 'कौसल्येला दैव उलटें फळ देवो' या वचनाची सांगड घातली म्हणजे तो ध्वनितार्थ स्पष्ट होतो. रामाला त्याच्या आईसकट वनात हाकलून लावा.

हिं.दो. । कद्रूं बिनतहि दीन्ह दुखु तुम्हहि कौसिलाँ देब ॥
। भरतु बंदिगृह सेइहहिं लखनु राम के नेब ॥१९॥

म.दो. । कद्रू विनते तुम्हां तशि कौसल्या छळि जाण ॥
॥ भरत बंदिगृह सेविती लक्ष्मण राम-दिवाण ॥१९॥

अर्थ : कद्रूने विनतेला छळली तशी कौसल्या तुम्हाला छळील व भरतास बंदिवास भोगावा लागेल आणि लक्ष्मण रामाचे दिवाण होतील हे लक्षात ठेवा ।।दो.१९।।

टीका दो. : कद्रू विनते छळीं - कद्रूने (सर्पाच्या मातेने) गरुडाच्या मातेला विनतेला फसवून आपली दासी बनविली तशी कौसल्या तुम्हाला फसवून दासी बनवू पहात आहे. बाकीच्या राण्या तिची सेवा करीतच असल्याने त्यांचा काहीच प्रश्न नाही. तुम्ही तिच्याशी इतके दिवस उर्मटपणाने, ताठ्याने वागलात तर आता काठ्यांनी मार खाण्यापेक्षासुद्धा अधिक अपमान व दुःख सोसावे लागेल. सत्ता हाती आल्यावर प्रतिस्पर्धी कोण उरू देईल? रामाच्या राज्याला भीती नको म्हणून भरताला टाकतील तुरुंगात डांबून. (क) विनतेची सुटका तिच्या पुत्राने गरुडाने केली पण तुमची सुटका करण्यास भरत स्वतः सुटे राहिले तर ना? (ख) शत्रुघ्नाचा भाऊ लक्ष्मण असला तरी व्यवहारात तो रामानुगामी, रामानन्य सेवक असल्याने रामाचे रिपु त्याला रिपूच वाटतात व वाटणारच. लक्ष्मणाने सुद्धा तुम्हास ही बातमी सांगितली नाही. तो होईल रामाला साहाय्यकर्ता, दिवाण.

हिं. । कैकय-सुता सुनत कटु बानी । कहि न सकइ कछु सहमि सुखानी ॥१॥
। तन पसेउ कदली जिमि काँपी । कुबरीं दसन जीभ तब चाँपी ॥२॥
। कहि कहि कोटिक कपट कहानी । धीरजु धरहु प्रबोधिसि रानी ॥३॥
। फिरा करमु प्रिय लागि कुचाली । बकिहि सराहइ मानि मराली ॥४॥

म. । ऐकत कटु वच कैकय-तनया । काहिं न ववे सुकली सभ्या ॥१॥
। घाम सुटे कदली-सम कांपत । कुबजी रसने दशनीं चापत ॥२॥
। कपट कहाण्या किती किति वदे । राणिस बहु समजावि धीर दे ॥३॥
। कर्म फिरे प्रिय गमे कुचाळी । स्तवी बकित मानुनी मराळी ॥४॥

अर्थ : ते कटु भाषण ऐकताच कैकयतनया भयाने सुकून गेली व तिला काहीही बोलवेना.॥१॥ तिच्या अंगाला दरदरून घाम सुटला व केळीसारखी थराथरा कापू लागली. तेव्हा कुबडीने आपली जीभ दातांनी चावली. (दातात दाबली)॥२॥ तिने राणीला कितीतरी कपट कहाण्या (बनावट गोष्टी-कल्पित कथा) सांगून समजूत घातली व धीर दिला. (धीर धरा म्हणून सांगितले).॥३॥ कर्म फिरल्याने (दासीने केलेली) कुचाळकी तिला प्रिय वाटली व बगळीला हंसी (मराळी) समजून तिची प्रशंसा करू लागली.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) कटु बच** (कटुबानी) - कडू - अनिष्ट-भाषण, हृदयाला झोंबणारे शब्द. तुम्हाला सवतीचे दास्य करावे लागेल व भरताला तुरुंगात जन्म काढावा लागेल. या दोन गोष्टी कैकयीला असह्य झाल्या. ती कल्पनाच भयानक वाटली. (क) **कैकयीच्या भोळ्या बुद्धीरूपी भक्कम दोरीवर सवतीमत्सररूपी भिल्ल येऊन बसला.** राणीला रामराज्याभिषेक अत्यंत इष्ट व प्रिय वाटत होता. पण सवतीचे दास्य व पुत्राला बंदिवास हे त्याचे फळ मिळणार असे कानी पडताच राम, राज्याभिषेक व कौसल्या घोर विषापेक्षाही भयंकर वाटू लागली. **सन्मान; सुख व सत्ता यांना धक्का न लागता या गोष्टी नित्य सहज मिळतील असे वाटत होते तोपर्यंत कैकयीची भक्ति-प्रीती-रामावर होती.** तमोगुण युक्त सात्विक हृदयाचे असेच असते. त्यांना प्रीती किंवा वैर करण्यास वेळ लागत नाही. **'सुर नर मुनि सर्वांची रीती । स्वार्थास्तव सब करिती प्रीती ।'** हेच खरे ठरले. सवतीला वरील दोन्ही गोष्टींपेक्षा अधिक भयानक व महाविषारी असे काय असेल? जी कैकयी दासीची जीभ ज्या गोष्टीमुळे ओढून काढण्यास थोड्या वेळापूर्वीच तयार झाली होती तीच त्याच गोष्टीला प्रिय मानून त्याच दासीची प्रशंसा करण्यास तयार झाली! **स्त्री-स्वभावाचे व सवतीमत्सराचे किती सुंदर, सहज स्वाभाविक चित्रण आहे! वा.रा., अ.रा., आ.रा., अद्भुत रामायण व भावार्थ रामायण यात तर या सौंदर्याचा फारच थोडा अंश दिसतो. त्यातील कुबडीचे भाषण अस्वाभाविक वाटते.**

(२) **काहिं न बदवे सुकली सभया** - वचन ऐकताच भयभीत होऊन सुकून गेली. ही कोणासही अतिशयोक्ती वाटेल. पण असे सुकून जाण्याचे उल्लेख

आता वारंवार पुढे येतील. तिला वाटले की, आपला सत्तेचा, मानाचा, सुखाचा व ऐश्वर्याचा पायाच एकाएकी साफ ढासळून आपण विरुद्ध परिस्थितीत जणू पडलोच ! अत्यंत भय वाटले. भय शोक इत्यादी तीव्रतम झालेल्या विकारांचा असा अनपेक्षित धक्का कोवळ्या भावनाप्रधान मनाला बसला म्हणजे सुकून जाणेच काय, प्राण निघून जाणेसुद्धा अशक्य नसते. हैद्राबाद संस्थानातील पोलीस ॲक्शनच्या काळात हे पुष्कळांच्या अनुभवास आले. भावनेच्या तीव्रतेने शरीरातील रक्तापासून प्राणापर्यंत सर्वांवरच अनिष्ट परिणाम होतो. जीवालाच मुळी असह्य धक्का बसतो. ही गोष्ट स्वतःवर बितल्याशिवाय किंवा प्रत्यक्ष घडलेली पाहिल्याशिवाय खरी वाटेल असे नाही. आनंदानेसुद्धा माणसे तत्काळ मरतात; पण अशी सुकत नाहीत किंवा काळी ठिक्कर पडत नाहीत.

**चौ.२ - (१) घाम सुटे कदलीसम कांपत** - भीतीच्या धक्क्याने चित्त मोठ्या वेगाने प्राणांमध्ये शिरून तो प्राण तेजतत्त्वांत घुसला की असा एकाएकी घाम सुटतो. **आकाशतत्त्वांत शिरला की मूर्च्छा किंवा मरण येते.** ज्या ज्या तत्त्वात प्राण जोराने प्रवेश करील त्या त्या तत्त्वाशी संबंधित अनुभाव प्रगट होतात. प्रेम, शोक, भय, आनंद इ. कोणताही विकार जसा तीव्र, तीव्रतर, तीव्रतम असेल त्या प्रमाणे स्तंभ, स्वेद, रोमांच, कंप, अश्रू इ. चिन्हे प्रगट होतात. अत्यंत तीव्रतम आवेग असेल तर मरणसुद्धा येते. **(क) कुबडी रसने दशनीं चापत'** - रसना = जीभ, दशन = चावणारे, दांत, भय, आश्चर्य, शोक, चिंता इ. दर्शक ही एक स्वाभाविक मुद्रा आहे. कुबडीला धास्ती पडली की हे काय झाले ! राणीसाहेबांना मूर्च्छा आली किंवा या भय-शोकांचे रूपांतर क्रोधात होऊन या मोठमोठ्याने बडबडू लागल्या तर आपले सर्व कारस्थान अयोग्य वेळी बाहेर पडेल. कपटस्फोट होईल. फार घोर शिक्षा मला भोगावी लागेल. इतक्या लवकर इतका तीव्रतर परिणाम होईल असे वाटले नव्हते. पण समाधानही वाटले की आता काही कमी-जास्त न झाल्यास डाव साधलाच.

**चौ. ३ - (१) कपट कहाण्या** - सवतीच्या कपटाच्या कल्पित गोष्टी-कथा-कहाणी = काहणी - कल्पित कथा, जी प्रत्यक्ष घडलेली नसते ती. या कथांत मुख्य मुद्दा राणीला धीर देऊन आशावादी बनविण्याचाच असणार. शत्रूच्या

कपटकारस्थानांतून युक्तीने, धैर्याने, गडबड, बडबड, गलबला न करता गुपचुपपणे कसे सुटता येते व शत्रूचे डाव त्याच्यावरच कसे उलटविता येतात याच्या कितीतरी कथा सांगितल्या व म्हणाली की आताच इतके घाबरण्याचे काय कारण आहे? रामराज्याभिषेक झाला तर काय परिणाम होणार आहे ते मी तुम्हाला सांगितले. अजून थोडा दिवस आणि सबंध रात्र मधे आहे. राज्याभिषेक होऊनच नाही दिला म्हणजे झालं. तुम्ही व मी मिळून हे काम सहज साधूच साधू. धीर धरून मी सांगेन तसे केलेत तर खाड्डा खणणारालाच खाड्यांत लोळवणे काही अशक्य नाही.

**चौ. ४ - (१) कर्म फिरे प्रिय गमे कुचाळी** - तो भीतीचा झटका पटकन ओसरला व त्याचे जागी वैर-मत्सरांनी पक्के ठाण मांडले व कुबडीच्या सगळ्या कहाण्या खऱ्या वाटल्या. कपटाचा डाव कपटानेच उलटवावा लागतो व तसा तो आपण उलटवू असा विश्वास उत्पन्न झाला. याचेच नाव कुचाळकी, आगलावेपणा प्रिय वाटला. कवि म्हणतात, हा कैकयीचा दोष नसून तिच्या व इतरांच्या कर्मामुळे असे झाले. येथे हे ठरले की कैकयीचे कर्म, दशरथाचे कर्म, इतर राण्यांचे कर्म व प्रजेचे कर्म फिरले यात संशय नाही. अशा समान कर्म संस्कारांची माणसे एकत्र आली व त्यातील १/२ व्यक्तींचे प्रबल कर्म फळास येणार असले म्हणजे इतरांनाही त्याचे परिणाम संगति दोषाने भोगावे लागतात. बोटी, आगगाड्या, विमाने वगैरेंच्या अपघातात सापडून मरणारांना व जखमी होणारांनाही हा नियम लागू आहे. **(क) लगी बकिस मानुनी मराळी** - बकी = बगळी, मराळी = हंसी. कुबडी स्त्री आहे म्हणून बकी, मराळी म्हटले. बगळा दंभाचे व कपटाचे प्रतीक आहे. व हंस सत्यान्वेषणाचे, विवेकाचे, ज्ञानाचे प्रतिक आहे. भाव हा की कुबडी दांभिक, महाकपटी, कुटिल असून द्वेषाने, वैराने हितकर्त्याचे, बुद्धिमंतांचे, विवेकी व्यक्तीचे सोंग आणले असल्याने राणीला ही साधु, परोपकारी, सत्यवादिनी, निर्हेतुक हितकर्ती वाटू लागली व राणी तशी तिची प्रशंसाही करू लागली.

**ल.ठे.** - या दोहयाच्या पहिल्या चौपाईच्या पूर्वी भरत जननी, भरत माता, राणी हे शब्द वापरले होते. **कैकयसुता - कैकयतनया** - हा केवळ माहेरचा

संबंध दाखविणारा शब्द येथे (चौ. १) वापरला व सुचविले की हिचा राणीपणा, हिचा भरताशी संबंध आता संपुष्टात आला म्हणून समजा व रघुकुल कलंकिनी मानली जाईल हे त्या शब्दाने सुचविले. वा.रा. २/३५ मध्ये सुमंत्राने कैकयीची जी हजेरी घेतली आहे ती सर्व (श्लो. १६-२७) येथे सूचित केली आहे. सतीमोह प्रकरणांत सती, भवानी, जगज्जननी हे शब्द काही वेळ आधी वापरून नंतर दक्षसुता, दक्षकुमारी हे शब्द वापरून असाच भेद दाखविला आहे.

*हिं.* *। सुनु मंथरा बात फुरि तोरी । दहिनि आँखि नित फरकइ मोरी ॥५॥*
*। दिन प्रति देखउँ राति कुसपने । कहउँ न तोहि मोह बस अपने ॥६॥*
*। काह करौं सखि सूध सुभाऊ । दाहिन बाम न जानउँ काऊ ॥७॥*

*म.* *। बघ मंथरे खरें वच तव तों । उजवा नेत्र नित्य मम लवतो ॥५॥*
*। दुःस्वप्ने प्रतिरात्रीं पडतीं । मोहें केलीं तुज न उघड तीं ॥६॥*
*। काय करूं मी ऋजू स्वभावें । सखि ! नेणें कधिं उजवें डावें ॥७॥*

**अर्थ :** हे पहा मंथरे ! तू म्हणतेस तेच खरे आहे. माझा उजवा डोळा नित्य (रोज) लवतो आहे.॥५॥ रोज रात्री मला वाईट स्वप्ने पडतात पण माझ्या मोहाने मी तुझ्याजवळ प्रगट केली नाहीत (सांगितली नाहीत) ॥६॥ सखी ! मी तरी काय करणार ! माझा स्वभावच पडला सरळ (त्यामुळे) डावे उजवे मला कधीच माहीत नाही.॥७॥

**टीका - चौ. ५ - (१) खरें वच तव तों** - प्रशंसा करू लागली, हंसी वाटली असे जे म्हटले आहे त्याचे उदाहरण येथे देतात. 'तुझे म्हणणे तर खरे आहे.' याने कुबडी सत्यवादिनी, हितकर्ती, दूरदर्शी ठरली. तूं जशी भविष्यकाळाच्या भयाची व दुःखाची सूचना वारंवार मला दिलीस ना, तशीच भावी दुःखाची, वियोगाची सूचना उजवा डोळा सारखा कितीतरी दिवस लवून देत आहे. स्त्रियांचा उजवा डोळा लवणे हे प्रियतमाचा वियोग सुचविणारे व अप्रियाची प्राप्ती सुचविणारे आहे. कैकयीला प्रियतम राम आहे. त्याचा वियोग होणार हे उजवा डोळा लवण्याचे अनिष्ट फळ सुचित केले जाते; पण कैकयी मोहाने मानीत आहे की सवतीची सेवा व पुत्राला बंदिवास हेच फळ डोळा लवण्याने

सुचविले जात आहे. **'मानसांत शुभाशुभ शकुन'** प्र.प्र. १७१४ **पहा.** कैकयीने भ्रमाने असे मानणे अगदी स्वाभाविक आहे. स्त्रियांचे उजवे अंग लवणे-स्फुरणे-अनिष्ट सूचक असते इतकेच तिला माहीत. कुबडीनेही अनिष्ट भविष्यच सांगितले. तेव्हा मेळ बसविण्यास वेळ तो किती ! **अर्धवट ज्ञानाचा परिणाम असाच होतो.** या अशुभ शकुनादिकांचे वाईटात वाईट फळ कैकयीलाच मिळाले !

**चौ. ६ - (१) दुःस्वप्ने रोज पडतात** पण तुला सांगितली नाहीत व याचे कारण स्वतःचा मोह असे कैकयी म्हणाली. येथे कुबडीला ज्ञानी, विवेकी ठरविली व आपला मोह, आपले अज्ञान कबूल केले. हंसी समजून प्रशंसा ती हीच. **(क) मोह** - हे तमोगुणाचे कार्य आहे. लक्षण आहे. तमोगुणी माणसे शकुन अपशकुन इत्यादींचा विचारच करीत नाहीत. तसेच कैकयीचे झाले. राजा, पति मुठीत आहे. साम्राज्याची चालक आहे, कुस्वप्ने व अपशकुन माझे काय करणार असे सहजच वाटले. भाव हा की तुझ्यासारखी ज्ञानी, चतुर, दूरदर्शी, विवेकी मी असते तर किंवा या गोष्टी तुला वेळीच सांगितल्या असत्या तर इतक्या थराला तू जाऊच दिले नसतेस. याच काळात भरतालासुद्धा स्वप्ने पडली; पण तो मोहांध होऊन स्वस्थ नाही बसला. शिवाभिषेक, ब्राह्मण भोजन, दान इत्यादी अरिष्ट निवारक उपाय त्याने लगेच सुरू केले. कारण तो तमोगुणी, गर्विष्ठ नाही. कुसंगतीत नाही व सहज विवेकी सात्त्विक आहे.

**चौ. ७ - (१) काय करूं मी ऋजू स्वभावें - उजवें डावें** - साधा भोळा स्वभाव असल्यामुळे माझ्याशी कोणी कपट करील, मला दुःखात ढकलण्याचा प्रयत्न करील ही शंका मला येणेच शक्य नव्हते. **(क)** उजवें = अनुकूल, डावें = प्रतिकूल. मित्र-शत्रू, चांगले-वाईट दैव अनुकूल आहे की प्रतिकूल आहे. माझे मित्र कोण व शत्रू कोण. चांगले शकुन, शुभ स्वप्ने अपशकून दुःस्वप्ने, कोणती हा विचार कधी मला शिवलाच नाही. तू इतके समजाऊन सांगितलेस तेव्हा कळले की राम, कौसल्या व राजा माझे शत्रू आहेत व तू माझी खरी सखी आहेस. दासी म्हणून तुला वडिलांनी पाठविली नी मीही तुला दासीच समजत होते. तू संकटाची व भयाची सूचना दिलीस तेव्हा मला कळले की ते शकुन व ती स्वप्ने वाईट. या व अशा गोष्टी न जाणता सुखात, आळसात,

निद्रात मग्न असणे हे तामस-सुखाचे लक्षण आहे. **'प्रारंभीं फळ समयीं ही जें मोहें चित्तीं करी भ्रम। निद्रा आळस विस्मृति जनितचि तें सुख तामस तें अधम'** (सं.स. गीता १८।३९). येथे पुन्हा दाखविले की कैकयी तमोगुणयुक्त आहे. **(ख)** वरील विवेचनावरून एक मुद्दा ठरला की कैकयीजवळ विवेकाचा अभाव आहे. सदसद्विवेक, सारासार विवेक, नित्यानित्यविवेक, कार्याकार्यविवेक, शुभाशुभविवेक इत्यादी सर्व प्रकारांचा अंतर्भाव विवेक शब्दांत होतो. या दोहयांत एकच चौपाई कमी आहे आणि कैकयीजवळ एकच गोष्ट कमी आहे, विवेक ! त्यामुळेच जे करू नये ते सर्व करून सप्तसमुद्र वलयांकित पृथ्वीवर, सप्त स्वर्गात, सप्त पाताळात, सर्व काळ (साती दिवस) निंद्य ठरणार. **'काय न करि अबला प्रबल?' याचे उत्तर येथे देऊन ठेवले की विवेक, सुविचार! कैकयीच्या अविवेकी स्वभावामुळे आजपासून सातव्या रात्री तिला वैधव्य येणार. 'विवेकभ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः'** एक चौपाई कमी करून व शेवटच्या चौपाईत विवेक भ्रष्टता सुचवून दाखविले की या राणीचा सर्व बाजूंनी विनाश होणार. **विसाव्या दोहयाच्या पूर्वीच हा भाव प्रगट करून सुचविले की तिला कधीही, कोठेही व केव्हाही विसावा मिळणे अशक्य. 'जगदात्मा प्राणाधिप रामहि। तद्विमुखा किं मिळे विश्राम हि ॥ (६।३५।६) रामविमुखाला कोठेही विसावा मिळणे अशक्य.** हे पुढे चित्रकूटला कैकयीच्या चरित्रांत दाखविले आहे.

*हिं.दो. । अपनें चलत न आजु लगि अनभल काहुक कीन्ह ॥*
*। केहिं अघ एकहि बार मोहि दैअँ दुसह दुख दीन्ह ॥२०॥*

*म.दो. । माझं चालतां अझुन कृत कोणा अहित न कांहिं ॥*
*॥ कवण अघ किं मज सकृत विधि दे दुःसह दुःखांहि ॥२०॥*

**अर्थ :** माझं चालत असतां आजपर्यंत (अझून) मी कोणाचे काही सुद्धा अहित (अकल्याण, वाईट) केलं नाही. (असे असून) असे कोणते पाप मी केले की ज्यामुळे विधात्याने एकदाच (एकदमच) मला हे दुःसह दुःख दिले?॥२०॥

**टीका दो. : (१) माझं चालतां -** माझे चालत असता, माझ्या हातात सत्ता असता, आजपर्यंत मी वाटेल त्याचे, वाटेल ते अकल्याण वा कल्याण करू

शकले असते; पण मी कधी एकदाही कोणाचेही अकल्याण-वाईट केले नाही. या कैकयीच्याच वचनानी सिद्ध होते की दशरथ तिच्या मुठीत होते; तिच्या तंत्राने वागत असत. दशरथांच्या पुढील (२६।१-५) या वचनांनी या अनुमानाला पूर्ण पुष्टी मिळते. मानसांतील इतरांच्या वचनांवरून सिद्ध होते की कैकयीने खरोखरच कोणाचे अकल्याण केलं नाही व कधी सवतीमत्सर केला नाही. परंतु वा.रा. पूर्वी दाखविलेल्या वचनांप्रमाणे कैकयी कौसल्येचा तरी मत्सर करीत असे व तिला दुःसह दुःख देत असे. **मानसांतील कैकयी तशी नाही.** (क) दुःसह दुःख, सवतीचे दास्य व पुत्राला कारावास. एका नीच दासीच्या कपटी, कुटील, असत्य भाषणाचा या विवेकहीन, सुविचारहीन राणीच्या मनावर किती भयंकर परिणाम झाला पहा ! हे कुबडीच्या पथ्यावरच पडणार आहे. या दुःखाच्या निवारणाचा उपाय सांगण्याचा मार्ग आता मोकळा झाला. (ख) दुसरा भाव हा की माझ्या हाती सत्ता असता मी कोणालाच दुःख दिलेले नसता अल्पकाळ सत्ता हाती येताच कौसल्येने मला दुःसह दुःख दिले. दोहयाच्या उत्तरार्धाने **स्पष्ट दाखविले की पापाचे फळ दुःख व एकच पाप सुद्धा दुःसहदुःख देऊ शकते.** एका विप्राचा एकदा अपमान केला त्याचे हे फळ आहे ! कुबडीने कल्पनेने उभे केलेले सवतीमत्सराचे पिशाच्च आता कैकयीला पछाडित लागत आहे. त्यामुळे तिला असे वाटत आहे. परंतु हे केवळ काल्पनिक दुःख आहे. कुबडीच्या वचनांवर विश्वास ठेवल्याचे फळ म्हणून तिला जन्मभर कल्पनातीत दारुण दुःखे भोगावी लागणार आहेत व तो केवळ एकाच पापाचा परिणाम आहे. आता ही दीन झालेली, सर्व सत्ता हाती असलेली महाराणी आणखी कळवळते.

**हिं.** ***। नैहर जनमु भरब बरु जाई । जिअत न करबि सवति सेवकाई ॥१॥***
***। अरि बस दैउ जिआवत जाही । मरनु नीक तेहि जीवन चाही ॥२॥***
***। दीन बचन कह बहुबिधि रानी । सुनि कुबरी तियमाया ठानी ॥३॥***

**म.** ***। पितृगृहिं गाळिन जन्म हवा तरि । सवत-दास्य ना घडे मरण जरि ॥१॥***
***। जगवि शत्रु-वश दैव जयाला । मरण बरें जगण्याहुन त्याला ॥२॥***
***। राणी वदे दीन बहु वचना । करि कुबडी स्त्रीमाया - रचना ॥३॥***

**अर्थ :** मी हवा तर वडिलांच्या घरी जन्म गाळीन (घालवीन कसातरी) परंतु मरण ओढवले (घडे) तरी सवतीचे दास्य माझ्याकडून घडणार नाही.॥१॥ दैव ज्याला शत्रूच्या अधीन ठेऊन जगविते त्याला जगण्यापेक्षा मरण बरे वाटते.॥२॥ या प्रमाणे राणी दीन वाणीने पुष्कळ बोलली तेव्हा (ते ऐकून) कुबडीने स्त्री मायेची रचना केली.॥३॥

**टीका. चौ. १ -** (१) भरताच्या बंदिवासापेक्षा कैकयीच्या मनात सवतीच्या दास्याचे भूतच जास्त नाचत आहे. तिला दुसरे काहीच सुचत नाही. **अविवेकी** मनुष्य आपल्याच शरीरास सुख देण्यासाठी झटत असतो. (२।१४२।३) या अर्थाचे मानस वचन येथे यथार्थ करून दाखविले. (क) **पितुगृहिं गाळिन जन्म हवा तरि** - यावरून ठरते की **कैकयी स्वतःच्या इच्छेने पतीचा त्याग करण्यास तयार आहे.** नैहर = बापाचे घर. कैकयीची माता घरात नाही म्हणून माहेर नाही. **गाळिन जन्म** = कसेतरी दिवस कंठीन. कारण तिथे इथल्यासारखे सुख मिळणे शक्यच नाही. भावजयांचे टोमणे खावे लागतीलच. पण सवतीचे दास्य करण्यापेक्षा ते ओशाळगतीत जगणे परवडेल. कारण :

**चौ. २ -** (१) **जगवि शत्रुवश दैव जयाला मरण बरें जगण्याहुन त्याला -** सवतीची दासी बनून जगणे म्हणजे शत्रूच्या आधीन राहणे, त्यापेक्षा मरण चांगले. **'ततोऽपि मरणं श्रेयो यत् सपत्न्याः पराभवः'** (अ.रा. २।२।६३).

**चौ. ३ -** (१) याप्रमाणे भयार्त झालेली सम्राटाची एक प्रियतम पत्नी एका नीच दासीपुढे दीन, दैन्यवाणी होऊन गयावया करीत आहे ! हे केवळ अविवेकाचे फळ ! या पहिल्या चरणाने नारीचरित्र नाटकाच्या पहिल्या अंकाचा उपसंहार केला. **'करि कुबडी स्त्रीमायारचना'** या चरणाने कुबडीच्या कपट चरित्राच्या शेवटच्या प्रवेशाचा उपक्रम केला आहे. स्त्री माया रचना कशी केली ते पुढील चौपायांत दिसेल. कैकयी, बुद्धिरूपी भक्कम दोरी धरून ती रामराज्याभिषेक समाचार कैकयीला न कळणे या मोठ्या वृक्षाला घट्ट बांधून, तिच्या झोल्यावर सवतीमत्सररूपी क्रूर, कठोर, निष्ठूर, भयानक भिल्लाला कुबडी भिल्लीणीने चांगला बसवला आहे. हा झोला दरीत सोडून त्या भिल्लाच्या हाती दुधारी तीक्ष्ण विळा बांधलेली लांब काठी देऊन कौसल्येच्या महालात

लागलेले रामराज्याभिषेक मोहोळ कापून पाडण्याची आज्ञा दिली जाईल.

हिं. *। अस कस कहहु मानि मन ऊना । सुखु सोहागु तुम्ह कहुँ दिन दूना ॥४॥*
*। जेहिं राउर अति अनभल ताका । सोइ पाइहि यहु फलु परिपाका ॥५॥*
*। जब तें कुमत सुना मैं स्वामिनि । भूख न बासर नींद न जामिनि ॥६॥*
*। पूँछेउँ गुनिन्ह रेख तिन्ह खाँची । भरत भुआल होहिं यह साँची ॥७॥*

म. *। असं कसं म्हणां उणें मनिं मानुनि । दुणें भाग्य सुख अपणांलागुनि ॥४॥*
*। जी अपलें अति अहित चिंतिते । तीच घेइ फळ पदरिं अंतिं तें ॥५॥*
*। कुमत कानि ये हें जैं स्वामिनि । भूक न दिवसा, नीज न यामिनिं ॥६॥*
*। कथिति अम पुसतां गणकांनां । भरत होति नृप सत्यचि माना ॥७॥*

**अर्थ :** (राणीसाहेब !) काहीतरी भलतेच मनात आणून (मानून) असे कसे म्हणता? तुम्हाला तर दुप्पट सुख व भाग्य प्राप्त होणार आहे.॥४॥ जी तुमचे अति अहित चिंतीत आहे, तिलाच शेवटी ते फळ पदरात घ्यावे लागणार आहे.॥५॥ स्वामिनि ! जेव्हा मी हे कुमत ऐकले तेव्हापासून मला दिवसा ना भूक, रात्री ना झोप (असे झाले होते).॥६॥ मी ज्योतिषांना (गणकांना) विचारले तेव्हा ते निश्चित सांगतात की भरत राजे होणार हे सत्य माना.॥७॥

**टीका. चौ. ४ - (१) असं कसं म्हणां उणें मनिं मानुनि** - पितृगृही जन्म गाळीन, मरण बरे इत्यादी तुम्ही काहीतरीच मनात आणता. उणे - कमीपणा मानण्यासारखे आहे काय यांत ! उलट तुमचे सुख व भाग्य दिवसेंदिवस दुप्पट वाढणार आहे. सध्या मुख्य सत्ता तुमच्या मुठीत आहेच. भरतांस राज्य मिळाले की तुम्ही होणार राजमाता; मग सुखाला, भाग्याला व मोठेपणाला काय तोटा? पण मग मला विसरू नका हं?

**चौ. ५ - (१) जी अपलें अति अहित चिंतिते** - तुम्ही कोणाचे वाईट केले नाहीत. कोणाला कधी दुःख दिले नाहीत. मग तुम्हाला दुःख का होईल? तुम्हाला निष्कारण दुःख देण्याची ज्यांची इच्छा आहे व ज्यांचा तसा प्रयत्न चालला आहे तेच पाप करीत आहेत. पापाचे फळ दुःख हे ठरलेलेच आहे. 'चिंता परा येई घरा' हा न्यायच आहे मुळी. भाव हा की तुम्हाला दासी बनविण्याची जिची इच्छा आहे तीच तुझी दासी होईल व ज्याच्यासाठी भरताला

कारागृह ठरविले आहे तो घरात-कारागृहात, नगरातसुद्धा नको असे तुम्ही करू शकता.

**चौ. ६ - (१) भूक न बिवस नीज न जामिनि -** हे सुद्धा अगदी धडधडीत खोटे आहे. अधाप काही तास सुद्धा झालेले नाहीत कुबडीला समजल्यावर, अजून संध्याकाळ सुद्धा झाली नाही. एकदा जे बनवून खोटे सांगितले ते चांगले पचविण्यासाठी पदोपदी खोटे बोलण्याची पाळी येतेच. आपल्या स्वामिनिष्ठेचे प्रदर्शन करण्यासाठी व पुढील वचनांप्रमाणे राणीने वागावे म्हणून ही धुंदीची गोळी दिली जात आहे.

**चौ. ७ -** (१) ज्योतिषांना विचारणे व त्यांनी सांगणे या गोष्टीसुद्धा धादांत खोट्या आहेत. नगर शृंगारलेले दिसले व भरत मातेकडे आली ती कुठे गेलीच नाही. भरताचा युवराजा होण्याचा कुल परंपरेप्रमाणे व धर्मशास्त्रानुसार अधिकार नसता त्याला युवराजा करावयास सांगायचा आहे; म्हणून ज्योतिषांचे मत सांगणे जरूर होते. (क) गत पंधा दिन सजिती साज किं (१९।३) यावरील शंकेचे जे उत्तर कुबडीने दिले आहे (टीकेत) त्याच्याशी या दोन्ही चौपायातील वचने अगदी विसंगत आहेत. पण कैकयी आता काही शंका विचारणार नाही अशी खात्री असल्याने निर्धास्तपणे बोलली. जर शंका विचारली असती की तुला सुद्धा लोकांकडून आज नुकतेच कळले; मग भूक नाही व झोप नाही हे कसे व गणकांना केव्हा विचारलेस? तिने सांगितले असते की मला आधी कळले हे खरे पण रात्रंदिवस विचार करून, ज्योतिषांना विचारून, नंतर पुन्हा रात्रंदिवस विचार केला की भरताला युवराज करण्यास काय उपाय करावा? तो उपाय जेव्हा सुचला तेव्हा तुम्हाला सांगितले. आधीच सांगितले असते तर त्याचा उपयोग तुम्हाला व्यर्थ चिंतेत, भयात, शोकात लोटण्यातच झाला असता. तुमच्यासारख्या कोमल हृदयाच्या महाराणीला भावी संकटाची सूचना देणारांनी ते दूर करण्याचा उपाय सांगणे कर्तव्य आहे. तो सांगता येत नसेल त्यांनी सांगणे ही मानसिक हिंसा आहे; म्हणून इतके दिवस सांगितले नाही व स्वतःची आधी खात्री करून घेतली तेव्हा सांगितले. हे संकट टाळण्याचा अगदी बिनतोड उपायही ठरवला आहे.

*हिं.दो.* *। भामिनि करहु त कहौं उपाऊ । है तुम्हरीं सेवा बस राऊ ॥८॥*
*। परउँ कूप तुअ बचन पर सकउँ पूत पति त्यागि ॥*
*॥ कहसि मोर दुखु देखि बड़ कस न करब हित लागि ॥२१॥*

*म.दो.* *। वदुं भामिनि जर करां उपाया । असति तुम्हां सेवावश राया ॥८॥*
*। कूपिं पडेन हि म्हणसि तर त्यजुं पति पुत्र शकेन ॥*
*। वदसि दुःख मम बघुनि अति स्वहिता कसं न करेन ॥२१॥*

**अर्थ :** भामिनि ! तुम्ही जर करणार असाल तर उपाय सांगते; (कारण) तुम्ही सेवेने महाराजांना वश करून ठेवले आहेत.॥८॥ (राणी म्हणाली) तू सांगशील तर मी आडात (कूपांत) उडी टाकीन आणि पति व पुत्र यांचा सुद्धा त्याग करून शकेन; माझे अत्यंत दुःख पाहून तू सांगत असता माझ्याच हितासाठी मी कसे करणार नाही? ॥दो.२१॥

**टीका. - चौ. ८ -** (१) भामिनि ! - सुंदर पण कोपिष्ट स्त्री. भाव हा की तुम्हाला क्रोधाचे सोंग आणावे लागेल व ते तुम्हाला सहज साधतेही. मी सांगेन तसे करावे लागेल. कबूल असेल तर उपायांना काय तोटा. उपाय तयार आहे आणि हवा तर सांगते. **(क) सेवावश राया -** भाव हा की मी सांगेन त्या उपायाची सिद्धि राजाकडूनच होणे शक्य आहे व राजांना तुम्ही सेवेने वश करून ठेवले आहेत. तुम्ही म्हणाल ते करतील. येथील सेवा शब्दाने नित्याची पतिसेवा विवक्षित नसून ज्या सेवेने राजाने दोन वर कबूल केले आहेत ती सेवा येथे उद्दिष्ट आहे. बाह्यार्थ मात्र पतिसेवा हा आहे. 'दयितात्वं सदा भर्तुरत्र मे नास्ति संशयः ॥ त्वत्कृते च महाराजो विशेदपि हुताशनम् ॥२४॥ तव प्रियार्थं राजा तु प्राणानपि परित्यजेत्' (वा.रा. २।९।२४-२५)

**दोहा. (१) कूपिं पडेन -** याने सुचविले की अत्यंत प्रिय असा देह व प्राणसुद्धा बळी देईन. पति प्राणनाथ, प्राणासारखा प्रिय, त्यांचासुद्धा त्याग करीन आणि पुत्र म्हणजे आपला आत्माच, त्याचाही त्याग करण्यास कचरणार नाही. **(क)** प्राण देण्यास तयार होणाऱ्या स्त्रिया पुष्कळ भेटतील, दिसतील, असतील; पण पतिव्रता असून पतीचा त्याग करणारी मिळणे अशक्य ! पतीसाठी पुत्राचा बळी देण्यास तयार होणाऱ्या फार क्वचित; पण दिसतील.

पण एका कुटील, नीच दासीच्या शब्दासाठी पतीचा व पुत्राचा (एकुलत्या एक भरतासारख्या) त्याग करण्यास तयार होणारी कोणी कैकयीवाचून असेल असे वाटत नाही. नाही कशी? पहिली कैकयीचीच जननी व दुसरी कैकयी. (ख) **अति दुःख** = सवतीचे दास्य कैकयीला पतिपुत्र त्यागापेक्षा मोठे दुःख वाटत आहे. पतीचा अपमान केला गेला म्हणून दक्षकन्या सतीने देह जाळला व कैकयी आपल्या तोंडाने म्हणत आहे की दासीच्या शब्दासाठी पति पुत्रत्याग करीन. **केवढा कुसंगतीचा व सवतीमत्सराचा प्रभाव** ! दासीचे वचन पति व पुत्र यांच्यापेक्षा अधिक हितकारी आहे असे कैकयीला वाटत आहे. ते तिच्या मातेच्या स्वभावाला योग्य असेच आहे. केवढे सुरमायेचे सामर्थ्य ! आता उपाय पुढील दोह्यात सांगेल. (ग) **हा दोहा एकविसावा. दासीचे वचन हा एकच विसावा राणीला वाटत आहे.**

***हिं.*** ***। कुबरीं करि कबुली कैकेई । कपट छुरी उर पाहन टेई ॥१॥***
***। लखइ न रानि निकट दुखु कैसें । चरइ हरित तिन बलिपसु जैसें ॥२॥***
***। सुनत बात मृदु अंत कठोरी । देति मनहुँ मधु माहुर घोरी ॥३॥***

***म.*** ***। घे कुबडी कैकइ-कबुलीला । लावि उपलिं उरिं कपट सुरीला ॥१॥***
***। कळे न राणिस निकट घात तो । बलिपशु भक्षी हरित घास तो ॥२॥***
***। श्रवणिं वचन मृदु अंतिं भयानक । घालि मधांतुनि जणुं विष घातक ॥३॥***

**अर्थ** : कुबडीने कैकयीची कबुली घेतली व आपल्या हृदयरूपी पाषाणावर (साहणेवर) कपट सुरीला लावीत (धार देत) आहे.॥१॥ बळी द्यावयाचा पशु जसा हिरवा (ओला) चारा खातो (पण) तो आपला घात जाणत नाही तसा राणीला आपला तो (भावी-जवळ आलेला) घात कळत नाही.॥२॥ (कुबडीचे) भाषण कानास असे गोड (मृदु) लागणारे पण परिणामी भयंकर (कठोर) आहे की जणू घातक विष मधात घालून देत आहे.॥३॥

**टीका. - चौ. १** - (१) घे कुबडी कैकयि-कबुलीला - तू म्हणशील ते करण्यासाठी वाटेल त्याचा त्याग करीन अशी कबुली कैकयीकडून घेतली. आपल्या वाक्चातुर्याने व कुभांडाने तिला स्वखुषीने कबूल करण्यास भाग पाडले. तिला अशा पेचात व भावी संकटांच्या कल्पनांच्या भीषण अरण्यात

उभी केली की तिने सहज कबूल करावे. येथे कुबडी ही बळी देणारी आहे. कैकयी बळी द्यावयाचा पशू, कुबडीने दाखविलेली लालूच हे ओले गवत, कुबडीचे हृदय हा धार लावण्याचा पाषाण, कपट ही सुरी - त्या पशूचा गळा कापून टाकण्याचे हत्यार, सूडबुद्धी ही चंडिका देवी, रामवनवास हा मिळवावयाचा प्रसाद व भरताला राज्य देऊन स्वतः मनमुराद ऐश्वर्य भोगून कैकयीवर सत्ता गाजविणे हे प्रयोजन फल आहे. आता या परंपरित रूपकाचे क्रमशः स्पष्टीकरण करू.

(२) **पे कुबरी कैकयि - कबुलीला** - हा चरण मागील संदर्भ स्पष्ट करणारा आहे. (क) **लावि उपलिं जरिं कपट सुरीला** - बळी देण्याच्या पशूची मान एका फटक्याने कापावी लागते म्हणून तो सुरा किंवा तलवार वजनदार व तीक्ष्ण धार असलेली असावी लागतात. कपटरूपी सुरीने कैकयीरूपी पशूचा गळा एका फटक्यात कापावयाचा आहे. म्हणून कपट सुरीला तीक्ष्ण धार देण्यासाठी आपल्या कठोर हृदयरूपी पाषाणावर, साहणेवर ती घाशीत आहे. भाव हा की अमोघ कपटयुक्ती शोधीत आहे. सुरी, वस्तरा इ. पाषाणावर लावणे म्हणजे त्यांस धार देणे.

**चौ. २ - (१) कळे न राणिस निकट घात...** - घास – बळी द्यावयाच्या पशूला आधी पुष्कळ दिवस चांगले ओले गवत (घास) व दाणा वगैरे घालून चांगला धष्टपुष्ट करतात. तो पशू ते सर्व मोठ्या आनंदाने खात असतो. आपल्याला खायला घालणारी व्यक्ति एक दिवस स्वतःचा इष्ट हेतु साधण्यासाठी आपला गळा कापणार आहे हे त्या पशूला कळत नाही. तसाच कैकयीला विवेक, सुविचार नाही. स्वतःचे हिताहित कळत नाही. ती पशूपेक्षाही मूर्ख, अविचारी आहे हे कुबडीने तोंडावरच सांगितले आहे. बलिपशू उदर तृप्तीच्या आशेने तो चारा खात असतो तसा दुप्पट सौभाग्य व दुप्पट सौख्याची आशा, सवतीमत्सर सूड इ. चारा कैकयीपुढे कुबडीने टाकला आहे व तो खाण्यात ती गुंग आहे. हा चारा खाऊन पुष्ट व उन्मत्त झालेला पशू स्वजातीच्या इतर पशूंना मारू लागतो. डोळे लालबुंद इंगळासारखे होतात. जमीन पायांनी पोखरू लागतो. डोंगर, टेकड्या यांना टक्कर देऊन शिंगे मारू लागतो. नदी किनाऱ्यांत

शिंगे खुपसतो. तशीच कृती कैकयी दशरथरूपी भूधराशी करणार आहे. दोन वर ही शिंगे होतील व ती प्रथम दशरथ पर्वताला - टेकाडाला व नंतर कौसल्यारूपी नदी तटाला मारली जातील. अपकीर्ति - कलंकरूपी पंक (चिखल) हा पशू आपल्याच पायांनी व शिंगांनी आपल्याच अंगावर कायमचा घेईल. हे सर्व तो पशू जसा दर्पाने, क्रोधाने, उद्दामपणाने, उत्साहाने धुंद होऊन मनापासून करीत असतो तसेच कैकयी करणार आहे. कुबडी आपल्या सूडबुद्धीरूपी चंडिकेला प्रसन्न करण्यासाठी आपला गळा कापणार आहे, ते तामसबुद्धी कैकयीला कळत नाही व शेवटपर्यंत कळणार नाही.

**चौ. ३ - (१) श्रवणिं वचन मृदु अंति भयानक** - त्या पशूला चरण्यासाठी त्याच्यापुढे टाकलेला चारा जसा मृदू, लुसलुशीत, गोड व रसाळ असतो त्याला तो मनापासून आवडतो तसे कुबडीचे कपटी, विश्वासघातकी भाषण राणीला हितकारक, सुखद व रूचकर वाटत आहे. पण अंती भयानक सुरा आपला गळा कापून टाकणार आहे हे राणीला कळत नाही. येथे हे रूपक पूर्ण झाले. (क) गळा कापणे म्हणजे कपटाने विश्वासघात करणे, विनाश करणे. सर्वनाश जर कोणाचा होणार असेल व कल्पांतापर्यंत दिगंत अपकीर्ती व नावाला कलंक जर कोणाच्या लागणार असेल तर एकट्या कैकयीच्याच. स्वार्थ साधून, ऐश्वर्य, सत्ता इ. मिळवून सवती मत्सराची तृप्ती करून अपकीर्ती झाली असती तर ती काहीतरी सुसह्य झाली असती. परंतु यातील काहीही न साधता, कोणतेही नवीन सुखसमाधान न मिळता असलेले सुख-समाधान, प्रतिष्ठा इ. सर्वच नष्ट होणार आहे. कैकयी हे विशेष नाम असून कल्पांतापर्यंत सामान्य नाम बनणार आहे.

(२) **घालि मधांतुनि जणुं बिष घातक** - राम वनवास हे घातक विष आहे; व कुबडीचे मधुर भाषण हा मध आहे. विष उग्र, प्राणघातक, क्लेशदायक असते हे सर्व जाणतात. त्यामुळे कोणी सहसा घेत नाहीत. फसवून विष द्यावयाचे असले म्हणजे मधात मिसळून देतात. म्हणजे सहसा कळत नाही. मध चाटून खाताना गोड लागतो. सुखद वाटतो. तसेच कुबडीचे भाषण आहे. रामाला वनात धाडा इतकेच सांगितले असते तर ते राणीने मान्य केले नसते;

पण सवतीचा सूड घेणे, भरताला राज्य देणे, आपण राजमाता होणे, मान-सन्मान मिळविणे इत्यादी अनेक आशारूपी मधुर रसांचे मिश्रण म्हणजेच येथे मध होय. मधात अनेक रस एकत्र आलेले असतात. **'मधुनि लिल्युरनेकरसाः'** (भाग.वे.स्तु.) या मधात मिसळून रामवनवासरूपी जालीम विष कैकयीला पाजणार आहे. मधात असलेला किंचित कडवटपणा नकोसा न वाटता गोडच वाटतो; तसे रामवनवासरूपी विष राणीला गोड वाटणार आहे. हे पुढील चौपायांवरून स्पष्ट कळेल.

**हिं.** *। कहइ चेरि सुधि अहइ कि नाहीं । स्वामिनि कहिहु कथा मोहि पाहीं ॥४॥*
*। दुइ बरदान भूप सन थाती । मागहु आजु जुडावहु छाती ॥५॥*
*। सुतहि राजु रामहि बनबासू । देहु लेहु सब सवति हुलासू ॥६॥*
*। भूपति राम सपथ जब करई । तब मागेहु जेहिं बचनु न टरई ॥७॥*

**म.** *। शुद्ध असे किं न, वदली दासी । स्वामिनि कथित कथा मजपासी ॥४॥*
*। भूपापासीं ठेव दोन वर । मागा निववा हृदय आज वर ॥५॥*
*। सुता राज्य रामा वनवासा । द्या, घ्या सकल सवति-उल्हासा ॥६॥*
*। भूपति राम शपथ जैं घेइल । तैं मागा मग वचन न टळतिल ॥७॥*

**अर्थ :** दासी म्हणाली की स्वामिनी ! काही (मागली पुढली) शुद्ध (आठवण) आहे की नाही? तुम्ही एकदा मजपाशी गोष्ट काढली होतीत - ॥४॥ कीं राजाजवळ दोन वर (त्यांनी कबूल केलेले) ठेव म्हणून ठेवले आहेत; ते आज मागून घ्या व आपले हृदय चांगले (बरे) निववा.॥५॥ पुत्राला राज्य व रामाला वनवास द्या. (असे वर मागा) आणि सर्व सवतींना झालेला उल्हास (आनंद व उत्साह) तुम्ही (एकट्या) घ्या. लुटा.॥६॥ (मात्र) भूपती ज्या वेळी रामाची शपथ घेईल त्या वेळीच मागा हो! म्हणजे त्याची वचने टळणार-बदलणार-नाहीत.॥७॥

**टीका. - चौ. ४ - (१) स्वामिनि** - भाव हा की उपाय तुमच्या स्वाधीन आहे. तुमच्या जवळ आहे आणि मला विचारता हे आश्चर्य आहे. तुम्हीच ती कथा मागे मला सांगितलीत, ती माझ्या चांगली आठवणीत आहे आणि तुमच्या परम कल्याणाची ती गोष्ट तुम्ही विसरलात तरी मला ती आठवणीत

ठेवावीच लागली. सुचविले की तुम्ही महामूर्ख पशू आहात. आणि मी शाहणी, फार चतूर, कर्तव्यनिष्ठ सुहृद आहे.

**चौ. ५ - (१) भूपापासीं ठेव दोन बर** - कैकयीला राजाने दोन वर कोणत्या कारणाने दिले होते या विषयी कल्पभेदाने भिन्न भिन्न कथा आहेत. **(क) पुढील कथा वा.रा.** २।९।१२-१८ **मध्ये आहे**. मंथरा म्हणते - पूर्वी देवासुरांच्या युद्धात दशरथ राजा दुसऱ्या राजर्षींना बरोबर घेऊन तुमच्यासह इन्द्राला साहाय्य करण्यासाठी गेले. दक्षिण दिशेला दण्डकारण्यात **वैजयन्त** नावाच्या **नगरात शंबर** नावाचा तिमिध्वज **असुर होता**. तो शेकडो माया जाणत असे. त्याने इन्द्राशी युद्ध सुरू केले व तो देवांना अजिंक्य झाला. त्या घनघोर युद्धात असुरांच्या शस्त्रास्त्रांनी जखमी झालेले वीर झोपलेले असता राक्षस त्यांना खाऊन टाकीत. तेथेच दशरथांनी असुरांबरोबर घनघोर युद्ध केले पण असुराने त्यांचे शरीर बोटा बोटांवर जखमांनी व्यापून टाकले. तेव्हा दशरथ बेशुद्ध झाले व तुम्ही त्यांचा रथ रणांगणातून दूर नेऊन त्यांचे रक्षण केलेत. तेव्हा संतुष्ट होऊन त्यांनी तुम्हाला दोन वर मागण्यास सांगितले. तुम्ही म्हणालात की जेव्हा इच्छा होईल तेव्हा मागून घेईन. तेव्हा ते तथास्तु म्हणाले. ही गोष्ट मला माहीत नव्हती पण तुम्हीच मला एकदा सांगितली होती. ही तुमची कथा तुमच्या स्नेहामुळे मी आतापर्यंत लक्षात ठेवली आहे. **(ख) अ.रा.** २।२।६५-७२ **मध्ये** - मंथरा सांगते - देवासुर संग्रामात इंद्राने दशरथांजवळ साह्याची याचना केली, तेव्हा ते तुम्हाला घेऊन युद्धाला गेले. युद्धात राजाच्या रथाच्या चाकाची कानखीळ (कीलकुनी) तुटून पडली. तेव्हा त्या छिद्रांत तुम्ही आपला हात घातलात व रथाचे चाक पडू दिले नाहीत. अशा रीतीने तुम्ही राजाचे प्राण वाचविलेत. राजाला विजय प्राप्त झाला तेव्हा त्यांनी तुम्हाला दोन वर देऊ केले. तुम्ही म्हणालात, '**त्वय्येव तिष्ठतु चिरं न्यासभूतं ममानघ ॥ यदा मेऽवसरो भूयात्तदा देहि वरद्वयम्** ॥७२॥ **न्यास** = ठेव = थाती शब्द येथे स्पष्ट आहे. हीच कथा जास्त प्रसिद्ध आहे व हीच मानसकवींनी घेतलेली दिसते. कैकयीच्या हाताला इतका कठीणपणा कशाने आला याची कथा पूर्वी दिलीच आहे.

(२) **निबवा हृदय आज बर** - बर = चांगलं, उत्तम प्रकारे जे तापलेले

असेल तेच निवविता येते. सवतीदास्याची भीती तुमच्या हृदयाला जाळीत आहे. त्यामुळे ते फार संतप्त झाले आहे. ते मी सांगते त्या उपायाने शांत, शीतल करा दुसरा उपाय नाही.

**चौ. ६ - (१) सुता राज्य रामा बनवासा - द्या** - राजा दशरथ सहज देऊ शकतील असा वर प्रथम मागण्यास सांगते. राज्यार्पणासाठीच उत्सव चालू आहे. 'जे राज्य, जी सत्ता रामाला देणार आहेत, ते राज्य, व ती सत्ता भरतास द्या.' असा पहिला वर मागा म्हणजे तुमच्या सवतीच्या हृदयात मावत नसलेला आनंद व गर्व पळून जाईल. ते दुःखाने होरपळेल व तुमचे होरपळलेले निवेल. 'रामाला वनवास द्या.' असा दुसरा वर मागा. भरतापेक्षा रामावर प्रेम करणारेच लोक जास्त आहेत. रामास मिळणारे राज्य भरतास दिले की राज्यात दोन पक्ष पडणार. एक बहुसंख्य प्रबळ पक्ष रामाचा व दुसरा अगदी अल्पसंख्य, दुर्बळ पक्ष भरताचा. राम नगरात राहिल्याने भरतास आणवून राज्य देईपर्यंतच अनर्थ ओढवेल. तुम्हालाच युक्तिप्रयुक्तीने ठार करतील व भरत आला म्हणजे त्यास नगरात शिरू न देता बाहेरच गाठतील आणि राम-लक्ष्मणांपुढे भरत-शत्रुघ्नांचा टिकाव लागणार नाही. म्हणून त्या अनर्थाचे मूळ रामच वनात गेले की लक्ष्मणही जाणारच. अरण्यात दोघेच राहिले म्हणजे घोर राक्षसांच्या तडाक्यांतून सुटणे अशक्यच. परत येणेच शक्य नाही नी भरताचे राज्य निष्कटंक होईल. माणूस डोळ्यांसमोर नसले फार दिवस म्हणजे आठवणी हळूहळू बुजत जातात व संगतीने हळूहळु प्रीती वाढते. रामावरील लोकांचे प्रेम उडेल व भरतांवर जडेल. **'काटीने काटी झाडावी । झाडावी ते कळोंचि नेदावी । कळकटेपणाची पदवी । घेवोंचि नये ॥** (दा.बो.) **'क्षत्रियाणामयं धर्मो यत्प्रजा परिपालनम् ॥ वधश्च धर्मयुद्धेन स्वराज्यपरिपन्थिनाम् ॥** प्रजेचे परिपालन करणे व स्वतःच्या राज्याच्या शत्रूंचा धर्मयुद्ध करून वध करणे हा क्षत्रियांचा धर्मच आहे. तुम्ही आपला जीव धोक्यात घालून, पतीचे प्राण रक्षण करून सतीधर्माचे पालन करून वर मिळविले आहेत. ते ठरल्याप्रमाणे इच्छेस वाटतील ते केव्हाही मागणे .यात अधर्म नाही, धर्मच आहे. बरे वर मागायचे म्हणजे चणेफुटाणे का कोणी मागतात. जे सहज प्रयत्नाने मनुष्याला मिळत नसेल तेच कोणी

वर म्हणून मागणार; म्हणून असे वर मागण्यात अन्याय, दुष्टपणा काही नाही.

**चौ. ७ - (१) भूपति रामशपथ जैं घेइल...** मात्र लक्षात ठेवा की पहिला वर देण्यास राजा नाकबूल होणार नाही. पण दुसरा वर देणे त्याच्या जिवावर येईल. कारण राजाला राम प्राणांपेक्षा जास्त प्रिय आहेत. राम वनवासात न जाता राजाने भरतास राज्य देण्याचे कबूल केले तरी ते कृतीत उतरणे जवळ जवळ अशक्यच; म्हणून राजा रामाची शपथ घेईल असे आधी करा नी मग पहिला वर मागा व नंतर दुसरा म्हणजे वचनभंग करण्यास राजाला धीर होणार नाही. **(क) शपथ करई - शपथ घेईल** - असे एकवचन हेतुपूर्वक वापरले आहे. मागल्यासारखे हे राणीला बोचते की काय हे पारखून पहात आहे. **(ख)** फौजदारी कोर्टात मारामारीच्या, खुनाच्या फिर्यादी झाल्या म्हणजे वकील आपल्या अशीलांना व साक्षीदारांना जसे पढवून, बजावून ठेवतात तसे ही दुष्ट, कपटी, कुटिल दासी करीत आहे. तिला माहीत आहे की आपण जे जे आरोप राम, राजा व कौसल्या यांवर केले आहेत ते ते सर्व हे आपले अशील उत्तम प्रकारे बोलून दाखवील. या प्रमाणे मधाचे मोहोळ कापण्यासाठी झोला व भिल्ल यांना खाली सोडले. दुधारी विळा तयार केला. आता क्रोधाचे नाटकरूपी लांब काठी व रामशपथ घेवविणे, हे विळा त्या काठीला घट्ट बांधणे या गोष्टी सिद्ध करील व मोहोळ अत्यंत सावधगिरीने कापण्यास सांगेल. (१३।४ टीका व तुलना पहा).

*। होइ अकाजु आजु निसि बीतें । बचनु मोर प्रिय मानेहु जी तें ॥८॥*

**हिं.दो.** *। बड़ कुघात करि पातकिनि कहेसि कोपगृहँ जाहु ॥*

*॥ काजु सँवारेहु सजग सब सहसा जनि पतिआहु ॥२२॥*

*। होइ अकाज आज निशि सरतां । मम वच माना प्राणां-परतां ॥८॥*

**म.दो.** *। करि कुघात पापिण म्हणे, जावें कोपगृहास ॥*

*॥ सावध साधा सर्व, नच धरा सहज विश्वास ॥२२॥*

**अर्थ :** आजची रात्र (अशीच गेली) की घात (अकाज) झालाच म्हणून समजा; म्हणून (सांगते ते) माझे म्हणणे प्राणांपलीकडे (परतां-परते) माना.॥८॥ पापिणीने अति वाईट (विश्वास) घात केला व म्हणाली की तुम्ही आता

कोपगृहात जा कशा; आणि फार सावध राहून सर्व (कार्य) साधा, एकाएकी (सहज, राजाच्या बोलण्यावर) विश्वास ठेवू नका.।।दो.२२।।

**टीका. - चौ. ८ - (१) आज निशि सततं अकाज होई** - आजच्या रात्रीत जर सांगितल्याप्रमाणे आपले कार्य साधले नाहीत तर मग सर्वनाश ठेवलेलाच. सूर्योदय होण्याच्या आत हे वर मागून घेतलेत तर सुखाच्या सिंहासनावर बसाल. रामाला राज्याभिषेक झाला किंवा राम वनात गेला नाही तर विनाश चुकविता येणार नाही. पुढले कार्य सिद्धीस नेणं आता सर्वस्वी तुमच्या हाती आहे. तुम्हाला नीट साधता आले नाही तर तुमचा व तुमची दासी म्हणून आमचा घात होणार.

**दोहा. (१) कुघात** - मोठा विश्वासघात, मर्मी घाव, पापीण का म्हटले हे सांगण्याची जरूरच नाही. **(क) कोपगृह** - राण्यांनी रागावून, रुसून बसण्याची, पडून राहण्याची जागा, खोली. इतर राण्यांच्या महालातील या खोल्यांचा उपयोग बहुधा कधीच झाला नसेल; पण कैकयीच्या प्रासादातील त्या क्रोधागाराला कैकयीचे पाय व अंग आणि दशरथांचे पाय अनेक वेळा लागले असतील. राणी कोपगृहांत असणे ही तिच्या क्रोधाची जाहिरात असे राजाने समजावयाचे व तेथे जाऊन क्रोधाचे कारण विचारावयाचे व तिला प्रसन्न करण्यासाठी ती सांगेल ते द्यावयाचे किंवा सांगेल ते करावयाचे हा क्रम ठरल्यासारखाच असे. क्रोध जितक्या वरच्या थराला गेल्याचे दाखवावयाचे असेल तेवढे नाटकी वर्तनाचे निराळे प्रकार असावयाचे. कोपगृहांत जाऊन बसणे हा अगदी साधा क्रोध. दागिने काढून फेकून देणे हा त्याच्यापेक्षा अधिक, जमिनीवर पडून राहणे ही त्याच्या वरची पायरी, जाडीभरडी वस्त्रे नेसून पडणे ही त्याच्या वरची पायरी, फाटकी-जुनी जाडी वस्त्रे नेसून पडणे ही त्याच्यावरची पायरी, अशा वेषांत नुसत्या जमिनीवर गडबडा लोळणे ही त्याच्यावरची इ.इ. **(ख) सर्व सावध साधा** - फार सावधगिरीने सर्व डाव साधा. राजाला चांगला झिडकारा. हात लाऊ देऊ नका अंगाला. बोलूच नका काकुळतीस आला तरी. मात्र फार ताणू नका. तो रागाने निघून गेला सवतीच्या महालात की आटोपलेच सर्व, विनाश झालाच ! बोलणेसुद्धा अगदी

विचार करून, मोजके बोलले पाहिजे. काय मागणार याचा जरासुद्धा सुगावा रामशपथ घेईपर्यंत लागू देऊ नका. त्याच्या गोड गोड भुलथापांवर एकाएकी विश्वास ठेऊ नका. पायधरण्या, विनवण्या केल्या तरी हट्ट सोडू नका. इ. सांगितले. क्रोध कसा आणावा, कसे रुसावे, हे कैकयीला चांगले माहीत होते. नेहमीची सवय होती असे मानसांतील दशरथांच्या वचनांवरून ठरते. 'रुसणे भारी प्रिय तुजला गे' (२८।१) वा.रा. कौसल्या रघुनाथासच म्हणाली आहे, की ती नेहमी रागावलेली असते.

हिं. ***। कुबरिहि रानि प्रानप्रिय जानी । बार बार बड़ि बुद्धि बखानी ॥१॥***
***। तोहि सम हित न मोर संसारा । बहे जात कइ भइसि अधारा ॥२॥***
***। जौं बिधि पुरब मनोरथु काली । करौं तोहि चख पूतरि आली ॥३॥***
***। बहुबिधि चेरिहि आदरु देई । कोपभवन गवनी कैकेई ॥४॥***

म. ***। प्राणप्रिय गणि कुबडिस राणी । घडि घडि महा मतिस वाखाणी ॥१॥***
***। तुज सम मम हित नहि संसारां । जात वहात देसि आधारा ॥२॥***
***। जर विधि वांछा पुरवि सकाळीं । नेत्र-पुतळि तुज करीन आळी ॥३॥***
***। दासीला देउनि बहु आदर । कैकयी कोपभवनिं गत सादर ॥४॥***

**अर्थ :** राणीने कुबडीला प्राणप्रिय मानली व तिच्या मोठ्या बुद्धिमत्तेची वारंवार प्रशंसा केली.॥१॥ या संसारांत माझे हित करणारे तुझ्यासारखे कोणी नाही; मी वहात जात असता तू मला हात (आधार) दिलास.॥२॥ उद्या सकाळी दैवाने जर माझी इच्छा पूर्ण केली तर हे सखी ! (आली) मी तुला माझ्या डोळ्यांतली बाहुली (पुतळी) करून ठेवीन (बरं)॥३॥ (याप्रमाणे) दासीला नाना प्रकारे आदर देऊन कैकयी आदराने कोप भवनात गेली.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) प्राणप्रिय गणि कुबडिस राणी** - 'कुबडे काणे पांगळे' - इत्यादी म्हणून ज्या राणीने हिचा उपहास केला व जीभ कापण्याची धमकी दिली, घरफोडी ही पदवी दिली तीच राणी त्याच नीच बटकीला प्राणप्रिय समजू लागली व जे राम तिला प्राणांहून प्रिय वाटत होते तेच तिच्या डोळ्यांत सलू लागले ! **मानवाच्या भावनांच्या अस्थिरतेची विपरीत चित्रे यापेक्षा भडक व सजीव कुठे दिसतील ?** प्राणप्रिय का झाली याची काही कारणे राणीच पुढे सांगते.

(क) **घडि घडि महामतिस वाखाणी** - कौसल्येचा गर्व व सवतीमत्सर, राजाचे दंभ व कपट, रामाचे औदासीन्य इत्यादी जाणणे, सूक्ष्म खोल बुद्धी, पुढे काय होणार याचा अचूक कयास बांधणे, दूरदर्शिता, दीर्घ स्मरणशक्ती, राजनीती निपुणता, उपाययोजना, चातुर्य इ. गुणांची प्रशंसा केली. जी महापापीण कुमती आहे ती महाबुद्धिवान वाटू लागली हे कुमतीचे लक्षण !

**चौ. २ - (१) तुज सम मम हित नहि संसारा** - रामाला वनवास देऊन व भरताला युवराज बनवून ही बटकी हित करणार. इतर सर्वांनी तिला (कैकयीला) बटकी बनविण्याचा व भरताला कैदेत टाकण्याचा कट केला आहे असे राणीला निःसंशय वाटू लागले व कुबडी सर्वात श्रेष्ठ हितकर्ती वाटू लागली. पण शेवटी कळेल की या बटकीनेच मोठा विश्वासघात केला व अपकीर्ती पात्र, चिरदुःखभाजन, निन्दास्पद केली. **कुमति उत्पन्न झाली की मित्र शत्रू वाटतात व शत्रू खरे मित्र वाटू लागतात. (क) बहात जातां** - रामराज्याभिषेकाच्या आनंदरस प्रवाहात वहात जाऊन संकटांच्या सागरात पडणार असता तू मला वाचविलीस. प्राणदाता, प्रिय, प्राणप्रिय वाटू न लागला तरच आश्चर्य ! रामराज्याभिषेक ऐकून राणीला प्रथम फार आनंद झाला. त्याला ती वहात जाणे म्हणते. जे अशुभ होते ते जेव्हा मला शुभ वाटत होते व पुष्कळ हितकर्ती माणसे असून कोणीच माझे हित पाहिले नाही अशा वेळी तू एकटीच माझे हित करणारी ठरलीस.

**चौ. ३ - (१) जर बांछा बिधि पुरवि सकाळीं** - दशरथांविषयी जी विपरीत भावना उत्पन्न झाली आहे ती शंका घेते की राजा आज इकडे आलाच नाही तर आपल्या कोपाचा व कुबडीच्या सावधगिरीचा काहीच उपयोग होणार नाही. रात्री कैकयीच्या महालात आल्याशिवाय राजाला चैनच पडत नाही व राजाने कैकयीशी काही कपट केलेले नाही हे दासीला माहीत असल्याने दशरथ आनंदित होऊन राणीच्या महालात येणारच; म्हणून तिला मुळीच शंका वाटत नाही; कारण आपण सर्व कुभांड रचले आहे हे तिला माहीतच आहे; परंतु तिचे सर्व म्हणणे या राणीला खरे वाटत असल्याने तिला ही पहिली शंका येणे स्वाभाविक आहे. राजा जर **कैकयीवर अत्यंत आसक्त नसता व त्याने**

**कैकयीच्या भयाने हे कार्य गुप्तपणे ठरविले असते तर तो कैकयीकडे गेलाच नसता.** पण सर्व गोष्टी प्रारब्ध कर्मप्रेरणेने एकाएकीच घडत गेल्या त्या प्रमाणे राजा कैकयीच्या वाड्यात जाणार आहेच. ईश्वरी कृपा असती तर तिकडे जाण्याची इच्छा न होता कोणाकडून तिला कळविले असते. (**क**) **दुसरी शंका** - राणीला वाटत आहे ती दुसऱ्या वराची. प्राण गेला तरी राजा रामाला वनात पाठविणार नाही, असे तिला वाटत आहे.

(२) **नेत्र-पुतळि तुज करीन आली - १ - नेत्रपुतळी** - डोळ्यांतील बुबुळांत असलेली बाहुली. हिला डोळ्यांच्या पापण्या जपत असतात तशी मी तुला जपेन. २. डोळ्यांना जे दिसते ते त्या बाहुल्यांमुळेच दिसते. त्याप्रमाणे सत्ता हाती आल्यावर मी सर्व व्यवहार तुझ्या तंत्राने करीत जाईन कारण तू चतूर, दूरदर्शी, मर्मज्ञ व माझे खरे हित करणारी आहेस. तुझी स्मरणशक्ती दांडगी, दुसऱ्यांचे इंगित, कपट तुला कळते त्यामुळे तू मला योग्य मार्गदर्शन करणारी होशील व तुला मुख्य पद मिळेल असे वा.रा. म्हटले आहे. तेच येथे थोडक्यात पण वात्सल्य, आदर इ. सहित सुचविले आहे. '**अभिषिक्ते तु भरते राघवे च वनं गते ॥ जात्येनच सुवर्णेन सुनिष्टप्तेन सुंदरि ॥ लब्धार्थाच प्रतीताच लेपयिष्यामि ते स्थगु ॥ मुखेच तिलकं चित्रं जातरूपमयं शुभम् ॥४९॥ कारयिष्यामि ते कुब्जे, शुभान्यभरणानि च ॥ परिधाय शुभे वस्त्रे देवतेव चरिष्यसि ॥५०॥ चन्द्रमाह्वयमानेन मुखेनाप्रतिमानना ॥ गमिष्यसि गतिं मुख्याम गर्हयन्ती द्विषज्जनम् ॥५१॥ तवापि कुब्जाः कुब्जाया सर्वाभरणभूषिताः ॥ पादौ परिचरिष्यन्ति यथैव त्वं सदा मम ॥५२॥** या श्लोकांतील सार 'नेत्रपुतळि तुज करीन' या शब्दांनी मानसांत सुचविले आहे. (वा.रा. २।९।४८-५२)

**चौ.४** - (१) **दासीला देउनि बहु आदर** - वा. रा. २।९।३८-४७ यांतील सार या चरणांत सांगितले आहे. **प्रज्ञां ते नावजानामि श्रेष्ठां श्रेष्ठाभिधायिनीम् ॥३८॥ पृथिव्यामसि कुब्जानामुत्तमा बुद्धिनिश्चये ॥ त्वमेव तु ममार्थेषु नित्ययुक्ता हितैषिणी ॥३९॥ नाहं समवबुध्येयं कुब्जे राज्ञश्चिकीर्षितम् ॥ सन्ति दुःसंस्थिताः कुब्जा वक्राः परमदारुणाः ॥४०॥ त्वंपद्ममिव वातेन संनता प्रियदर्शना ॥ उरस्ते ऽभिनिविष्टं वै यावत्स्कन्धं समुन्नतम् ॥४१॥ अधस्ताच्चोदरं शातं सुनाभमिव लज्जितम् ॥ परिपूर्णं तु जघनं सुपीनौ च पयोधरौ ॥४२॥ विमलेन्दुसमं वक्त्रं**

**अहो ! राजति मन्थरे ॥ जघनं तव निर्घृष्टं रशनादामशोभितम् ॥४३॥ आसन् या शम्बरे मायाः सहस्रमसुराधिपे ॥४५॥ सर्वास्त्वयि निविष्टास्ता भूयश्चान्याः सहस्रशः॥ तवेदं स्थगु यद्दीर्घं रथघोणामिवायतम् ॥४६॥ मतयः क्षत्रविद्याश्च मायाश्चात्र वसन्ति ते ॥ अत्र ते प्रतिमोक्ष्यामि मालां कुब्जे हिरण्मयीम्॥४७॥** जी अति कुरूप, अति कुबुद्धी म्हणून प्रसिद्ध होती तीच राणीला अति रूपलावण्यसंपन्न दिसू लागली. वरील श्लोकांत जी प्रशंसा केली आहे तिचे सार 'बहु आदर देउनि' या शब्दांनी सुचविले. **छ.ठे. हे सर्व वर्णन** मानसात नसले तरी राम वनवासास गेल्यावर कैकयीने कुबडीला एखाद्या राणीसारखी वस्त्रालंकारांनी सजविली हे भरत आल्यानंतरच्या कथेत सुचविले आहे. (२।१६३।२). **(क)** नंतर कैकयी आदराने (श्रद्धेने) कोपगृहात गेली. वा.रा. मंथरा तिला कोपभवनात पोचविण्यास गेली आहे. मंथरा-कैकयी संवाद कैकयी शय्येवर पडलेली असता झाला असे वा.रा. वरून ठरते. कोपभवनांत राणी गेल्यावरसुद्धा कुबडीने बजावले आहे की वाटेल ते करून हे दोन वर मागून घ्या. नाहीतर जन्मभर पश्चाताप करीत बसावे लागेल. तेव्हा राणीने प्रतिज्ञा केली आहे की एकतर उद्या सकाळी मी येथे मरून पडल्याचे सांगण्यास तू राजाकडे जाशील किंवा भरताला राज्य व रामाला वनवास मिळाल्याचे ऐकशील. (वा.रा. २।९।६१ पहा.)

***हिं.*** ***। बिपति बीजु बरषा रितु चेरी । भुइं भइ कुमति कैकई केरी ॥५॥***
***। पाइ कपट जलु अंकुर जामा । बर दोउ दल दुख फल परिनामा ॥६॥***
***। कोप समाजु साजि सबु सोई । राजु करत निज कुमति बिगोई ॥७॥***
***। राउर नगर कोलाहलु होई । यह कुचालि कछु जान न कोई ॥८॥***

***म.*** ***। बीज विपत् वर्षा ऋतु किंकरि । कैकइ कुमति ब बने भूमि बरि ॥५॥***
***। पडत कपट-जळ अंकुर फुटतो । वर युगदल फल अंतिं दुःख तों ॥६॥***
***। क्रोध साज सजुनी भुविं पडली । राज्य करत कुमतिनें ठकवली ॥७॥***
***। धामधूम पुरिं राज निवासीं । कांहिं कुचालि न कळे कुणासी ॥८॥***

**अर्थ :** (विपद् = विपत्ति; किंकरी = दासी-चेरी; वर्षा ऋतु - पावसाळा) विपत्ती हे बीज आहे. दासी हा पावसाळा आहे व कैकयीची कुमति ही चांगली (अनुकूल) भूमी बनली (सापडली-झाली).॥५॥ कपटरूपी जल (पाऊस) पडताच

अंकुर फुटला; दोन वर ही दोन दले झाली व शेवटी दुःखरूपी फळ मिळणार.॥६॥ क्रोधाचा सर्व साज सजून नुसत्या जमिनीवरच राणी पडून राहिली. राज्य करीत असता स्वतःच्या कुमतीनेच तिला ठकवली (फसवली)॥७॥ (इकडे) नगरात व राजनिवासात (उत्सवाची) धामधूम चालू आहे व (तिकडे) काय कुचाळकी केली जात आहे हे कोणास काहीच कळले नाही.॥८॥

**टीका. चौ. ५-६** (१) या दोन चौपायांत बीजापासून फलप्राप्तीपर्यंतचे वृक्षाचे रूपक आहे. या रूपकाने हे दाखवावयाचे आहे की बीज भूमीत पडल्यापासून व बीज तयार होण्यापासून फळ प्राप्तीपर्यंतच्या सर्व अवस्था निसर्गक्रमाने योग्य काळी सहज घडत असतात. त्यात कोणाची स्तुती किंवा निंदा करण्यास जागा नसते. त्याप्रमाणेच या सर्व गोष्टी निसर्गक्रमाने यथाकाळी क्रमशः घडल्या व घडत आहेत. तत्त्वतः कोणालाच दोष देण्याचे कारण नाही. **हे वर्णन पाऊस पडून होणाऱ्या घटनेचे आहे. बीज लाऊन, पाणी घालून वाढविलेल्या वृक्षाचे हे वर्णन नाही.** बीज आधी कुठेतरी सहज तयार झालेले असते. ते वाऱ्याने किंवा इतर कारणांनी कुठेतरी जाऊन पडून राहिलेले असते. कुठल्या ठिकाणचे बीज कुठे पडलेले असते ते आधी कोणास कळत नाही. रोप उगवल्यावर कदाचित कळू शकते. दशरथाने न जाणता, चुकून, तापसाची हत्या केली. त्या कर्माचे फळ जो शाप मिळाला त्यात दोन बीजे होती. एक सुखसमाधान बीज व दुसरे दुःखफल बीज. अपुत्र व वृद्ध असता पहिले बीज पुत्रप्राप्ती रूपाने फळास आले. पुत्रशोकाने मरणरूपी ज्याचे फळ मिळणार ते दुःखफल बीज आधीच तयार झालेले होते. तेच विपत्ति बीज. ते दशरथाच्याच कर्म भूमीतून उडाले होते. (काही फळे आपोआप फुटून त्यातील अति सूक्ष्म बीजे दूर उडतात). त्याला पूर्णपणे अनुकूल अशी भूमी (जमीन) कैकयीची कुबुद्धि, कुरूप विप्राचा शाप व वर आणि त्यांच्या प्रेरणेने दशरथाने कबूल केलेले दोन वर यांच्या प्रभावाने सापडली होती. कर्म प्रेरक अदृष्ट शक्तीने ते विपत्ति बीज तेथे घालून ठेवले होते. पावसाळा सुरू होऊन काही काळ जाईपर्यंत कुठे कोणती बीजे पडलेली आहेत हे फार प्रयत्न करून सुद्धा कळत नाही. तसेच **हे विपत्ति बीज कैकयीच्या कुमतीत पडलेले होते.** (क) भूमी ज्याच्या

मालकीची व ज्याच्या कबजात असेल त्या व्यक्तीलाच मुख्यतः त्या भूमीत उगवून फळणाऱ्या वृक्षाची फळे मिळतात.

**कैकयि-कुमतिच बने भूमी** - म्हणून स्पष्ट झाले की दुःखरूपी फळ मुख्यतः कैकयीच्याच वाट्यास येणार. हेच मागे टीकेत स्पष्ट सांगितले आहे. कैकयीवर मालकी दशरथाची; म्हणून त्यांना त्याच्या खालोखाल दुःख भोगावे लागणार. दशरथांचा अतिनिकट संबंध इतर राण्यांशी म्हणून त्यांना १४ वर्षे अति दुःख व शेष आयुष्य वैधव्यांत. प्रजेचा संबंध त्यांच्या खालोखाल म्हणून त्यांना राण्यांच्यापेक्षा कमी. पुत्रांचा संबंध प्रजेपेक्षा फार जवळचा म्हणून त्यांना प्रजेपेक्षा जास्त. (ख) दुःखरूपी फळाचा मुख्य भोक्ता दशरथ ठरविणे संयुक्तिक नाही. कारण की कुमति भूमी त्यांची नाही. ज्याची भूमी त्याचा त्या भूमीत येणाऱ्या फळांवर मुख्य हक्क असतो हे नाकारता येणार नाही.

(२) **पाइस कपट जल अंकुर फुटला** - एखाद्या सुपीक भूमीत बीज पडलेले असले तरी वर्षा ऋतू येऊन पाऊस पडल्याशिवाय ते उगवत नाही. कैकयी कुमति-भूमीला दासीरूपी वर्षाऋतूची जोड मिळाली तरी पाऊस पडल्याशिवाय बीज उगवत नाही. पावसाची देवता इंद्र आहे. त्यानेच शारदेला पाठवून वर्षाऋतूतील पाऊस पाडण्याची सोय केली. दासीचे कपटरूपी जल पडले. पाऊस पडल्यावर बीजांना अंकुर फुटण्यास काही काळ लागतो. वाफ यावी लागते. सवतीमत्सराने जो दाह झाला तोच वाफसा मिळाला. (वाफ मिळाली). पुन्हा कपट जलाचा वर्षाव झाला तेव्हा त्या बीजाला मोड (अंकुर) फुटला. मोड कोणता हे कवींनी सांगितले नाही. **वर मागण्याची प्रबल कामना - दुर्वासना - हा मोड त्या भूमीतच फुटला.** (क) बीज द्विदल असेल तर मोड फुटल्यानंतर काही काळाने दले - पहिली पाने प्रगट होऊन दिसू लागतात; पण ती बीजांतच असावी लागतात. भात, गहू, मका, ज्वारी, बाजरी, वरी, नागली इ. एकदल बीजे असतील तर दोन दले येत नाहीत. दशरथांचाच संबंध बीजाशी असल्याने त्यांनीच पूर्वी देऊ केलेले दोन वररूपी दले बीजांतच गुप्त होती. तीच कैकयी कुमति भूमीतून तिने वर मागितले की प्रगट होतील. भाव हा की दशरथांनी

त्याच वेळी वर देऊन टाकले असते. 'पुढले मी सांगत नाही. आता मागितलेस तरच मिळतील.' असे म्हणाले असते तर ही दोन दले फुटली नसती; पण 'बुद्धिः कर्मानुसारिणी' 'प्रेरक हृदिं रघुवंशविभूषण'. फार तर मला पुत्र झाल्यास त्याला राज्य मिळावे हा एक वर ती मागू शकली असती. आणखी दुसरा यापेक्षा कमी किंमतीचाच मागावा लागला असता. रामवनवास वर त्या वेळी मागू शकली नसती. त्या तापसाच्या शापाच्या प्रभावाने दोन वर देण्याची इच्छा व ते ठेव ठेवण्याची इच्छा त्या वेळी दोघांस झाली. **कर्म फळाचे सामर्थ्य किती दांडगे असते हे येथे दिसून आले.** मनुष्याला पूर्ण बुद्धिस्वातंत्र्य आहे असे कोणी म्हणतात पण ते खरे नाही. **बुद्धि कर्मप्रभावानुसार बदलते हा सिद्धान्त येथे मान्य करावाच लागतो.**

(३) **फळ अंतिं दुःख** - पुढे त्याचे रोपटे होऊन त्याला फळ-धान्य येते ते बीजाच्या जातीचेच असते. बीज विपत्ति रूप असल्याने फळे-पीक - विपत्तीच, दुःखच. एकाच बीजाला अनेक धान्य बीजे फळरूपाने लागतात. मोठा वृक्ष असेल तर लहान-मोठी अनेक फळे लागतात; व प्रत्येक फळात अनेक बीजे मूळ बीजाच्या जातीचीच असतात. येथे अनेक बीजे असलेले फळ लागणार. अनेक दुःखे कैकयीच्याच वाटणीस व इतरांना त्या मानाने कमी कमी मिळणार हे रूपकाने स्पष्ट सांगितले. **दोन ओळींच्या एका सांग रूपकांत किती व्यापक अर्थ व मोठमोठे सिद्धान्त (कर्म विपाकाचे) भरून ठेवले आहेत** व कवीचे सृष्टी निरीक्षण किती सूक्ष्म व प्रतिभा किती दांडगी आहे हे पाहून कौतुक वाटते. रूपकाचे पृथक्करण त्या त्या शास्त्रानुसार अधिकाधिक केल्याने बिनचूक, मनोरंजक व सिद्धान्त शिक्षक अर्थ कसा सहज प्रगट होत जातो हे पाहणेसुद्धा सुखदायक ठरते. येथे **हा एक मोठा सिद्धान्त प्रगट झाला की राजाचे एकच मोठे पाप व राणीचे एकच मोठे पाप यामुळे त्यांना, सर्व कुटुंबाला व प्रजेला दुःसह दुःखे भोगावी लागली.** 'यथा राजा तथा प्रजा' हा सिद्धान्त वरील अर्थाने पण खरा ठरतो. **राजाराणी यांच्या पापपुण्याचे फळ प्रजेलासुद्धा भोगावे लागतेच.** जे राजाराणी यांचे तेच लहानथोर सत्ताधीश व त्यांच्या पत्नी

यांच्या बाबतीत समजावे.

**चौ. ७ - (१) कोप साज सजुनी** - याचे वर्णन पुढे आहेच. जाडीभरडी, जुनी, मळीन, जीर्ण वस्त्रे नेसली. अंगावरील दागदागिने भराभर काढून त्या खोलीत अस्ताव्यस्तपणे जिकडे तिकडे फेकून दिले. फुलांची माळ (गजरा) तोडून, कुसकरून तिचे तुकडे फेकून दिले. मंगळसूत्र तोडण्यास मात्र धजली नसेल. कारण अजून सबळ आशा आहे. ते सर्व फेकलेले अलंकार व नवीन आणखी घालण्याची ! नवीन तऱ्हेचा दागिना निर्माण झाला की तो पाहिजेच. राणी आहे विलासप्रिय ! **(क) राज्य करत कुमतिने ठकवली** - कवि म्हणतात हा क्रोधाचा साज नसून तिच्या कुमतीने तिला ठकविण्यासाठी आणलेला माज आहे; व जगात तोंड दाखविण्यास लाज वाटेल इतकी फसत आहे. विप्राच्या तोंडाला काजळ फासले ती ही कुमती-दुर्बुद्धी राणीकडून हे करवीत आहे. 'कर्मणो गहना गतिः' दुर्बुद्धीने व मदाने केलेले एक पापकर्म इतके दुःखदायक होते; मग अशी अनेक पापकर्मे जे करतात त्यांना किती दुःखे भोगावी लागत असतील? **जे कोणी आज विविध दारुण, दुःसह दुःखाने गांजलेले असतील त्यांनी आपल्या दुःखाचे खापर दुसऱ्यांच्या डोक्यावर फोडण्याचे नवे पाप न करता समजावे की आपल्याच पूर्व कर्मांचे फळ आपल्याला भोगावे लागत आहे. पुढे व पुढील जन्मी दुःखे होऊ नयेत म्हणून 'दुर्बुद्धी या मना कदा नुपजो नारायणा' अशी कळकळून प्रार्थना करीत राहून थट्टेतसुद्धा दुर्बुद्धीला थारा देऊ नये.**

**चौ.८ - (१) धामधूम पुरिं राज निवासीं** - उत्सवाच्या धामधुमीत सर्व नगरी व राजवाडा गर्क असल्याने जसे राज्याभिषेकाचा समाचार सांगण्यास कोणी कैकयीकडे जाऊ शकले नाहीत, आठवणच झाली नाही, त्याप्रमाणेच कैकयी, कुबडी किंवा कैकयीच्या कोणी इतर दासी, आज इकडे फिरकल्यासुद्धा नाहीत. तेव्हा तिकडे आहे तरी काय? असे वाटण्यास कोणाचेही लक्ष जाण्यास सवडच नव्हती. **(क)** ही चौपाई येथे आगंतुका सारखी असून मागल्या व या चौपाईचा काही संबंध नाही, असे शेकडा ९९ जणांस तरी वाटेल. कोणी म्हणतील की हे दुसरे प्रकरण सुरू झाले; पण तसे नाही. मागल्या चौपाईशी हिचा फार

महत्त्वाचा संबंध आहे. कैकयी व कुबडी यांना इतका वेळ एकांत कसा मिळाला, सर्व नगरीतील कोणीच स्त्रिया, कैकयीच्या मैत्रिणी, कौसल्यादि राण्या इ. कोणीही कैकयीच्या गैरहजेरीचा तपास कसा केला नाही? कैकयीची एखादी प्रेमातली सखी गेली असती तरी कपट-पाऊस पडला नसता व पुढील अनर्थ टळला असता. सर्व आपापल्या उद्योगात व परमानंदांत मग्न असल्याने कोणाची आठवण कोणास कशी होणार ! त्या दोघींचे दुष्ट खलबत पार पडून कैकयी कोपगृहात गेली तरी तिकडे कोणाचे जाणे झाले नाही की लक्ष गेले नाही हा दैवी योगच. हे येथे दाखवावयाचे आहे. धामधूम गडबड, गलबला याचे आता थोडे सविस्तर वर्णन करतात.

***हिं.दो.*** *। प्रमुदित पुरनर नारि सब सजहिं सुमंगलचार ॥*
*॥ एक प्रबिसहिं एक निर्गमहिं भीर भूप दरबार ॥२३॥*

***म.दो.*** *। प्रमुदित पुर नर नारि सब सजिति सुमंगल सारिं ॥*
*॥ प्रविशति कोणी निघति जन दाटी राजद्वारिं ॥२३॥*

**अर्थ** : नगरांतील पुरुष व सर्व स्त्रिया अत्यंत आनंदित होऊन सर्वजण सर्व प्रकारच्या मंगल वस्तु सजवीत आहेत. कोणी राजद्वारांतून आत जात आहेत तर कोणी बाहेर पडत आहेत व राजद्वारापाशी लोकांची खूप गर्दी झाली आहे.॥२३॥

**टीका. दो. - (१) प्रमुदित - 'सुखें सकल पुरजनां समस्तां । रामचंद्र-मुखचंद्र निरखतां'** (२।१।६) असे या काण्डाच्या आरंभीच म्हटले आहे. रामदर्शनाने लोक सुखी-मुदित होते. पण आता राज्याभिषेक होणार म्हणून प्र-मुदित, अति आनंदित, अति सुखी झाले आहेत. (क) मंगल वस्तु कोणत्या याचे वर्णन १।३४४।६ - ३४६ मध्ये पूर्वी केले आहे. **(ख) सुमंगलचार** = सुमंगल साज, सर्व सुमंगल द्रव्ये, सारी - सारी, सगळी. एक = कोणी, काही; कारण 'प्रबिसहिं', 'निर्गमहिं' ही अनेकवचनी रूपे आहेत. म्हणून एकेकटाच जात-येत आहे असा अर्थ करता येणार नाही. दरबार = द्वार (२।२०६ पहा.) देवडी, प्रवेशद्वार. (ग) नगरांतील उत्सवाचे वर्णन ८।३ मध्ये सोडले ते ११।१

मध्ये पुन्हा सुरू करून ११।५ मध्ये पुन्हा सोडले होते. ते येथे पुन्हा सुरू केले. या जाणाऱ्या-येणाऱ्यांत कोण कोण कशासाठी जात-येत आहेत हे पुढील चौपायांत सांगतील.

*श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय २ रा समाप्त.*



# अध्याय तिसरा

हिं. *। बाल सखा सुनि हियँ हरषाहीं । मिलि दस पाँच राम पहिं जाहीं ॥१॥*
*। प्रभु आदरहिं प्रेमु पहिचानी । पूँछहिं कुसल खेम मृदु बानी ॥२॥*
*। फिरहिं भवन प्रिय आयसु पाई । करत परसपर राम बड़ाई ॥३॥*

म. *। बालसखे परिसुनि हर्षे हर्षति । वृंद वृंद जाती रामाप्रति ॥१॥*
*। प्रेम पाहुनी प्रभु आदरती । क्षेम कुशल मृदुवचनें पुसती ॥२॥*
*। प्रियनिरोप पावुनी परततां । गाति परस्पर राम-महत्ता ॥३॥*

**अर्थ :** रामचंद्रांच्या बालमित्रांना हा समाचार (राज्याभिषेकाचा) समजताच ते हर्षित होऊन गटागटांनी (पाच-पाच, दहा-दहा) रामाकडे जाऊ लागले.॥१॥ त्यांचे प्रेम पाहून (ओळखून) प्रभु त्यांचा आदर सत्कार करून गोड शब्दांनी क्षेमकुशल विचारीत आहेत.॥२॥ प्रियमित्राचा निरोप मिळून ते परत जात असता आपापसात रामाचा मोठेपणा वर्णन करीत चालले आहेत.॥३॥

**टीका. - चौ. - १ - (१) बाल सखे** - बालमित्र, बालपणातले मित्र. आपला बालमित्र आता चक्रवर्ती युवराज होणार हे ऐकून त्यांना आनंद व उत्साह वाटू लागला व मित्राचे अभिनंदन करण्यासाठी थोडथोडे, टोळ्याटोळ्यांनी, एकत्र जमून जाऊ लागले. बालपणी प्रभु यांना आपल्या पंक्तीला घेतल्याशिवाय जेवीत नसत. शिकारीला जातानासुद्धा बरोबर नेत असत. यांत बऱ्याच समवयस्क राजकुमारांचा भरणा आहे हे रघुवीर विवाह-वर्णनात स्पष्ट झाले आहे. **'बोलाविति जैं जेवत राजा । त्यजुनि येति ना बालसमाजा ॥'** (१।२०३।६) **'घेति सर्वे मित्रां भावांलां । जाति नित्य मृगयेस बनाला ॥ भोजन सानुज समित्र करती'** (१।२०५।१,४) **'सब शोकिन वर झाले स्वार । भरत-सदृश वय राजकुमार'** (१।२९८।७) भरत व राम यांच्या वयात फक्त १ दिवसांचे अंतर! **(क)** पुरनरनारी सुमंगल सामुग्री जमविण्यात गर्क आहेत तर बालमित्र रामभेटीला जाण्यायेण्याच्या गडबडीत आहेत. एकाच वेळी निरनिराळे वर्ग निरनिराळी

कार्ये करीत आहेत. पण त्या सर्वांचे एकत्र वर्णन करणे शक्य नसल्याने नगरातील उत्सवाचा संबंध पुन्हा पुन्हा दाखवून मधे मधे इतर घटना वर्णन करीत आले. सचिवांची संमती मिळाल्यावर नगरात उत्सव सुरू झाला तो चालूच आहे. मध्ये रामसीताशकुनादि वर्णन केले. अंतपुरांतील उत्सवाचे वर्णन केले. मग पुन्हा ११ व्यांत नगरोत्सवाचे वर्णन केले. मग कुबडी-कैकयी संवाद वर्णन केला. तिकडे तो संवाद चालू असता इकडे नगर नरनारी मंगलद्रव्ये सजवीत असल्याचे सांगितले व राजद्वाराजवळील गर्दीतून वाट काढीत बालमित्रांचे जथे जात येत आहेत. अशा प्रकारे नगरात धामधूम, गलबला जा-ये चालूच आहे. म्हणून पुनः पुन्हा तिकडला संबंध जोडला जात आहे.

**चौ. २** - (१) **'प्रभु'** शब्दाने कवि या बालमित्रांचे विशेष भाग्य दाखवीत आहेत. बालसखे मनात म्हणत आहेत की, 'मुनिमखरक्षण, अहल्योद्धार, भवधनुष्यभंग, परशुराम गर्वहरण यांसारखी अद्‌भुत कार्ये करून दिगंत कीर्ती मिळविली असा समर्थ असून, लहानपणी जसा आमच्याशी प्रेमाने वागत होता तसाच जगप्रसिद्ध झाल्यावरसुद्धा वागला व आता चक्रवर्ती राजा होणार तरी तितक्याच प्रेमाने व बरोबरीच्या नात्याने वागत आहे. जरासुद्धा गर्व, ताठा मद नाही.' आज काय दिसते? कोठे नोकरी (म्हणजे गुलामी) मिळेल अशी अंधुक आशा उत्पन्न होताच आपल्या पहिल्या मालकास व आईबापांनासुद्धा दुरुत्तरे मिळतात ! सच्छील, कुलीन व शीलहीन कुलहीन यांच्यातील हा फरक आहे. **'परउपकारी नर ×× बिभवलाभिं नमतात'** (३।४०) संपत्ती, ऐश्वर्य, सत्ता, विद्या यांची शोभा विनय - नम्रता वाढण्यातच आहे. प्रभु 'धर्ममार्ग चरित्रेण' (श्रुति) दाखवीत आहेत. **(क) क्षेम व कुशल** = क्षेम व योग, (योगक्षेम). 'प्राप्तस्य रक्षणं क्षेम, अप्राप्तप्रापणं योगः' नवीन मिळविणे म्हणजे योग = कुशल, व पूर्वी मिळालेल्याचे रक्षण म्हणजे क्षेम - शेतीवाडीचे उत्पन्न बरे आले ना? धंद्यांत कमाई ठीक होते ना? वगैरे प्रश्न कुशल प्रश्न आहेत. घरची मंडळी वगैरे आनंदांत आहेत ना? प्रकृतिस्वास्थ्य ठीक आहे ना? इत्यादी हे क्षेम प्रश्न होत. वर्णभेदपरत्वेसुद्धा क्षेम, कुशल, अनामय इ. शब्दांचा उपयोग कुशल समाचार विचारताना करतात. **(ख) मृदुवाणी** - मृदु मधुर

शब्दांनी, नम्र, निगर्वीपणाने. **प्रेम पाहुनी** = प्रेम ओळखून. यांचे आपल्यावर शुद्ध प्रेम आहे हे ओळखून. भाव हा की नुसत्या औपचारिक, दिखाऊ प्रेमाने हे आलेले नसून माझ्या उत्कर्षाने यांना आनंद झाला असून उत्साहाने, खऱ्या प्रेमाने आले आहेत हे जाणून त्या बालमित्रांची नावे व्यक्तिशः घेऊन सांगितले असेल की मी जरी युवराज झालो तरी तुमचा बालसखा आहे हे विसरू नका हं ! अगदी पहिल्यासारखे निःसंकोचपणे येत-जा व भेटत जा मला. अरे युवराज झालो तरी तो आपला बालपणातील आनंद का त्याने मिळणार आहे? जबाबदारीच वाढणार ! त्यामुळे मनापासून नकोसे वाटते; इ.

**चौ.३.(१) प्रियनिरोप पावुनी परततां** - 'घेउनी' नव्हे 'पावुनी'. त्यांना असे वाटत आहे की येथून जाऊच नये; पण प्रिय मित्राने सांगितले असेल की गड्यांनो ! घरी तुमची वाट पहात असतील. मी पळून का जाणार आहे? का परदेशात जाण्यास निघालो आहे? किती वेळ बसलात तरी तेच. पुन्हा केव्हातरी भेट होईलच. इत्यादी प्रकारे प्रभूंनीच निरोप दिला की नाईलाजाने परत फिरतात व घरी जाता-जाता आपल्या मित्राच्या अपूर्व, अलौकिक गुणांची प्रशंसा आपसांत करीत थव्याथव्यांनी जात आहेत. काय चर्चा करीत जात आहेत ते पुढल्या चौपाईत सांगतील. नंतर एकदा आपल्याला कैकयीकडे जावे लागेल व पुन्हा राजवाड्यात येऊन महाराजांबरोबर आपण कैकयीच्या महालात व क्रोधागारात जाऊ. पण तेथे होणार दुःखच !

*हिं.* *। को रघुबीर सरिस संसारा । सीलु सनेहु निबाहनिहारा ॥४॥*
*। जेहिं जेहिं जोनि करम बस भ्रमहीं । तहँ तहँ ईसु देउ यह हमहीं ॥५॥*
*। सेवक हम स्वामी सियनाहू । होउ नात यह ओर निबाहू ॥६॥*

*म.* *। कोण रघुविरा - सम संसारां । शीला स्नेहा निभावणारा ॥४॥*
*। भ्रमूं योनिं जे जे कर्मानें । तिथें अम्हां ईशें हें देणें ॥५॥*
*। दास अम्हीं स्वामी सीतापति । हें नांदो नातें अंतावति ॥६॥*

**अर्थ :** या संसारांत शीलाचा व स्नेहाचा निर्वाह करणारा रघुवीरासारखा कोण आहे?॥४॥ म्हणून शंकराने (ईशें) आम्हास इतकेच द्यावे की आम्ही ज्या ज्या योनीत कर्मानुसार भ्रमण करू.॥५॥ तिथे तिथे आम्ही दास व स्वामी

सीतापति हे नाते अंतापर्यंत नांदावे.॥६॥

**टीका. चौ. ४** - (१) रघुवीर शब्दाने त्या बालमित्रांची भावना प्रगट केली. भाव हा की आपल्या मित्राला हा परमोच्च अधिकार, महाराज दशरथ असताच मिळत आहे. याचे कारण त्याच्या ठिकाणची सर्व प्रकारची वीरता हे एकच आहे. सहा प्रकारची वीरता **'गत प्रदायक दीन दयालहि । सरल सबल साहिब रघुराजहि ।'** (१।१३।७) या चौ. टीकेत दाखविली आहे. रघुवीरा सारखा कोणी नाही. **(क) शीला स्नेहा निभावणारा** - शील व स्नेह ही दोन्ही शेवटपर्यंत टिकविणे फार कठीण असते; कारण स्नेहाचा निर्वाह पूर्णपणे करताना पुष्कळ वेळा शीलाला धक्का लावला जातो व शील टिकवावयाचे तर स्नेह टिकत नाही. पण रघुवीराने शील व स्नेह या दोन्हींचा पूर्ण निर्वाह अगदी कसोशीने केला आहे. युद्धवीरता, त्यागवीरता, विद्यावीरता, कृपावीरता, धर्मवीरता व ऋजुता (सरलपणा) वीरता ही सहा प्रकारची वीरता असल्याशिवाय क्षत्रियाने शील व स्नेह यांचा एकाच वेळी पूर्ण निर्वाह करणे अशक्य आहे. रामच कृष्ण झाले असून कृष्णावतारात युद्धवीरता व ऋजुवीरता नाही. कुटिल कारस्थाने भरपूर करावी लागली व युद्धातून पळून गेले आहेत. **दोन्ही पूर्ण ब्रह्माचे अवतार** असून कृष्णावतारात शील व स्नेह या दोन्हींचा निर्वाह करता आला नाही. याचे कारण दोन प्रकारची वीरता कमी झाली. सरळपणाचा अभाव शीलात कमीपणा आणतो. सरळपणा गेला की धर्मवीरतेत न्यूनपणा आलाच. मग धर्मयुद्ध करता येणे शक्य नाही. द्रोणाचार्य, भीष्माचार्य, कर्ण इत्यादींचा वध करविण्यात अधर्म युद्धाचा व कपटाचा आश्रय करावा लागलाच. प्रतिज्ञाभंग केलीच. जास्त विस्तार नको. **दोन्ही पूर्णब्रह्माचे अवतार आहेत हे मात्र वाचकांनी विसरू नये.** नरनाट्यांतील भेद दाखविणे ओघाने प्राप्त झाले. दोघांत न्यूनाधिकता नाही; परंतु **नरजीवांनी अनुकरणीय चरित्र रामाचेच. कृष्णचरित्राचे कोणी अनुकरण करू नये. त्यांच्या उपदेशाचे अनुकरण करणे आवश्यक आहे. प्रस्तावनेत 'श्रीराम व श्रीकृष्ण' प्रकरण १३।१८ पहा.**

(२) **शील व स्नेह यांचा निर्वाह** किती उत्तम प्रकारे केला हे मानसांतील अयोध्याकांडांत उत्कृष्ट रीतीने पाहण्यास सापडते. आता लवकरच शीलस्नेहांच्या

परीक्षेची वेळ येत आहे. म्हणूनच जणू बालमित्रांना हे वर्णन करण्याची इच्छा झाली. साही प्रकारची वीरता कसास लागण्याचा काळ अति समीप आला आहे. म्हणून कवींनी रघुवीरांच्या या कांडांतील चरित्रांचा ध्रुवतारा कोणता हे अत्यंत सूत्ररूपाने येथे सुचित करून ठेवले. **शीलाला धक्का न लावता स्नेहाचे उत्तम संरक्षण हेच या काण्डांतील श्रीरामचरित्राचे मर्म आहे.** या मर्माचा उच्चार वारंवार अनेक मुखांनी केला आहे. येथे उपक्रम केला आहे. कारण आता वनवासाचा उच्चार लवकरच कानी पडू लागेल. **'शीला स्नेहा ये न सोडतां । अडचणींत रघुनायक पडतां'** (२।८५।५) हे अयोध्येच्या सीमेवर तमसातीरी घडले. **'प्रियप्रेमवश घडे प्रमादू । तैं यशनाश जगीं - अपवादू'** (७७।४). असे दशरथांस विनविले. या प्रमाणे सर्वत्र शीलाचा (वा नीतीचा) च उल्लेख प्रथम आहे. **स्नेहापेक्षा शीलाचे महत्त्व अधिक वाटले पाहिजे.** (क) दशरथ-राम संवाद, कैकयी-राम संवाद, कौसल्या-राम संवाद, राम-लक्ष्मण संवाद इ. प्रसंग शील व स्नेह यांच्या कसोटीची परमावधी आहेत. पण त्यांत शील संरक्षणासाठी स्नेहाचा बळी देणे किंवा स्नेहासाठी शीलाचा बळी देणे रघुवीरांकडून एकदाही घडले नाही, हे प्रत्येक वाचक मान्य करील. सर्वांनी शीलाचा व स्नेहाचाही निर्वाह करावा ही रघुवीरांची प्रबल इच्छा सर्वत्र दिसून येते. म्हणून पित्यास सुद्धा हात जोडून, क्षमा मागून, तीच प्रार्थना केली (७७।४). **'मुकुनि न घाबरि हो स्नेहास्तव'** (५३।८) असे कौसल्येला सांगितले. **'प्रेमें हट्ट करिशि जर वामे । दुःख पावशिल तरि परिणामें ॥'** (६२।३) असे सीतेला बजावले. **'वदले राम वचन नयनागर । शीलस्नेहार्णव - सुख-सागर ॥ प्रेमें बाळ ! न कातर होई'** (७०।७-८) असे लक्ष्मणास म्हणाले. **स्नेहवश झाल्याने अकार्ये घडतात. शीलांत वैगुण्य येते हे लक्ष्मणसुद्धा जाणतात. 'स्नेहविवश ही करिल अकार्या'** (७३।७) असे लक्ष्मणास सुमित्रेविषयी मनात वाटले. पण सुमित्रेने तसे केले नाही. अशा विविध निमित्तांनी या काण्डांतील प्रत्येक प्रकरणांतील रामचरित्राचे मर्म सहज सुचवून ठेवलेले पाहून आश्चर्य वाटते. **ही दक्षता इतर रामायणात नाही.**

**चौ. ५-६ (१) भ्रमूं योनिं जे जे कर्मानें इत्यादि** - रघुवीराचे बालमित्र हे जाणत नाहीत की रामच परमेश्वर, परमात्मा आहे. तरीसुद्धा ज्ञानी वसिष्ठादि

महर्षीनी जे मागितले तेच हे बालमित्र त्या महर्षींच्या आधीच मागत आहेत. आज ते रामसखे आहेत; पण सख्य भक्तीने त्यांचे समाधान होत नाही असे स्पष्ट दिसते. कारण ते स्वामी-सेवक संबंध म्हणजेच दास्यभक्ति मागत आहेत. **येथे पुन्हा एक मोठा मानससिद्धांत ग्रंथित केला. 'दासांवरि मम अधिका प्रीती'** हे श्रीमुखवचनच आहे. **'सेवक-सेव्य-भावविण भवतरण न उरगारि ॥ भजा राम-पद-पंकजां या सिद्धान्त-विचारिं'** (७।११९). सख्य भक्तीत सेवेचा लाभ मिळत नाही. अहंकार वाढण्याचा संभव असतो. प्रभूचा न कळत अनादर-अपमान केला जाण्याची शक्यता असते. म्हणूनच कृष्णासखा म्हणतो की **'सखा म्हणुनि सलगीने बदलो कृष्ण ! यादवा ! सखे ! अरे ॥ नेणुनि तव महिमा बदलो तें प्रेमें अथवा चुकुनि हरे ॥ थट्टेने अपमानहि केला शय्यासनिं खाता फिरतां । सन्मुख मागें सर्व अच्युता करी अतर्क्या क्षमा अता** ॥ (सं.स.गी.११।४१-४२). म्हणून या जन्मात सखे असलेले बालमित्र न कळत प्रभूची दास्यभक्ती जन्मोजन्मी मागत आहेत - शंकरांजवळ. येथे **दुसरा मानस सिद्धान्त सुचविला आहे. 'कृपा पुरारि न करिति जयासी भक्तिलाभ मम मुनि ! न तयासी ॥** १।१३८।७।। **शंकरभजन बिना नर भक्ति न मम लभतात.'** (७।४५) हे सर्व बालसखे शिवभजक आहेत हेही दाखविले गेले. अत्यंत दुर्मिळ वस्तु मिळण्यासाठी आपल्या उपास्य देवतेलाच प्रार्थना करतात. **'रघुकुल - इष्ट देव शिव' हे प्रकरण प्रस्तावनेत पहावे.** सकल पुरनरनारी दशरथ, कौसल्या, राम, भरत, शिवोपासक आहेत हे पूर्वी गू.चं. दाखविले आहे व पुढेही दाखविले जाईल.

(२) **जन्माचे कारण कर्म आहे हा आणखी एक सिद्धान्त** येथे सांगितला आहे. **'ज्या योनिं जन्मूं कर्मवश'** (४।१० छं.) वाली म्हणाला आहे. रामदास्य दे व वाटेल तेवढ्या वेळा जन्मास घाल आम्ही त्याला भीत नाही हा या बालमित्रांच्या मनातील भाव आहे. प्रत्येक काण्डात जन्मोजन्मी रामभक्तीची याचना कोणी ना कोणीतरी केली आहे. **(क) हें नांदो नातें अंताप्रतिं** - याने नित्य अखंड रामदास्य मागितले. काही दिवस केली रामदास्य भक्ती व दिली सोडून. लागले दुसऱ्याची करायला. असा व्यभिचार होऊ नये म्हणून ही पुस्ती मागणीला जोडली. **मोक्ष मागितला नाही** हेसुद्धा लक्षात ठेवले पाहिजे. ही अशी

वासना बालमित्रांचीच नसून पुरजनांचीही आहे असे आता सांगतील.

हिं. *। अस अभिलाषु नगर सब काहू । कैकयसुता हृदयँ अति दाहू ॥७॥*
*। को न कुसंगति पाइ नसाई । रहइ न नीचमते चतुराई ॥८॥*

दो. *। साँझ समय सानंद नृपु गयउ कैकई गेहँ ॥*
*। गवनु निठुरता निकट किय जनु धरि देह सनेहँ ॥२४॥*

म. *। अशि अभिलाषा पुरिं सर्वा हो ! । कैकयसुता - हृदयिं अति दाहो ॥७॥*
*। कोण न नासे मिळुनि कुसंगति । नाहिं चतुरता उरत नीचमतिं ॥८॥*

दो. *। सांज - समयिं सानंद नृप जाती कैकयि - गेहिं ॥*
*॥ निष्ठुरतेप्रति गमन करि जणुं कीं स्नेह सुदेहि ॥२४॥*

**अर्थ :** अशी अभिलाषा नगरातील सर्व लोकांना (बाल, वृद्ध, तरुण) आहे हो ! पण कैकयसुतेच्या हृदयांत अत्यंत दाह होत आहे.॥७॥ कुसंगति मिळाल्याने कोणाचा नाश होत नाही? (सर्वांचा होतो) नीचाच्या मताने (चालल्याने) शहाणपणा (चतुराई-चतुरता) उरत नाही.॥८॥ संध्याकाळच्या वेळी दशरथ राजा आनंदित होऊन कैकयीच्या वाड्यात जाण्यास निघाले. जणू उत्तम देहधारी स्नेह निष्ठुरतेकडेच जात आहे. (असे वाटते) दो.॥२४॥

**टीका. - चौ. ७ - (१)** ११।६ मध्ये 'उजाडेल कधिं सर्वहि म्हणती । देव कुचाळी विघ्न विनवती ॥ यांत जसे विरोधाने उठावदार चित्र निर्माण केले आहे तसेच येथे एका बाजूस सर्व पुरनरनारी व दुसऱ्या बाजूस कैकयकन्या यांची चित्रे उभी केली आहेत. पहिल्या चित्रांतील सर्व लोक राम युवराज होणार म्हणून **प्रमुदित** असून जन्मोजन्मी सीतापतीची निरंतर **दास्यभक्ती** मागत आहेत. तर दुसऱ्या चित्रांतील एकट्या कैकयसुतेला **अति हृदयदाह** होत आहे व तो **रामाला वनवासास पाठविल्याशिवाय शान्त होण्यासारखा नाही,** असे तिला खात्रीपूर्वक वाटत आहे ! (क) ही दोन विरोधी समीकरणेच इतकी बोलकी आहेत की टीकाटिपण्णीची विशेष आवश्यकताच नाही. **'श्रुतिपुराण सद्ग्रंथ वदतिही । रघुपति भक्ति-विना सुख नाहीं ॥ 'जीवा सुख न हरी-प्रतिकूलहि' 'रामविमुख, न जीव सुख पावे' 'विमुख राम सुख पावे ना कुणि'** (७।१२२।१४,१६,१८,१९) **ज्या कैकयीला राम 'प्राणांहुनि प्रिय'** (१५।८) होते तिलाच १।२ घटकानंतरच

असे कसे वागू लागले याचे उत्तर सुभाषित रूपाने देतात.

**चौ. ८ - (१) कोण न नासे मिळुनि कुसंगति** - कैकयसुता रामाला प्राणांहून प्रिय मानणारी असूनसुद्धा कुसंगतीत पडली म्हणून असे झाले व आता तिचा सर्वनाश होणार हे ठरलेलेच. (क) **कोण न नासे?** कोणी नाश पावत नाही असे नाही हे त्याचे सामान्य उत्तर आहे. अपवाद बालकांडांत आधीच सांगितला आहे. **'विधिवश सुजन कुसंगीं पडतीं । निजगुण फणिमणि सम अनुसरती'** (१।३।१०) नासे - बिघडतो, कुमति, कुजन बनतो. उपदेश हा आहे की सुसंगति न मिळाली तरी कुसंगती धरू नका व कुसंगतीत पडला असला तर भगीरथ प्रयत्न करून कुसंगती सोडा. (ख) **'कोण न नासे मिळुनि कुसंगती'** - हे सुभाषित निरपवाद नाही. एकच अपवाद वर दिला आहे; म्हणून **ही बहिर्लापिका आहे व संत बिघडत नाहीत हे याचे उत्तर आहे.** बाकी सर्व बिघडतात. याने सुचविले की कैकयी स्वभावतः सज्जन नव्हती. कैकयसुता शब्दाने हे आधीच सुचविले आहे. कैकय-राजाच्या राणीने जसा पतिविरोध केला व तिला पतीच्या मरणाची पर्वा वाटत नव्हती तशीच कैकयी पतिविरोधिनी व निष्ठूर बनणार. **'पितॄन् समनुजायन्ते नरा मातरमंगनाः'** स्त्रिया मातेसारख्या निपजतात व पुरुष पित्यासारखे होतात. (वा.रा. २।३५।२७) तिच्या मातेचे संस्कार-कुमति आदि - कुसंगतीने तिच्यात जागृत झाले व कैकयसुता बिघडली.

(२) **नाहिं चतुरता उरत नीचमतिं** - कुसंगतीत पडल्यावर त्यांच्या प्रभावाने त्या नीचांच्या नीच मतांचे अनुसरण करण्याची बुद्धि होते. कुबडीसारख्या नीच, दुष्ट दासीची संगती दीर्घ काळ घडल्याने स्वतःची उच्च,, धर्म्य, पवित्र व न्याय्यमते सोडून त्या नीच दासीच्या मतांप्रमाणे वागण्यास कैकयी राजी-खुशीने तयार झाली. त्यामुळे तिचा सर्व शहाणपणा गेला. ती स्वतःस मूर्ख व बटकीला चतुर, ज्ञानी समजू लागली. 'स्तवी बकिस मानुनी मराली' या चरणाने नीच मतांचे अनुकरण करू लागल्याचा भरभक्कम पुरावाच दिला आहे. पुरजन व कैकयी यांची तुलना जशी भडक विरोधाने थोडक्यात केली तशीच आता दशरथ व कैकयी यांची करतात.

**दोहा. - (१) सांज समयिं सानंद नृप जाती कैकयि - गेहिं** – सकाळी

राजसभेत आरसा सहज हाती आला व पुढील सर्व गोष्टी सहज घडत गेल्या. रामराज्याभिषेकाच्या तयारीची व्यवस्था लावण्यात दशरथ संध्याकाळपर्यंत दंग होते. प्राणप्रिय कैकयीची आठवणसुद्धा सर्व दिवसांत झाली नाही. मग इतर राण्यांची कशी होणार? अभिषेकाची सर्व तयारी झालेली आपल्या डोळ्यांनी पाहीपर्यंत संध्याकाळ झाली हे सांगण्यासाठी 'सांजसमयिं' हा उल्लेख केला आहे. **(क) सानन्द नृप** - आनंदित होण्याची २/३ कारणे दिसतात. सर्व तयारी झाली म्हणून समाधान वाटून आनंद, प्रियतमा कैकयीची भेट होणार म्हणून आनंद व राज्याभिषेकाची बातमी तिला प्रथम सांगणार म्हणून आनंद. राणी हृदय दाहाने अति संतप्त झालेली व नीच मताने अति निष्ठुर बनलेली तर राजा आनंदात मग्न होऊन सुखाच्या, विश्रांतीच्या भरवशाच्या स्थानी, सुखात लोळण्याच्या आशेने चालले आहेत. त्या चित्रांतील स्त्री राजाच्या मानगुटीस बसून, रामाला वनवासात धाडून आपली छाती शीतल करण्याच्या गुप्त उद्देशाने, राजाच्या येण्याची वाट पहात कोपभवनात क्रोधाचे सोंग आणून जमिनीवर पडली आहे. राजा येण्याची चाहूल कान टवकारून घेत आहे. चाहूल लागताच क्रोधाचे नाट्य जोरात सुरू होईल. क्रोधाचा उपयोग सूड घेण्यासाठी करावयाचा असल्याने व हृदय वज्राहून कठोर झाले असल्याने, शोकाचे अनुभाव (अश्रू आदि) मुळीच दिसणार नाहीत. **निष्ठुरता व स्नेह यांची भेट आता होणार आहे.** दोन्ही मूर्तिमंत झाली आहेत. **निष्ठुरता स्नेहाचा पराभव करते हे ठरलेलेच आहे.** त्यामुळे या भेटीत काय निष्पन्न होणार हे सहज कळण्यासारखे आहे. **मानसांतील कैकयीच्या इतकी निष्ठुर कैकयी व मानसातील दशरथांइतके स्नेही दशरथ इतर रामायणात आढळत नाहीत. प्रत्येक चरित्र परमोच्च निर्दोष आदर्श आहे.** प्रभूचीच इच्छा वनात जाण्याची आहे, म्हणून हे अघटित घडत आहे.

*हिं.* ***। कोपभवन सुनि सकुचेउ राऊ । भयबस अगहुड़ परइ न पाऊ ॥१॥***
***। सुरपति बसइ बाहँबल जाकें । नरपति रहहिं सकल रुख ताकें ॥२॥***
***। सो सुनि तिय रिस गयउ सुखाई । देखहु काम प्रताप बड़ाई ॥३॥***
***। सूल कुलिस असि अँगवनिहारे । ते रतिनाथ सुमन सर मारे ॥४॥***

म. *। परिसुनि कोपभवनिं भय राया - । सुके, टाकवे पुढें न पाया ॥१॥*
*। ज्याच्या भुजबलिं सुरपति राहति । कल पाहुन नरपति मन राखति ॥२॥*
*। तो सुकला स्त्री रुष्ट परिसुनी । घ्या प्रताप कामाचा बघुनी ॥३॥*
*। शूल कुलिश असि अंगिं झेलती । ते रतिनाथ सुमन-शरिं झुरती ॥४॥*

**अर्थ :** राणी कोपभवनात आहे असे कानी पडताच राजा भयभीत झाला. भयाने सुकून गेला व पाऊल पुढे टाकवेना.॥१॥ ज्याच्या बाहुबलाच्या आश्रयावर सुरपति (देवराजा) (निश्चिंत) राहतो व ज्याचा कल पाहून नरपति मनासारखे वागतात.॥२॥ तो (आज) बायको रुसली आहे हे ऐकून सुकून गेला, तेव्हा हा कामाचा (मदनाचा) प्रताप (महती) पाहून घ्या.॥३॥ जे शूल, वज्र व तलवार यांचे घाव आपल्या अंगावर (फुलासारखे) झेलतात (लीलेने सहन करतात) तेच रतिनाथाच्या (कामदेवाच्या) फुलांच्या बाणांनी (घायाळ होऊन) झुरतात ! ॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) परिसुनि कोपभवनिं, भय राया, सुके** - दशरथ नित्याप्रमाणे कैकयीच्या महालात रोजच्या ठिकाणी गेले. तिथे कैकयी न दिसल्यानेच चिंता उत्पन्न झाली. मग दासींना विचारल्यावर कळले की कोपभवनात आहे. **'देव ! देवी भृशं क्रुद्धा क्रोधागारमभिद्रुता'** (वा.रा. २।१०।२१). असे व इतकेच दासींनी सांगितले. रोज पुढे येऊन स्वागत करीत असे ते राहिलेच; आणि क्रोधागारात का? कोणावर रागावली? कशामुळे रागावली? इ. चिंता वाटू लागली. पुढील चौपायांवरून स्पष्ट दिसते की राजा कामविव्हळ होऊन आला आहे. भय एवढ्यामुळेच वाटले की ज्या इच्छेने आलो ती तर तृप्त होत नाहीच; पण आजच्या सारख्या आनंदाच्या दिवशी ही राणी रागावली आहे, हे कोणास कळले तर लोक काय म्हणतील ही धास्ती पडली. **'वेळ अवेळ पहा तरि काहीं'** (२६।८) हे राजाचे पुढील वचन हाच भाव प्रगट करते. **(क) पाया पुढे न टाकवे** - कसातरी धीर धरून कोपभवनात तिची समजूत घालण्यासाठी जाण्यास निघाला राजा. तोच भयाने शक्तिपात झाल्यासारखे वाटले. हातपाय लुळे पडले. पाऊल चटकन पुढे टाकवे ना.

**चौ. २-३ (१) ज्याच्या भुजबलिं सुरपति राहति** - देवांचा राजा इंद्र

दशरथांच्या बाहुबलाच्या आश्रयावर दैत्यदानवांच्या भयापासून मुक्त झाला व त्याचे राजसिंहासन टिकून राहिले. भाव हा की दशरथ स्वर्गातील देवांपेक्षा व पाताळातील दैत्यदानवांपेक्षा शूर वीर, बलवान, रणधीर निर्भय आहे. पण बायकोच्या रागाच्या बातमीने इतका घाबरला की पाय पुढे टाकण्याची शक्ती राहिली नाही ! जो रावण (दशमुख) कोणाही पुढे मान वाकवावयाचा नाही तो सीतेसारख्या परस्त्री जवळ काकुळतीस येऊन विनंत्या, प्रार्थना करतो. हे सुंदर कांडांत दिसेलच. (क) **कल पछुन नरपति मन राखति** - पृथ्वीवरील सर्व राजे ज्याच्या मनातील हेतु जाणून त्यांना प्रसन्न करण्याचा प्रयत्न म्हणून त्याच्या मनासारखे वागतात; तोच चक्रवर्ती महावीर बायकोच्या रुसव्याच्या बातमीनेच गर्भगळीत झाला. भाव हा की आपल्याकडूनच देवीच्या मनाविरुद्ध काहीतरी मोठा अपराध घडला की काय? व आता काय शिक्षा होणार कोणास ठाऊक? अशी धास्ती पडली. दाखविले की राजा जरी सर्व नरपतींच्यावर सत्ता गाजविणारा **समर्थ सम्राट आहे तरी त्याच्यावर सत्ता चालविणारी, जिला अबला म्हणतात अशी एक प्रबला रमणी तरुणी आहे !** (ख) देहरूपी लंका दुर्गाच्या मुख्य चार द्वारांपैकी उपस्थ (जननेंद्रिय) द्वाराशी कोण कोण राक्षस साधनरूपी कपींशी लढण्यास सिद्ध असतात याचे वर्णन **वेदान्तसार अध्यात्मरामायणात** केलेले आहे. हे द्वार जिंकल्याशिवाय भागत नाही. याच द्वारावर बहुतेक मोठमोठे वीर घायाळ होतात. **राक्षसांत होते विप्रवेषपाठी । दंभ ज्यांच्या पोटीं सदा राहे ॥ कवि थोर राजकारणी पुरुष ॥ ऐसेहि राक्षस त्याच द्वारीं ॥ अग्निहोत्री होते कितीक तयांत । अर्हता सेवेत रत तेही ॥ जपी तपी योगी वैद्य आणि रोगी । दिसती विरागी तेही द्वारीं । अहो याच द्वारीं गर्दी झाली भारी । विरळा तो दूरीं येथून जो ॥'** '**मासे मारण्यारा कोळी**' या पदात म्हटले आहे - । **काळ धीवरें जीवमत्स्य हे भुलवीण्या लागीं । काम गळाला नारी आमिष लाविलें वेगीं । जरी जाहले शूरवीर जे सर्व जगज्जेते । तरी तयांची शौर्यवीरता नच कामा येते ॥ नेत्राग्रेनें ज्यांच्या हलती दळेंही वीरांची । नारिनयननाराचें गळते गाळण कीं त्यांची ॥ प्रज्ञा.॥**

(२) दशरथ असा सर्व जगज्जेता राजा असून बाईल रुसली हे जाणून सुकून गेला. राजा जर कामवश नसता व स्त्रीजित नसता, तर पुढील सर्व

दुर्धर प्रसंग टळला असता. त्रैलोक्य विजयी वीरांचे मनोरथ एक भोळीभावडी नारी विफल करू शकते हे येथे दाखविले व सुचविले की जरी अशा धर्मनिष्ठ कामी पूर्वसंचित पुण्य प्रभावाने रामप्राप्ति-ज्ञानप्राप्ति-गुरुकृपेने झाली तरी ती व्यक्ती जर प्रपंचातून सुटणार नाही तर ते ज्ञान = प्राणांहून प्रिय राम त्या व्यक्तीला सोडून वनात निघून जाईल ! हे आध्यात्मिक रहस्य आहे. ज्ञान वनात गेले की भक्ति जानकी व वैराग्य लक्ष्मणसुद्धा त्यांच्या बरोबर वनात जाणार !

चौ. ४ - (१) शूल कुलिश असि अंगवि झेलती - त्रिशूल, वज्र, बाण, तलवार इत्यादी दुर्धर अस्त्रशस्त्रांचे घाव उघड्या अंगावर हसत हसत सहन करणारे महावीरसुद्धा कामदेवाच्या पुष्प बाणांनी घायाळ होऊन विलाप करीत बसतात. येथे सुचविले की कामाचे मुख्य बळ जी नारी तिच्या हावभावांना व प्रेमाच्या सोंगाला भुलून दशरथांवर मरण्याची पाळी येणार आहे. प्रबल झालेल्या अबलांची किंवा बालकांची जो जो समजूत घालावी तो तो तुमच्या शिरावर नाचू लागतील. अशा वेळी त्यांची उपेक्षा करणे व त्यांच्याकडे ढुंकूनसुद्धा न पाहणे हाच सरळ मार्ग असतो. पण कामी पुरुष व एकुलत्या एक मुलाचे आईबाप यांना ते धारिष्ट करवत नाही.।।४।। कामाचा तडाका हा असा आहे !

हिं. *। सभय नरेसु प्रिया पहिं गयऊ । देखि दसा दुखु दारुन भयऊ ।।५।।*
*। भूमि सयन पटु मोट पुराना । दिए डारि तन भूषन नाना ।।६।।*
*। कुमतिहि कसि कुबेषता फाबी । अनअहिवातु सूच जनु भावी ।।७।।*
*। जाइ निकट नृपु कह मृदु बानी । प्रानप्रिया केहि हेतु रिसानी ।।८।।*

म. *। प्रियेपाशिं नृप सुभीत येई । बघुनि दशा दुख दारुण होई ।। ।।५।।*
*। जाड जीर्ण पट भूवरि पडली । विविध भूषणें फेकुन दिधलीं ।।६।।*
*। गमे कुमतिला कुवेष केवीं । जणुं भावी वैधव्या सुचवी ।।७।।*
*। जाउनि जवळ पुसे मृदु वाणीं । रुसलिस कां प्राणप्रिय राणी ।।८।।*

अर्थ : राजा अत्यंत भयभीत होऊन प्रियेपाशी आला व तिची ती दशा दिसताच त्यास दारुण दुःख झाले.।।५।। जाडीभरडी, जुनीपुराणी वस्त्रे नेसलेली असून नुसत्या जमिनीवर पडलेली आहे व अंगावरील भूषणे (अलंकार) काढून फेकून दिलेली आहेत. (खोलीभर)।।६।। या दुर्बुद्धीला हा कुवेष कसा आवडला

व कसा दिसला (म्हणाल) तर जणू काय भावी वैधव्याची सूचनाच तो देत आहे.।।७।। (अगदी) जवळ जाऊन राजाने गोड शब्दांनी विचारले की राणी! प्राणप्रिये ! तू का रुसली आहेस (हेतु काय?).।।८।।

**टीका. चौ. ५-६ (१) प्रिबेपासि नृप सुभीत बेई** - ल.ठे. या सर्व वर्णनात कवींनी दशरथांबद्दल एकवचनच वापरले आहे. पूर्वीसारखी आदराची भाषा आता या राजाबद्दल लोक वापरणार नाहीत हे सुचविले. (क) २५।१ मध्ये राजा कोपभवनाकडे जाण्यास निघाला; पण पाऊल टाकवेना. नंतर प्रसंगोपात कामप्रताप वर्णन केला. इतक्या वेळात राजा जेमतेम कोपभवनाच्या द्वारापर्यंत आला. आधीच फार घाबरलेला आहे. दरवाजापाशी येताच जे दृश्य दिसले, ज्या दुर्दशेत राणी दिसली, ती पाहून राजाच्या कामवश, भयभीत, कोमल, सरळ, निष्कपट स्नेहमय हृदयाला दारुण दु:ख झाले. धक्काच बसला असेल. (ख) जिच्या अति सुकुमार शरीराला तलम नरम रेशमी कापडसुद्धा खुपेल असे वाटावयाचे तीच आज गोणपाटासारखे जाडे, सुती, अगदी जुने-पुराणे, दोन-तीन धडपे जोडलेले, ठिगळे लावलेले, मुरडी घातलेले लुगडे नेसलेली आहे. हे पाहिल्यानंतर राजाला वाटले असेल की माझे इतके ऐश्वर्य असून माझ्या प्राणप्रिय प्रियतमेला हा भिकारणीचा वेष करण्याची इच्छा झाली हे माझे दुर्दैव! काहीतरी फार मोठा अपराध, अपमान, कोणीतरी केला असेल म्हणून इतकी रागावलेली दिसते. माझ्याकडून काही घडल्याचे मला तरी आठवत नाही. या कुवेषाची तिला का इच्छा झाली या विषयी कवि आपले मत सांगतात.

**चौ. ७ - (१) जनुं भावी बैधव्य सुचबी** - श्रीमंत, सुशील, पतिव्रता स्त्रियांचा पति वारला म्हणजे त्या स्त्रिया नित्याची उंची वस्त्रे टाकून अशी जाडीभरडी वस्त्रे नेसतात. दागदागिने काढून त्या शोकावेगात भराभर फेकून देतात. नुसत्या उघड्या जमिनीवर शोकविव्हळ होऊन लोळत असतात. तशीच हुबेहुब ही राणी दिसत आहे. फक्त विलाप नाही इतकेच ! कवि म्हणतात हा वेष विधवा स्त्रियांनाच शोभण्यासारखा असून ज्या अर्थी हिला आवडला (गमे-गमला) त्या अर्थी असे वाटते (गमे) की ही पुढील वैधव्याची सूचनाच दिली जात आहे. पण वैधव्य आल्यावर कैकयीने असा वेष केला नाही. चांगली नटलेली आहे.

(क) ज्या सौभाग्याच्यासाठी स्त्रियांचे सर्व भोगविलास, अलंकार, सौंदर्यप्रसाधने व त्यांचे सौंदर्य असते ते सौभाग्यध नष्ट झाल्यावर पतिप्रेमी धर्मशील स्त्रियांना ते अलंकार भारभूत वाटतात. ती उंची वस्त्रे मढ्याला नेसविलेल्या सुंदर वस्त्रांसारखी विरूप वाटतात. सौभाग्यवती स्त्रियांनी जाणून बुजून असा वेष करणे सौभाग्य विनाशाचे चिन्ह आहे असे समजावे. **विधवांनी वेष कसा करावा हे येथे सहज सुचवून ठेवले आहे.** पण कलियुगात काय दिसते? **'सुवासिनी तों विना विभूषण । विधवांचे शृंगार तु नूतन'** (७।९९।५).

**चौ.८ - (१) जाउनि जवळ पुसे** - जरा आणखी जवळ जाऊन पाहताच राजास राहवेना. जमिनीवर पडलेली कैकयी कशी दिसत होती याचे वर्णन वा.रा. अनेक दृष्टांतांनी केले आहे. पण वरील दोन ओळींतील वर्णन जितके सजीव व कैकयीचे चित्र सहज दृष्टीपुढे उभे करणारे आहे तितके ते नाही. **'निधाय सर्वाभरणानि भामिनी ॥ असंवृतामास्तरणेन मेदिनीं तथाधिशिश्ये पतितेव किन्नरी ॥' 'तमोवृता द्यौरिव भग्नतारका ॥' 'लतामिव विनिष्कृत्तां पतितां देवतामिव ॥ किंनरीमिव निर्धूतां च्युतामप्सरसं यथा ॥ मालामिव परिभ्रष्टां हरिणीमिव संयताम् ॥ करेणुमिव दिग्धेन विद्धां मृगयुवा वने'** (वा.रा. २।९।६५-६६, २।१०।२५-२६) शब्द वाचीत असता या अनेक सुंदर उपमा कैकयीची एकच मूर्ती डोळ्यांपुढे उभी करू शकत नाहीत.

**(२) रुसलिस कां** - सवती असणाऱ्या स्त्रियांना रुसण्यास तीन-चार कारणे असू शकतात. (क) सवतीने किंवा तिच्या परिवारातील कोणी अपमान करणे. (ख) पतीचे आपल्यावरील प्रेम कमी होऊन किंवा न होता पतीने सवतींना किंवा तिच्या मुलाबाळांना सुख देणे. (ग) पतीने आपल्या माताच्या विरुद्ध वागणे. (घ) सहज सांगून पतीने दागदागिने किंवा वस्त्रे इ. न पुरविणे. **(३) प्राणप्रिय राणी** - प्राणप्रिय = प्राणांहून प्रिय, **'प्राणेभ्योऽपि गरीयसी'** (वा.रा.) **'प्रिय न तनु - प्राणांहुनि काहीं'** (१।२०८।४) असे दशरथच म्हणाले असता त्यांना ही राणी प्राणांहून प्रिय आहे म्हणून तिच्यासाठी वरील चार कारणे दूर करून तिला जे प्रिय वाटते ते करण्यास राजा का तयार होणार नाही. या शब्दाने सुचविले की तू म्हणशील ते मी करतो. हाच अर्थ पुढील दोह्याच्या

चौपायांत दशरथाने स्पष्ट करून सांगितला आहे.

ल.डे. - चोवीस दोहे पूर्ण होऊन आता २५ व्याची पाळी आली. पण प्रत्येक २५ व्या दोह्यापूर्वी एक छंद घालावयाचा कवीचा संकल्प या काण्डात आहे; आणि छंदानंतर दोहा न घालता सोरठा घालण्याचाही संकल्प आहे. हे कोणीही कवि करू शकेल. पण छंदाचा उपयोग एखाद्या रसाच्या विशेष परिपोषासाठी करावयाचा व सोरठ्याचा उपयोग कोमल भावना प्रदर्शित करण्यासाठीच करावयाचा हा ग्रंथारंभी केलेला संकल्पही पाळणे फार कठीण आहे. ते येथे व पुढील ५०, ७५, १०० इत्यादी प्रत्येक पंचविसाव्या दोह्याच्या ठिकाणी उत्तम रीतीने साधले आहे. १२५ चे ऐवजी १२६ वा आहे हे पुढे दिसेल.

*हिं. छं.* *। केहि हेतु रानि रिसानि परसत पानि पतिहि नेवारई ।*
*॥ मानहुँ सरोष भुअंग भामिनि बिषम भाँति निहारई ॥*
*। दोउ बासना रसना दसन बर मरम ठाहरु देखई ।*
*॥ तुलसी नृपति भवतब्यता बस काम कौतुक लेखई ॥१॥*

*म.छंद.* *। कां रोष राणी?, लावतां पति पाणि ती झिड्कारिते ।*
*॥ जाणों सरोष भुजंग - भामिनि बिषम - दृष्टीं निरखिते ॥*
*। युग वासना रसना दशन वर मर्म-ठाया शोधिते ।*
*॥ तुलसी नृपति भवितव्यता-वश काम-कौतुक मानि तें ॥१॥*

**अर्थ :** (दशरथ विचारतात) राणी ! रोषाचे काय कारण (का रुसलीस)? असे म्हणून अंगाला हात (पाणि) लावताच तिने आपल्या हाताने पतीचा हात (पाणि) झिडकारून टाकला; व जणू काय क्रुद्ध झालेल्या नागिणी (भुजंग-स्त्री) प्रमाणे दुष्ट नजरेने (विषारी दृष्टीने) ती (राजाकडे) निरखून पाहू लागली. दोन वासना याच तिच्या जिभा होत. दोन वर हेच जणू विषारी दोन दांत होत आणि जणू काय डसण्यासाठीच मर्म-स्थान (ठाय) सोधीत आहे. तुलसीदास म्हणतात, राजा भवितव्यतेला वश झाला असल्याने या सर्व चेष्टा त्याला प्रणयलीला (कामलीला, कामकौतुक) च वाटत आहेत.॥छंद॥

**टीका. छंद** - (१) का रुसलीस असे एकदा विचारले तरी बोलत नाही असे

पाहून राजा तिच्या अंगावर प्रेमाने हात (पाणि) फिरवीत पुन्हा विचारतो की तू राणी, माझी प्राणप्रिया असून तुला रुसण्याचे काय कारण? (क) **रानी** - तू चक्रवर्ती महाराजांची प्राणप्रिया असल्याने तुला कोणत्याही प्रकारच्या सुखाची कमतरता नाही आणि तू रुसून अशी भिकारणीसारखी का पडून राहिली आहेस?

(२) **परसि पानि लावतां** - जणू एखाद्या कामी, दुष्ट, परपुरुषाने, सुंदर पण भिकारणीच्या वेषात असलेल्या, बाजूस पडून राहिलेल्या पतिव्रतेच्या अंगास हात लावताच, हाताचा स्पर्श होताच, तिने आपल्या हाताने त्या पुरुषाच्या हाताला रोषाने झटका देऊन उडवावा व त्याच्याकडे अत्यंत रोषाने, डोळे इंगळासारखे लाल करून पहावे त्या प्रमाणे ती दशरथाकडे - स्वतःच्या पतीकडे पाहू लागली. यावर उत्प्रेक्षा केली.

(३) **जाग्नो सरोष भुजंगभामिनि** - जाणों = जणू = मानहुँ. राजा भुजंग नसता राणी भुजंगभामिनी बनली आहे म्हणून उत्प्रेक्षा केली. मांत्रिकाशिवाय इतर कोणी नागिणीला प्रेमाने जरी स्पर्श केला तरी ती प्रथम इंगळासारख्या लाल, संक्रुद्ध डोळ्यांनी त्या व्यक्तीला नखशिखांत निरखून पाहते. हाताने स्पर्श करताच नागीण अत्यंत संतापते. नागाशिवाय इतर कोणी स्पर्श केलेला नागिणीला आवडत नाही. दशरथ अजून भुजंग बनला नाही. पण लवकरच बनणार आहे. मग क्रोधाने पाहण्याचे सोडून कपटप्रेमाने नागीण डोलू लागेल. नागीण चावलेला मनुष्य इतर कोणास चावला तर त्या माणसाला विष चढते. दशरथाने वर देण्याचे कबूल करणे म्हणजे भुजंग बनणेच आहे. कुटिल गतीने जाणारा तो भुजंग. भुजो कौटिल्ये, कौटिल्येन गच्छति इति भुजगः, भुजंगः, ही नागीण राजाला चावली - वर मागितले - म्हणजे तो भुजंग बनेल. राज्य देतो असे सांगून वनवास देणे ही कुटील गतीच आहे.

(४) **मर्म ठाया शोधते** - शरीरात अशी काही स्थाने आहेत की त्या ठिकाणी सर्प - नाग - नागीण चावल्यास मंत्र किंवा औषध उपयोगी पडत नाहीत. हातांच्या व पायांच्या अंगठ्याजवळील बेचके अशी मर्मस्थाने आहेत. या मर्मस्थानी चावण्याची संधी चवताळलेली नागीण शोधीत असते व आपल्या जिभा चाटीत असते. (क) **युग वासना रसना** - नागिणीला (सर्पांना) दोन जिभा

असतात म्हणून त्यांस द्विजिव्ह म्हणतात. भरताला राज्य देऊन सत्ताधीश बनण्याची वासना ही एक जीभ व रामाला वनवासात धाडून सवतीचा सूड घेण्याची वासना ही दुसरी जीभ-रसना आहे. पतिप्रेम - रस व रामप्रेम - रस ना अशी कैकयी आता झालीच आहे. (ख) सर्पाच्या मुखात वरच्या बाजूस दोन भरीव दशन (दंत) व खालच्या बाजूस दोन पोकळ सुईसारखे दशन असतात. खालच्या दशनांतून विष जोराने ओतले जाते. तेवढ्यासाठी साप चावल्याबरोबर उलटा वळतो तेव्हा विष चटकन रक्तात घुसते. या सर्व क्रिया कैकयीकडून क्रमशः होणार आहेत. तिला सापीण म्हटले असते तर विशेष बिघडले नसते; पण कौटिल्य - कुटिलता - प्रत्यक्ष शब्दाने सुचविता आली नसती. कुटिलपणाचा व कपटाचा उपयोग करून हे सर्व ती साधणार आहे. हे भुजंग = कुटिल गति या शब्दाने सुचविले आहे. भामिनी = फार सुंदर व कोपिष्ट स्त्री; म्हणून भुजंगभामिनी = कुटिल, कोपिष्ट सुंदर स्त्री असा अर्थ आहे. हाच प्रथम योग्य आहे. दशरथ भुजंग बनल्यावर भुजंगाची रागीट स्त्री हा दुसरा अर्थ होईल. पूर्वी कुबडीला काळी जणू सापीण - पापीण (१३।८) म्हटले आहे. ती कैकयीला चावली तेव्हा आता कैकयी नागीण बनली आहे. काळी सापीण नीच कुळातील - संकर जातीची असते. नाग व धामण यांच्या संयोगाने कृष्णसर्पाची उत्पत्ती होते. नागीण पिवळी धमक, शुद्ध कुळातील असते. कृष्णसर्पाचे रंग ऋतूमानाने बदलतात. नाग-नागिणीचे पालटत नाहीत. कुबडी काळी व नीच जातीची म्हणून तिला काळी सापीण म्हटले व कैकयी चंपकगौर आहे म्हणून नागीण म्हटले. यावरून गोस्वामींच्या सूक्ष्म-निरीक्षणाची साक्ष पटते. केव्हा वर मागावे, कसे मागावे याचा विचार कैकयी करीत आहे. हेच मर्मस्थान शोधीत निरखून पाहणे होय.

(५) **नृपति भवितव्यतावश काम-कौतुक मानि** - कैकयीने आपल्या मनात रचलेल्या कुटिलतेची व कपटाची राजाला काहीच कल्पना आली नाही. हा क्रोध खरा नसून केवळ प्रणयलीला-कामलीला आहेत असे त्यास वाटत आहे. याचे कारण प्रारब्धभोग असे तुलसीदास म्हणतात. **'चतुर-कपट सरलां ना कळतें'** हे येथे पुन्हा दाखविले. कुबडीचे कपट सरल बुद्धि राणीला कळले नाही म्हणून

कुबडीच्या संगतीने ती कुटिल गती कपटी नागीण बनली. तिचे कपट सरलमति राजाला न कळल्याने प्रारब्ध वशात तोही आता प्रणयलीला करू लागेल. (क) **'तुलसी'** हे नाव या काण्डातील प्रत्येक छंदांत आहे. फक्त १२६ व्यातील छंदांत किंवा त्या सोरठ्यांत नाही.

***हिं.सो.*** *। बार बार कह राउ सुमुखि सुलोचनि पिकबचनि ।।।*
*।। कारन मोहि सुनाउ गजगामिनि निज कोप कर ।।२५।।*

**म.सो.** *। नृपति वदति बहु वार सुमुखि सुलोचनि पिकवचनि ।*
*।। कां हा कोप अपार सांग किं गजवर - गामिनी ।।२५।।*

**अर्थ :** राजा वारंवार (पुष्कळ वेळा) म्हणाला की, हे सुमुखि ! सुलोचनि! कोकिल वचनी ! गजवरगामिनी ! हा अपार कोप का ते मला सांग की (एकदा). ।।२५।।

**टीका. सो. - (१) गजवरगामिनी** - मी आलो म्हणजे तू गजश्रेष्ठाच्या गतीने पुढे सामोरे येऊन माझे **कोकिळेसारख्या** मधुर मनोहर **शब्दांनी** स्वागत करीत असे. आज तसे न केल्याने मला वृद्धाला दिवसभर झालेल्या श्रमांचा परिहार झाला नाही. असे का बरे केलेस ? का रागावलीस ? गोड, प्रेमळ शब्दांनी माझ्या सर्व श्रमांचा परिहार करून तू आपल्या सुंदर, मनोहर नेत्र कटाक्षांनी प्रेमाने माझ्याकडे पाहिलेस म्हणजे मला वाटत असे की मी नंदनवनातच आलो. पण आज तसे का केले नाहीस? रागावण्याचे, एवढा रुसवा धरण्याचे कारण का नाही सांगत ? तुझ्या प्रेमळ, मनोहर शब्दांनी व प्रेमळ नेत्रकटाक्षांनी आनंदित होऊन तुझ्या सुंदर-रमणीय मुखाकडे मी पाहिले म्हणजे तुला व मला जे सुख होत असे ते मला व तुलाच ठाऊक ! आज मी त्या अनिर्वचनीय सुखाला आचवलो. तुझे ते रोजचे **प्रफुल्लीत रमणीय मुख** आज असे उग्र का बरे झाले? तुझे ते प्रेमळ, प्रेमाची भाषा बोलणारे **सुलोचन** आज असे इंगळासारखे लाल करणारा हा अति क्रोध येण्याला कारण तरी काय घडले? ज्या कोकिल स्वराने माझे श्रमहरण करीत असस तो मधुर स्वर त्या कोमल कंठांतून निघून मला कर्णामृत पाजीत नाही याचे कारण काय ते एकदा सांग तरी. मत्त हत्तीच्या

गतीने माझ्याजवळ प्रेमाने चालत येणारी तू असून आज तुला मातीत लोळत पाडण्यासारखा क्रोध कशामुळे आला हे मला का सांगत नाहीस ? अशा प्रकारे त्या कामकौतुकाला, कामकौतुकाच्या भाषेनेच गोंजारीत विचारले. वारंवार (बहुवार) म्हणजे कसे गजगामिनी इत्यादी चार संबोधनांचा येथे परस्पर संबंध काय हे वरील प्रेमळ व कोमल प्रश्नावलीत स्पष्ट झाले आहेच.

(२) दिवसभर आपला उद्योगधंदा करून, दमून-भागून, सायंकाळी-रात्री घरी परत येणाऱ्या **पतीशी पतिव्रता पत्नीने कसे वागावे हेपण या चार संबोधनांनी सहज दाखवून ठेवले आहे.** कोणत्या क्रमाने पतीला सुख द्यावे हे मागील प्रश्नावलीतच दाखविले आहे. इतक्या प्रेमाने एक महाराजा-सम्राट एका स्त्रीला काकुळतीस येऊन विचारीत आहे. पण प्रेमाने जिंकलेल्या व कामवश झालेल्या या धर्मशील, प्रेमळ, सम्राटाची किंमत कैकयीला मुळीच वाटत नाही. ती एक अक्षरसुद्धा बोलत नाही. वासनारूपी रसना आतल्या आत चाटीत मर्म केव्हा सापडेल याची संधी पहात आहे. 'कोटिकुटिल मणि गुरुने' पढविलेली असल्याने वर मागण्यास संधी देणारे किंवा तसल्या विषयाचे शब्द राजाच्या मुखांतून निघाल्याशिवाय ती तोंडच उघडणार नाही.

हिं. ***। अनहित तोर प्रिया केइँ कीन्हा । केहि दुइ सिर केहि जमु चह लीन्हा ॥१॥***
***। कहु केहि रंकहि करौं नरेसू । कहु केहि नृपहि निकासौं देसू ॥२॥***
***। सकउँ तोर अरि अमरउ मारी । काह कीट बपुरे नर नारी ॥३॥***
***। जानसि मोर सुभाउ बरोरू । मनु तव आनन चंद चकोरू ॥४॥***

म. ***। प्रिये अहित तव कोण करी तरि । द्विशिर कोण, यम कुणा पाशिं धरि ॥१॥***
***। रंक कोण वद करुं नरेशहि । कुणा नृपा वद देउं विदेशहि ॥२॥***
***। मारुं शकेन हि अमरा तव अरि । कोण कीट पामर मानव तरि ॥३॥***
***। मत्स्वभाव जाणसी बरोरू । मन तव आनन-चंदिं चकोरू ॥४॥***

**अर्थ :** प्रिये तुझे अहित केले तरी कोणी? (असा) दोन डोक्यांचा कोण आहे? किंवा यमाने कोणाला पाशांत धरले आहे?॥१॥ सांग पाहू असा कोण रंक आहे की ज्याला राजा करू किंवा असा कोण राजा आहे की ज्याला

परदेशात हाकलून देऊ?॥२॥ तुझा शत्रू अमर (देव, जरि) असला तरी त्याला सुद्धा मी मारू शकेन मग इतर पामर नरांची, कीटांची (किड्यांची) कथा ती काय? हे वरोरू तू माझा स्वभाव जाणतेसच की माझे मन तुझ्या मुखचंद्रावर चकोर बनले आहे.॥४॥

**टीका.** - अनेक वेळा सुमुखि, सुलोचनि, पिकवचनी, गजवरगामिनी इ. संबोधनांनी प्रणयाने विनवण्या करूनसुद्धा ही राणीरूपी देवी उत्तरे देत नाही असे पाहून राजाला वाटले की हा क्रोध काही लुटुपटीचा नाही. कोणी तरी माझ्या प्राणप्रियतमेचा काहीतरी मोठा गुन्हा केलेला दिसतो. म्हणून तिला प्रसन्न करण्याचा प्रयत्न राजा आता विविध प्रकारे करीत आहे. जीव परमात्म्याचा अंश, अविनाशी, प्रभु, सच्चिदानंदघन असून एका तामसी रमणीला वश झाल्यामुळे किती दीन झाला आहे व तिला खूष करण्यासाठी काय काय करण्यास तयार आहे हे पाहण्यासारखे आहे. बरे हा दुष्ट, अधर्मी जीव नसून धर्मशील, पुण्य पुरुष याच्यासारखा विश्वात नाही !

**चौ. १ : (१) अहित (अनहित) तव कोण करी - अहित** = अकल्याण, अपराध, गुन्हा, अपमान. भाव हा की माझ्यासारख्या परम पराक्रमी सम्राटाच्या प्राणप्रिय पत्नीचा अपराध, अपमान करणारा कोणी असेल असे वाटत नव्हते. परंतु कोणी असलाच तर तो द्विशिर - दोन डोक्यांचा कोणीतरी असला पाहिजे. भाव हा की अशा अपराधाची शिक्षा डोके उडविले जाणे ही मिळाली तरी दुसऱ्या डोक्याने काही काळ जिवंत राहता येईल असे त्यास वाटले असावे. भाव हा की असा कोण अपराधी दुष्ट असेल त्याचे नाव सांग, मी स्वतः त्याचे डोके उडवीन. **(क) यम कुणा पाशिं धरि** - ज्याने तुला असला क्रोध येण्यासारखे दुष्कृत्य केले असेल व कुठेतरी फरारी झाला असेल, तो कोणी का असेना व कुठेही लपून राहिलेला असेना त्याची घटका भरली म्हणून समज. यमाने आपले पाश ज्यावर टाकण्याचे ठरविले असेल ती व्यक्ती कुठे, कितीही गुप्त असली तरी मरण चुकविता येणार नाही. म्हणून येथे यमाने पाशात धरण्याचा उल्लेख केला; अन्यथा द्विरुक्ती दोष घडला असता. या दोन वचनांनी प्रगट व गुप्त शत्रूंचा उल्लेख केला.

**चौ. २ - (१) रंक कोन बद करूं नरेशही** - एखाद्यावर कृपा करावी असे तुझ्या मनात असता, ते जाणून मी तसे केले नाही म्हणून का तू रुसली आहेस हा या चरणांतील भाव आहे. तू सांगण्याचीच खोटी आहे. साधी कृपाच काय, रंकाला राजा करून टाकतो एका क्षणात! तुझ्या इच्छेचा व शब्दाचा अव्हेर आजपर्यंत केला नाही हे तुला माहीत आहे. भरताला रंक बनविण्याचा कट रचला आहे असे या राणीला वाटत आहेच. पुढे जे करावे लागणार आहे त्याचा प्रणयाने केलेला पूर्व संकल्पच जणू हे वाक्य आहे. प्रणयाने - कामकौतुक करीत असता - दिलेली अभिवचने पाळलीच पाहिजेत असे बंधन धर्म-नीति-शास्त्राने घातलेले नाही. महा. भा. ९।१९ **(क) कुणा नृपा बद देउं बिदेशहि** - कोणत्या राजाला पदच्युत करून स्वदेशांतून हद्दपार करू ते सांग. हे वचनसुद्धा रामाला वनवासास पाठविण्यास पुरेसे आहे. पण हे पति-पत्नीच्या कामकौतुकातले असल्यामुळे ते अयोध्याधीशाला बंधनकारक होत नाही. राज्य देणे किंवा पदच्युत करून हद्दपार करणे हे राजाच्या कार्यक्षेत्रातले आहे. शिवाय प्रणयवचन कामीजनांच्या थट्टाविनोदासारखेच असल्याने त्यास प्रतिज्ञेचें स्वरूप येऊ शकत नाही; म्हणून राणी सध्या काही बोलणार नाही. इच्छा असेल ते माग असे जेव्हा राजा म्हणेल त्या वेळी मर्मस्थान सापडले असे जाणून ही नागीण फुत्कारू लागेल. '**त्यजुं पतिपुत्र शकेन**' हे न जाणतां उच्चारलेले कैकयीचे शब्द जसे खरे ठरणार आहेत तसेच राजाचे या चौपाईतील शब्दसुद्धा सत्यसृष्टीत उतरणार आहेत.

**चौ.३ - (१) अमर** - पुण्यक्षय झाल्याशिवाय ज्यांना मृत्यू किंवा जन्म येत नाही ते देव. अमरांना जर मारता येत असते तर रावणाने सर्वांना केव्हाच ठार केले असते. अमरांना कोणी मारू शकत नाही; असे असून दशरथ म्हणत आहे की मी त्यांनासुद्धा मारू शकेन. या वाक्याने कवींनी हे दाखविले की राणीला प्रसन्न करण्यासाठी राजा ही प्रणयप्रार्थना करीत आहे; म्हणूनच या अभिवचनांना कैकयी काडीमात्र किंमत देत नाही. **(क) कोण कीट पामर मानव तरि** - मनुष्ये तर किडे-मुंग्या आहेत. त्यांना मारणे अगदीच सोपे आहे. भाव हा की तुझा अपराध करणारा कोणी का असेना त्याचे कल्याण किंवा विनाश

तू म्हणशील त्या प्रमाणे करीन पण हा क्रोध सोड.

**चौ. ४ - (१) बरोरू** - वर म्हणजे सुंदर आहेत. ऊरू म्हणजे मांड्या जिच्या ती; म्हणजेच सुंदर; पण या शब्दांत कामवासनेचा गंध आहे. **(क) मन तव आनन-चंदि चकोरू - चंद हा शुद्ध संस्कृत शब्द आहे.** 'हिमांशुश्चंन्दः शशी चन्द्रो हिमद्युतिः' (शब्दार्णवे). या चरणांतील 'मन तव आनन' एवढेच शब्द निराळे घेतले व 'आन न' असा पदच्छेद केला की एक सुंदर भाव निघतो. 'मन तव, आनन', माझे मन तुझे आहे; दुसऱ्या कोणाचे नाही. भाव हा की माझ्या मनाला तुझ्या मुखचंद्राशिवाय चकोर बनून राहण्यास दुसरा मुखचंद्र या जगात नाही. तुझ्या शिवाय माझे दुसऱ्या कोणत्याही राणीवर प्रेम नसता व तुझ्या प्रसन्न, रमणीय मुखाकडे बघत राहण्यानेच मला सर्व सुखसमाधान मिळत असता, तुझ्या शिवाय इतर सुखाचे स्थान मला नाही हे तुला माहीत असता तू अशी भयंकर कां बरे रागावलीस व रोषाचे कारणसुद्धा अजून का सांगत नाहीस? एवढ्याने सुद्धा कामदेवी प्रसन्न होत नाही असे पाहून तिच्या चरणी आणखी अनेक अमूल्य वस्तू राजा समर्पण करीत आहे-

***हिं.*** ***। प्रिया प्रान सुत सरबसु मोरें । परिजन प्रजा सकल बस तोरें ॥५॥***
***। जौं कछु कहौं कपटु करि तोही । भामिनि राम सपथ सत मोही ॥६॥***
***। बिहसि मागु मनभावति बाता । भूषन सजहि मनोहर गाता ॥७॥***
***। घरी कुघरी समुझि जियँ देखू । बेगि प्रिया परिहरहि कुबेषू ॥८॥***

***म.*** ***। प्रिये प्राण सुत सर्वहि मम जें । प्रजा सपरिजन तव वश समजे ॥५॥***
***। वदूं कांहिं कपटें जर तुजसी । भामिनि ! रामशपथ शत मजसी ॥६॥***
***। विहसुनि घे इच्छित तें मागुनि । गात्रिं मनोहर भूषण घालुनि ॥७॥***
***। वेळ अवेळ पहा तरि कांहीं । प्रिये कुवेषा त्यज लवलाहीं ॥८॥***

**अर्थ** - प्रिये ! माझे प्राण, पुत्र आणि जे काही माझे आहे ते सर्व आणि प्रजा, सर्व परिजन इ. सर्व तुझ्या अधीन आहेत असे समज.॥५॥ भामिनी ! मी जर तुझ्याशी काही कपटाने हे बोलत असेन तर मला रामाची शतशः शपथ आहे.॥६॥ एकदा पोटभर हसून, मनो-हर अंगांवर भूषणे घालून तुझी इच्छा असेल ते मागून घे.॥७॥ काही वेळ-अवेळ याचा विचार तरी कर आणि

प्रिये हा कुवेष ताबडतोब टाकून दे (पाहूं).॥८॥

**टीका. - चौ. ५ -** (१) प्राण, पुत्र, धनदौलत, ऐश्वर्य इत्यादी सर्वस्व, सर्व प्रजा, नोकरचाकर सगोत्र, कुटुंब इत्यादी सर्व दशरथाने या चौपाईने कामदेवीच्या चरणी समर्पण केले ! कामदेवी = कामवासना पुरविणारी देवी. गुरुवसिष्ठांपुढे फक्त सुत व संपत्ती ठेवून अर्पण केली होती; (१।३५३।१). परंतु या कामवासना पुरविणाऱ्या नारीला आपले सर्वस्व व प्राण सुद्धा अर्पण करीत आहेत ! **कामवासनेचे प्राबल्य जिथे इतके आहे तिथे ज्ञानरूपी राम वनवासात जाण्याची इच्छा न करील तरच नवल. 'प्रिय न तनू प्राणांहुनि काही'** असे दशरथच विश्वामित्रांस म्हणाले आहेत व येथे या नागिणीला आपले प्राणसुद्धा देण्यास तयार आहेत. विश्वामित्रांसही प्राण देण्यास कबूल होते पण ज्येष्ठ पुत्र राम देण्यास कबूल नव्हते. पण येथे सर्वच पुत्र या कामदेवीला बळी देण्यास स्वेच्छेने तयार झाले आहेत ! सर्वस्वात कौसल्यादी सर्व स्त्रियांचा अंतर्भाव होतोच. त्या वसिष्ठांस किंवा रामविवाहानंतर विश्वामित्राससुद्धा अर्पण केल्या नव्हत्या; परंतु येथे एका कामवासनेच्या तृप्तीसाठी एका चढेल स्त्रीला तोच दशरथराजा पुत्र, स्त्रियादि सर्वस्व न मागता अर्पण करीत आहे. **'घ्या प्रभाव कामाचा बघूनी' 'अहं च हि मदियाश्च सर्वे तव वशानुगाः ॥ न ते कंचिदभिप्रायं व्याहन्तुमहमुत्सहे'** (वा.रा. २।१०।-) **(क)** दशरथाच्या वरील विवेचनांवरून स्पष्ट ठरते की कैकयीला संतुष्ट ठेवण्यासाठी राजा इतर कोणत्याही राणीकडे ढुंकून सुद्धा पहात नसे. तिचा कोणताही शब्द मोडण्याचे धैर्य त्याच्या ठिकाणी नव्हते. कैकयीला प्रसन्न ठेवण्यासाठी इतर कोणाही व्यक्तीला वाटेल ते दुःख देण्यास राजा कचरत नव्हता. कौसल्येसारख्या पट्टराणीला, रामजननीलासुद्धा दशरथाने कधी सुख दिले नाही हे वा.रा. दशरथवचनांनीच सिद्ध आहे. **'न मया सत्कृता देवी सत्कारार्हा कृते तव ॥ इदानीं तत्तपति मां यन्मया सुकृतं त्वयि ॥** (२।१२।७०) सत्कार करण्यास योग्य असलेल्या देवीचा (कौसल्येचा) मी तुझ्यासाठी कधी सत्कार केला नाही व मी तुझ्यासाठी जो प्रेमाने वागलो व सुख दिले त्याबद्दल आज मला पश्चात्ताप होत आहे. मानसांतील या दोह्यांतील चौ. १-६ सुद्धा जवळ जवळ तेच

सुचवितात. कैकयीला वाटत आहे की मला प्रसन्न करून स्वतः सुखी होण्यासाठी दिलेली ही तोंडदेखली अभिवचने आहेत. या शंकेचा सुगावा-वास-दशरथास आला म्हणून पुढील चौपाईत सांगतात -

**चौ. ६ - (१) बदूं काहिं कपटें जर तुजसी** - मी कपटाने बोलत आहे अशी या देवीची समजूत झालेली दिसते अशी शंका राजाला आली. ही कामकौतुकास्तव रागावलेली नसून खरीच रागावलेली दिसते. त्यामुळे माझ्या वचनांवर हिचा विश्वास बसत नाही. विश्वास वाटावा म्हणून राजाने रामशपथ घेतली. एकवेळच नव्हे शंभर वेळा शपथ घेऊन सांगतो की मी कपट करीत नसून खरेच बोलत आहे. भाव हा की तू म्हणशील ती शिक्षा किंवा कृपा तू सांगशील त्या व्यक्तीला मी करीन, व प्राण, पुत्र, सर्वस्व, प्रजा, परिजन इ. वाटेल ते तुझ्या स्वाधीन करीन पण तुझी इच्छा पुरवीन. (क) **'स्नेह-सुकृत-सीमा - रघुराज हि'** अशा रामाची शपथ मोडणे म्हणजे स्नेहाचा व सर्व सुकृताचा पूर्ण विनाश करणे होय. एक वेळ नव्हे, शंभर वेळा रामशपथ घेतो. **कामी पुरुषांच्या दैन्याची व स्त्री लंपटपणाची परमावधि येथे दाखविली.** एक ग्राम्य विषयसुखाच्या पूर्तीसाठी **'जो आनंदसिंधु सुखराशी,** सर्व सुखसागर राम त्याची शंभर वेळा शपथ घेतली. तशीच लोळत टाकून, ते सर्व दागिने गुंडाळून त्या खोलीस कुलूप लावून, सील करून गेले असते किंवा वात झाला आहे म्हणून एक डाग टाळूवर दिला असता तर क्रोध तेव्हाच उतरला असता. डागण्या तापत घालण्याचा हुकूम दिला असता तरी भागले असते. पण नारिविजित पुरुषाकडून हे व्हावे कसे? **'नारिविवश नर सगळे, स्वामी !! नाचति नट-मर्कट-सम नामी'** (७।९९।९) हे कलियुगातील सर्वसाधारण पुरुष वर्गाचे वर्तन व मागील चौपायांत रेखाटलेले व पुढे रंगविलेले एका वृद्ध सम्राटाचे चित्र यांत काय भेद आहे? बहुपत्नीकत्वाचा हा दुष्परिणाम पाहूनच की काय राम एकपत्नी व्रतधारी झाले !

**चौ. ७ - (१) बिहसुनि** = खदखदा हसून पाहिजे ते मागून घे. पूर्वी प्रणय विनोद करताना जशी खदखदा हसत होतीस तशी हास, म्हणजे तुझा क्रोध गेला अशी माझी खात्री होईल. क्रोध व विहास किंवा शोक व विहास

एकत्र असू शकत नाहीत हे राजाला माहीत आहे. पण कपटी माणसाला अशा विरोधी गोष्टींचा अभिनय एकाच वेळी चांगला करता येतो. एक भाव गुप्त असतो व एक प्रगट असतो इतकेच. (क) **गात्रि मनोहर** - पूर्वी मुख, लोचन, वचन, गमन व मांड्या यांचे सौंदर्य वर्णिले; आता सांगतात की तुझे सर्व शरीरच माझ्या मनाला चोरणारे आहे. भूषणे नाहीत व भिकारणीचा वेष केला आहेस तरी मनो-हर आहे; भूषणे घालून मोठ्याने हसलीस म्हणजे किती मनोहर होईल ! (ख) **इच्छित तें मागुनि घे** - हे सांगण्यात राजाची अशी समजूत दिसते की 'रामाला राज्याभिषेक करा' हेच ही मागणार. पुढील चौ.२-३ वरून ही भावना स्पष्ट होते. **'तूं इच्छिसि तें झालें'** व **'उद्यां करूं राम युवराजा'** हीच ती दोन वचने होत. याच भरवशाने रामशपथ घेऊन सांगितले की पाहिजे ते मागून घे. राजा राजनीतिपटु असून स्त्रीसौंदर्यलोलुप व कामवश झाल्याने जें करू नये म्हणून सुभाषितकार सांगतात तेच नक्की केले. 'विश्वासो नैव कर्तव्यः स्त्रीषु राजकुलेषु च'. पुढे राजा स्वतःच म्हणतो की 'हत नारीविश्वासिं' (२९।-) राणीने नीच दासीवर विश्वास ठेवला व राजा शिरजोर प्रबल अबलेवर विश्वासून स्वतःचा विनाश करून सर्वांना दुःसह दुःखात ढकलणार आहे. पण 'जो जस करि तो तस फल चाखित' तेथे कोणाचे काय चालणार ! इतरांनी या गोष्टींपासून धडा शिकून शक्यतो असे प्रसंग टाळण्याचा प्रयत्न करावा हेच यांतील ग्राह्य सार आहे.

**चौ. ८** - (१) **वेळ अनेक पहा तरि कांहीं** - भाव हा की आजचा दिवस ही वेळ, कुवेष करण्याची व क्रोधाने कोपभवनात लोळत पडण्याची नाही. ही नेहमीपेक्षा सर्वोत्तम व परमसुन्दर वेष व उत्सव करण्याची वेळ आहे. भलत्यांच वेळी भलतेच कृत्य करणे चांगले नाही. रामाला राज्याभिषेक होणार म्हणून मंगलोत्सव व मंगल वेष करण्याची ही परम मंगलकारक वेळ आहे असे राजाला मनात वाटत आहे. राजाच्या मनातील भाव राणीला कळला नाही असे नाही. मुद्दाम कपटाने अज्ञानाचे सोंग घेऊन, चालू असलेला मंगलोत्सव बंद पाडण्यासाठीच तिचा प्रयत्न चालू असल्याने तिला कुवेष करण्यास हीच वेळ सुवेळ वाटत आहे. अशा मंगलसमयी प्रियतम राणीने अमंगल वेष केलेला

पाहून राजाला विशेष व्यथा होत आहे. रामशपथ घेतल्याशिवाय मागू नकोस व एकाएकी विश्वास ठेवू नकोस असे कपटप्रवीण तिच्या गुरुने पढवून ठेवले होते. त्याप्रमाणे राजाने रामशपथ तर घेतली व इच्छा असेल ते माग असेही सांगितले. आता मर्मस्थान सापडल्यासारखेच आहे हे जाणून ती आता बोलू लागेल; पण विहसून भूषणे अंगावर घालून माग असे राजाने सांगितले असल्याने अगदी आज्ञाधारक सेवकाप्रमाणे ती या गोष्टी क्रमाने करणार आहे.

**हिं.दो.** ***। यह सुनि मन गुनि सपथ बड़ि बिहँसि उठी मतिमंद ॥***
***॥ भूषन सजति बिलोकि मृगु मनहुँ किरातिनि फंद ॥२६॥***

**म.दो.** ***। परिसुनि, चिंतुनि शपथ अति हसुनि उठे मतिहीन ॥***
***॥ सजि भूषण बघुनी मृगा पाश जणूं भिल्लीण ॥२६॥***

**अर्थ :** राजाचे भाषण ऐकून व फार मोठी शपथ घेतली हा विचार करून, मोठ्याने (अति) हसून ती हीन बुद्धि (मंदमति) उठली; व मृगाला पाहून भिल्लीणीने जणू पाश (फंद) सावरावे तशी ती भूषणे अंगावर घालू लागली.।।दो.२६।।

**टीका. दो. -** (१) **विहसुनि घे इच्छित तें मागुनि । गात्रिं मनोहर भूषण घालुनि'** असे राजाने सांगितले आहे. त्या प्रमाणे विहसणे, अंगावर भूषणे घालणे व इच्छित मागणे असा क्रम ठरला. पहिल्या दोन गोष्टी सांगितल्या प्रमाणे केल्या हे येथे दोहयांत आधी सांगितले व नंतर असे करण्यातील तिचा हेतु उत्प्रेक्षेने सांगितला. (क) आपण शृंगारलीला करीत आहोत अशी राजाची झालेली समजूत टिकून राहावी व पाहिजे ते मागून घे या शपथपूर्वक वचनाला काही अटी जोडल्या जाऊ नयेत म्हणून राणीसुद्धा कपटाने शृंगारलीलांचे नाटक आता करीत आहे. (ख) **चिंतुनि शपथ अति - 'राम शपथ शत मजसी'** असे राजा म्हणाला. रामाची शपथ दशरथाने घेणे अत्यंत महत्त्वाचे आहे. ही शपथ प्राण गेला तरी राजा मोडणार नाही; कारण राजाला राम प्राणांपेक्षा प्रिय आहेत व शपथभंग केल्यास रामाचे अनिष्ट होईल या भयाने राजा वचनभंग करणार नाही असे चिंतन-विचार-मनाशी करून ती खदखदा हसली. (अति हसुनि). एखाद्याला घाबरवून टाकल्यावर आपण ती थट्टा केली होती असे

भासविण्यासाठी एकदम मोठ्याने खदखदा हसावे त्याप्रमाणे राजाच्या इच्छेप्रमाणे प्रथम मोठ्याने हसली. राजाला वाटले असेल की हिचा राग गेला व ही खरोखरच प्रसन्न झाली. (ग) **मतिहीन** - मतिमंद म्हणण्याचे कारण की या आपल्या कपटाने राणी इतरांपेक्षा स्वतःचेच अत्यंत अकल्याण, अमंगल करून घेणार आहे. पण तिला भ्रमाने वाटत आहे की शत्रूंना यथायोग्य शासन करून मी परमसुखाच्या सिंहासनावर बसणार आहे. नंतर ती उठून उभी राहिली.

(२) **दुसरी आज्ञा** - विनंति - होती की फेकून दिलेली भूषणे घाल व कुवेष टाकून दे. त्याप्रमाणे तिने आधी सुवेष केला. पूर्वीची सोडून ठेवलेली वस्त्रेच नेसली. जी वस्त्रे नेसून ती पडली होती ती अमंगल-दूषणास्पद वस्त्रे होती. म्हणून चांगली वस्त्रे नेसली असे मानणे भाग आहे. आधी सुंदर वस्त्रे व मग सुंदर अलंकार घालतात. त्या प्रमाणे अस्ताव्यस्त पडलेले अलंकार ती घालू लागली. बहुधा राजानेच ते अलंकार गोळा करून क्रमशः तिला आणून दिले असतील, म्हणूनच कवि म्हणतात की - (क) **सजि बधुनी मृगा पाश जणूं भिल्लीण - 'घडि घडि सादर तिला विचारित । शबरीगानिं मृगी जणुं मोहित'** (१७।१) असे पूर्वी कैकयी-कुबडी यांच्या विषयी म्हटले आहे. राजाने वारंवार विचारले आहेच. आता राजा जणू मृग बनून कैकयी-शबरीच्या-भिल्लीणीच्या कपट पाशात बांधला जात आहे. कैकयीचे अति हसणे व वस्त्रे-भूषणे मनोहर गात्रीं घालणे भिल्लीणीने मृगाला पाशबद्ध करण्यासारखे आहे. कैकयी स्वतः कुबडी-शबरीच्या कपटपाशात सापडून शबरी बनली व राजा दशरथ स्वतः येऊन मोहाने तिच्या कपटपाशात सापडला. पण पाश अद्याप आवळले नसल्याने त्याला अजून तसे वाटत नाही. आपला विश्वासघात केला हे दशरथाच्या लक्षात येण्यास फार वेळ लागणार आहे. राजा पुल्लींगी शब्द आहे म्हणून मृग म्हटले. मृग शब्दाने सुचविले की मोहाने, न कळत, पाशांत पकडले जात आहेत. राजासारखा सुविचार केला असता तर पुढील दुर्धर प्रसंग ओढवला नसता. मृगासारखे अविचाराने वागत आहेत म्हणून पाशांत पकडले जात आहेत. कुबडी किरातिनी-भिल्लीणीच्या संगतीने कैकयी किरातिनी-शबरी-भिल्लीण बनली व येथे तिला मिळालेली ही पदवी राम अयोध्येतून वनात

जाईपर्यंत कायम राहणार आहे. भिल्लीणीचे जेवढे विघातक धंदे आहेत त्या सगळ्यांचा उल्लेख या प्रकरणांत केलेला आढळेल. **'किरात स्वभाव'** प्र. प्र. १५।४ पहा. **(ख) ल.ठे. 'शबरीगानि मृगी जणुं मोहित'** (१७।१) अशी मृगी प्रथम कैकयी बनली. तिने शबरी बनून आता राजाला मृग बनविला. राजा मृग बनल्यावर बाकीच्या राण्या मृगी न बनल्या तरच नवल. **'श्रुनि मृगी जणुं केसरीनादा'** (५४।३) अशी भयभीत मृगी कौसल्या बनणार आहे. 'मृगी जणूं दव चहुं दिशिं निरखुनि' (७३।६) अशी सुमित्रा घाबरून गेलेली मृगी होणार आहे ! (ग.) **वा.रा. या प्रसंगी काय म्हणते पहा - वाङ्मात्रेण तदा राजा कैकेय्या स्ववशे कृतः । प्रचरकन्द विनाशाय पाशं मृग इवात्मनः'** (११।२२) यांत विहसणे, वस्त्राभूषणांनी शरीर सजविणे व भिल्लीण यांचा उल्लेख नाही. केवळ वचनांच्या योगाने कैकयीला वश झालेला राजा स्वतःच्या विनाशार्थ मृगासारखा पाशांत सापडला. येथे मानसांत कैकयी अजून काहीच बोलली नाही. अधिक सुंदर काव्य, भावना व नाट्य कशात आहे ते वाचकांनीच ठरवावे. राजाला वाटले की आपली प्रिया आता प्रसन्न झाली आहे. ती एवढ्या अट्टाहासाने व क्रोधाचे नाटक करून जे मागणार ते तर मी आधीच करण्याचे ठरविले आहे. तिला परम प्रिय असा तो समाचार सांगितला की ती फारच प्रसन्न होईल. मानसातल्या सारखे भावचित्रण व चरित्र चित्रण वा.रा. किंवा इतर रामायणे यांत कोठेच नाही. प्रत्येक ठिकाणी तुलना करून दाखविण्यास टीकेचा विस्तार आड येत आहे. दशरथ सहज सरळ स्वभावाने सांगतात -

**हिं.** *। पुनि कह राउ सुहृद जियँ जानी । प्रेम पुलकि मृदु मंजुल बानी ॥१॥*
*। भामिनि भयउ तोर मन भावा । घर घर नगर अनंद बधावा ॥२॥*
*। रामहि देउँ कालि जुबराजू । सजहि सुलोचनि मंगल साजू ॥३॥*

**म.** *। मग राजा मनिं सुहृद चि मानुनि । मंजु मृदु वदे प्रेमें पुलकुनि ॥१॥*
*॥ भामिनि ! तूं इच्छिसि तें झालें । नगरिं घरोघर उत्सव चाले ॥२॥*
*। उद्यां करूं रामा युवराजा । सज किं सुलोचनि ! मंगल-साजा ॥३॥*

**अर्थ :** तेव्हा मग राजाने आपल्या मनात तिला सुहृदच मानली आणि मृदु मंजुल वाणीने, प्रेमाने रोमांचित होऊन, म्हणाले - ॥१॥ भामिनी ! तुला जे

मनापासून पाहिजे होते तेच झाले (असे समज) नगरात, घरोघर (त्या प्रीत्यर्थ) उत्सव (सुद्धा) चालू आहे.॥२॥ उद्या रामचंद्राला युवराज करणार (यौवराज्य देणार) तरी हे सुलोचनी ! (सुंदरी) तू (सुद्धा) आता मंगलसाज सजवू लाग (पाहू)॥३॥

**टीका. चौ. १ - (१) मग राजा मनिं सुहृद चि मानुनि** - राजाच्या इच्छेप्रमाणे ती चांगली हसली. चांगली वस्त्रे व अलंकार घालून प्रसन्न दिसू लागली, तेव्हा राजाला वाटले की ही खरोखरच प्रसन्न झाली आहे; परंतु राजाचा विश्वासघात करण्यासाठी तिने सुहृदाचे सोंग घेतले आहे हे राजाला समजले नाही.

**चौ. २ - (१) भामिनि तूं इच्छिसि तें झालें** - यावरून सिद्ध झाले की कैकयीने केव्हा तरी राजास गळ घातली असावी की रामचंद्र आता मोठे, कर्ते, योग्य झाले आहेत. तरी त्यांस युवराज करून आपण आता विश्रांती घ्यावी. किती दिवस हा राज्यभार शिरावर घ्यायचा. आपल्या दोघांच्या डोळ्यांदेखत हा उत्सव व्हावा अशी माझी फार फार इच्छा आहे. 'विहसुनि ये इच्छित तें मागुनि' असे नुकतेच म्हटले व आता लगेच म्हणाले की 'भामिनी, तू इच्छिसि ते झाले', म्हणजेच तिची प्रबळ इच्छा काय होती हे राजाला माहीत होते. जर माहीत असते की हिचा विरोध आहे किंवा विरोधाची थोडी शंका आली असती तर राजाने इतक्या विनवण्या केल्याच नसत्या व रामशपथही घेतली नसती. झाले = झाल्यासारखेच आहे. कारण (क) **नगरिं घरोघर उत्सव चाले**- तुला कळले नसल्याने तुझ्या या महालातच फक्त उत्सव, आनंद, दिसला नाही. आता ती आनंदाची बातमी मीच तुला सांगतो. तुला कळली म्हणजे तू मलाच उत्तम बक्षीस देशील.

**चौ. ३ - (१) उद्यां करूं रामा युवराजा** - रामाला युवराज करण्यास आता मुळीच विलंब नाही. एवढी रात्रच काय ती मधे आहे. उद्याच तो मंगल समारंभ करण्याचे ठरले आहे. तुझी लालसा होती की शक्य तितक्या लवकर हा सोहळा करावा. आज सहज पंचांग पाहिले ते उद्याचाच दिवस उत्तम आहे. तेव्हा गुरु महाराज व सचिव यांची संमती घेतली व उद्याचाच मुहूर्त

ठरवला. वाटले की तुझी लालसा एकदा पूर्ण केली की मिळवले. सर्व तयारी झालेली पाहिली व प्रथम तुला सांगण्यासाठी तुझ्याकडे आलो. तू अगदी अलीकडेच ती इच्छा प्रगट केलीस. दोन-चार दिवसच झाले असतील. ताबडतोब केले नाही तुझ्या मनासारखे म्हणून इतकं का रूसायचे. बरं मला आठवणच नव्हती. आज झाली एकाएकी आठवण. दिवसही चांगला व उद्याचाच सापडला. सर्व तयारीसुद्धा झाली. आज आठवण झाली व तुझ्या अगदी मनासारखे उद्याच करायचे ठरले इ.इ. राजा म्हणाला. कुसंगतीने 'विनाशकाले विपरीत बुद्धि' झाल्यावर हे गोड शब्द तिला कसे कळणार? (क) **सज किं सुलोचनि मंगल साजा** - आता तू सुद्धा यौवराज्याभिषेकोत्सवासाठी हा तुझा महाल मंगलवस्तूंनी सजव पाहू. पण 'युक्तचि दुर्भाग्यें तिज वच दुःखद हें पहा कसें गमलें ॥ -

हिं. *। दलकि उठेउ सुनि हृदय कठोरू । जनु छुइ गयउ पाक बरतोरू ॥४॥*
*। ऐसिउ पीर बिहसि तेहिं गोई । चोर नारि जिमि प्रगटि न रोई ॥५॥*

म. *। हृदय कठोर परिसुनी भंगत । पक्व केसतुडा धक्का लागत ॥४॥*
*। विहसुनि लपवी अशिहि तिडिक ते । चोरनारि जशि उघड न रडते ॥५॥*

**अर्थ :** हे ऐकून तिचे कठोर हृदय असे फाटले (भंगले) की जणू पिकलेल्या केसतुडालाच कोणी धक्का लावला.॥४॥ चोर नारी जशी उघड उघड रडत नाही त्याप्रमाणेच अशी तिडीक सुद्धा तिने मोठ्याने हसून (विहसुनि) लपविली.॥४॥

**टीका. - चौ. ४ - (१) केसतुड** = केसतुड. अंगावरील केसांना विशेष ताण बसून तुटल्याने होणारे एक प्रकारचे गळू. हे प्रथम फार कठीण असते. फार कळा येतात. अतिशय दुखते व जर त्याला कशाचा स्पर्श झाला, धक्का बसला तरी हृदयात अत्यंत कळा येतात. हृदय फुटणार की काय असे वाटते. (बरतोर-बरतोरू = केसतुड) (क) कुबडीने आपल्या कपटाने चोकून चोकून एक केसतुड उत्पन्न केले आहे. राम राज्याभिषेक होणार हे जणू केसतुड कैकयीला झाले आहे. त्याने क्लेश होत होतेच. त्यात उद्याच रामराज्याभिषेक होणार, मंगळसाज सजव. तुझ्या मनासारखे झाले. इत्यादी दशरथ म्हणाले हा

त्या पिकत आलेल्या केसतुडाला जोरांचा धक्काच जणू दिला गेला. (ख) याने कैकयीच्या कठोर बनलेल्या हृदयाला अशी पीडा झाली. अशी तिडीक उठली की आता हृदय फाटून त्याचे तुकडे होणार असे वाटले. तरी सुद्धा -

चौ. ५ - (१) **बिहसुनि लपवी अशिहि तिडिक ते** - इतके असह्य दुःख झाले तरी तिने मोठ्याने हसून ती असह्य पीडासुद्धा लपवून ठेवली. (**क**) **चोर नारि जशि उघड न रडते** - चोर नारी = चोराची स्त्री, चोरी करणारी स्त्री किंवा व्यभिचारिणी - जारिणी. यांतील पहिला अर्थ घेणे योग्य नाही. कारण की त्यामुळे दशरथ राजा चोर ठरेल. असा आरोप दशरथावर करण्यास मुळीच जागा नाही. दुसरा अर्थच चांगला आहे. कुबडीशी गुप्त खलबत केले ही चोरी केली. चोरी करताना हृदयावर घाव लागावा त्या प्रमाणे भरताला बंदिवास व स्वतःस कौसल्येचे दास्य करावे लागणार हे दोन असह्य घाव त्या चोरीत लागले आहेत. त्या घावांवर पुन्हा धक्का घरी आल्यावर लागला की असह्य कळा येतात. त्या वेळी चोरटी स्त्री जर रडू लागेल तर आजूबाजूची मंडळी कारण विचारतील व चोरी केल्याचे बाहेर पडेल. चोरीचा माल हातचा जाईल व शिक्षा होईल हे जाणून ती चोरटी स्त्री जशी उघड उघड रडत नाही तशीच कैकयीने सर्व पीडा सोसली. मुखावर दुःखाचे चिन्हसुद्धा उमटू नये म्हणून मोठ्याने हसली. राजाला शंका आली तर सर्व डाव फसेल व शिक्षाही भोगावी लागेल हे ती जाणून आहे. राजाने आपल्याला साव मानावी व विश्वास उडू नये म्हणून हे कपट नाटक केले. (**ख**) **जारिणी** हा अर्थ घेतल्यास अर्थ होतो तो - पतीला कळू न देता चोरून व्यभिचार कर्म करणाऱ्या स्त्रीला जरी कळले की आपला जार मेला किंवा फार आजारी आहे तरी ती पतीच्या समोर आपले सर्व दुःख, सर्व शोक दाबून टाकून, लपवून ठेऊन हसते-खिदळते व जणू काहीच झाले नाही असे वरवर दाखवते त्याप्रमाणेच कैकयीने आपली सर्व हृदय व्यथा लपविली व पती अनुकूल असल्याचे प्रदर्शन प्रसन्नतेच्या हास्याने केले. **पतीला जे आवडत नाही ते चोरून करणे व पतीचा विश्वासघात करण्याचा प्रयत्न कपटाने करणे हा एक प्रकारचा व्यभिचारच आहे**. या व मागील अर्थात विशेष फरक नाही. म्हणून चोरटी स्त्री

हाच अर्थ घ्यावा. गोस्वामींचे कोमल, शुद्ध हृदय भरतजननीला जारिणीची उपमा देईल असे मानण्यास ही बुद्धि धजत नाही. हृदय अत्यंत कठोर, कुटील, कपटी, निर्दय असल्याशिवाय दोन विरोधी भावना हास्य व शोक, हास्य व क्लेश एकत्र असत नाहीत.

हिं. *। लखहिं न भूप कपट चतुराई । कोटि कुटिल मनि गुरू पढ़ाई ॥६॥*
*। जद्यपि नीतिनिपुन नरनाहू । नारिचरित जलनिधि अवगाहू ॥७॥*
*। कपट सनेहु बढ़ाइ बहोरी । बोली बिहसि नयन मुहु मोरी ॥८॥*

म. *। नृपा कपट-चतुराइ न कळली । कोटि-कुटिल-मणि-गुरु-पढविली ॥६॥*
*। जरि नरेश अति नीति-निपुणची । नारिचरित्र अगाधचि जलधी ॥७॥*
*। मग वर कपटी स्नेह वाढवुनि । विहसुनि वदे नयन-मुख मुरडुनि ॥८॥*

**अर्थ :** (राणीला) कोटि-कुटिल-शिरोमणि असलेल्या गुरुने पढविली असल्याने भूपतीला तिचे कपट-चातुर्य कळले नाही.॥६॥ नरेश (नरनाहू) दशरथ जरी नीतिनिपुण बुद्धिमान आहेत तरी नारीचरित्र हा अगाध सागर आहे.॥७॥ मग वरवर कपटी स्नेह वाढवून मुख व डोळे मुरडित मोठ्याने हसून ती म्हणाली.॥८॥

**टीका. चौ. ६** - येथपर्यंत दिसून आले असेल की कुबडीच्या संगतीने कैकयीवर जे जे दुष्परिणाम झाले ते ते क्रमशः दशरथ सम्राटावर होत आहेत. कैकयी शबरीगान मोहित मृगी बनली तसे दशरथ या शबरीच्या हावभावांनी मोहित मृग बनले. राणीला कुबडीची कपटचतुराई कळली नाही.(२२।२) तशीच राजाला राणीची कपट चतुराई ओळखता आली नाही. **'कळे न राणिस निकट घात तो । बलिपशु भक्षी हरित घास तों ।** (२२।२) असेच राजाचे होत आहे. राणीचे हावभाव व कपटी स्नेह त्या हरित घासासारखे आहेत. त्यांवर कामलालसेने लुब्ध झाल्यामुळेच राणीच्या बाह्य चातुर्यात व स्नेहात लपविलेली कपट सुरी दिसली नाही. **'लावि उपलिं उरिं कपटसुरीला'** (२२।१) हे हावभाव, हे कामविलास त्या कपट सुरीसारखे फळतील हे सुचविले आहे, असे का झाले?

(१) राणीच्या मनात असे ठाम बिंबविले आहे की राजा अत्यंत कपट चतुराईने तिच्याशी वागत आहे. **'नेणां भूप-कपट चातुर्या'** (१४।६). दशरथ स्वाभाविक स्नेहाची मूर्तीच असल्याने सरळ, निष्कपट बुद्धीने बोलत आहेत

तरी तिला वाटत आहे की राजा कपट करीत आहे. आणि राणी कपटनाटक करीत असून राजाला ते स्वाभाविक भामिनीविलास वाटत आहेत. 'चतुर कपट सरलां ना कळते' असे राणीला पक्के पढविलेले आहे. (क) **कोटिकुटिलमनि-गुरु-पढविली** - कोटि कुटिल कपटी लोकांचे शिरोभूषण शोभणारी जी कुबडी ती राणीची गुरु आहे. अशा उत्तम गुरुने पढविलेली राणीसुद्धा कोटिकुटिल शिरोमणिच झाली आहे. 'आपणांसारिखे करिती तात्काळ । नाहीं काळवेळ तयांलागी ।।' हे दुर्जनांच्या बाबतीतसुद्धा बहुधा खरे ठरते. दशरथ सरळ निष्कपट असून कामवश झाले असल्याने त्यांस राणीचे कपट ओळखता आले नाही. वास्तविक पाहता ज्यांनी हजारो वर्षे साम्राज्य शासन केले त्यांस हे कपट सहज कळावयास पाहिजे होते. कारण की दशरथाचे शत्रूसुद्धा रामराज्याभिषेक समाचार कळताच हर्षित झाले व त्या मंगलोत्सवांत दंग झाले. पण पुत्रापेक्षा रामावर अधिक प्रेम करणारी राणी विधवांस योग्य असा वेष करून कोपभवनात जमिनीवर लोळत पडली आहे हे पाहूनच शंका येणे जरूर होते. पण काममोहित झालेल्या स्त्रीजित पुरुषांस ते कसे कळणार? **'प्रबल प्रताप कामाचा पाहुनि'**. जो सम्राट आपल्या साम्राज्यातील कोनाकोपऱ्यातल्या नृपांचे कपट जाणण्यास समर्थ होता - आहे - त्यालाच आपल्या घरातल्याच एका स्त्रीचे कपट कळू नये हे महदाश्चर्य आहे. परंतु नारीविजित नरांना त्या नारीचे कपट कळणे शक्य नसते हे चोरनारीच्या दृष्टान्ताने आधीच सुचविले आहे. 'यां चिंतयामि सततं मयि सा विरक्ता' हे कळण्यास भर्तृहरि राजाला कितीतरी काळ लागलाच ! म्हणूनच कवि म्हणतात -

**चौ. ७. (१) नारिचरित्र अगाध चि जलधी** - स्त्रियांच्या चरित्राचा ठाव लागणे शक्य नाही. दशरथासारख्या राजनीतिनिपुण सम्राटालासुद्धा स्त्रीचरित्राचा अंत लागला नाही. तेथे इतरांची कथा ती काय? **'स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं देवो न जानाति कुतो मनुष्यः'** (सुभाषित) कामीजनांची दीनता दाखवीत असता रघुनाथ सुद्धा म्हणतात की **'राखा स्त्री हृदयामधि जरि ही । युवती शास्त्र नृपति वश नाही'** (३।३७।९). स्त्रिया आज अत्यंत अनुकूल दिसत असल्या तरी केव्हा विश्वासघात करतील याचा नेम नसतो. म्हणून पुरुषाने स्त्रियांच्या

कह्यात जाऊ नये, स्त्रीजित होऊ नये; पण कामी पुरुषांना हे शक्य नसते.

**चौ.** ८ - (१) कामी, भोळ्या, परमस्नेही राजाला वरवर प्रेमाची वृद्धि झालेली दाखविली म्हणजे त्याचा अधिकाधिक विश्वास वाढेल व आपल्या मनातील दुष्ट भावना त्याला कळणार नाही म्हणून एखाद्या प्रेमळ नायिकेप्रमाणे शृंगाररसाचे हावभाव दाखवू लागली. येथेसुद्धा विहसणे आहेच. नुसते नसून डोळा मारीत, लज्जेने, मुख मुरडीत हे प्रणयनाट्य ती कपटाने करीत आहे. मनात मात्र योग्य संधीची वाट पहात आहे, की कामपाशात पक्का करकचून बांधू व मग आपले खरे स्वरूप प्रगट करू. **स्त्रियांचे हावभावयुक्त प्रेमपूर्ण हास्य हे पुरुषांना आंधळे, मूर्ख, आत्मघातकी बनविण्याचे एक प्रभावी साधन आहे.** त्यात राजाला ते फार रुचत आहे. त्याची आज्ञा आहे मग कमी का? प्रत्येक वेळी बोलताना डाव साधेपर्यंत ती विहसणार आहे. **'ज्यां रक्षिति रघुवीर ते बचले त्या अवसरी'** (१।८५) अशा कामपाशातून सुटण्यास दुसरा आधार नाही. परंतु या वेळी रघुवीराचीच इच्छा वनात जाण्याची असल्याने दशरथास या सापळ्यातून कोण सोडविणार ! हे आहे आधिदैविक रहस्य !

*हिं.दो.* *। मागु मागु पै कहहु पिय कबहुँ न देहु न लेहु ॥*
*॥ देन कहेहु बरदान दुइ तेउ पावत संदेहु ॥२७॥*

*म.दो.* *। माग माग मज म्हणां प्रिय ! दिलें घेतलें कांहिं ॥*
*॥ दिधलें जे वरदान युग तेंच मिळेल किं नाहिं ॥२७॥*

**अर्थ** : प्रिया ! माग माग असे मला सांगता पण कधी दिलेत व मी कधी घेतले? (दिले नाही व घेतले नाही) दोन वर दान दिलेले आहेत ते तरी मिळतील की नाही कोणास ठाऊक ! (संदेहच वाटतो).।।दो.२७।।

**टीका. दो. (१) माग माग म्हणां** - नेहमी असेच माग माग म्हणता व वेळ मारून नेता नी आपले काम साधता. देण्याची इच्छाच नसते. कामसाधु आहात झाले. देण्याची गोष्टच कधी काढायची नाही नी अघळ पघळ माग माग म्हणायचे असते नेहमीच. कारण तुम्ही जाणता की ही कधी मागणार नाही. जो कधी काही मागत नाही व घेत नाही अशा संन्याशाला सर्वस्व देतो असे सांगून फुकटचे औदार्य दाखविण्यास काहीच हरकत नसते. प्रत्यक्ष उदाहरणच

पहा. दोन वर दान दिलेत त्याला किती किती वर्षे झाली; पण कधी गोष्ट तरी काढली का आपण की ते दोन वर आता तरी घे मागून, अशी. पूर्वी कबूल केलेलेच अजून दिले नाहीत आणि म्हणायचे की नवे वाटेल ते माग. भाव हा की आपल्या बोलण्यात बोलणे उरले नाही तेव्हा विश्वास माझ्यासारख्या भोळीने, कसा ठेवावा हाच प्रश्न आहे. या अनुभवामुळे असा संशय वाटतो की आपण कबूल कराल वाटेल ते; पण गोड गोड शब्दांनी मला भोळीला भुलवून देणार नाही काही सुद्धा. या सर्व नाट्यात हेतु हा आहे की राजाने पुन्हा दृढ प्रतिज्ञा करून म्हणावे की, घे ते दोन्ही वर मागून आता देतो. एवढ्यासाठी गोड गोड शृंगारिक भाषेत, शृंगारचेष्टा करीत टाकलेला हा गळफास आहे. ती जाणते की या दिखाऊ, कोमल पाशात हा मृग आपली मान अगदी आनंदाने अडकवणार. (क) शिवाय काय मागायचे ते तिच्या मनाने अगदी निश्चित केले असल्याने संशय वाटतोच आहे की दुसरा वर मिळणे कठीण आहे. प्राण गेला, अकीर्ति झाली तरी रामाला वनवास देणार नाहीत. म्हणून खुंटा हालवून बळकट करीत आहे. (४५|१-२, ७९|३-८ पहा) या संदेहाची प्रतीति पुढे त्या चौपायांत येते. पण ती काही कच्च्या गुरुची शिष्यीण नाही.

हिं. *। जानेउँ मरमु राउ हँसि कहई । तुम्हहि कोहाब परम प्रिय अहई ॥१॥*
*। थाती राखि न मागिहु काऊ । बिसरि गयउ मोहि भोर सुभाऊ ॥२॥*
*। झूठेहुँ हमहि दोष जनि देहू । दुइ कै चारि मागि मकु लेहू ॥३॥*
*। रघुकुल रीति सदा चलि आई । प्रान जाहुँ बरु बचन न जाई ॥४॥*

म. *। कळे मर्म नृप सस्मितं सांगे । रुसणें भारी प्रिय तुजला गे ! ॥१॥*
*। मागितली कधिं ठेव किं ठेउनि? । मी स्वभाव भोळा गत विसरुनि ॥२॥*
*। मिथ्या दोष अम्हां ना द्यावे । दोन च कां चार हि मागावे ॥३॥*
*। रघुकुल-रीतिस कदा खंड ना । जावो प्राणहि वचन-भंग ना ॥४॥*

**अर्थ :** राजा हसून म्हणाला की कळले, सगळे मर्म मला कळले. अगं ! तुला रुसणे फारच प्रिय आहे.॥१॥ तुम्ही ठेव ठेवून कधी मागितलीत का? (मुळीच नाही) माझा पडला (विसर) भोळा स्वभाव त्यामुळे विसरच पडला.॥२॥ आम्हाला (विनाकारण) खोटे दोष मात्र देऊ नका (हं). दोनच कां चार (वर)

मागा हवे तर ॥३॥ प्राण गेला तरी चालेल पण वचनभंग (प्रतिज्ञाभंग) होणार नाही या रघुकुलाच्या रीतीला कधी खंड पडला नाही.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) नृप सस्मित सांगे** - राणी विशेष हसली तर राजाही हसत हसतच उत्तर देत आहे. अजूनही राजाला कैकयीच्या कपटाचा पत्ता लागला नाही. हे हसत केलेल्या विनोदी भाषणावरून स्पष्ट दिसते. **(क) कळे मर्म** - मर्म समजले असे राजा म्हणाला पण त्याला ते मुळीच समजले नाही. राणीला मात्र समजले आहे की हा मृग आता सहज पाशात अडकत आहे. आपले कपट स्नेहाचे नाटक असेच चालवले पाहिजे. **(ख) रुसणें भारी प्रिय तुजला** - राजाचा भाव हा आहे की मत्त हत्तीप्रमाणे विनवण्या करवून घेऊन भक्ष्य खायचे. मानिनी आहेस तू. रागाचे सोंग आणून मला विनंत्या करावयास लावायचा हे तुला फार आवडते.

(२) **ल.ठे.** मागील दोह्यापर्यंत कवि दशरथांबद्दल बहुवचन वापरीत आले. पण येथे 'कहई' हे एकवचन वापरले. **'कहहीं' हे बहुवचनाचे** रूप आहे. **'लखहिं न भूप कपट चतुराई'** **(क)** आतापर्यंत दशरथ स्वतःविषयी मोह, मोहि असे एकवचनच वापरीत आले; पण दोष देण्याचा व रघुकुल रीतीचा संबंध येताच 'हमहि' 'अम्हां' असे बहुवचन वापरतील. राजाबद्दल एकवचन वापरून कवींनी सुचविले की राजाच्या या भोळेपणामुळे व स्त्रैणस्वभावामुळे वाचकांचा दशरथांविषयीचा आदर कमी होणार. एका स्त्रीवर मोहित होऊन सर्वांना दुःखी केल्याबद्दल लोक राजाचा अनादर करतील. पुढे मध्येच बहुवचन वापरून सुचविले आहे की काही लोक राजाला उलट अधिक आदर देतील. हे पुढे घडलेले दिसेलच.

**चौ.२ - (१) मागितली कधिं ठेव किं ठेउनि** - दोन वर ठेवल्याबद्दल कुबडीने राणीला आठवण दिली आहे. तेच राजाने सांगितले. ठेव ठेवलेली वस्तू ठेवणाराने मागून घ्यावयाची असते. ज्याच्याकडे ठेवली त्याने नेऊन द्यावयाची नसते. तूच आपली ठेव मागितली नाहीस आणि तुला संदेह वाटतो हे अयोग्य आहे. केव्हातरी मागितल्यावर कालक्षेप केला असता किंवा वायदे दिले असते तरच संशय वाटणे योग्य झाले असते. तुलाच आठवण झाली नाही तर मला

कशी होणार? त्यातून माझा स्वभाव आहे विसरभोळा. तेव्हा वर दिले नाहीत हा काही आमचा दोष नाही. आपणच चूक करून दुसऱ्यांस दोष देणे बरे नाही. राणीने दोषारोप केला असे वाटताच कुळाभिमानाने उचल खाल्ली हे पुढल्या चौपाईतील बहुवचनाने दिसते. या कुळाभिमानाने दशरथ जे बोलणार आहेत तेच त्यांच्या नाशाचे कारण होणार आहे. मनुष्य स्वभावाचे चांगले ज्ञान असलेले कुशल वकील असेच अभिमानाला डिवचणारे, व क्रोध आणण्यास कारण होणारे प्रश्न उलट तपासणीत विचारतात व तो जबानी देणारा रागाच्या व आवेशाच्या भरात काहीतरी घटकन बोलून जातो व तोंडघशी पडतो. तसेच येथे कैकयीने जाणून-बुजून केले. असा मिथ्या भाषणाचा आरोप केला की राजा आणखी जोराने प्रतिज्ञा करील व मग मागण्याची योग्य संधी सापडेल हे ती जाणते.

**चौ.३ - (१) मिथ्या दोष अम्हां ना दावे** - येथे 'अम्हां' 'हमहि' हे बहुवचन वापरले. भाव हा की हा आरोप माझ्यावर केला म्हणजे तो कुळावरच केला असे ठरेल. रघुवंशी मिथ्याभाषी असतो असा त्याचा अर्थ होईल. कैकयीचे शब्द राजाला थोडे बोचले. त्या बरोबर रघुवंशी रक्त थोडे उसळले. **(क) दोनच कां चार हि मागावे** - वर दिले गेले नाहीत हा आमचा दोष नाही. तो दोष तुझा आहे. काही ठेव व्याजी असते तर काही बिनव्याजीही असते. ही ठेव व्याजी होती असे मानले तरी व्याजमुद्दल मिळून दामदुपटीपेक्षा कोणी जास्त देत नाही. दोनची दुप्पट चार म्हणून म्हणाले की व्याज पूर्वी ठरलेले नसूनही घ्यायचेच असेल तर चार वर माग. आम्ही काही दिवाळखोर नाही किंवा परधनाची अभिलाषा करणारे आम्ही नाहीत. आमच्यावर वचनभंगाचा आरोप मात्र करू नका. कारण -

**चौ. ४ - (१)** रघुकुलाची रीती अखंड चालत आली आहे की प्राण गेला तरी चालेल पण दिलेले वचन मोडावयाचे नाही. रघुकुळातील कोणाही पुरुषाने वचनभंग-प्रतिज्ञाभंग केलेला नाही. प्राण देतील पण प्रतिज्ञाभंग करणार नाहीत हे व्रत रघुकुलांत अखंड चालत आले आहे. या कुलरीति-परंपरेचा भंग करणारा मी आहे, असे तुला वाटले तरी कसे? प्राण देईन वाटल्यास पण वचन मोडणार नाही. कारण मी रघुकुलातला आहे. **कुलरीति मोडणे म्हणजे कुळाला**

**कलंकित करणे आहे.** त्या भुजंगभामिनीने ज्या हेतूने विषारी फुत्कार सोडले तो तिचा हेतु सफल झाला. राजाच्या भोवतालचा गळफास अधिक घट्ट झाला. कुलाभिमानाने भलत्याच वेळी उचल खाल्ली व कुलघातिनीचा डाव साधला. चढलेला आवेश एकदम ओसरत नाही. त्याच आवेशात आणखी कारण सांगतात :

हिं. ***। नहिं असत्य सम पातक पुंजा । गिरि सम होहिं कि कोटिक गुंजा ॥५॥***
***। सत्यमूल सब सुकृत सुहाए । बेद पुरान बिदित मनु गाए ॥६॥***
***। तेहि पर रामसपथ करि आई । सुकृत सनेह अवधि रघुराई ॥७॥***

म. ***। नहि असत्यसम पातक-पुंजा । गिरिसम होती कोटि किं गुंजा ॥५॥***
***। सत्यमूल सब सुकृत शोभती । वेदपुराणिं विदित मनु वदती ॥६॥***
***। त्यांत रामशपथा कृत नाना । स्नेह-सुकृत-सीमा रघुराणा ॥७॥***

अर्थ : एका असत्यासारखा पातकांचा दुसरा पर्वत (= पुंज, पुंजा-पुंजका) नाही; कोट्यवधि गुंजा जमविल्या तरी त्या पर्वतासारख्या होणार आहेत काय? (शक्यच नाही).॥५॥ सत्यमूल असलेलीच सर्व सुकृते शोभतात असे वेदपुराणात प्रसिद्ध आहे व मनु राजानीसुद्धा सांगितले आहे.॥६॥ त्यांतही मी रामाच्या अनेक (नाना) शपथा घेतल्या आहेत आणि राम-रघुराणा सर्व स्नेहाची व सुकृताची सीमा आहेत.॥७॥

**टीका. चौ. ५ - (१) नहि असत्य सम पातकपुंजा** - जगातील सर्व गुंजांचा ढीग केला तरी त्याचे पर्वतासारखे शिखर दिसणार नाही. त्यांना शीग लागणार नाही. त्या दूरवर पसरतील. पण एक असत्य म्हणजे हिमालय पर्वताचे अत्युच्च शिखरच समजावे. इतर सर्व पातके गुंजांसारखी म्हणजे क्षुद्र आहेत. जगातील सर्व गुंजांचे वजन एका लहानशा टेकडीएवढे सुद्धा होणार नाही. तसेच इतर पातके व असत्य यांचे आहे. '**न सत्येन समो धर्मः । न सत्यात् परमं तपः**' '**धर्म न दुसरा जगिं सत्यासम । वानिति वेदपुराणें आगम**' (२।९५।५). असे श्री रघुनाथ म्हणाले आहेत. (क) **महापातकांत असत्याची गणना कां केली नाही?** महापातकांच्यापेक्षाही असत्य फार मोठे पातक असल्याने त्यांच्यात याची गणना कशी करता येईल? असत्याच्या वर्गात बसण्यासारखे दुसरे पापच नाही. फक्त

परनिंदा असत्यापेक्षा मोठे पाप आहे. मनुष्य सत्यनिष्ठ असेल तर हजारो पापे त्याच्यापासून आपोआपच दूर पळतात. सत्य हेच परमात्म्याचे स्वरूप आहे म्हणूनच असत्याची एवढी निंदा. प्रतिज्ञाभंग, वचनभंग करणे म्हणजे आपलेच वचन आपणच असत्य ठरविणे आहे आणि पापाचा हिमालय पर्वत आपल्या उरावर ठेवण्यासारखे आहे.

**चौ. ६ - (१) सत्यमूल सब सुकृत शोभती** - मूळ तुटले की वृक्ष मरून जाण्यास वेळ लागत नाही. **'सुकृत हानि जर पणास परिहरुं । राहो कुमरि कुवारि काय करुं'** (१।२५२।५) असे राजा जनकाने म्हटले आहे. त्याचाच विस्तार येथे आहे. ज्या सुकृताच्या-पुण्याच्या-धर्मकर्माच्या मुळाशी सत्य असेल, जे सत्याधिष्ठित असेल तेच सुकृत शुभ होय. त्यालाच सुकृत म्हणणे शोभेल. असत्यावर उभारलेले, असत्याने **विटाळलेले, सुकृत,** सुकृत नसून सुकृत नामधारी दुष्कृत्य आहे. एका बाजूला एक असत्य असेल व दुसऱ्या बाजूला स्नानसंध्या, दानधर्म, परोपकार इ. अनेकविध पुण्य असले तरी त्या सर्व पुण्याची किंमत शून्य. उलट असत्य मुळीच नाही आणि इतर काहीच सुकृत-पुण्य करीत नाही तरी त्यास सद्‌गती मिळेल. **(क) एकच अपवाद** - उक्ताऽनृतं भवेद्यत्र प्राणिनां प्राण-रक्षणम् ।। अनृतं तत्र सत्यं स्यात् सत्यमप्यनृतं भवेत् ।। (प.पु.मा.पी.) असत्य भाषणाने कोणाचे मरण वाचत असेल तेथे असत्य असत्य नसून सत्यच आहे; आणि सत्य बोलण्याने कोणाची प्राणहानी होणार असेल तर ते सत्य असत्यच आहे. 'स्वर्गोमोक्षः तथा धर्मः सर्वे वाचि प्रतिष्ठिताः ।। यस्तां लोपयते वाचं अशेषं तेन लोपितम् ।। साधूनां निकषं तथा कुलधनं सर्वाश्रयाणां वरम्' सत्यवादीपणा आहे. स्वर्ग, मोक्ष व धर्म इ. सर्व सत्य वाणीवर अवलंबून आहेत. ज्याने सत्यवाणीचा लोप केला त्याने स्वर्गादि सर्वच चांगल्या गोष्टींचा लोप केला. सत्यानेच साधुत्वाची परीक्षा होते. सत्य हेच संतांचे, सज्जनांचे, कुलपरंपरागत धन आहे व सत्याचा आश्रयच सर्व आश्रयांहून श्रेष्ठ आहे. **(ख) पण आज काय दिसते?** - जाता येता, हिंडता फिरता, बोलता बसता माळेचे मणी फिरविणारे व योगाभ्यास करणारे एक गृहस्थ आपल्या त्याच मुखाने म्हणाले की 'स्वामी ! काय करणार ! खोटे बोलल्याशिवाय हल्ली जगणेच

अशक्य आहे.' हा कलिमहिमा आहे. १९१९-१९२० साली एका शिक्षण संस्थेचे संचालक म्हणाले की, 'माझ्या तोंडी शब्दांना काही किंमत नाही.' आज तर निधर्मी राज्य, दारिद्र्याची वृद्धि आणि त्यामुळे असत्याची समृद्धि झालेली दिसतच आहे ! (ग) **मनु वदती** - मनु हे सूर्य वंशांतील पहिले सम्राट होत. त्यांनी जे नियम साम्राज्यात प्रचलित केले तेच पुढे **मनुस्मृति** या नावाने प्रसिद्ध झाले. उपलब्ध असलेल्या सुमारे २८ स्मृतिग्रंथात मनुस्मृति श्रेष्ठ व पहिली आहे. मानवाच्या विविध व्यक्तिधर्माचे व समाजधर्माचे व राजधर्माचे पालन कसे करावे हे त्यात फारच उत्तम प्रकारे सांगितले आहे.

**चौ.७ - (१) त्यात रामशपथा कृत नाना** - रघुकुलरीति चालू ठेवणे हे कर्तव्य म्हणून वरदान नाकारता येत नाही. असत्याचरण करून अत्यंत महान पातक करणे व अपकीर्ती पदरात घेणे शक्य नाही हे दुसरे कारण व 'रामशपथ शत' घेतल्या असल्याने वचनभंग करता येणे हे शक्य नाही. रामशपथ मोडणे म्हणजे सर्व रामस्नेह व सर्व सुकृत यांचा संहार करणे होय. शपथ मोडणे म्हणजे सत्याचा, धर्माचा, स्वर्गाचा, मोक्षाचा वगैरे लोप करणे आहे. या प्रमाणे तीन अत्यंत प्रबल कारणे असता आम्ही वचनभंग करू असा संशय येण्याचे काही कारण नव्हते. (नाना = अनेक).

*हिं.दो. । बात दृढ़ाइ कुमति हँसि बोली । कुमत कुबिहग कुलह जनु खोली ॥८॥*
*। भूप मनोरथ सुभग बनु सुख सुबिहंग समाजु ॥*
*॥ भिल्लिनि जिमि छाड़न चहति बचनु भयंकर बाजु ॥२८॥*

*म.दो. । कुमति हसुनि वच करवुनि गाढी । कुमत कुविहग - टोपि जणुं काढी ॥८॥*
*। भूप-मनोरथ सुभग बन सुख सुविहंग-समाज ॥*
*॥ जशि भिल्लिण सोडूं बघे वचन भयंकर बाज ॥२८॥*

**शब्दार्थ :** कुमति - दुष्टबुद्धि, राणी; गाढ-दृढ, घट्ट, पक्के; कुविहग - दुष्ट पक्षी, ससाणा - बाज श्येन; टोपि (कुलह) टोपी, झांकण; सुभग - सुंदर, पत्रपुष्प - फल पशुपक्षी इत्यादींनी सुशोभित. विहग - विहंगम, पक्षी, विहग = आकाशात गमन करणारा असा धात्वर्थ आहे.

**अर्थ :** राजाचे वचन - प्रतिज्ञा - दृढ करवून दुर्बुद्धि राणीने आपले दुष्ट

मतरूपी दुष्ट पक्ष्याची टोपीच जणू काढली.।।८।। व राजाचे मनोरथरूपी सुंदर वन असून त्यात सुखरूपी सुंदर विहंगांचा समुदाय आहे आणि जशी भिल्लीण ससाण्याला (त्या पक्ष्यांची शिकार करण्यास) सोडते तशी आपले भयंकर वचनरूपी ससाणा (बाज) राणी सोडू पहात आहे.।।दो.२८।।

**टीका. चौ. ८ - (१) बच करखुनि गाढीं** - फलज्योतिष शास्त्रात एखाद्या प्रश्नाचे अचूक, निर्णायक उत्तर देण्यापूर्वी विवेकी कुशल ज्योतिषी पाहतो की तीन सुदृढ आधारांनी एकच गोष्ट निश्चितपणे निर्णीत होते किंवा नाही. तीन आधारांनी, निरनिराळ्या ग्रहयोगांनी, एकच फळ सांगितले जात असेल तर ते घडणारच असे जाणून तो उत्तर देतो. त्या प्रमाणेच आपल्या बोचक संदेहयुक्त वचनांनी कुमतीने राजाला डिवचून तीन आधारांचा उच्चार त्याच्याकडून करविला. आता वचन पक्के-दृढ झाले. बदलू शकणार नाही, असे नक्की ठरल्यावर ती हसली व बोलली. या दोन क्रियांचे वर्णन कवि उत्प्रेक्षा व दृष्टांताने करतात. (क) **कुमत-कुविहग-टोपि जणुं काढी - कुबिहग** = ससाणा. त्याच्या डोळ्यांवर टोपीसारखे झांकण घालून तो गुप्त ठेवलेला असतो. भिल्लीण पक्ष्यांची शिकार करण्यास जाताना ससाणा ठेवलेली करंडी बरोबर नेते. पक्षी समोर टप्प्यात आला, दिसला म्हणजे ती वरचे झाकण काढते आणि त्या ससाण्याला हातात धरून त्या पक्ष्यावर त्या दिशेला सोडते. तो ससाणा = बाज पक्षी एका झडपेत त्या समोरच्या पाखराला पकडून भिल्लीणीजवळ घेऊन येतो. येथे कैकयीचे दुष्ट मत (कुमत) हाच जणू ससाणा आहे. तो तिच्या कु-विह (आकाश) ग = दुष्ट हृदयात होता. करंडीतला ससाणा आकाशात संचार करणाऱ्या पक्ष्यांना जसा दिसत नाही तसे राणीचे दुष्ट मत, (दुष्ट वासना) हावभाव व कपटी स्नेह या झाकणामुळे राजाला दिसले - कळले नाही. आता जे हास्य केले तेच ससाण्यावरील झाकण काढणे आहे. हे हास्य कृतकृत्य होणार असे वाटून केलेले आहे. भाव हा की आता लवकरच तिची दुष्ट वासना ती प्रगट करील. भिल्लीण जसा त्या ससाण्याला हातात घेऊन सोडते त्या प्रमाणे ते कुमत-दुष्ट वासना शब्दांत आणून त्याला शब्दांचे रूप देऊन तो वचनरूपी बाज - ससाणा ती आता पक्ष्यांवर सोडून त्याची शिकार

करविणार. भाव हा की आपले दुष्ट मत शब्दांनी प्रगट करून ती दशरथाला चीत करणार व त्याच्या जवळून पाहिजे ते घेऊन तृप्त होण्याचा प्रयत्न करणार. पकडायचा पक्षी कोणता, कुठे आहे इ. आता सांगतात.

**दो. २८ - (१) भूपमनोरथ सुभग बन** - राजाचा रामराज्याभिषेकाचा मनोरथ हेच सुंदर वन आहे. सुंदर वनांत विहार करणारे अनेक सुंदर पक्षी-विहंग असतात. **(क) सुख सुविहंग समाज** - रामराज्याभिषेकापासून राजाला, कौसल्येला, सुमित्रेला, इतर सर्व राण्यांना, लक्ष्मणाला, सीतेला, परिवाराला, राममित्रांना, प्रजेला व सर्व जगाला मिळणारे सुख हे विविध सुंदर विहंग (सुविहंग) समुदाय आहेत. चांगल्या-मांसाहारी नसलेल्या पक्ष्यांची शिकार करण्यात ससाणा हा दुष्ट पक्षी फार पटाईत असतो. त्याची झेप कधी चुकत नाही. राजाचा सुखरूपी विहंग पकडला म्हणजे इतर सर्वांचे सुख आपोआपच नष्ट होणार आहे. ससाणा पक्षी एका वेळी एकच पक्षी पकडतो पण **(ख) बचन भयंकर बाज** - कैकयीचे वचन हा फार भयंकर बाज ससाणा आहे. तो वर दाखविलेल्या सर्व सुखसुविहंगांची शिकार एकदमच करणार आहे. ससाण्याच्या पंखांचा आवाज ऐकताच व त्याला पाहताच आकाशात आनंदाने विहार करणारे पक्षी (घारी, गिधाडे, करकोचे सोडून) गर्भगळित होऊन जातात. तशीच स्थिती कैकयीच्या भयंकर वचनांच्या श्रवणाने प्रथम राजाची होणार व नंतर ज्याला ज्याला तो समाचार कळेल त्या सर्वांची भरतासुद्धा होणार आहे. राजाची दुर्दशा पाहून प्रथम सुमंत्र घाबरणार, नंतर रामचंद्रास त्यामुळेच दुःख होणार. **'परिसुनी, सकल नारि नर बिकळ' 'कळे जिथे ज्या तो शिर पिटतो'** (४६।७-८) **'सुके घाबरुनि'** (५४।२) अशी कौसल्येची दशा झाली आहे.या प्रमाणे प्रथम दशरथ व नंतर सर्व अयोध्या अत्यंत दुःखी व शोकाकुल होणार.

(२) ससाणा पाखराची मान आपल्या तीक्ष्ण चोचीत धरतो - दोन वरांची मागणी ही त्या भयंकर वचन ससाण्याची चोच आहे. हिने राजाची प्रतिज्ञारूपी मान तो पकडणार व सर्वांचे सुखरूपी सुंदर पक्षी राणीच्या पायांवर प्राण सोडणार. त्यांचे सुख नष्ट होणार. त्या भिल्लीणीला वाटत आहे की सर्व सुख स्वतःस मिळणार. पाखरांना दोन पंख असतात. तसे राम व सीता यांना सिंहासनारूढ

झालेली डोळ्यांनी पाहणे हे सुखविहंगांचे पंख आहेत. राजाची सत्यनिष्ठा व रामशपथ हे त्या ससाण्याचे दोन पंख आहेत. ससाणा भिल्लीणीला सुखद वाटतो. तसे आपले भयंकर वचन सर्व सुख देईल असे या कुमती राणीला वाटत आहे. आता मननास उपयुक्त म्हणून खाली कोष्टक रूपाने तुलना केली आहे.

भिल्लीण ससाणा व पक्ष्यांची शिकार

| | | |
|---|---|---|
| भिल्लीण | १ | कुमति-राणी |
| दुष्ट पक्षी ससाणा | २ | राणीची दुष्ट वासना, कुमत |
| झांकण | ३ | कपटी स्नेह हाव भाव इ. |
| झाकण काढणे | ४ | कृतकृत्यतेचे हास्य |
| ससाणा सोडणे | ५ | भयंकर वचन उच्चारणे |
| सुंदर वन | ६ | राजाचे रामराज्याभिषेकाचे मनोरथ |
| सुविहंग समाज | ७ | राजाचे व कौसल्यादि सर्वांचे सुख |
| पक्ष्याची मान (गळा) | ८ | राजाची वर देण्याची प्रतिज्ञा |
| ससाण्याची तीक्ष्ण चोंच | ९ | दोन अनिष्ट-वर याचना |
| सुविहंगांचे पंख | १० | रामसीता-राज्याभिषेक पाहणे |
| ससाण्याचे पंख | ११ | राजाची सत्यसंधता व रामशपथ |
| ससाणा भिल्लीणीला पक्षी पकडून आणून देतो | १२ | ते भयंकर वचन सर्वसुख मला देईल असे राणीला वाटले |

***श्रीमानस - गूढार्थ - चंद्रिका अयोध्या कांड अध्याय ३ रा समाप्त.***



# अध्याय चौथा

हिं. *। सुनहु प्रानप्रिय भावत जी का । देहु एक बर भरतहि टीका ॥१॥*
*। मागउँ दूसर बर कर जोरी । पुरवहु नाथ मनोरथ मोरी ॥२॥*
*। तापस बेष बिसेषि उदासी । चौदह बरिस राम बनबासी ॥३॥*

म. *। प्राणप्रिय ! मनिं रुचे मागतें । एक वरें भरतास राज्य तें ॥१॥*
*। जोडुनि कर वर मागें दुसरा । नाथ ! मनोरथ पूर्ण मम करा ॥२॥*
*। तापस वेषिं विशेष उदासी । चौदा वर्ष राम बनवासी ॥३॥*

**अर्थ :** प्राणप्रिया ! मला मनापासून आवडते ते मागते. एका वराने भरताला ते राज्य द्या.॥१॥ नाथ ! मी हात जोडून दुसरा वर मागते. तुम्ही माझा मनोरथ पूर्ण करा.॥२॥ रामाने तापस वेषांत विशेष उदासीन राहून चौदा वर्षे वनांत वास करावा.॥३॥

**टीका. चौ. १ - (१)** अजूनसुद्धा कुमति कपटी प्रेमानेच बोलत आहे. प्राणप्रिय = प्राणपति व नाथ हे शब्द आणि हात जोडणे व मधुर भाषण यांनी हेच सिद्ध होते. **'रुसलिस कां प्राणप्रिय राणी'** (२५।८) असे राजाने म्हटले आहे. म्हणून तीसुद्धा वरवर प्रेम दाखवीत तेच संबोधन वापरते. तिच्या मनातला अर्थ हा आहे की मनाला प्राणांसारखे प्रिय वाटणारे मागते. **(क) भरतास राज्य तें -** जे रामाला देणार होता तेच राज्य भरताला द्या. **'कोणा रंका करूं नरेश'** या प्रश्नाचेच जणू हे उत्तर आहे. भाव हा की तुम्ही राज्य रामाला देऊन भरताला रंक करण्याचे ठरविले होते. म्हणून त्याच रंकाला ते यौवराज्य द्या. ज्या सामग्रीने रामास देणार होता त्याच सामग्रीने, तेच राज्य भरतास द्या. एखाद्या कुठल्या तरी लहानशा देशाचे राज्य देऊन मोकळे होतील म्हणून ही सावधगिरी ! मुळात 'ते' या अर्थाचा शब्द नाही; पण राणीच्या मनातील भाव अधिक स्पष्ट करण्यासाठी मराठीत 'ते' हा शब्द घातला. **(ख) प्राणप्रिय ! -** दुसरा भाव हा की माझ्या प्राणांना जे प्रिय वाटते ते तुम्ही कबूल

केलेत म्हणून तुम्ही प्राणप्रिय आहात. कुबडीने जो वर प्रथम मागण्यास सांगितला तोच राणीने प्रथम मागितला. ही मागणी ऐकल्याने राजाला विशेष दुःख होणार नाही व दुसरा वर मागणे अशक्य होणार नाही; म्हणून हा प्रथम मागण्यास सांगितला होता. रामवनवास प्रथम मागितला असता व ऐकल्याबरोबर राजाचे प्राण निघून गेले असते तर हाती काहीच आले नसते व तिच्या म्हणण्यावर कोणीच विश्वास ठेवला नसता. मग वसिष्ठांनी रामास साम्राज्याभिषेकच केला असता.

**ल.ठे.** - दूरदृष्टीने पाहता मानसांतील कैकयीच्या पहिल्या मागणीप्रमाणे कोणते राज्य भरतास द्या हे स्पष्ट नसल्याने अयोध्येच्याच सिंहासनावर न बसविता दुसऱ्या एखाद्या राजाला पदच्युत करून ते राज्य भरतास देता आले असते. वा.रा. वरयाचना अगदी निःसंदिग्ध आहे. **'योऽभिषेकसमारम्भो राघवस्योपकल्पितः॥ अनेनैवाभिषेकेण भरतो मेऽभिषिच्यताम्॥... नवपञ्च च वर्षाणि दण्डकारण्यमाश्रितः॥२६॥ चीराजिन जटाधारी रामो भवतु तापसः॥ भरतो भजतामद्य यौवराज्यमकण्टकम् ॥२७॥** (२।११)... (क) मग गोस्वामींनी अस्पष्ट शब्दयोजना का केली? रामाला वनवास कोठे हे सुद्धा येथील वरयाचनेत स्पष्ट नाही. गोस्वामी हे दाखवितात की 'रामाला वनवासी बनवा' हे शब्द ऐकल्याबरोबर राजाची विचारशक्तीच नष्ट झाली. त्यामुळे शब्दार्थाची व्याप्ती लक्षात आली नाही. दुसरा कोणी असता तर तत्काळ म्हणाला असता की तुझ्या मागणीप्रमाणे भरताला अमुक देशाचे राज्य आताच दिले व रामाला अयोध्येच्या पलीकडे असलेल्या अमुक वनात पाठवितो. तुझ्या मागणीप्रमाणे वर देऊन मी आपल्या वचनांतून मुक्त झालो आहे हे इंद्रचंद्रसूर्यादी देवांस साक्ष ठेऊन सांगतो. उद्या सकाळी तू भरताला दिलेल्या राज्यात जाऊन रहा. असे सांगून राजा निघून गेला असता. वा.रा. अशी पळवाट ठेवलेलीच नाही. दशरथाचे रामावरील अनुपम प्रेम व्यक्त करण्यासाठी येथे अशी पळवाट ठेवली आहे. मराठीतील 'ते' शब्दानेसुद्धा अर्थ स्पष्ट होत नाहीच. उलट 'ते' हे नव्हे असाही अर्थ होऊ शकेल. **अत्यंत शोकाकुल झालेल्या चित्तास शब्दार्थाची यथार्थ व्याप्ती कळत नाही.**

**चौ.२ - (१) जोरि कर बर मागे दुसरा इ.** - थोड्या वेळापूर्वी जी

नागिणीसारखी फुत्कारत होती, जिने राजाचा हात झिडकारला व विषारी क्रूर दृष्टीने टवकारून पहात होती तीच आता हात जोडते. नाथ ! म्हणते; मनोरथ पुरवा म्हणून काकुळतीस येते ! याचेच नाव नारीचरित्र ! वा.रा. हे नाट्य नाही. तेथे एक घाव दोन तुकडे आहेत. येथे कुनारीचरित्राचा आदर्श दाखवावयाचा आहे. हे नाट्य महाकाव्य आहे. वा.रा. नुसते महाकाव्य आहे. वा.रा. दशरथाला पदोपदी कामी म्हटले आहे. येथे तो भाव फक्त एकदाच स्पष्ट दाखवून वारंवार कामी न म्हणता कामीजनांची दीनता पदोपदी प्रदर्शित केली आहे. यामुळेच मानसातील हे प्रकरण वा.रा.पेक्षा फारच चटकदार व अनुपम झाले आहे. पण **'श्री वाल्मीकीच झाला श्री तुलसीदास रामयश गाया'** या मयूर कवीच्या उक्तीप्रमाणे ही सरसता वाल्मीकींना कमीपणा आणीत नाही. परंतु या व अशाच अनेक प्रकारच्या श्रेष्ठतेमुळे मानसाने उत्तर हिंदुस्थानात वा.रा. ला मागे टाकले आहे. दुसरा वर राजाच्या काळजालाच बोचण्यासारखा मागणार असल्याने हे अत्यंत नम्रतेचे व दीनतेचे नाट्य कपटाने करीत आहे. वर मागून झाल्यावर सापिणीसारखी उलटेल.

**चौ.३ - (१) तापस बेषि विशेष उदासी** - उदासी = उदासीन - विरक्त - विरागी. याचाच अर्थ मुनींचे व्रत, वेष व आहार असा पुढे स्पष्ट केला आहे. **'कुठं कुठं सरिता तीरिं उदासी । बसति बोधरत मुनि संन्यासी' 'आम्हीं भरत ! न असत्य वदतों । उदासीन तापस बनिं बसतों'** (२।२१०।३) असे भरद्वाज मुनि म्हणतात. येथेही 'तापस उदासी वनवासी' आहेच. कैकयीचा भाव हा आहे की भरताच्या राज्यातील वस्त्रेभूषणे इ. रामाने काही नेऊ नये. मुनिवस्त्रे, मुनिआहार व वनवास यांच्या योगाने त्याच्या कोमल, सुंदर शरीराचे संरक्षण होणार नाही. थंडी, वारा, ऊन यांनी आजारी पडून मरून जाईल. व मग भरताला चौदा वर्षेच नव्हे तर निरंतर राज्य करता येईल. वा.रा. राणीने शेवटी पुस्ती जोडली आहे की **'भरतो भजतामद्य यौवराज्यमकण्टकम्'** यांतील अकंटक राज्य शब्दांनी रामवनवासाचा हेतु स्पष्ट केला आहे. तो मानसांत ध्वनित आहे. गूढ ठेवण्यात जे सौंदर्य आहे ते उघड सांगण्यात नाही. **(क) विशेष उदासी** - भरद्वाज, अत्रि, अगस्ति इ. मुनि तापस बनवासी उदासी असून सामान सुमान बाळगणे, नगरात

जाणे, येणे, हजारो शिष्य बाळगणे इत्यादी गोष्टी करीत असत. तसे रामाने करू नये म्हणून विशेष उदासी ही अट घातली.

(२) **चौदा वर्ष राम वनवासी - चौदा वर्षेच वनवास का मागितला?** कोणतीही संख्या असती तरी असा प्रश्न चुकला नसता. जन्मभर वनवास का मागितला नाही हा प्रश्न सयुक्तिक ठरेल. **'राम करूं इच्छिति तें घडते'** हे याचे उत्तर आहे. रावणाचे आयुष्य सुमारे चौदा वर्षेच राहिलेले आहे व तो रामाच्याच हातून मरावयाचा आहे हे ठरलेले असल्याने कुबडीने शिकविले नसतानाही राणीला तशी बुद्धि झाली. **'प्रेरक हृदिं रघुवंशविभूषण' (क) वा.रा. कुबडीने पढविले की १४ वर्षे वनवास मागून घे, तेव्हा तिने कार्यकारण मीमांसा दिली आहे. 'चतुर्दशहि वर्षाणि रामे प्रव्राजिते वनम् ॥ रूढश्च कृतमूलश्च शेषं स्थास्यति ते सुतः ॥३१॥ एवं प्रव्राजितश्चैव रामोऽरामो भविष्यति ॥ भरतश्च हताऽमित्रस्तव राजा भविष्यति ॥३३॥ येन कालेन रामश्च वनात्प्रत्यागमिष्यति ॥ अन्तर्बहिश्च पुत्रस्ते कृतमूलो भविष्यति ॥३४॥ संगृहीतमनुष्यश्च सुहृद्‌भिः सार्धमात्मवान् ॥३५॥.** याचा सारांश हा की इतका दीर्घ काळपर्यंत रामाचा व लोकांचा संबंध सुटला म्हणजे लोकांचे रामावरील प्रेम नष्ट होईल व संगतीने ते भरतावर तसेच प्रेम करू लागतील. एवढ्या एक तपापेक्षा जास्त काळात भरताला आपली सत्ता दृढमूल करता येईल व रामाच्या पक्षाचे म्हणजे जे अमित्र-शत्रू असतील, त्यांचा सहज नायनाट करता येईल. मग देशात व नगरात भरताला कोणी शत्रू उरणार नाही व राम परत आल्यावर त्यास साह्य करणारा कोणी राहणार नाही. भरताला आपले मित्रबळ व मनुष्यबळ वाढवून समर्थ होता येईल. (ख) चौदा वर्षे अत्यंत विरागी दशेत घोर अरण्यात घालविल्यावर रामाला वनवासच गोड वाटू लागेल व नगरात येऊन राहणे आवडणार नाही. बारा वर्षे (एक तप) एकाच व्यवसायात, साधनात काढली की तोच व्यवसाय, तीच परिस्थिती गोड वाटते. आता कुठे १८ वे वर्ष नुकतेच लागले आहे. (वा.रा. २।२०।२५) १४ वर्षांनी तो आलाच तरी त्याला कोणी ओळखू सुद्धा शकणार नाही. या वयातच मनुष्याची वाढ होते. शरीरात, रूपवर्णादिकांत बदल होतो. वनवासामुळे सौंदर्य व मोहकता नष्ट होईल. त्यातून आलाच व कोणी ओळखलाच तरी

प्रेम नष्ट झालेलेच असणार. (ग) **मानसातील कुबडीने कालमर्यादा सांगितली नाही. कवि हे दाखवितात की जी मंदमति होती तीच कुबडीसारख्या कोटि कुटिल मणि गुरुने पढविल्यानंतर गुरुपेक्षाही दूरदर्शी व बुद्धिमान बनली. गुरुच्या सवाई शिष्य बनली.** दशरथासारख्या नीतिनिपुण पुण्यशील सम्राटास जिच्या हेतूंचा पत्ता लागला नाही तेथे वर जी अनुमाने केली त्यापेक्षा अधिक तर्क करून काही हाती लागणार नाही. **'प्रेरक हृदिं रघुवंश विभूषण'** हेच खरे.

(ग) या परिच्छेदात आरंभीच जे कारण दाखविले आहे तेच अ.रा. सर्ग १ मध्ये काण्डारंभीच रामचंद्रांनी नारदास स्पष्ट सांगितले आहे. - 'प्रतिज्ञा तं च यत्पूर्वं करिष्ये तन्न संशयः॥३६॥ किन्तु कालानुरोधेन तत्तत्प्रारब्ध-संक्षयात् । हरिष्ये सर्वभूभारं क्रमेणाऽसुरमण्डलम् ॥३७॥ रावणस्य विनाशार्थं श्वो गन्ता दण्डकावनम् ।... इत्यादी ॥ पूर्वी मी जशी प्रतिज्ञा केली आहे त्या प्रमाणे सर्व करणार आहे. परंतु कालानुसार ज्यांच्या ज्यांच्या प्रारब्धाचा क्षय होत जाईल त्या त्या क्रमाने भूभार झालेल्या त्या त्या सर्व असुरांचा संहार करून सर्व भूभार हरण करीन ॥ मी रावणाचा वध करण्याच्या हेतूने उद्याच दंडकारण्यात जाण्यास निघेन ॥ या प्रमाणे रामचंद्रांनी प्रतिज्ञा केल्यानंतरच रामराज्याभिषेकाची इच्छा दशरथांच्या मनात उत्पन्न झाली आहे. चौदा वर्षे वनवास करीन असेही स्पष्ट म्हटले आहे. (श्लो. ३८).

(घ) अ.रा.त दुसरा वर या प्रकारे मागितला आहे. 'अपरेण वरेणाऽशु रामो गच्छतु दण्डकान् ॥१९॥ मुनिवेषधरः श्रीमान् जटावल्कलभूषणः ॥ चतुर्दशसमास्तत्र कन्दमूलफलाशनः ॥२०॥ पुनरायातु तस्यान्ते वने वा तिष्ठतु स्वयम् । प्रभाते गच्छतु वनं रामो राजीवलोचनः ॥२१॥ यदि किंचित विलम्बेत प्राणां स्त्यक्ष्ये तवाग्रतः ॥ भव सत्यप्रतिज्ञस्त्वं एतदेवं मम प्रियम् ॥१२॥ येथे राणीने काही सांगायचे बाकी ठेवले नाही. मानसांतील कैकयी इतकी उतावळी नाही ! हेही राणी सांगणार आहे. पण योग्य वेळ आल्यानंतर वा.रा.त जवळ जवळ असेच सांगितले आहे पण प्राणत्यागाची धमकी दिलेली नाही. याचा परिणाम पहा –

*हिं. — सुनि मृदु बचन भूप हियँ सोकू । ससि कर छुअत बिकल जिमि कोकू ॥४॥*
*गयउ सहमि नहिं कछु कहि आवा । जनु सचान बन झपटेउ लावा ॥५॥*
*बिबरन भयउ निपट नरपालू । दामिनि हनेउ मनहुँ तरु तालू ॥६॥*

*म. श्रवुनि वचन मृदु शोक भूप-मनिं । विकल कोकसे शशिकर लगुनि ॥४॥*
*घाबरले वच नुमटे आननिं । श्येन झडपि जणु लावा काननिं ॥५॥*
*ये वैवर्ण्य फार नरपाला । जणूं वीज पडतां तरु ताला ॥६॥*

**अर्थ :** कोमल वचन ऐकून राजाच्या हृदयात असा शोक झाला की चंद्र किरणाच्या स्पर्शाने चक्रवाक व्याकुल व्हावा ॥४॥ राजे इतके घाबरले की मुखावाटे शब्द उमटेना. जणू वनात लावा पक्ष्यावर ससाण्याने झडप घातली असावी.॥५॥ राजाला इतके वैवर्ण्य आले की जणु ताडाच्या वृक्षावर वीजच पडली. ॥६॥

**टीका : चौ. ४ (१) श्रवुनि वचन मृदु... मनिं** - (चौ. २-३) राणीचे शब्द जरी कोमल आणि नम्र होते **तरी ते राजाला दाहक झाले.** शोकरूपी दाह हृदयात उत्पन्न झाला. शशि किरणांच्या स्पर्शाने शोकविव्हळ होणाऱ्या कोकाचा-चक्रवाकाचा दृष्टान्त दिला. शशिकर शब्दाने शीतलत्व सुचविले. हाच दृष्टान्त रामवचन व सीतेला दाह होणे हे दाखविण्यास दिला आहे. 'दाहति शीतल वचन सतीला । शरदचंद निशि जशि कोकीला' (६४।२) या शीतल पण दाहक वचनालाच 'मृदुल मनोहर' (६४।१) म्हटले आहे. 'रघुवर वचनें मधुर विनम्रहि । सलति जननिन्हृदिं जशिं बाणाग्रहि ॥ सुके घाबरुनि वचनें शीतल । पडत यवासिं जसें वर्षाजल' (५४।१-२) रामवनवासाची वार्ता ऐकून पुढे कौसल्येची जशी दशा झाली आहे अगदी तशीच दशरथांची झाली. राजाला जसे बोलवत नाहीसे झाले तसेच 'वदवे ना मुळिं हृदयविषादां' (५४।३) सीतेच्या हृदयाचा कोकीप्रमाणे दाह झाला. दशरथाचे तसेच झाले आहे. रामवनवास व रामवियोगाची कल्पना हेच कारण तिन्ही ठिकाणी आहे. म्हणून या चौपाईचा संबंध भरताला राज्य देण्याशी नसून रामाला वनवास देण्याशी आहे व तोही विशेष अटींवर. (क) भरताला राज्य देणे, राजाला दुःखद वाटले नाही हे दशरथांच्या पुढील वचनांनी सिद्ध होते. 'भरत राम दोन्ही किं ममाक्षी । सत्य सांगतो शंकर

साक्षी ।। सोत्सव भरता राज्यीं बसवूं ।। (३१।६,८). 'एक चि गोष्ट दुःखिं मज पाडित । अडचणिचा वर दुसरा याचित ।। अझुन आंच ती उर जाळितसे' (३२।४,५). भरताला राज्य द्या असे म्हटल्याने राजाला शोक झाला असे म्हटल्यास दशरथांच्या या वचनांशी विरोध येतो व दशरथाच्या सरल स्वभावाला मिथ्या कलंक लावला जातो; म्हणून हे इतके विवेचन करावे लागले. (ख) विकल कोकसे शशिकर लागत - राजा शोकविव्हळ झाला. का विव्हळ झाला हे दृष्टान्ताने सांगितले. किती विव्हळ झाला हे पुढील चौपाईत सांगतील. चंद्रकिरण मृदु, शीतल व शरीर तापहारक असले तरी त्यांचा परिणाम कोकावर असा होतो की रात्रभर त्याला कोकीपासून दूर रहावे लागते. प्रियतम व्यक्तीच्या विरहाला ते कारण होतात. राणीच्या मुखचंद्राचे वचनकिरण जर प्रियतम व्यक्तीच्या विरहाला कारण झाले नसते तर राजा शोकाकुल झाला नसता. या दृष्टान्ताने सुद्धा हेच ठरते की भरताला राज्य द्या इतकेच मागितले असते तर राजाला दुःख झाले नसते. परंतु रामाला विशिष्ट अटींवर वनवास द्या हेच वचन दाहक झाले. पहिल्या वराने जर राजा शोकविव्हळ झाला असता तर तो मागता क्षणीच पुढल्या चौपाईत राजाच्या शोकाचे वर्णन केले असते. सीतेला वनात बरोबर जाण्यची अनुज्ञा मिळताच तिचा दाह शान्त झाला आहे. लक्ष्मणाचे ही तसेच झाले. सर्व प्रजेलासुद्धा चित्रकूटास रामसहवासात असेपर्यंत सुख झाले. दाह गेला होता. भरतराज्य कोणालाच दुःखद वाटले नाही. रामवियोगच सर्वांच्या दुःखाचे मूळ आहे.

(२) **अध्यात्मपर अर्थ** - अध्यात्म दृष्टीनेही भरताचे म्हणजे प्राज्ञाचे राज्य, गाढ निद्रा, कोणत्याच जीवाला दुःखद वाटत नाही. रामवियोगच जीवांच्या सर्व दुःखांचे कारण आहे. राम = स्वस्वरूपाचे अभेद ज्ञान. आत्मानुभवाचा - आत्मज्ञानाचा व जीवाचा वियोग झाला की जीव भव-दुःख सागरात पडतो. आत्मज्ञानाचा वियोग म्हणजेच अज्ञान व विपरीत ज्ञान. भरताचे - प्राज्ञाचे राज्य = गाढनिद्रा नको असे वाटणारा कोणी विरळाच. भरतराज्य सर्वांना सुखद होते म्हणूनच पुढे श्रीरघुनाथाने भरतास युवराज केले आहेत. (वा.रा.) २७३।५-८ पहा. राम राजा व भरत युवराजा असे झाले म्हणजेच जीव

कृतकृत्य होतो. हे रूपक वाढवावे तितके वाढेल. फार मधुर आहे; पण चव घेता येईल त्याला ! (मा.पी.प.!) **(क) राम सच्चिदानंद दिनेश'** चक्रवाकाला फार प्रिय असतो. त्याचा विरहच चक्रवाकाला शोकाकुल करतो. चंद्र व सूर्य हे दोन्ही आकाशात असले तरी चक्रवाकाला दुःख होत नाही. पण भास्कराच्या प्रकाशात चंद्राचे तेज पडत नाही हे कैकयीला माहीत असल्याने तिने रामभानूला वनात पाठविला. **ज्ञानरूपी राम देहरूपी अयोध्येतील जीवरूपी दशरथभूपाजवळ असेल तोपर्यंत दुःख शोक, मोह, कामक्रोधादी उलूक, व्याघ्र, तस्कर काही करू शकत नाहीत.** सर्वदा दुःखरहित निर्मळ आत्यन्तिक सुखाचे साम्राज्यच तो भोगीत असतो. **पण भक्ति जानकी असेल जवळ तरच हो !**

**चौ. ५ - (१) घाबरले बच नुमटे आननिं इ.** - भयाने इतके व्याकुळ झाले की मुखांतून दुःखाचा, शोकाचा उद्‌गार किंवा 'राम' सुद्धा निघेना. या दशेचे वर्णन करण्यास उपमा, दृष्टान्त नाही म्हणून उत्प्रेक्षेने सांगतात. मागील दोह्यांत कैकयीच्या भयंकर वचनाला 'भयंकर बाज' म्हटले. तो काही कळू न देता कैकयी भिल्लीणीने सोडला. लावा हा एका जातीचा पक्षी आहे. तो बहुधा जमिनीवरच राहतो. 'लावी पक्षीण व तिची पिले' ही गोष्ट माहीत असेलच. दशरथ पुरुष आहेत म्हणून लावा म्हटले. सचान = बाज - ससाणा - श्येन. हा अत्यंत वेगाने व द्रुत गतीने झडप घालतो. त्या लावा पाखराला विचार करण्याससुद्धा सवड मिळत नाही. त्याची कल्पनाही नसते की श्येन जवळपास कुठे असेल? शेतात पडलेले दाणे खाण्यात तो गर्क असतो व अचानकपणे एक क्षणसुद्धा न लागता त्याची मानगुटीच पकडली जाते. चीऽऽचीऽऽ सुद्धा करता येत नाही. कारण गळाच दाबलेला असतो. तो आतल्या आत गुदमरतो. दशरथाला कैकयीच्या शब्दांच्या अर्थाचा विचार करण्याससुद्धा सवड राहिली नाही इतक्या त्वरेने 'चौदा वर्ष राम वनवासी' या वचनरूपी भयंकर ससाण्याने, ध्यानी-मनी-स्वप्नी कल्पनासुद्धा नसता झडप घालून राजारूपी लावा पक्ष्याची मानच धरली. प्राणप्रिय ! नाथ ! हात जोडणे, डोळा मारणे, मुख मुरडणे, पुरवा मनोरथ माझे, प्रेमळ हास्य इत्यादी कुमति कपटी भिल्लीणीने पसरलेले दाणे हा लावा पक्षी आनंदाने खात होता. ते खाण्यात गर्क असता एकाएकी मानगुटीच

पकडली गेली. मग शब्द कसा निघणार? प्राण हृदयांत कोंडले गेले, जीव घाबरा झाला. कासावीस झाले दशरथ ! **किती सर्वांग सुंदर उत्प्रेक्षा आहे** ! विश्वासघात करण्याची कैकयीची ही पद्धती, राजाचा तिंच्यावरील विश्वास, तिचे दंभ, कपट, क्रूरता, आकस्मिक, अकल्पित, अत्यंत द्रुतगतीने झालेला दुष्परिणाम, राजाचे प्रेम इत्यादी अनेक गोष्टींचे सजीव चित्र केवळ एका उत्प्रेक्षेने उभे करण्याची अद्‌भुत काव्यकला वा.रा. आहे का पाहू -

(२) **'तेन वाक्येन संहृष्टा तमभिप्रायमात्मनः ।। व्याजहार महाघोरमभ्यागतमिवान्तकम्'** ॥१२॥ या श्लोकापासून २९ व्या श्लोकापर्यंत १८ श्लोकांत कैकयीचे वर याचनेचे भाषण आहे. मानसात केवळ तीन ओळींत काम भागवून द्रुतगती व विचार करण्याससुद्धा सवड न देणे हे भाव सुचविले. (२।११।१२-२९). **(क)** वरयाचनेचा राजावर झालेला परिणाम - **'ततः श्रुत्वा महाराजः कैकेय्या दारुणं वचः ॥ चिन्तामभिसमापेदे मुहूर्तं प्रतताप च॥१॥ किं नु मे यदि वा स्वप्नश्चित्तमोहोऽपि वा मम ॥ अनुभूतोपसर्गो वा मनसो वाप्युपद्रवः ॥२॥ इति संचिन्त्य तद्राजा नाध्यगच्छत् तदा सुखम्'**॥३॥ मानसांतील तीन ओळींच्या वरयाचनेच्या शब्दांनी जो भयंकर परिणाम झाला त्याचा शतांश तरी वा.रा.च्या १८ श्लोकांच्या वरयाचनेच्या भाषणाने या तीन श्लोकांतल्या सहा ओळींत झालेला दिसतो का? या तीन श्लोकांत वरील उत्प्रेक्षेतील अनेक भावनांचे चित्र आहे का? 'तेव्हा कैकयीचे दारुण वचन ऐकून महाराजाला चिंता उत्पन्न झाली. एक मुहूर्तभर पुष्कळ ताप झाला. तें विचार हे की - हे मला स्वप्न पडले की चित्ताला काही मोह झाला? की मला भुताने पछाडले की मनाला काही उपद्रव झाला? याप्रमाणे चांगला विचार केला पण राजाला सुख झाले नाही. हा तीन श्लोकांचा अर्थ व वरील दोन चौपायांची टीका यांची तुलना संस्कृत न जाणणाऱ्या वाचकांनीसुद्धा आता करून पहावी. **या चौपाईत कंठावरोध व तटस्थता हे भाव दिसले.**

**चौ. ६** - जो हृदय दाह झाला व प्राणांचा कोंडमारा झाला त्याचा शरीरावर काय परिणाम व किती वेगाने झाला हे व आणखी काही गोष्टी या चौपाईत सांगितल्या आहेत. (१) **ये वैवर्ण्य फार महिपाला** - वैवर्ण्य = विवर्णता - शरीराची कान्ति नष्ट होणे. दशरथ फार गोरे होते ते काळे ठिक्कर पडले.

**वैवर्ण्य हा एक सात्विक भाव येथे दाखविला.** निपट = फार, अति. या काळे पडण्याचे वर्णन उत्प्रेक्षेने करतात. (क) **जनूं बीज पड़तां तरु ताला** - ताडाच्या झाडावर वीज पडताक्षणीच तो जळल्यासारखा काळा ठिक्कर होतो, कोलमडून जमिनीवर धाडकन पडतो. तसे दशरथ काळे ठिक्कर पडून जमिनीवर पडले. ताडाचे झाड काळेच असते पण दशरथ दुप्पट गोरे म्हणून उपमा देता येईना. वीज पडण्यापूर्वी पुष्कळ कडकडाट होतो. वा.रा. कैकयीची वाणी तशी कडाडली आहे पण वीज पडली नाही. मानसांत कडकडाट न होता, आकाशात ढग न दिसताच मृदू, मधुर विनम्र वाणीनेच वीज पडली आहे. कडकडाट न होता, ढग नसता वीज पडणे हा घोर उत्पात गणला आहे. I. ताड सरळ, भव्य व उंच असतो तसे दशरथ सरळ स्वभावाचे भव्य व उंच आहेत. II. तुफानी वारा, वायधूळ इत्यादी निसर्गजनित संकटे ताड अत्यंत धीराने, स्वाभिमानाने व कोणापुढे मस्तक न झुकविता सुखाने झेलीत, डोलत असतो; पण एक वीज पडली म्हणजे त्याचा विनाश होतो; दशरथ राजांची अशीच स्थिती होती; पण कैकयीची वाणीरुपी वीज पडताच ते एकदम कोलमडून पडले. वीज अत्यंत उष्ण व दाहक असते पण कैकयीवाणी शीतल, मृदु, मधूर असून तिने विजेचे कार्य केले. III. ताड अशा रीतीने पडल्यावर त्या झावळ्या (वरची पाने) जरी काही दिवस ओल्या सजीव दिसल्या तरी ५।७ दिवसांत पूर्ण निर्जीव होतात. IV. ताडाच्या उत्प्रेक्षेने हेही सुचविले की अजूनपर्यंत दशरथ उभे होते. विशेष काही न सांगता एका समर्पक उत्प्रेक्षेने किती गोष्टी सांगितल्या हे पाहून आश्चर्य वाटले. (उत्प्रेक्षा कां केली याचा शोध करू लागताच वरील भाव आजच प्रगट झाले. (२।८।५४)) 'सरल सुशील धर्मरत भूपति । ते केवीं स्त्रीस्वभाव जाणति' (२।२६२।५) ताडाची व दशरथाची तुलना आणखीही वाढण्यासारखी आहे पण ते कार्य वाचकांच्या वाट्यास देणे बरे. वा.रा. हे सौंदर्य आहे का पहावे. तेथे राजाला दोनदा मूर्छा आल्याचे वर्णन आहे. V. पडले, कोलमडले म्हणण्याने मूर्छा सुचविलीच. (ख) लावा वनणे व विजेने ताड पडणे यांच्या समन्वयाने दर्शविले जाते की ताडासारखे भव्य, गंभीर, उच्च होते ते लाव्यासारखे क्षुद्र, दीन बनले कारण एका

भामिनीविलासिनीचे शशिकिरणांसारखे कोमल व शीतल पण विजेसारखे भयंकर व प्राणघातक छोटेसे भाषण ! एवढ्याने भागले नाही. अजून शब्द उमटत नाही. पुढील दशा पहावी - (ग) **अध्यात्म रामायणात - 'निपपात महीपालो वज्राहत इवाऽचलः ॥२।३।२३॥. 'तां हि वज्र समां वाचं आकर्ण्य हृदयच्छिदम् ॥ दुःख शोकमयीं घोरां... छिन्नस्तरुरिवापतत् ॥'** ही स्थिती येण्यापूर्वी राजाने कैकयीशी पुष्कळ रागाने संभाषण केले आहे व नंतर तिने पुन्हा दुर्वचनांचा पुष्कळ कडकडाट केला तेव्हा ती दशा झाली. पण कोमल-शीतलवाणी व परिणाम ताडाप्रमाणे पडणे ही मजा. अ.रा. नाही. तेथे नुसता 'तरु' आहे. ताड नाही !

*हिं.* ***। माथें हाथ मूदि दोउ लोचन । तनु धरि सोचु लाग जनु सोचन ॥७॥***
***। मोर मनोरथ सुरतरु फूला । फरत करिनि जिमि हतेउ समूला ॥८॥***
***। अवध उजारि कीन्हि कैकेईं । दीन्हिसि अचल बिपति कै नेईं ॥९॥***

*म.* ***। मस्तकिं हात मिटुनि युग लोचन । शोक शोक करि धरुनी हो ! तन ॥७॥***
***। मदिय मनोरथ सुरतरु फुलला । फळत करिणिनें कीं उन्मुळला ॥८॥***
***। पाडि अयोध्ये उजाड कैकयि । रोवी मेढ अचल विपदामयि ॥९॥***

**अर्थ :** दोन्ही हातांनी डोके घट्ट धरून व डोळे मिटून जणू शोकच देहधारी होऊन शोक करू लागला हो.॥७॥ माझा मनोरथ रूपी सुरतरु फुलला व आता फळणार तोच हत्तिणीने समूळ उपटून टाकला की !॥८॥ कैकयीने अयोध्येला उजाड पाडली व जणू विपत्तींची बनविलेली मेढ अचल अशी रोवली.॥९॥

**टीका. - चौ. ७ -** (१) दोन्ही हात कानशिलांवर दाबून धरून डोळे मिटणे ही **मूर्च्छा मुद्रा** म्हणता येईल. चक्कर येऊ लागली, मूर्च्छा येणार असे वाटू लागले की शोकार्त किंवा भयार्त मनुष्य असे करतो. डोळे उघडले की चक्कर येऊ लागते म्हणून डोळे घट्ट मिटून ठेवतो. मस्तकांतील वेदना दुःसह झाल्या म्हणजे हातांनी डोके दाबून ठेवतो. राजाला दुःसह व्यथा होत आहे व चक्कर येत आहे हे या क्रियांनी सुचविले. (क) कवि म्हणतात पाहणारांस असे वाटले की जणू काय शोकच दशरथराजाचे रूप घेऊन शोक करीत आहे. 'हो !' - याने आश्चर्य दाखविले. दशरथ करुणारसाची-शोकाची साक्षात मूर्तीच बनले.

दशरथ राजा असल्याने शोक राजा झाला. आता त्याचे सैन्य पाठोपाठ येणारच ! शोकाने दशरथ राजाला कैद केला; व लवकरच 'जणू करुणरस-कटक करि चाल पिटुनि डंक्यांस' (४६) असे अयोध्येवर आक्रमण केले जाणार आहे. रघुवीराची वरात जनकपुरीतून निघण्याची तयारी सुरू होताच करुणाविरह दांपत्याने विदेहपुरीत निवास केला होता. ते जोडपे तिकडून अयोध्येत येऊन इतके दिवस लपून राहिले होते कैकयीच्या कोपभवनात असे वाटते !

**चौ. ८ - (१) मदिय मनोरथ सुरतरु फुलला** - रामाला राज्याभिषेक आपल्या डोळ्यांदेखत करावा हा मनोरथ म्हणजेच कल्पवृक्ष. **'नवांकुरिं पडे किं पाणी'** (२।६।४) हाच सचिवांचा मनोरथ होता. सचिवांची संमती मिळाली हे त्या सुरुतरुचे वाढणे. राज्याभिषेकाची तयारी झाली हीच फुले. आता उद्या राज्याभिषेक झाला म्हणजेच तो मनोरथ सुरतरु राजाला, राण्यांना व सर्वच लोकांना परमसुखरूपी वांछित फळ देणार अशी खात्री वाटत होती. तोच तो सुरतरु मुळासुद्धा उपटून फेकून दिला गेला. सर्वांचे सुख या हत्तीणीने नष्ट केले. कैकयीला मिळालेल्या पदव्यांच्या यादीत 'करिणी'ची भर पडली. (क) कुबडीने तिला म्हटले होते की पशूंनासुद्धा आपले हिताहित कळते पण तुला कसे कळत नाही? म्हणूनच जणू काय ती करिणी बनली व आपले हित साधले असे तिला वाटले. हत्ती किंवा हत्तीण (करिणी) उन्मत्त झाल्यावर आपल्या मालकाससुद्धा मारण्यास कमी करीत नाहीत; मग कल्पवृक्ष उपटून टाकील यात नवल काय? पांढऱ्या हत्तीणीसारखी फुकट पोसून माजविली व मोकाट सोडली म्हणून तिने हा सुरतरु उपटला. तिच्या मस्तकावर धाकरूपी अंकुश धारण केलेला आपले पौरुषरूपी माहूत राजाने बसविला असता तर हीच हत्तीण त्या सुरतरुची फळे लुटण्यास राजाला आनंदाने घेऊन गेली असती. **स्त्रीरूपी करिणीवर अंकुश नसला म्हणजे पतिमनोरथ सुरुतरूला ती उपटून टाकील यात नवल काय? सुंदर स्त्रीरूपी करिणीच्या रूपाला भुललेले पुरुष रूपी महामतंगज कसे खाड्यांत पडतात हे येथे दाखविले.** (ख) सुरतरु या पृथ्वीतलावर आणण्याचा मनुष्याने प्रयत्न केला म्हणूनच की काय देवांनी घरच्या हत्तीणीकडूनच तो समूळ उपटून टाकविला असे वाटते. १२।६ पहा. मदिय - मदीय = माझा.

**चौ.९ - (१) पाडि अयोध्ये उजाड** - हिने केवळ माझाच मनोरथ नष्ट केला असे नाही. सर्व अयोध्येलाच उजाड करून टाकली. कारण की जो माझा मनोरथ होता तोच सर्व प्रजेचा होता. राम वनात जाणे म्हणजे सर्व आनंद व सुखच वनात जाणे होय. 'सुकृत-शील-सुख-सीमा परमा । जन्मलाभ-अवधी किं निरूपमा' असा जो अभिषेक मुहूर्त 'तो वांछिति नर नारि सब या प्रकारिं अत्यार्ति ॥ जशि चातकचातकि तृषित वृष्टि शारदी स्वाति' (५२). असे असता राम वनवासास गेल्यावर ती प्रजा नगरांत राहते कशाला व राहिली कदाचित तरी ओसाड नगरीसारखीच अयोध्या भयाण, दुःखद दिसणार असे भाकीत दशरथ करीत आहेत. पुढे असेच घडलेले दिसेल. **(क) रोवी मेढ अचल विपदामयि** - कपटरूपी पाया पक्का भरून रामाभिषेकाच्या मुहूर्तावर रामाला वनवासास पाठवून हिने विपत्तींची मुहूर्तमेढच रोवली व ती अशी पक्की रोवली की जरासुद्धा हलणार नाही. हिने सर्व विपत्तींचे मूळच निर्माण केले. त्या मेढीसारखीच इमारत तयार होणार. म्हणजे अयोध्या विपत्तींचे निवासस्थान बनणार. (ख) येथे आठच्या ऐवजी नऊ चौपाया का? **एक चौपाई जास्त का?** नारीवर वाजवीपेक्षा **जास्त विश्वास ठेवला** त्याचा हा परिणाम सर्वांना भोगावा लागणार. हेच आता दोह्यांत दशरथ सांगणार आहेत.

*हिं.दो. । कवनें अवसर का भयउ गयउँ नारि बिस्वास ।*
*॥ जोग सिद्धि फल समय ज़िमि जतिहि अबिद्या नास ॥२९॥*

*म.दो. । घडे काय कोण्या समयिं हत नारीविश्वासिं ॥*
*॥ योगसिद्धिफल-समयिं जशि यतिस अविद्या नाशि ॥२९॥*

**अर्थ :** कोणत्या वेळी काय घडले हे ! नारीविश्वासाने माझा घात केला. (मी मारला गेलो.) योगसिद्धीचे फलप्राप्त होण्याची वेळ अगदी जवळ आली असता अविद्येने जसा यतीचा नाश करावा (तसे माझे झाले.) ॥दो.२९॥

**टीका. दो. - (१) घडे काय कोण्यासमयिं** - ज्या मुहूर्तावर राज्याभिषेक व्हावयाचा त्याच मुहूर्तावर राम वनात जाणार ! येथे आश्चर्याने स्वतःसच विचारतात की हे असे अगदी विपरीत कसे झाले? स्वतःच उत्तर देतात की मी या स्त्रीवर फाजील विश्वास ठेवला त्यानेच माझा घात झाला (गयउँ).

स्त्रीवर विश्वास ठेवला हे कारण व घात झाला हे कार्य. याला दृष्टान्त देतात. **(क) योगसिद्धि** = ज्ञानयोग सिद्धीस जाणे; जड चेतनग्रंथींचा भेद करणे हेच योगसिद्धीचे फल आहे. पण हे फळ आता अगदी पदरात पडणार अशा वेळीच अविद्या माया कैकयीसारखेच नाटक करते. त्यावर जर विश्वास ठेवला गेला की त्याचा विनाश होतो. योगाचे सर्व कष्ट फुकट जातात. **'तैं बुद्धी ती प्रकाश मिळुनी । सोडी ग्रंथि हृदयगृहिं बसुनी ॥ ग्रंथिभेद ती (बुद्धि) करूं शके जर । होइ जीव मग कृतार्थ हा तर ॥ सोडत गाठ बघुनि खगराया । विघ्न अनेक करी तैं माया ॥ ऋद्धिसिद्धी बहु दे बा ! धाडुनि । मतिला प्रलोभ दाविति येऊनि ॥ कळ बळ छळ करी समीप जाते । विझवी दीपा अंचलवातें ॥ असे बुद्धि जर परम शहाणी । तिज न लक्षिते अहित जाणुनी** ॥ ७।११८।४-९. कैकयीनें आपल्या कपट कलेच्या बळावर छल केला व दशरथाला मोहात पाडला. ती अहितकर्ती न वाटता सुखकर वाटली. तिला न जुमानण्याचे बाजूस राहून तिच्यावर पूर्ण विश्वास ठेवला. यतीने - योग्याने - अविद्येच्या ऋद्धिसिद्धिरूपावर मोहित होऊन विश्वास ठेवला. त्यांना सुखकर समजून जवळ केल्या, त्यांना कवटाळण्याची इच्छा केली की ती अविद्या त्या यतीचा - साधकाचा - योग्याचा - घात करते. तसेच अगदी दशरथाचे झाले. **'नारि विष्णु माया प्रगट'**.

(२) **अध्यात्मपर अर्थ** - योगसिद्धीचे फल आहे ज्ञान. **'विरतिस धर्म योग दे ज्ञाना'** (३।१६।९) ग्रंथिभेद होणे म्हणजेच आत्मज्ञान प्राप्त होणे. ते मिळण्याच्या ऐन वेळी अविद्यारूपी कैकयीवर विश्वास ठेऊन जीव दशरथ भुलला व तिच्या सौंदर्यापासून सुखानंद मिळविण्याची इच्छा झाली की अविद्या कैकयी ज्ञानरूपी रामाला देशोधडीला लावते व जीव दशरथाला त्या देहाने पुन्हा त्याचे दर्शन सुद्धा होत नाही. व **'जीव पुन्हां तैं विविध विध भोगि संसृती क्लेश ॥ हरिमाया अति दुस्तर तरवे ना विहगेश'** (७।११८ रा) अधिक विस्तार ज्ञानदीप प्रकरणाच्या (७।११७।१-११८) टीकेत पहावा. विचार करावा वाचकांनी की गोस्वामींनी हा जो दृष्टान्त दिला तो रामायणाचा विचार अध्यात्म दृष्टीने केल्याशिवाय दिला काय? व याचा उलगडा उपप्रश्न उत्पन्न करून त्यांच्या विवरणांत उत्तर काण्ड पुरवणीत करून ठेवला तो सहज काकतालीय न्यायाने

की हेतुपूर्वक? राजा उत्तर देत नाही असे पाहून आता कैकयी कडकडू लागेल.

हिं. *। एहि बिधि राउ मनहिं मन झाँखा । देखि कुभाँति कुमति मन माखा ॥१॥*
*। भरत कि राउर पूत न होंही । आनेहु मोल बेसाहि कि मोही ॥२॥*
*। जो सुनि सरु अस लाग तुम्हारे । काहे न बोलहु बचनु सँभारे ॥३॥*
*। देहु उतरु अनु करहु कि नाहीं । सत्यसंध तुम्ह रघुकुल माहीं ॥४॥*

म. *। असे मनोमनिं भूपति कुढती । बघुनि दशा, मनिं कुमति रुष्ट ती ॥१॥*
*। नसे भरत कीं पुत्र आपला । काय आणली विकत तुम्हिं मला ॥२॥*
*। मम वच शर-सम गमे मना जर । करुन विचार न कां वदलां तर ॥३॥*
*। द्या उत्तर अनुकूल किं नाहीं । सत्यसंध तुम्हिं रघुवंशीही ॥४॥*

**अर्थ :** या प्रमाणे भूपति मनातल्या मनात कुढत आहेत. राजाची ती दुर्दशा पाहून दुर्बुद्धी कैकयी मनात रुष्ट झाली - चिडली.॥१॥ (व विचारते की) भरत तुमचा मुलगा नाही की काय? व मला तुम्ही विकत आणलीत की काय?॥२॥ (मी जे मागितले ते) माझे वचन तुमच्या हृदयाला जर बाणासारखे बोचते आहे तर बोलताना विचार करून का नाही बोललात.॥३॥ माझ्या म्हणण्याला तुम्ही अनुकूल आहात की नाही (प्रतिकूल आहात) याचे पहिल्याने उत्तर द्या. (मात्र लक्षात ठेवा की) तुम्ही सत्यसंध-सत्यप्रतिज्ञ आणि (ही) रघुवंशी आहात.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) असे मनोमनिं भूपति कुढती** - असे - 'शोक शोक करि धरनी हो ! तन' पासून मागील दोहयांत जसे वर्णन केले तसे. येथे दशरथांच्या या पहिल्या शोकलहरीचा उपसंहार केला आहे. नागिणीने मर्मस्थानी दंश केल्याने विष कसे झपाट्याने चढले ते पूर्वी उत्प्रेक्षांनी वर्णन केलेच आहे. आजच्या रात्रीतच अशा अनेक शोक-पश्चात्ताप-लहरी राजाला येणार आहेत. शोकाने, पश्चातापाने राजा मनातल्या मनात कुढत-झुरत आहे. दृढ प्रतिज्ञा व रामशपथा केल्या असल्याने उघड उघड नाही म्हणवत नाही. मागील चौपायांवरून असे वाटणे शक्य आहे की राजा प्रगट बोलत होता. 'मनोमनि' शब्दाने सांगितले की वैखरीने किंवा पुटपुटतसुद्धा बोलले नाहीत. **(क) बघुनि दशा, मनिं कुमति रुष्टती** - राजाच्या झालेल्या दुर्दशेवरून त्या

दुर्मतीने जाणले की असेच जर काही क्षण गेले तर राजाचे प्राणपाखरू उडून जाईल व आपले सर्व मनोरथ बुडून जातील आणि भलतीच काहीतरी घोर शिक्षा भोगावी लागेल. शोक-भयादि विव्हळतेचा हृदयात कोंडमारा झाला म्हणजे प्राण जाण्यास वेळ लागत नाही. त्या विकाराला वाचा फुटली तर तो प्रसंग टळतो. भरताला राज्य व रामाला वनवास देण्याची इच्छा राजाची दिसत नाही हेही तिने ताडले व ती आता आपले खरे स्वरूप प्रगट करते. राजाची ही दशा आपल्या प्राणांवरच गदा आणणार हे जाणून ती चिडली, खवळली. पूर्वीचे हसणे, गोड कोमल शब्द इ. लयाला जाऊन तिने चण्डिकेचे स्वरूप धारण केले.

**चौ.** २ - तिच्या पुढील प्रत्येक वाक्यात सवती मत्सर व राजा कपटी दंभी आहे ही भावना भरलेली आहे. ती म्हणते - (१) **नसे भरत कीं पुत्र आपला?** - भरताला राज्य द्या हा एक वर मागितला, पण तो देण्याची तुमची इच्छा दिसत नाही. उलट त्यामुळे तुम्हाला फार दुःख झालेले दिसते. राम वनवासाचे नाव नाही काढीत ती ! पुन्हा उच्चार केला तर आताच प्राण जातील व सवतीचा सूड घेणे दूर राहून सवतच माझा सूड घेईल. भरत तुमचाच मुलगा आहे की दुसऱ्या कोणाचा? तो अगदी लग्नाच्या बायकोलाच झालेला आहे ना? पैसे देऊन विकत आणलेली दासी मला समजता की काय? व भरत दासीपुत्र आहे असे मानून त्यास राज्य देत नाही की काय? दासीपुत्र असता तर राज्य न देणे योग्य ठरले असते. मनात भाव हा आहे की तुम्ही कौसल्येच्या चिथावणीने मला न कळविता सगळा डाव रचलात व भरताला कारागृहात डांबून मला कौसल्येची दासी बनविण्यासाठी तुम्ही रामाला राज्य देताना भरताला एक साधी चिठ्ठी सुद्धा धाडली नाहीत. 'तुझे वर दिले' हे शब्द राजाच्या मुखातून वदवी पर्यंत राम वनवासाचे नाव काढले तर राजाचे प्राण राहणार नाहीत; म्हणून ती गोष्टच या भाषणात काढणार नाही. या भाषणाने राजाला चांगला डिवचून बोलका करीपर्यंत ती दुसऱ्या वराविषयी काही बोलणार नाही.

**चौ.३.** एवढ्याने सुद्धा राजा बोलत नाही असे पाहून म्हणते की (१)

**शरसम मम बच गमे मना जर इ.** - इतका शोक करण्यासारखे माझे शब्द जर तुम्हाला अप्रिय लागणार होते तर आधी विचार न करताच पाहिजे ते मागून घे असे का म्हणालात? विचार करून काही अटी घालून का नाही बोललात? अविचाराने बोललात ही चूक तुमची की माझी? आधी अविचाराने बोलायचे नी मग शोकविव्हळ व्हायचे हा कुठला न्याय? तुमच्या या शोकाच्या नाटकाला व दैन्याला घाबरून मी वर मागे घेईन असे का तुम्हास वाटते? बरे खराच शोक असेल व माझे शब्द असह्य झाले असतील तर -

**चौ. ४ - (१) धा उत्तर अनुकूल किं नाहीं** - मी कबूल केले खरे पण मी देत नाही असे स्पष्ट सांगा. नाहीतर मला अनुकूल असलेले करा - 'दिले वर' असे म्हणा. **(क) सत्यसंध तुम्हि** - मात्र नाही म्हणताना विचार करा की तुम्ही सत्यसंध आहात अशी ख्याती आहे. अजूनसुद्धा दातखीळ उघडत नाही असे पाहून राजाच्या रक्ताला उसळी मारावयास लावण्यासाठी आता जणू जोराचा आघात करते. **(ख) तुम्हि रघुवंशी** - पण लक्षात आहे ना की तुम्ही रघुवंशांतले पुरुष आहात. प्रतिज्ञाभंग करून असत्यवादी ठरा व रघुकुलाला कलंक लावा. **'नहि असत्यसम पातकपुंजा'** व **'रघुकुल-रीतिस कदा खंड ना । जावो प्राणही वचनभंग ना'** या राजाच्या वचनांवर हा अप्रत्यक्ष मारा आहे. उघड उघड मारा पुढे करणार आहे. हा आडून केलेला मारा अद्याप मर्मी लागला नाही असे पाहून आता अर्थ स्पष्ट करते. **(ग) वा.रा. - राणीने वरयाचनेचा** स्पष्ट उच्चार केल्यावर थोडा वेळ मूर्छित पडून उठल्यावर प्रथम दशरथच कोपाने तिला टाकून बोलले आहेत. त्यातील थोडासा नमुना - **'कैकयीमब्रवीत् क्रुद्धो दहन्निव हि चक्षुषा ॥ नृशंसे दुष्टचारित्रे - ॥७॥ कुलस्यास्य विनाशिनि... त्वंमयाऽऽत्मविनाशाय भवनं स्वं निवेशिता ॥९॥ अविज्ञानान् नृपसुता व्याली तीक्ष्ण विषा यथा ॥** - ३७ श्लोकांपर्यंत दशरथाचे तेजस्वी, ओजस्वी, रामगुणांचे वर्णन करणारे व रामावाचून होणाऱ्या आपल्या दशेचे वर्णन आहे. पुढे ३८-५२ पर्यंत कैकयीचे दुसरे भाषण आहे. तुलना वाचकांनी करून पहावी.

***हिं.*** ***। देन कहेहु अब जनि बरु देहू । तजहु सत्य जग अपजसु लेहू ॥५॥***
***। सत्य सराहि कहेहु बर देना ॥ जानेहु लेइहि मागि चबेना ॥६।***

म. । बदुनि देउं वर भलें न देणें । त्यजुनि सत्य जगिं अपयश घेणें ॥५॥
। स्तवुनि सत्य वर देतो म्हटलें । चणे फुटाणे घेइ वाटलें ?॥६॥

**अर्थ :** वर देतो म्हणून कबूल करून आता नाही देत, ठीक आहे. नका देऊ व सत्याचा लोप करून जगात अपयश घ्या पदरांत.॥५॥ सत्याची प्रशंसा करून वर देतो असे म्हणालात तेव्हा चणेफुटाणे घेईल मागून असे वाटले होते की काय?॥६॥.

**टीका. चौ. ५ - (१) 'सत्यसंध तुम्हि'** असे जे म्हणाली त्याचाच अर्थ स्पष्ट करते. कसेतरी करून राजाला अडवून चिडवून प्रथम बोलता करण्यासाठी ही खटपट आहे. बोलू लागला म्हणजे पहिला वर तरी सहज पदरात पडेल व दुसऱ्याबद्दल राजा हो, ना, काहीच म्हणाला नाही तर मग पुढे पाहता येईल. एकदा हाती सत्ता आली म्हणजे मग पाहून घेता येईल, हा मुख्य हेतू आहे. 'नहि असत्यसम पातकपुंजा' 'सत्यमूल सब सुकृत शोभती ॥' इत्यादी जे राजा म्हणाला त्याची आठवण देत आहे. रामशपथ व रामवनवास हे शब्द पहिला वर मिळाल्याशिवाय उच्चारायचे नाहीत असा तिचा विचार दिसतो. फार धूर्त आहे. **(क) त्यजुनि सत्य जगिं अपयश घेणें** - देतो म्हणून कबूल करून न देणे म्हणजे सत्याचा खून करणे आहे. तुम्ही जगात 'सत्यसंध', सत्यवादी म्हणून प्रसिद्ध आहात. सत्याचा त्याग केलात की मिळविलेले यश तर जाईलच पण धर्मिष्ठ सज्जन म्हणतील की आपल्या प्रियतम पत्नीला कबूल केलेले ज्याने दिले नाही तो इतरांना काय देणार ! तुमच्या शब्दावर कोणी विश्वास ठेवणार नाही; व सज्जनांच्या संगतीत बसण्याची लायकी राहणार नाही.

**चौ.६ - (१) स्तवुनि सत्य वर देतों म्हटलें** - मारे अघळ पघळ सत्याचीं प्रशंसा केलीत की 'नहिं असत्य सम पातकपुंजा' 'सत्यमूल सब सुकृत शोभती' इत्यादी एक व्याख्यानच झोडलेत आणि आता कुठे गेली ती सत्य प्रीती, सत्य निष्ठा? तुम्ही म्हणाल की, 'मागशील ते देतो म्हटले तरी मागणाराने योग्यायोग्य पाहून मागावे की नाही? मी कुठे देत नाही म्हणतो. मी सत्याचा त्याग करीत नाही पण तू औचित्याचा भंग करतेस.' पण हा विचार आता काय कामाचा? **देतो म्हणून उच्चार करण्यापूर्वी विचार करावयास हवा होता की ही काय मागेल**

बरे? तुम्ही केलाही असेल विचार की ही मागून काय मागणार? मागेल फार तर मूठभर चणेफुटाणे? असे का वाटले तुम्हाला? मी काय बोळ्याने का दूध पिते? का मला खायला, मुखशुद्धीला मिळत नाही म्हणून मी चणेफुटाणे मागू? मी मागितले ते काहीच नाही. तुम्ही कबूल केलेलेच वर देणे तुम्हाला अत्यंत अमूल्य दान, फार मोठे दान वाटत असेल; पण जे सत्यसंध होऊन गेले त्यांच्या दातृत्वापुढे हे दान म्हणजे चणेफुटाणे देणेच आहे. तुम्हाला माहीत असेलच पण कंजूष लोभी बनून अडाण्याचे सोंग घेऊन मला भोळीला फसवू बघता तरी कोणी कसा शब्द पाळला ते ऐका :

***हिं.*** ***। सिबि दधीचि बलि जो कछु भाषा । तनु धनु तजेउ बचन पन राखा ॥७॥***
***। अति कटुबचन कहति कैकेई । मानहुँ लोन जरे पर देई ॥८॥***

***म.*** ***। शिबि दधीचि बलि जें जें भाषति । तनु धन तजुनि वचन पण पाळति ॥७॥***
***। वदे कैकयी अति कटु वचना । क्षतामधें जणुं घाली लवणा ॥८॥***

**अर्थ :** शिबि, दधीचि व बली हे जे काही बोलले ते ते वचनरूपी पण आपला देह, धन इ. (सर्वस्व) त्याग करून सुद्धा त्यांनी पाळला.॥७॥ या प्रमाणे कैकयी अत्यंत कटु भाषण करून जणू जखमेत (क्षतांत) मीठ (लवण)च भरीत आहे.॥८॥

**टीका. - चौ. ७ - (१) शिबि दधीचि बलि -** पुढे या तिघांच्या कथा दिल्या आहेत. त्यांवरून असें दिसेल की शिबि व बली यांना कपटाने फसवून त्यांच्याकडून मागून घेतले आहे. तसा कपटाचा आरोप राजाने आपल्यावर करू नये म्हणून दधीचीचे नाव मधे घुसडले आहे. शिबि व दधीचि यांनी आपले शरीर दिले परंतु वचनभंग केला नाही. बलीने तर आपले सर्व साम्राज्यादि अर्पण करून पाताळात जाण्याचे कबूल करून सुद्धा दिलेला वचनरूपी पण पाळला. मी तर तुमचा देह मागत नाही की राज्य जन्मभर द्या असे म्हटले नाही. केवळ १४ वर्षे राज्य द्या असे मागितले तेसुद्धा देववत नाही? तुमच्या तनूला ओरखडासुद्धा उठायचा नाही. तुम्ही राज्यात राहू नका असेही मी म्हटले नाही. आपल्यासारख्या प्रेमळ प्राणनाथांस मी असे कसे म्हणेन. यातसुद्धा राम आणि भरत यांची नावे गाळली असल्याने वरील टीकेत त्यांचा प्रवेश होऊ दिला नाही, हे जरा जडच

गेले; पण वक्त्याच्या भावना स्पष्ट करणे इतकेच येथे साधणे आहे.

चौ. ८ - (१) **क्षतामधे जणु घाली लवणा** - जखमेत किंवा भाजलेल्या अंगावर मीठ घातले म्हणजे पूर्वीपेक्षा अधिक पीडा व आग होते; व ती जखम बरी न होता चिघळत जाते व त्या वेदनांनीच शेवटी जखमी केलेली व्यक्ती प्राणांस मुकते. हे भाषण ऐकण्याने राजाला अधिकच दुःख झाले. अधिक दाह झाला. हे भाषण ऐकणे नको असे वाटू लागले. पण प्रतिज्ञा-पाशात जखडून बांधला गेल्याने राजा काय करणार? (क) अत्यंत प्रेमळ, पतिव्रता, रामप्राणप्रिय असणारी भोळी कैकयी नीच-कुसंगतीत पडून स्नेहमूर्ती,सरळ धर्मनिष्ठ सम्राटाला काय बोलत आहे हे पाहिले म्हणजे **कोणाची व विशेषतः स्त्रियांची बुद्धी केव्हा कशी फिरेल याचा विचार करून विश्वास ठेवावा.** आता मात्र दशरथांस बोलल्याशिवाय सुटकाच राहिली नाही ! पुढील दोह्यांत बोलू लागतील.

## शिबि-राजा

वा.रा.सुद्धा कैकयीने शिबीच्या कथेचा उल्लेख केला आहे. महाभारत वनपर्वात ही कथा आहे. शिबि उशीनर महाराजांचा पुत्र. त्याच्या साधुत्वाची व औदार्याची परीक्षा घेण्यासाठी देवांनी इंद्र व अग्नि यांना नियुक्त केले. अग्नि कपोत (कबुतर) बनला व इन्द्र श्येन बनला. राजा सभेत सिंहासनावर बसला असता कबूतर पळत पळत येऊन राजाच्या मांडीवर पडले व ससाणा त्याचा पाठलाग करीत तेथपर्यंत आला. 'मी तुला शरण आलो आहे' असे कपोत म्हणाला राजाला. 'मी श्रोत्रिय, तपस्वी, ब्रह्मचारी आहे माझे प्राण वाचवा.' ससाणा म्हणाला की, 'कपोत माझा ईशनिर्मित आहार आहे. माझ्या उदरभरणात तुम्ही विघ्न आणू नये.' त्यांची ती स्पष्ट मनुजगिरा ऐकून राजा धर्मसंकटात पडला. शरणगताला त्याच्या शत्रूच्या हाती देणे मोठे पाप आहे वगैरे सांगून राजा म्हणाला - मी वाटल्यास प्राण देईन पण शरणागताचा त्याग करणार नाही. तुम्ही विनाकारण त्रास देऊ नका. वाटल्यास बैल वगैरेचे मांस मी मोबदला देतो. किंवा तुमची काय इच्छा असेल ते देईन पण कपोत देणार नाही.

ससाणा म्हणाला, 'राजा, तू आपल्या उजव्या मांडीचे मांस आपल्या हाताने

कापून कपोताच्या भारंभार दे म्हणजे माझे कार्य होईल व त्याचा प्राण वाचेल. शिबि राजाने तराजू आणवून एका पारड्यात ते कबूतर घातले व दुसऱ्यात मांडीचे मांस स्वतःच्या हाताने कापून घातले तरी कबूतराचे पारडे खालीच. सगळ्या शरीराचे मांस काप-कापून घातले तरी तेच. शेवटी राजा स्वतः त्या पारड्यात उभा राहिला तेव्हा पारडी बरोबर झाली. काही ठिकाणच्या कथांत भेद आहेत. येथे ही एक पुरे. पुढे ते दोघे कपटवेष सोडून प्रगट झाले व राजाला आशीर्वाद वगैरे दिले आहेत व राजाचा देह दिव्य झाला आहे.

## दधीची ऋषीची कथा

ब्रह्मदेवाचे पुत्र अथर्वण ऋषि, त्यांचा पुत्र दधीची. यांची माता देवहूतीची कन्या. हे उदार व महातपस्वी होते. इंद्राला वृत्तासुराचा पराभव-वध करता येईना तेव्हा देवांनी दधीचीकडे जाऊन त्यांची हाडे मागितली. तेव्हा दधीची म्हणाले की शरीर केव्हा तरी मरणारच आहे. परोपकारात त्याचा उपयोग होत असता मी जरी त्याचा त्याग केला नाही तरी ते एके दिवशी माझा त्याग करणारच. म्हणून तुमच्या कार्यासाठी त्याचा त्याग करणे काय वाईट? असे म्हणून त्यांनी त्या शरीराचा त्याग केला. विश्वकर्म्याने त्यांची हाडे घेऊन त्यांचे वज्र नावाचे अस्त्र बनविले व त्या वज्राने पुढे इंद्राने वृत्रासुराचा वध केला.

## बली-दैत्यराजा

दैत्यराजा भक्तश्रेष्ठ प्रल्हादाचा हा नातु. याने देवांनासुद्धा जिंकले. हा फार उदार व धर्मज्ञ, धर्मशील होता. देव राज्यैश्वर्यहीन झाल्यावर देवमाता अदितीने देवशत्रूंचा नाश करणारा पुत्र व्हावा अशी प्रार्थना पति कश्यप ऋषींना केली. त्यांनी सांगितल्याप्रमाणे अदितीने व्रत व उपासना केल्यावर प्रभु भाद्रपद शुद्ध द्वादशीला तिचे पुत्र म्हणून 'वामन' रूपाने अवतरले. ते बटुरुपांत होते. त्या वेळी बली शंभरावा अश्वमेध यज्ञ करीत होता. तेथे वामन-बटु रूपाने गेले. बलीने बटूची पुजा करून 'काय पाहिजे ते मागा' असे म्हटले. शुक्राचार्यांनी (दैत्य गुरु) सर्व मर्म बलीला सांगितले पण त्याने आपले वचन मागे घेतले नाही. बटूने त्रिपादभूमी मागितली. शुक्राचार्यांनी पुन्हा विरोध केला तरीसुद्धा

त्याने आपले व्रत व वचन पाळले. प्रभूंनी आपले एक पाऊल वाढवून त्याने सर्व पृथ्वी व्यापली. दुसऱ्या पावलाने सगळे स्वर्ग व्यापले तेव्हा तिसऱ्या पावलास जागा उरली नाही. तेव्हा वामन म्हणाले की राजा तुझे वचन असत्य ठरले. बली म्हणाला, 'राजाचे शरीर अर्ध्या राज्याच्या बरोबरीचे असते त्यावर तिसरे पाऊल ठेवावे, मी सत्यवादी आहे.' तेव्हा तिसरे पाऊल बलीच्या डोक्यावर ठेवले व त्यास पाताळात ढकलला. ही कथा श्रीमद्भागवतात आहे.

ल.ठे. शिबी व बली या दोघांकडे कपटाने याचना केली. 'शिबि दधीचि बलि' यांत आदिअन्ती कपटाने मिळविलेल्या गोष्टींचेच वर्णन आहे. आदिअन्ती जे असते ते मधे नसले तरी असल्यासारखेच ठरते व आदिअन्ती नसून जे मधेच असते ते असून नसल्यासारखेच. येथे हे सुचविले आहे की कैकयीने कपटानेच साधले. राजा वर देण्यास तयार झाला तो कपटावर विश्वास ठेऊन व अजूनसुद्धा ती कपटानेच कार्य साधीत आहे. राजाचा धीर सुटला आहे. बोलण्याची शक्ती नाही पण आता बोलल्याशिवाय सुटका नाही.

**हिं.दो.** । **धरम धुरंधर धीर धरि नयन उघारे रायँ ॥**
**॥ सिर धुनि लीन्हि उसास असि मारेसि मोहि कुठायँ ॥३०॥**

**म.दो.** । **धर्म - धुरंधर धीर धरि उघडी नेत्रा राव ॥**
**॥ शिर पिटि, घे श्वासा, म्हणे मर्मी मारि असि घाव ॥३०॥**

**अर्थ :** धर्म धुरंधर राजाने धीर धरला व डोळे उघडले. डोके बडवून एक दीर्घ श्वास घेतला व (मनात) म्हणाला की ही तलवार माझ्या मर्मावर घाव करीत आहे.॥३०॥

**टीका. दो.** - हिंदीतील धरि = धरून; व मराठीतील धरि = धरता झाला, धरला - असि = तलवार. (१) **धर्मधुरंधर धीर धरि** - धर्माची धुरा खांद्यावर घेतलेली असल्याने कैकयीने नुकत्याच केलेल्या मिथ्या आरोपांचा निरास केला पाहिजे असे वाटले. उत्तर न देता सहन करणे अशक्य झाले. 'राजा धर्मधुरंधर आहे' याने सुचविले की अधर्म करणार नाही. (क) **धीर धरि** - धीर धरला. धैर्य अगदी गळून गेले होते. बोलण्याची किंवा डोळे उघडण्याची सुद्धा शक्ती राहिली नव्हती. पण नाईलाज म्हणून कसा तरी धीर धरला व मोठ्या कष्टाने

डोळे उघडता आले. डोळे उघडताच समोर जे दृश्य दिसले ते पाहून निराशा झाली. भरताला राज्य देण्याचे कबूल करून राणीची समजूत घालून रामवनवासाचा वर रद्द करून घेऊ असे वाटत होते पण ते आता अशक्य आहे असे वाटले. राज्य देतो म्हणून काल सांगून वनात जा असे सकाळीच सांगितले तरी सत्याचा लोप होतो. तो वर देत नाही असे हिला सांगावे तर प्रतिज्ञाभंग होते; म्हणून कैकयीची समजूत घालण्याचा बेत मनात केला होता; पण पुढे वर्णिलेले समोरचे दृश्य पाहताच या धर्मसंकटांतून सुटण्याची आशा दिसेना.

(२) **शिर पिटि** - आपले हात आपल्या कपाळावर मारू लागला. **ही असहाय्यता सूचक मुद्राच आहे.** रामवनवास चुकविण्यास उपाय नाही अशी खात्री वाटली. अशा स्थितीत त्या व्यक्तीचा श्वास निरुद्ध झालेला असतो. छाती शोकाने भरून आलेली असते. श्वासोश्वास बंद असतो. अशा स्थितीत कोणी दीर्घ सुस्कारा टाकतात तर कोणाला दीर्घ श्वास घ्यावा लागतो. **बाह्य कुंभक झाला असेल तर दीर्घ श्वास घ्यावा लागतो. अन्तःकुंभक झालेल्यांना दीर्घ सुस्कारा टाकावा लागतो.** राजाने दीर्घ श्वास घेतला. याने ठरते की फुफ्फुसे बाहेरच्या हवेसाठी आर्त झाली होती. बाह्यकुंभक झाला होता. छाती शोकाने दडपली होती. **(क) म्हणे मर्मि मारि असि घाव** - मनातच म्हणाले. **असि = तलवार = कैकयी.** पुढील चौपायांतच राणीला नंगी रोष तलवार म्हटले आहे. डोळे उघडताच राजाला तलवार दिसली. कशी दिसली ते पुढे सांगतील. रामाला वनवासास पाठविणार हा मर्मावर, माझ्या हृदयावरच घाव केला जाणार तेव्हा आता जगण्याची आशाच नाही. कारण ही दुधारी तलवार आहे. पट्टा आहे. राम वनात जाणे हे एकच कारण मला ठार मारण्यास पुरेसे आहे. शिवाय तसे मी सांगण्यात सत्याचा लोप करण्याची ही पाळी येणार ! म्हणूनच दशरथाने आपल्या मुखाने वनवासाची आज्ञा रामाला दिली नाही. राज्याभिषेक करतो असे ज्या मुखाने म्हटले त्याच मुखाने वनात जाण्याची आज्ञा देण्याने सत्याचा लोपच केला गेला असता. या दोह्यांतील 'असि'चा अर्थ असिने असा काही टीकाकार करतात; पण तो सुसंगत नाही कारण कैकयीलाच पुढल्याच चौपाईत तलवार म्हणत आहेत.

हिं. *। आगें दीखि जरत रिस भारी । मनहुँ रोष तलवार उघारी ॥१॥*
*। मूठि कुबुद्धि धार निठुराई । धरी कूबरीं सान बनाई ॥२॥*
*। लखी महीप कराल कठोरा । सत्य कि जीवनु लेइहि मोरा ॥३॥*

म. *। क्रोधें जळत पुढें बहु दिसली । जणूं रोष-तरवार उपसली ॥१॥*
*। मूठ कुबुद्धि धार निष्ठुरता । कुबडि-सहाणेवर पाजवतां ॥२॥*
*। लखि महीप कठोर कराला । सत्य किं घेइल मम जीवाला ॥३॥*

**अर्थ :** (डोळे उघडताच राजाला) आपल्या पुढे क्रोधाने (रोषाने) फार जळत असलेली (कैकयी) जणू काय रोषरूपी उपसलेली (नंगी) तलवारच दिसली.॥१॥ (तिची) दुर्बुद्धि ही मूठ असून निष्ठुरतारूपी धार कुबडीरूपी साहणेवर पाजविली गेल्याने.॥२॥ महिपाला (पृथ्वीपतीला) ती कठोर व विक्राळ दिसली व लक्षात आले (वाटले) (की) ही खरोखर माझा जीव घेणार की काय?॥३॥

**टीका. चौ. १ - (१) पुढें दिसली** - डोळे उघडले तोच राजाला कैकयी आपल्या पुढे समोर दिसली. कशी दिसली? क्रोधे बहु जळत असलेली दिसली. डोळे लालबुंद झालेले, भिवया वर चढल्या आहेत. ओठ व हात थरथरत आहेत आणि मुद्रा अत्यंत लाल व उग्र झाली आहे. **'ऐकुनि नृपवच लक्ष्मण फिरवित । दृष्टी... ॥ अरुण नयन भृकुटी कुटिल । निरखिति नृपां सकोप'** (१।२६७) हे जरा क्रुद्ध झालेल्या लक्ष्मणाचे वर्णन आहे. ही राणी तर क्रोधानें जळत आहे. (क) **जणूं रोष तरवार उपसली** - उपसली = उपसलेली, म्यानातून सर्रकन् बाहेर काढलेली. म्यानात असेपर्यंत - गुप्तीत असलेली - तरवार दिसत नाही. गुप्त असते. तसाच कैकयीचा रोष गुप्त होता. कशात-कोणत्या गुप्तीत-लपविला होता हे कळले म्हणजे गुप्ती (म्यान) कोणती या विषयी मतभेद राहणार नाही. **'मग, वर कपटी स्नेह वाढवुनि । विहसुनि वदे नयन मुख मुरडुनि'** (२७।८) वरवरचा - **दिखाऊ कपटी स्नेह हीच गुप्ती** (तलवार गुप्त असलेली हातात धरण्याची सुंदर काठी)

(२) **ही रोषरूपी तलवार कोणी उपसली** - कोणी काढली बाहेर? **'हत नारी विश्वासिं'** नारीवर जो फाजिल विश्वास ठेवला त्यानेच ही तलवार उपसली. त्या त्या दिखाऊ स्नेहावर विश्वास ठेवला नसता तर पुढील गोष्टी घडल्याच

नसल्या हे त्या (२९) दोहयाच्या टीकेत दाखविले आहे. राजाला कैकयी म्हणजे रोषरूपी नंगी तलवारच वाटली.

**चौ.२** - तलवारीचे सांगरूपक येथे पूर्ण करतात. तलवारीला मूठ नसेल तर ती हातात धरता येणार नाही. कैकयीची **कुबुद्धि** - दुष्ट बुद्धि - हीच **मूठ** आहे. सवतीचा सूड घेण्याची दुर्बुद्धि कैकयीला झाली नसती तर नारी विश्वास ही तलवार वापरू शकला नसता. 'बीज विपत् वर्षा ऋतू किंकरि । कैकइ - कुमतिच बने भूमि बरि' (२३।५) असे पूर्वी म्हटले आहे. (क) उपसणारा, म्यान, तलवार व तिला मूठ इतके सर्व असून तलवारीला तीक्ष्ण धार नसेल तर ती निरुपयोगी ठरेल. निष्ठुरपणा ही तीव्र धार आहे. भाव हा की कैकयीच्या (स्वभावातील) रोषाला **निष्ठुरता रुपी धार आलेली आहे**. राजाने कितीही विनवण्या केल्या, मी मरेन, तू विधवा होशील, भरत राज्य स्वीकारणार नाही इ. सांगितले तरी तिला मुळीच दया येणार नाही. व रामवनवास-वरात ती जरासुद्धा कमीपणा येऊ देणार नाही. ही धार कैकयीच्या रोषाला पूर्वीसुद्धा थोडी होतीच. ती कौसल्येला छळीत असे असे जे वा.रा. आधारे पूर्वी दाखविले आहे ते येथे कवींनी ध्वनित केले आहे. कैकयी रागीट होती हे **'नित्यक्रोधतया तस्याः कथं तु खर-वादितम् ॥ कैकेय्या वदनं द्रष्टुं पुत्र शक्यामि दुर्गता'** (वा.रा. २।२०।४४) नित्य क्रोधी व स्वर-कठोर भाषण करणारी ती होतीच. **'रुसणें भारी प्रिय तुजला गे'** (२८।१) असे मानसांत - दशरथच म्हणाले आहेत. **'निष्ठुरतेप्रति गमन करि जणुं कीं स्नेह सुदेहि'** (२।२४). क्रोध, निष्ठुरता व दुर्बुद्धी कैकयीच्या स्वभावात होतीच पण राजाला दुर्बुद्धि व निष्ठुरता यांचा अनुभव स्वतःच्या बाबतीत आला नव्हता तो आता येणार आहे. (ख) धार मूळची असली तरी तिचे पाणी उतरले असेल किंवा गंजून बोथट झाली असेल तर लढाईवर जाण्यापूर्वी किंवा कोणावर वार करण्यापूर्वी चांगले पाणी देऊन पाजवावी लागते. त्यास सहाण (निसणा) लागते. ती नसेल तर धार तीक्ष्ण होत नाही. म्हणून सांगतात की रोषतलवारीची निष्ठुरताधार कुबडीरुपी साहणेवर घासून चांगली पाणीदार, तीक्ष्ण व लखलखीत केली आहे. धार देणारा किंवा देणारी कोणीतरी पाहिजे. तो उल्लेख कवींनी केलेला नाही.

निष्ठुरतेला ज्याने तीक्ष्ण व पाणीदार केली तीच व्यक्ती धार देणारी ठरणार. 'कैकयिकुमतिच बने भूमि बरि ।। **पडत कपटजळ** अंकुर फुटतो ।। (२३।५-६). जल = पाणी. येथेसुद्धा पाणी येण्याचा व वृद्धी करण्याचा व कैकयीचा संबंध वरील अवतरणांप्रमाणे आहेच. कपट हे तलवारीचे पाणी आहे हे मानसाधारेच ठरले. पाणी, **धार देणारी व्यक्ती भवितव्यता** - भावी **किंवा सरस्वती** आहे. कुबडीची बुद्धि देवांनी प्रेरित सरस्वतीनेच फिरविली आहे.

**चौ.३ - (१) लखि महीप कराल कठोरा** - ही कैकयीरूपी रोष तलवार राजाला फारच कठोर व विक्राळ-भयंकर वाटली; इतकी की मर्मावर झालेला हिचा वार (घाव) माझा जीव घेतल्याशिवाय राहणार नाही अशी राजाची खात्री झाली. भाव हा की राणीचा रोष व निष्ठुरता कमी होण्याचे लक्षण दिसले नाही. कठोर भाषण रूपी हिचे घाव एकावर एक बसणार व **बहुधा** माझा जीव घेणार असे राजाला वाटू लागले. 'कामाचें बल नारि' आणि 'क्रोधा बल परुषाक्षरें' कैकयीने आणखी पुष्कळ वार केले आहेत राजाच्या मर्मावर. 'परिसुनि मृदुवच कुमति **अति जळे** । जणुं अनलामधिं घृताहुति गळे । (२३।४) पासून 'रोषतरंगिणि जणुं अति फुगली' (३४।१) पर्यंत. तै कैकइ **कटु** कठोर **वदते** । जणूं क्षतामधिं **विषा घालते**' (३५।३) **(क) महीप**- महीचे पालन करताना रणात दानवांच्या तलवारींनी व शस्त्रास्त्रांनी ज्यांना मरणभीती वाटली नाही त्यांना या रोषतलवारीची भीती वाटत आहे ! **(ख) सत्य किं** - किं हा शब्द बुडत्याला काडीच्या आधाराप्रमाणे आशेचा अति अल्पांश दाखवितो; म्हणूनच राजा तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहणार आहे. आशेचा अल्पांश म्हणजे हा रोष खराच की शृंगारलीलांतला एक विनोदी भाग आहे याचा निर्णय अजून राजाला करता आलेला नाही; त्यामुळेच राजाचा विश्वास अजून उडत नाही. तो उडाला असता तर तलवारीचे आणखी वार कोणी केले असते? विश्वास आहे हे पुढे स्पष्ट दिसत आहे. (तलवार उपसणारा कोण याचा विचार टीकाकारांनी मुळीच केला नाही.) रूपकाचे व्यवस्थित विश्लेषण करता आले म्हणजे मानसाधारेच कवीचे हृद्गत कसे बाहेर पडते हे पाहण्यासारखे आहे. खाली या रूपकाची कोष्टक रूपाने तुलना केली आहे.

## जणू रोष तलवार उपसली (३१।१-३)

| | | |
|---|---|---|
| उपसलेली रोषतलवार | १ | रुष्ट झालेली कैकयी |
| तलवारीची मूठ | २ | कैकयीची कुबुद्धि |
| उपसणारा (व गाजविणारा एकच) | ३ | राजाचा कैकयीवरील अति विश्वास |
| गुप्ती (म्यान) | ४ | दांभिक कपटी स्नेह व हावभाव |
| तीक्ष्ण धार | ५ | निष्ठुरता |
| पाणी | ६ | कपट |
| पाजविण्याची सहाण | ७ | कुबडी |
| पाजविणारी व्यक्ति | ८ | भवितव्यता, सरस्वती |
| वार ज्यावर करणार ती व्यक्ति | ९ | दशरथ राजा |

हिं. *। बोले राउ कठिन करि छाती । बानी सबिनय तासु सोहाती ॥४॥*
*। प्रिया बचन कस कहसि कुभाँती । भीर प्रतीत प्रीति करि हाँती ॥५॥*
*। मोरें भरतु रामु दुइ आँखी । सत्य कहउँ करि संकरु साखी ॥६॥*

म. *। कठिण करुनि छाती नृप वदती । वाणी सविनय तिज आवडती ॥४॥*
*। प्रिये ! वदसि कसं भलत्या रीतीं । भीरु ! सोडुनी प्रचिती प्रीती ॥५॥*
*। भरत राम दोन्ही किं ममाक्षी । सत्य सांगतो शंकर साक्षी ॥६॥*

**अर्थ :** छाती कठीण करून तिला (कैकयीला) आवडणारी अशी विनययुक्त वाणी राजा बोलू लागले.॥४॥ प्रिये ! भीरु ! प्रचीती व प्रीती यांचा त्याग (विनाश) करून तू भलत्याच प्रकारे कसे बोललीस?॥५॥ मी शंकरांना साक्षी ठेऊन सांगतो की भरत व राम हे दोन्ही माझे डोळे आहेत.॥६॥

**टीका. - चौ. ४ - (१) छाती कठीण करुनि -** रामवियोगभयाने व शोकाने दशरथांच्या छातीचे (हृदयाचे) पाणी पाणी झाले होते. धीराच्या बर्फाने ती कठीण - घट्ट - केली, तेव्हा कुठे तोंडातून शब्द उच्चारण्याची शक्ती आली. **सविनय =** विनययुक्त - नम्रतायुक्त. राणीने आपली छाती कठोर - कठिण

- केली तेव्हा ती कठोर कटु वचने बोलली. पण छाती कठिण करून सुद्धा राजाला कठिण-कठोर-बोलवेना. कैकयी प्रसन्न होत नाही, तिचा रोष कामचेष्टांतला नसून खरा आहे अशी पक्की खात्री होईपर्यंत तिला न आवडणारे राजाला बोलवणार नाही. उलट **(क) ववती बाणी तिज आवडती** - मानिनि असून भामिनी (कोपना) असणाऱ्या स्त्रियांना पतीकडून अनुनय विनय करवून घेणे फार आवडते. कैकयी अशीच असल्याने राजा विनयाने तिला आवडणारे बोलून तिचा अनुनय करीत विनवित आहेत. **(ख)** प्रिये, भीरु हे तिला आवडणारे शब्द होते. भरत तिला रामापेक्षा अधिक प्रिय वाटू लागलेला पाहून पुढे 'रामभरत' न म्हणता 'भरतराम' असे म्हणणार आहेत; पण **'पयः पानं भुजंगानां केवलं विषवर्धनम्'** असा अनुभव राजाला येणार आहे. गोड शब्दांनी तिला प्रसन्न करून दुसरा वर बदलून घेण्याचा प्रयत्न करीत आहेत. हा राजनैतिक हेतु यात नसता तर 'भरतराम' असे राजाने कदापि म्हटले नसते. **येथे स्त्रैणपणा नसून राजनीति आहे.** बुडत्याला काडीचा आधार तसा प्रयत्न आहे.

**चौ.५ - (१) प्रिये वदसि कसं भलत्या रीतीं - प्रिये** - तूं माझी प्रिय पत्नी असून मला दुःख शोकसागरात बुडावे लागेल असे भलत्याच प्रकाराने कसे बोलतेस - बोललीस? भाव हा की तू असे खरोखर बोलशील असे मला अजून वाटत नाही. **(क) भलत्या रीतीं** - अधर्माचा, असत्याचा वगैरे आरोप माझ्यावर करणे व रामाला वनवासात पाठविण्याची भाषा बोलणे तुझ्याकडून कधी घडले नव्हते, घडेल असे वाटत नव्हते. आजच कसे घडले? **(ख) भीरु** = भित्री. स्त्रियांच्या सहज स्वभावातील आठ गुणांपैकी भीरुता - भित्रेपणा हा एक आहे. **'भित्रा नारीस्वभाव साचें । मंगलांत भय मन अति काचें'** (५।३७।२) भाव हा की भरताला राज्य मागितलेस यांत काही विशेष नाही. अतिलोभ हा एक दुसरा गुण आहेच; पण रामाला भिण्याचे तुला काय कारण? वा.रा. २।१२ मध्ये दशरथ तिला म्हणतात - **'तस्य धर्मात्मनो देवि वने वासं यशस्विनः ॥ कथं रोचयसे भीरू नव वर्षाणि पञ्च च॥२२॥ तस्मिन्नार्जवसंपन्ने देवि देवोपमे कथम् ॥ पापमाशंकसे रामे महर्षिसम तेजसि ॥३१'** मधल्या श्लोकांत रामाच्या विविध सद्‌गुणांचे व त्याने केलेल्या कैकयीच्या सेवेचे वर्णन आहे. भाव हा

की आजच रामाने तुझा कोणता अपराध केला की त्याच्या विषयी तुला भीती वाटू लागली? (ग) दुसरा भाव हा की तू स्वभावभीरू असून रामवनवासाचा वर मागताना तुला भीती कशी वाटली नाही. तुझा रामावरील विश्वास (प्रतीति) उडाला की काय? का रामावरील तुझी प्रीति साफ नष्ट झाली? (घ) मला प्राणप्रिय म्हणणाऱ्या तुला मी खरोखरच प्राणप्रिय असून दुसरा वर देण्याने मला प्राणान्तिक क्लेश होतील अशी भीती तू पतिव्रता, प्रियतम पत्नी असून कशी वाटली नाही? माझ्यावरील ह्या तुझ्या विश्वासाचा (प्रचिती-प्रचीति - विश्वास - प्रतीति) व प्रीतीचा तू त्याग केलास की काय? ल.ठे. **हिंदीतील 'भीर'** चे दोन-तीन अर्थ संभवतात. भीर = गर्दी, दाटी या अर्थानेच हा शब्द मानसांत १० ठिकाणी वापरला आहे. ७।१३० मध्ये भीती - (भीः) या अर्थाने वापरला आहे व येथे भीरू = भित्री या अर्थाने वापरला आहे. गर्दी, दाटी हा अर्थ येथे अशक्य आहे. वा.रा. या प्रसंगीच 'भीरू' वापरलेला वर दाखविला आहे. 'भीरू' शब्दात भीतीचा अन्तर्भाव होतोच. (ङ) मी भरताला राज्य देत नाही असे तुला का बरे वाटले? माझ्यावरील विश्वास उडाल्यानेच की आणखी कशाने? मी इतका शोक-दुःख विव्हळ झालो असता कटु कठोर भाषणाने मर्मताडन केलेस ते माझ्यावरील तुझे प्रेम (प्रीति) नष्ट झाल्याचे चिन्हच नव्हे काय? सार हे की माझी प्राणप्रिया, प्रियतम पत्नी, तू असे खरोखर करशील असे मला वाटत नाही अजून, तू थट्टेचा अतिरेक करीत असशील इतकेच मला वाटत आहे. शब्द लाघवांत किती अर्थगौरव आहे !

**चौ. ६ - (१) भरत राम दोन्ही किं ममाक्षी** - भरत व राम मला सारखेच वाटतात; हे तुला माहीत नाही की काय? स्वतःच्या दोन डोळ्यांपैकी एक अप्रिय व एक प्रिय असे कधी कोणाचेच होऊ शकत नाही. तसेच माझे भरत व राम यांविषयी आहे. (क) मनुष्याला आपले दोन्ही डोळे जितके प्रिय तितके हे दोघे मला प्रिय आहेत. दोन्ही डोळे शाबूत, सुखांत असले तरच शोभा व सुख असते तसेच मला शोभादायक व सुखदायक हे दोघे आहेत. एका डोळ्याला दुःख झाले की त्या व्यक्तीलाही दुःख होतेच. (ख) एका डोळ्यापासून दुसऱ्याला जशी भीती नसते तशी भरताला रामाची किंवा रामाला भरताची

मुळीच भीती वाटत नाही. (ग) एक डोळा जसा दुसऱ्या डोळ्याला दुःख देऊ शकत नाही तसेच माझ्या भरतराम डोळ्यांचे आहे. पण एका डोळ्याला पाणी आले की जसे दुसऱ्याला येते तसेच राम दुःखाने भरत व भरत दुःखाने राम दुःखी होणार आहेत. (घ) राम ज्येष्ठ पुत्र असल्याने रामभरत म्हणावयास हवे होते; पण भरतराम का म्हटले हे पूर्वी दाखविले आहे. (२) **शंकरसाक्षी सत्य सांगतो** - शंकरांससुद्धा माहीत आहे; ते सुद्धा असेच सांगतील की - ।। भरतराम दशरथ-भूपाक्षी ।। येथे शंकरांची शपथ घेऊन पुन्हा तिचा विश्वास संपादन करू बघत आहेत. (क) जी ज्याची उपास्य देवता असेल तिचीच साक्ष तो देतो; म्हणून **दशरथांचे इष्ट देव शिव-शंकर हे येथेही सिद्ध झाले**. या चरणाचा संबंध पुढील चौपाईशी पण आहे.

**हिं.** ***। अवसि दूत मैं पठइब प्राता । ऐहहिं बेगि सुनत दोउ भ्राता ।।७।।***
***। सुदिन सोधि सबु साजु सजाई । देउँ भरत कहुँ राजु बजाई ।।८।।***

**म.** ***। धाडिन नक्कि उदयिं दूतांतें । ऐकत येतिल वेगें भ्राते ।।७।।***
***। सुदिन बघुन सब साजां सजवूं । सोत्सव भरता राज्यीं बसवूं ।।८।।***

**अर्थ :** (सकाळी) सूर्योदय होताच मी दूतांना नक्की पाठवितो व (आज्ञा) ऐकताक्षणीच ते दोघे बंधू वेगाने निघून येतील.।।७।। मग शुभ दिवस पाहून सर्व साज सजवू व उत्सवाने, मोठ्या थाटाने - भरताला राज्यावर बसवू (मग तर झाले ना तुझ्या मनासारखे) ।।८।।

**टीका.** - तू मागितलेला पहिला वर दिला असे नुसते मोघम न सांगता या दोन चौपायांत स्पष्ट सांगतात की जरा सुद्धा विलंब न लावता भरताला राज्य देतो. तो येथे असता तर याच मुहूर्तावर सुद्धा दिले असते. उजाडण्याची खोटी की दूत पाठवितो व असे पत्र लिहितो की आज्ञा कानी पडताच क्षणाचाही विलंब न लावता भरत-शत्रूघ्न शक्य तितक्या त्वरेने येतील, यांत शंका किंवा चिंता बाळगण्याचे काही कारण नाही. (क) भरत आल्यावर जो अगदी उत्तम पहिला मुहूर्त मिळेल तो धरू. मुळीच दिरंगाई करणार नाही. एखादे शुभ कार्य - धर्म कार्य - करण्यास शुभ दिवस वगैरे न पाहिल्यास अनपेक्षित विघ्ने येतात. नाहीतर आला की त्याच दिवशीसुद्धा राज्याभिषेक

केला असता. सर्व तयारीही पुन्हा करावी लागणारच. अगदी परमानंदाने मोठ्या थाटामाटाने भरतास राज्य देऊ. भाव हा की रामराज्याभिषेक मी जेवढ्या आनंदाने करणार होतो तितक्याच आनंदाने व उत्साहाने भरताला राज्याभिषेक करीन. भरतराम हे दोन डोळे आहेत असे जे सांगितले त्यास अनुसरून हे सांगणे अगदी योग्यच आहे. व दशरथांनी असे केलेही असते. २०७।४ पहा. भरताने हे मान्य केले असते की नाही हे सांगणे फार कठीण आहे. एकीकडे राजाज्ञा व वडिलांची आज्ञा व दुसरीकडे रामचंद्रांचा न्याय्य हक्क बुडवून कुलपरंपरेला पायाखाली तुडविणे; अशा मोठ्या धर्मसंकटात तो पडला असता; व त्याने कैकयीला सांगवून रामालाच राज्य देवविले असते असे भरताच्या स्वभावावरून सहज अनुमान करता येते. दोघे सारखेच प्रिय असता रामालाच राज्य देण्याचे का ठरविले याचे सत्य व संयुक्तिक कारण सांगतात –

**हिं.दो.** ***। लोभु न रामहि राजु कर बहुत भरत पर प्रीति ।***
***॥ मैं बड़ छोट बिचारि जियँ करत रहेउँ नृपनीति ॥३१॥***

**म.दो.** ***। राज्यलोभ रामा नसे भरतीं परमा प्रीति ॥***
***॥ करुनि विचारा ज्येष्ठ लघु अनुसरलो नृपनीति ॥३१॥***

**अर्थ :** रामाला राज्यलोभ मुळीच नाही व त्याची भरतावर परम (अत्यंत) प्रीति आहे; पण मीच लहान मोठा हा विचार करून राजनीतीचे पालन करीत होतो.।।दो. ३१।।

**टीका. दो.** - भरताला राज्य दिल्यावर रामाला वनात धाडण्याची आवश्यकता नाही हे येथे ध्वनित करतात. रामाला राज्याचा लोभ असता तर आपली सत्ता, ऐश्वर्य इ. भरताने व त्याच्या आईने अनीतीने व अन्यायाने लुबाडले असे वाटून तो भरताचा व तुझा वैरी बनणे कदाचित शक्य झाले असते; पण **रामाला राज्याचा लोभ लेशमात्र नाही.** त्यामुळे भरताच्या सत्तेत राम मुळीच ढवळाढवळ करणार नाही; म्हणून भरतास राज्य मिळाले की रामाची भीती बाळगण्याचे मुळीच कारण नाही. 'राम नसति कीं राज्यबुभुक्षू । धर्मधुरीण विषयरस-रुक्षू' (२।५०।३) असे कैकयीच्या प्रिय सखी म्हणतात. 'राम पुनीत, विषयरस-रुक्षू' (२।१७९।७) असे भरत म्हणतात. कौसल्या व नगरांतील सर्व पुरुष यांचेसुद्धा असेच मत आहे

व प्रत्यक्ष वस्तुस्थिती अशीच असल्याचे पुढे दिसेलच. मंगलाचरणांतच (श्लो.२) हे सांगितले आहे. **(क) भरतीं परम प्रीति** - रामाला स्वतः राज्यलोभ नसला तरी भरतावर त्यांचे प्रेम नसून लक्ष्मणावर आहे म्हणून लक्ष्मणासाठी राम भरतविरोध करील असे कैकयी कदाचित म्हणेल म्हणून हे वाक्य आहे. भाव हा की भरतास राज्य मिळाल्याने रामाला विशेषच आनंद होईल. 'कोण जगीं प्रिय सम भरता ही' (७।७) असे रामच सीतेला म्हणाले आहेत. इतरांची या विषयी वचने पुढे दिसतीलच. हे सर्व सांगण्यात हेतु हा आहे की 'मला राज्य द्या' असे रामाने मला सांगितले नाही हे कैकयीला पटवून देणे.

(२) **करुनि विचारा ज्येष्ठ लघु अनुसरलो नृपनीति** - मी स्वतःच्याच विचाराने रामराज्याभिषेकाचा बेत केला व तो पक्षपाताने, अन्यायाने, अनीतीने, द्वेषाने किंवा कुलपरंपरेला सोडून केला नाही व कोणीही मला तसे करण्यास भाग पाडले नाही, हे येथे सुचवितात. राणीच्या मनातील हेतूंची थोडीथोडी जाणीव आता राजास होऊ लागली आहे हे येथील व पुढील वचनांवरून स्पष्ट दिसते. 'आपल्याला न विचारता रामाच्या व कौसल्येच्या मताने राजाने भरत नसता ही घाई जाणून बुजून केली, असे राणीला वाटत असावे असा राजाचा तर्क आहे. पण कैकयीच्या या समजाच्या मुळाशी मत्सर, द्वेष, सूड इ. दुष्ट हेतु असेल असे राजाला अजून वाटत नाही. तिला प्रथम न विचारता कौसल्येला विचारले या संशयानेच रुष्ट झाली आहे. पुन्हा असे करणार नाही वगैरे कबुल्या माझ्याकडून घेऊन मग ही म्हणेल की 'कशी घटकाभर थट्टेने मौज केली?' असे राजाला वाटत आहे. **'मी कृत तुज पुसल्याविण सगळे'** या दशरथवचनाने सिद्ध होते. आवडत्या बायकोला आधी न विचारता नावडतीला आधी विचारले म्हणजे आवडत्या बायका कालिका बनतात; पतीचे आपल्यावरील प्रेम कमी होऊन सवतीवर बसले या संशय पिशाचाने पछाडल्या जाऊन पतीवर अशी क्रोधाची आग पाखडतात की त्याने पुन्हा जन्मात सवतीकडे ढुंकूनसुद्धा पाहू नये. त्यातलाच हा प्रकार आहे असे राजा समजत आहे. हे **'रुष परिहासिं किं खरोखर असे'** (३२।५) या प्रश्नावरून ठरते. **(क) करुनि विचारा ज्येष्ठ लघु** - **'स्वामी ज्येष्ठ बंधु लघु सेवक । हा दिनकरकुळिं शोभन**

**दंडक ॥... त्यांस तिलक कां क्षोभ तुला बरं?'** (१५।३,८) असे कैकयीनेच आरंभी कुबडीला विचारले आहे. ही जी कुलपरंपरागत नीति आहे तिचेच अनुसरण मी करीत होतो. **(ख) अनुसरलो नृपनीति** - मनुस्मृतीत राजधर्म प्रकरणातच सांगितले आहे की **'ज्येष्ठ एव तु गृह्णियात पित्र्यं धनमशेषतः ॥ शेषास्तमुपजीवेयुर्यथैव पितरं तथा'** (९।१०५) अशी राजनीति आहे की ज्येष्ठ पुत्रानेच बापाचे सर्व धनादिक घ्यावे व बाकीच्यांनी त्याला पित्यासारखा मानून त्याच्यावर अवलंबून रहावे. 'ज्येष्ठो भ्राता पितुःसमः' (ही मनुप्रोक्त नीति जर तशीच चालू राहिली असती तर आज दिसणारी व संख्येत वाढत जाणारी ओसाड खेडी - ओसाड गावे (Deserted villages) मुळीच दिसली नसती. पित्याच्या मालमत्तेच्या समान वाटण्या सर्व पुत्रांत करण्याच्या पद्धतीने भाऊबंधकी, भांडणे, बंधुप्रेमाचा अभाव व खेडी, गावे ओसाड पडून शहरांची वस्ती बेसुमार वाढणे या समाजस्वास्थ्य विघातक, राष्ट्र-धर्म-विनाशक गोष्टी घडलेल्या दिसल्या नसत्या ! आता तर बहिणींना-कन्यांना ही समान वाटणी देण्याचा कायदा हुकमी बहुमताने पसार केला गेला आहे !) राजाच्या म्हणण्याचे सार हेंच की मी अधर्म, पक्षपात इ. कांही केले नाही. तुलाच राज्यलोभ उत्पन्न झाला आहे की काय अशी शंका डोकावू लागली आहे. कैकयीच्या मनातील मुख्य संशय दूर करण्याचा प्रयत्न आता करतात -

*हिं.* *। राम सपथ सत कहउँ सुभाऊ । राममातु कछु कहेउ न काऊ ॥१॥*
*। मैं सबु कीन्ह तोहि बिनु पूँछें । तेहि तें परेउ मनोरथु छूछें ॥२॥*
*। रिस परिहरु अब मंगल साजू । कछु दिन गएँ भरत जुबराजू ॥३॥*
*। एकहि बात मोहि दुखु लागा । बर दूसर असमंजस मागा ॥४॥*
*। अजहुँ हृदय जरत तेहि आँचा । रिस परिहास कि साँचेहुँ साँचा ॥५॥*

*म.* *। वदें स्वभावें राम-शपथ शत । रामजननि कधिं कांहिं न सांगत ॥१॥*
*। मी कृत तुज पुसल्याविण सगळें । म्हणुन मनोरथ धुळीस मिळाले ॥२॥*
*। रोष सोड, कर उत्सव - साजा । अल्पचि दिवसिं भरत युवराजा ॥३॥*
*। एक चि गोष्ट दुःखिं मज पाडित । अडचणिचा वर दुसरा याचित ॥४॥*
*। अजुनि आँच ती उर जाळितसे । रुष परिहासिं किं खरोखर असे ॥५॥*

**अर्थ :** रामाची शपथ शंभर वेळा घेऊन तुला सांगतो की रामाच्या मातेने मला कधीच काहीसुद्धा सांगितले नाही.।।१।। तुला न विचारता मीच सगळे केले; त्यामुळे माझे सर्व मनोरथ धुळीस मिळाले (फोल ठरले) ।।२।। आता हा सर्व रोष दे सोडून नी कर पाहू उत्सवाची तयारी (साज); थोड्याच दिवसांत भरत युवराज (झाला म्हणून समज).।।३।। एकाच गोष्टीने मला दुःखात लोटला आहे, (ती ही की) दुसरा वर फार अडचणीचा मागितला गेला.।।४।। ती आग (आँच, ताप, दाह) अजूनसुद्धा (माझ्या) हृदयाला जाळीत आहे. (तेव्हा) तुझा हा रोष थट्टेतला आहे की अगदी खराच आहे? (सांग बरं एकदा).।।५।।

**टीका. - चौ. १ -** (१) मागील ओळींत रामाविषयी व स्वतःविषयी कैकयीच्या मनातील संशय (असल्यास) दूर करण्याचा प्रयत्न राजाने केला. या चौपाईत कौसल्येविषयी संशय दूर करू बघत आहेत. नुसते सांगून विश्वास बसणार नाही म्हणून रामशपथ घेतली. रामावर अत्यंत प्रेम आहे हे कैकयी जाणते म्हणून रामाची शपथ घेतली. पूर्वी अगदी अशीच शपथ घेतली तेव्हा राणीचा विश्वास बसला हे राजा विसरला नाही. 'भामिनि रामशपथ शत मजसी' (२६।६) वदूं काहिं कपटें जर तुजसी' हा त्या वेळचा पूर्वभाग येथे अध्याहृत आहे. **(क) रामजननि कधिं कांहिं न सांगत** - आजपर्यंत - कोणतीही महत्त्वाची गोष्ट करताना मी कधी राममातेला विचारले नाही व तिनेही कधी काहीसुद्धा सांगितले नाही. तुझ्याच विचाराने आजपर्यंत मी सर्व गोष्टी करीत आलो. राममाता कधी कसल्याही चौकशा करीत नाही, की कोणाच्या कसल्याही भानगडीत पडत नाही, असे राजाने अगदी खरेखरे सांगितले. पण राणीच्या मनात पक्का संशय भरवून दिला आहे मुख्यतः कौसल्येबद्दलच. 'आजोळीं भरतांस धाडले । रामजननिमतिं जाणां घडलें' 'कौसल्येमनिं तुम्हिं बहु सलतां' (१८।२,३,४) इत्यादी.

**चौ.२ - (१) मी कृत तुज पुसल्याविण सगळें इ.** - यांत रामाचा दोष नाही. राममाता दोषी नाही व मीही अधर्म, पक्षपात, कपट इ. काही केले नाही. फक्त एकच चूक माझ्याकडून घडली; कोणतीही गोष्ट तुला विचारल्यावाचून

मी कधी केली नाही; पण याच वेळी मजकडून ती नकळत घडली. त्यामुळे तुला आला संशय व आपला मोठा अपमान झाला असे वाटून तू भयंकर रुसलीस आणि त्याचा परिणाम मात्र फार भयंकर झाला. (क) नकळत घडलेल्या क्षुद्र चुकीवरून एवढे रागावणे काही बरे नाही; पण तुला तेच आवडते. परंतु त्यामुळे माझे सर्व मनोरथ धुळीस मिळाले हे लक्षात घे. हे तू दुष्टपणाने केलेस असे मला अजून वाटत नाही.

**चौ.३. (१) रोष सोड, कर उत्सव-साजा** - पण आता रागाचे काय कारण? मी भरताला राज्य देतो असे सांगितले ना? त्याबद्दल आनंद वाटून उत्साहाने, हसतमुखाने राज्याभिषेकाच्या तयारीस नको का लागायला? भरताला येण्याला असे किती दिवस लागणार? तरी आता हे क्रोधाचे सोंग पुरे झाले. ऊठ पाहू चटकन व लाग कार्याला. निष्कारण रुष्ट होऊन निर्दोष माणसांना नुसत्या संशयाने दोषी ठरवून कल्पनातीत असह्य शिक्षा करणे बरे नाही. भरताला राज्य दिल्याने कोणालाच वाईट वाटणार नाही. सर्व नगरी आयती, उत्तम शृंगारलेली आहेच. तू तुझ्या इच्छेप्रमाणे काय विशेष तयारी करायची ती कर. व हा तुझा महाल त्याप्रमाणे लवकर सुशोभित कर. (या व या पूर्वीच्या, राजाच्या प्रत्येक वाक्यानंतर रोषतलवार आंतल्या आंत खणखणाट करीत असेलच. ते सर्व विचार लवकरच प्रगट होतील.) भरताला राज्य मिळाले तरी कौसल्यादी सगळ्या राण्या, राम, नगरवासी स्त्रीपुरुष व मी या सर्वांनाच आनंद वाटेल.

**चौ. ४ - (१) एकच गोष्ट दुःखिं मज पाडित** - 'नसे भरत कीं पुत्र आपला' इत्यादी जे राणी म्हणाली त्यावर सांगतात की भरताला राज्य मागितलेस त्याचे मला मुळीच वाईट वाटले नाही. फक्त एका दुसऱ्याच गोष्टीने मला दुःखसागरात पाडला. राजा शोकाने प्राण सोडील या भीतीने राणीने 'रामवनवास' हे शब्द पुन्हा अजून वापरले नाहीत. त्याप्रमाणेच दशरथसुद्धा ते शब्द उच्चारण्यास घाबरत आहेत. 'राम वनवासी' हे शब्दच त्यांच्या परम दुःखाला कारण झाले आहेत. **(क) अडचणिचा वर दुसरा याचित** - कोणती गोष्ट ते येथे सांगितले पण 'राम वनवास' हा उच्चार करवला नाही. नाही म्हणावे तर प्रतिज्ञाभंग

होतो. हो म्हणावे तर सत्याचा लोप होतो व रामवियोग होतो. असे धर्मसंकट आणि मरणापेक्षा अधिक दुःख त्या दुसऱ्या वराने ओढवले आहे. तुला विचारले नाही या एका क्षुद्र चुकीसाठी इतका वेळ इतकी भयंकर शिक्षा दिलीस तेवढी पुरे झाली. विचारले नाही त्याचा अपार अनुपम मोबदला तुझ्या पदरात पडलाच म्हणायचा. भरताला राज्य ही काही लहानसहान लाभाची गोष्ट नाही. दुसरा वर मागितलास त्याची आवश्यकताच नाही. भरताशी वैर-विरोध करणारी एकही व्यक्ती माझ्या राज्यात नाही. मग दुसरा अडचणीचा वर का मागितला? मला शिक्षा करण्यासाठीच ना? इतका वेळ भोगली तीच फार झाली !

**चौ.५ - (१) अजुनि आँच ती उर जाळितसे** - त्या दुसऱ्या वरानेच वियोगानलाच्या ज्वाळा माझ्या हृदयांत पेटविल्या व त्यांनी ही छाती अजून (एवढा वेळ झाला, दुसरा वर मागण्याची आवश्यकता नाही इ. समजावून सांगितले तरी -) जळत आहे. इतकी भयंकर शिक्षा झाली ! आता आणखी नको. (क) **रुष परिहासिं किं खरोखर असे** - मला अजूनही असे वाटत नाही की हा तुझा रोष (रुष) खरा आहे. केवळ थट्टेने, माझ्या चुकीबद्दल मला थोडा वेळ अद्दल घडविण्यासाठीच हा असावा असे वाटते. काय असेल ते सांगून टाक एकदा. हा रोष खराच आहे का केवळ विनोद आहे? विनोदाला तरी काही सीमा असतेच. आता परमावधी झाली. हा रोष खरा असेल तर -

***हिं. । कहु तजि रोषु राम अपराधू । सबु कोउ कहइ रामु सुठि साधू ॥६॥***
***। तुहूँ सराहसि करसि सनेहू । अब सुनि मोहि भयउ संदेहू ॥७॥***
***। जासु सुभाउ अरिहि अनुकूला । सो किमि करिहि मातु प्रतिकूला ॥८॥***
***म. । त्यज रुष वद किं राम-अपराधू । सकलहि वदति राम अति साधू ॥६॥***
***। तूंही स्तविशी करिशी स्नेहा । तव वच उपजवि मनिं संदेहा ॥७॥***
***। यत्स्वभाव अनुकूल हि अरिला । तो किं करी प्रतिकूल आईला ॥८॥***

**अर्थ :** रोष सोड व रामाचा अपराध कोणता तो सांग तरी. सगळे लोक म्हणतात की, राम अत्यंत साधु आहेत.॥६॥ तू सुद्धा रामाची प्रशंसा करीत असतेस व त्याच्यावर स्नेह करतेस; (परंतु) तुझ्या (या आजच्या) वचनाने माझ्या मनात संदेह उठू लागला आहे.॥७॥ ज्याचा स्वभाव शत्रूला सुद्धा

अनुकूल (कृपा करणारा) आहे, तो आईला (मातेला) प्रतिकूल असलेले कसे करील? (मातेशी विरोध करील काय?).॥८॥

**टीका. - चौ.६ - (१) त्यज रुष, वद** - रोष क्रोध; याचा पगडा मनुष्याच्या मनावर असेपर्यंत त्याला निःपक्षपाताने विचार करता येत नाही. त्याला सत्यासत्य, दोष, गुण, हित-अहित इत्यादींचा यथार्थ बोध होत नाही; म्हणून सांगितले की 'आधी क्रोध बाजूला ठेव व मग रामाने काय अपराध केला तो सांग. 'ज्या अपराधास्तव वनवासासारखी भयंकर शिक्षा ठोठावलीस' असे म्हणण्यास राजाला धीर करवेना. भाव हा आहे की रामाकडून काही अपराध घडणेच शक्य नाही. हे मीच म्हणतो असे नव्हे. **(क) सकलहि म्हणति राम अति साधू** - साधूंकडून कधीतरी चुकून एखादा अपराध घडणे शक्य आहे पण राम अति साधु असल्या कारणाने तेहि शक्य नाही. सर्व लोकच असे म्हणतात. सर्व म्हणजे आमचे शत्रू, मित्र, उदासीन, नगरांतले व राज्यातले सर्व लोक. **'सेवक सचिव सकल पुरवासी । जे अमचे अरि मित्र उदासी ॥ प्रिय मज राम तसे सर्वांप्रत** (२।३।२-३) **'वैरीही रामाला स्तवती'** (२।२००।७).

**चौ.७ - (१) तूंही स्तविशी करिशी स्नेहा** - तू सुद्धा रामाची नेहमी भरपूर प्रशंसा करीत होतीस व माझ्यासारखेच तुझे रामावर शुद्ध प्रेम होते; पण जो दुसरा वर मागितलास त्यामुळे शंका येऊ लागली आहे की खराच स्नेह करीत होतीस का वरवर दाखवीत होतीस? **(क)** कालपर्यंत अघळ पघळ प्रशंसा करून प्राणांपेक्षा अधिक स्नेह करणारी तूच आणि हा दुसरा वर मागणारी पण तूच. तेव्हा अशी शंकाही डोकावते की रामाने काही अपराध केला की काय? अपराध काय केला ते कळले तर चौकशी करून योग्य शिक्षा देता येईल. राजपुत्राने अपराध-गुन्हा केला तर राजाने त्यालाही शिक्षा केलीच पाहिजे. अपराध नसता कोणालाही शिक्षा करणे मोठा अन्याय आहे. **'अदण्ड्यान् दण्डयन् राजा दण्ड्यांश्चैवाप्यदण्डयन् ॥ अयशो महदाऽप्नोति देहान्ते निरयं व्रजेत्'** पण पुन्हा वाटते की रामाविषयी असा संशय घेणे योग्य नाही, कारण -

**चौ.८ - (१) यत्स्वभाव अनुकूल ही अरिला** - जो शत्रूंवरसुद्धा कृपा करतो, शत्रूंवर सुद्धा उपकार करतो तो स्वतः मातेचा अपराध कसा करील? मातेच्या

विरुद्ध कसा वागेल? **'बैरीही रामाला स्तवती । भाषण-भेट-विनर्यि मन हरती'** (२००|७) **'रिपु-अहितहि कबिं सम नाचरति'** (२|१८३|६) असे भरत म्हणतात. रामाने काही अपराध केला या म्हणण्यावर कोणाचाही विश्वास बसणार नाही. **'तू अपराधा योग्य न ताता । जननी-जनक-बंधु-सुखदाता'** (४३|३) असे कैकयीच रामास म्हणणार आहे. **'नहि किंचिदयुक्तं वा विप्रियं वा पुरा मम ॥ अकरोस्त्वं विशालाक्षि तेन न श्रद्दधाम्यहम् ॥२०॥ ननु ते राघवस्तुल्यो भरतेन महात्मना ॥ बहुशो हि सुबाले त्वं कथाः कथयसे मम ॥२१॥** (वा.रा. २|१२) याचाच सारांश येथील सातव्या चौपाईत आहे. **(क) 'जीवलोको यदा सर्वो रामस्याह गुणस्तवं । अपराधं कमुद्दिश्य त्यक्ष्यामीष्टमहं सुतम् ।'** (वा.रा. २|१२|१०-११) याचाच सारांश येथील चौ. ६ मध्ये आहे. अ.रा. ३|२६-२७ शी अधिक साम्य आहे).

***हिं.दो.*** *। प्रिया हासरिस परिहरहि मागु बिचारि बिबेकु ॥*
*॥ जेहिं देखौं अब नयन भरि भरत राज अभिषेकु ॥३२॥*

***म.दो.*** *। प्रिये हासरुष सोडुनी माग करुनि सुविवेक ॥*
*॥ तर पाहिन डोळे भरुनि भरता नृपाभिषेक ॥३२॥*

**अर्थ :** प्रिये हा विनोदात्मक रोष सोड आणि चांगला (विचारपूर्वक) विवेक करून माग (दुसरा वर) तरच मी भरताला राज्याभिषेक झालेला डोळे भरून पाहीन (पाहू शकेन) ॥दो.३२॥.

**टीका दो. - (१) हास रुष सोडुनी - 'रुष परिहासिं किं खरोखर असे'** चौ. ५ मध्ये म्हटले. येथे हास व रिस (रुष) हे शब्द सुटे घेणे अनुचित आहे. सध्या ती रोषरूपी नंगी तरवार आहे. तेथे हास = हास्य कोठले? हासरिस = परिहास - रिस = विनोदांतील रोष. रोष खरा आहे असे म्हणण्याचे सोडले व हा रोष थट्टेइतकाच आहे असे मानून तो सोडण्यास सांगतात. **(क) खोटा क्रोध-भीती इत्यादी फार वेळ राहिल्यास त्यांना सत्य स्वरूप येते** व मग तो विकार परिणामाचा विचार विवेक न करताच बोलतो; म्हणून सांगितले की तू जो दुसरा वर मागितलास तो चांगला विवेकयुक्त विचार करून म्हणजे साधक बाधक गोष्टींचा, भरताच्या व रामाच्या स्वभावाचा इ. विचार करून मागितला नाहीस. अगदी अविवेकाने मागितलास. कारण ती याचना क्रोधाने संतप्त होऊन केली

गेली आहे. त्यामुळे अन्याय, जुलूम, अनीति, पक्षपात, सत्याचा लोप इ. अनेक दोष उत्पन्न होत आहेत. म्हणून दुसरा वर पुन्हा सुविचाराने माग. भाव हा आहे की रामाला वनवासात न धाडता नगरातच राहू दे. असे न झाले तर काय होईल याचा तू विचार केला नसलास तरी मी सांगतो की या माझ्या डोळ्यांना भरत राज्याभिषेक पाहण्यास सापडणार नाही. हे डोळे त्यापूर्वीच कायमचेच मिटतील. भरतराज्याभिषेक मी डोळे भरून - आनंदाने पहावा, तेथपर्यंत मी जगावे, असे तुला वाटत असेल तर हा रोष व अविवेक सोड व दुसरा वर बदलून घे हे आहे वक्तव्याचे सार. '**न तु रामं विना देहे तिष्ठेत्तु मम जीवितम् । तदलं त्यज्यतामेष निश्चयः पापनिश्चये**' (वा.रा. २।१२।१४) यांतील कठोर शब्द सोडून बाकीचा अर्थच आता स्पष्ट सांगतील.

**हिं.** ***। जिऐ मीन बरु बारि बिहीना । मनि बिनु फनिकु जिऐ दुख दीना ॥१॥***
***। कहउँ सुभाउ न छलु मन माहीं । जीवनु मोर राम बिनु नाहीं ॥२॥***
***। समुझि देखु जियँ प्रिया प्रबीना । जीवनु राम दरस आधीना ॥३॥***

**म.** ***। वारिविहीन मीन तरी जगती । फणि मणिविण दिन दीन कंठती ॥१॥***
***। वदें स्वभावें छल न मना ही । जीवन मम रामाविण नाहीं ॥२॥***
***। प्रिये प्रवीण करुनि बघ चिंतन । रामदर्शना अधीन जीवन ॥३॥***

**अर्थ :** मासे पाण्यातून बाहेर काढले तरी (कदाचित) जगतील; मणिहीन झालेले फणी (नाग) दीन होऊन दिवस कंठू शकतील.॥१॥ (परंतु) सहज स्वभावाने मी सांगतो, मनात कपट ठेऊन नव्हे, की माझे जीवन रामाशिवाय राहणे शक्य नाही.॥२॥ प्रिये ! तू प्रवीण आहेस (म्हणून) मनात जरा विचार करून बघ (म्हणजे कळेल) की माझे जीवन रामदर्शनाच्या स्वाधीन - रामदर्शनावर अवलंबून आहे.॥३॥

**टीका. चौ. १ - (१) वारिविहीन मीन तरि जगती** - पाण्यातून बाहेर काढलेला मासा तडफड तडफड करून लगेच मरतो. पण माशांचा स्वभाव बदलून ते कदाचित पाण्यावाचून जगू शकतील पण माझा स्वभाव - प्रकृतिधर्म - बदलणे शक्य नाही. (क) फणि = फणी. मोठा भुजंग; ते मणिविहीन झाले. त्यांचा मणि जरी कोणी पळवला तरी ते मरत नाहीत. अत्यंत दीन होऊन

सुद्धा दिवस कंठीत असतात. दुःखाने जगतात.

**चौ.२ - (१) छल न मना ही** - छल = कपट, मना = मनात, ही = निश्चित. माझ्या मरणाने येणाऱ्या वैधव्याच्या भीतीचा डोंगर तुझ्यापुढे उभा करून, त्याच्या आधाराने वर बदलून मिळेल इत्यादी हेतूनी मी सांगत नाही. जे खरे खरे आहे, वास्तविक आहे तेच सांगतो की रामविरहित मला जगताच येणार नाही.

**चौ. ३ - (१) प्रिये** - प्रिय पत्नीने आपल्या अविवेकी हट्टाने, थट्टेथट्टेत पतीच्या मरणास स्वतःच कारण होणे हा सतीचा - पतिव्रतेचा धर्म आहे काय? माझे जीवन रामावरच अवलंबून आहे की नाही याचा तू चांगला विचार करून बघ. तू काही मूर्ख नाहीस. **(क) प्रवीण आहेस** - चतुर, हुशार आहेस. माझ्या स्वभावाचे व माझ्या रामावरील प्रेमाचे ज्ञान तुला आहे. सुचविले की रामदर्शनाचा योग शक्य असला तरच मी जिवंत राहणे शक्य आहे. **(ख)** मागल्या चौपाईत व्यतिरेकाने सांगितले व येथे अन्वय पद्धतीने सांगितले. राम जवळ नसतील तर माझे जीवित नाही हा व्यतिरेक व जवळ असतील तर माझे जीवित राहील हा अन्वय सांगितला. पहिल्या मार्गाने तुला व तुझ्यामुळे सर्व राण्यांना वैधव्य, दुःख जन्मभर, माझे मरण, सर्व लोकांना अत्यंत दुःख इ. सर्वच अनिष्ट व अकीर्तिकारक घटना घडणार. दुसरा मार्ग चोखाळलास तर मी जिवंत राहू शकेन व तुला परमसौख्य मिळेल व इतरांना सौख्य लाभेल. भरताला राज्य देऊन या दोन मार्गातील कोणता मार्ग पत्करावयाचा हे तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे. गोड वाटेल तो तू स्वीकारशीलच. वा.रा. निराळे दृष्टान्त देऊन हेच सांगितले आहे. 'अपश्यतस्तु मे रामं नष्टा भवति चेतना ॥ तिष्ठेल्लोको विना सूर्यं सस्यं वा सलिलं विना ॥ न तु रामं विना देहे तिष्ठेत्तु मम जीवितम्' **(ग)** ज्या दशरथांनी विश्वामित्रांस 'वाटेल ते मागा' असे सांगितल्यावर सुद्धा 'रामा देणें मुने घडेना' असे म्हटले तेच आज कैकयीला सांगू शकत नाहीत की दुसरा वर मी देऊ शकत नाही. कारण तसे करणे म्हणजे प्रतिज्ञाभंग करणे आहे व वर देणे म्हणजे सर्व लोकांना दुःखी करणे आहे. वा.रा. दुसऱ्या भाषणांत स्पष्टच सांगितले आहे की 'वनांत जा' असे

रामाला सांगणे माझ्याकडून कालत्रयी घडणार नाही. **'प्रताम्य वा प्रज्वल वा प्रणश्य वा सहस्रशो वा स्फुटिता मही व्रज ॥ न ते करिष्यमि वचः सुदारुणं ममाहितं केकयराजपांसने'** (२।१२।११०) वा.रा. दशरथाने कैकयीला वारंवार पुष्कळ अपशब्द क्रोधाने वापरले आहेत. मानसांतील दशरथ अधिक कामी नसून प्रशान्त सागरासारखे विनम्र मृदु वाणीनेच बोलताना दिसतात. 'हरि-इच्छा भावी बलवान् अति' आणि कोटिकुटिल शिरोमणि गुरुने पढविलेली निष्ठुरतेची मूर्तीच अवतीर्ण झाली असल्याने कैकयीरूपी रोष तलवार राजावर आणखी कठोर वार आता करणार. आता कैकयी आपला तोफखाना सुरू करते -

*हिं.* ***। सुनि मृदु बचन कुमति अति जरई । मनहुँ अनल आहुति घृत परई ॥४॥***
***। कहइ करहु किन कोटि उपाया । इहाँ न लागिहि राउर माया ॥५॥***
***। देहु कि लेहु अजसु करि नाहीं । मोहि न बहुत प्रपंच सोहाहीं ॥६॥***

*म.* ***। परिसुनि मृदुवच कुमति अति जळे । जणुं अनलामधिं घृताहुति गळे ॥४॥***
***। म्हणा करा किं न कोटि उपायां । इथें न लागे आपली माया ॥५॥***
***। द्या किं अयश घ्या, म्हणून नाहीं । बहू प्रपंच न रुचे मला ही ॥६॥***

**अर्थ :** (राजाचे) मृदु भाषण ऐकून दुर्बुद्धि (राणी) अधिकच (अति) जळू लागली. जणू अग्नीत तुपाच्या आहुतीच पडल्या.॥४॥ (ती) म्हणाली तुम्ही अनंत उपाय करा ना कां; इथे तुमची माया (लपंडाव) काही लागणार (चालणार) नाही.॥५॥ (मी मागितले ते वर) द्या; नाहीतर नाही देत म्हणून अपयश (पदरांत) घ्या; फार प्रपंच (शब्दावडंबर) मला मुळीसुद्धा (ही) आवडत नाही.॥६॥

**टीका. चौ. ४ - (१) 'परिसुनि... अति जळे' - 'क्रोधें जळत पुढें बहु दिसली'** (३१।१) असे पूर्वी घडले. आता त्याहीपेक्षा अधिक जळत असलेली दिसली. क्रोध हाच अनल अग्नि आहे. तिने वर मागितले ती मृदु वाणी ऐकून राजाचे हृदय **शोकाने** जळले व राजाचे मृदु, नम्र, विनंतीवजा भाषण ऐकून तिचा **क्रोधाग्नि** पूर्वीपेक्षा **अधिक भडकला**. राजाला प्रतिज्ञावचनांनी व राम शपथांनी बांधून घेतला असून आपल्या दुष्ट वासना पूर्ण करवून घेण्यास लागणारा निष्ठुरपणा, निर्लज्जपणा, कठोरता इ. अनेक शस्त्रास्त्रे तिच्या जवळ

असल्याने तिला शोक न होता क्रोध वाढला. राजाच्या जवळ कोणतेच आयुध न राहिल्याने, असहाय्य झाल्याने शोक व विनवण्या करण्या पलीकडे त्याच्या हाती काहीच राहिले नाही. (क) **'जपुं अनलमर्धि घृताहुति गळे'** येथे घृताहुति म्हटले व **'लक्ष्मण वचनाहुतिमुळे भृगुबर-कोप-कृशानु'** (१।२७६। **यांत** लक्ष्मणाच्या वचनांना **घृताहुति न म्हणतां नुसते 'आहुति' का म्हटले?** लक्ष्मणाचे शब्द तुपासारखे स्निग्ध, (स्नेहाने भरलेले) मृदु, ममतारूपी चिकटपणा, पातळपणा (द्रवरूपता), सुगंध इ. तुपाच्या ठिकाणच्या गुणांनी विहीन होते. इतकेच नव्हे तर यांच्या विरुद्ध गुण लक्ष्मणाच्या वचनात भरपूर होते. दशरथांच्या भाषणात तुपाचे वरील सर्व गुण आहेत म्हणून घृताहुति म्हटले. किती सावधगिरी व उपमानांच्या गुणांकडे किती लक्ष ! दशरथाच्या शब्दांत भरताबद्दल स्नेह, कैकयीबद्दल ममता, तिच्यांवर विश्वास हा चिकटपणा, शोकाने द्रवलेले हृदय व त्याचे नम्र बोल ही द्रवता, रामप्रेमसुगंध व सत्यनिष्ठा हे पावित्र्य इ. तुपाचे सर्व गुण आहेत. (ख) या दोन ठिकाणांच्या समन्वयाने **मानसशास्त्राचा हा सिद्धान्त दाखविला** की अविवेकजनित आंधळा झालेला क्रोध भडकण्यास कठोरकटु भाषणच कारण होते असे नाही. मृदु, सरळ, विनम्र, स्निग्ध, पवित्र भाषणसुद्धा तेच कार्य करते. क्रुद्ध माणसाच्या मनाविरुद्ध भाषण इतकेच कारण मुख्य असते. वा.रा. याच प्रसंगी दशरथांनी कटु, कठोर, उग्र, अपशब्द वापरले आहेत तरी परिणाम असाच झाला आहे.

**चौ.५ - (१) म्हणे करा किं न कोटि उपाया-माया** - कुमतीला वाटत आहे की गोड गोड शब्दांनी मला मथवून कौसल्येचे दुःख टाळण्याचा प्रयत्न राजा कपटाने करीत आहे. तिच्या म्हणण्यातील भाव हा की तुमचे कपट (माया) मी जाणले आहे. तुमच्या साखरपेरणीचा काही उपयोग होणार नाही. राजाने सांगितलेल्या गोष्टींपैकी एकही तिला खरी वाटत नाही. राजाने रामशपथ घेतली (दुसऱ्या वेळी) तीसुद्धा खोटी असे तिला वाटत आहे. येथे दाखविले की **कपटी मनाला सर्वत्र कपटच दिसते. वा.रा. कैकयी म्हणते 'स त्वं धर्मं परित्यज्य रामं राज्येऽभिषिच्य च ॥ सह कौसल्यया नित्यं रन्तुमिच्छसि दुर्मते ॥.... पश्यतस्ते मरिष्यामि रामो यद्यभिषिच्यते ॥ एकाहमपि पश्येयं यद्यहं राममातरम् ॥ अञ्जलिं**

**प्रतिगृण्हन्तीं श्रेयो ननु मृति र्मम ॥** (२।१२।४५,४८) यावरून मुख्य आक्षेप हा आहे की कौसल्येशी संगनमत करून मला फसविण्याचा तुमचा डाव आहे. तुम्ही आता कौसल्येशी रममाण होणार हा सगळ्यांत मोठा आक्षेप आहे.

**चौ.६ - (१) बहू प्रपंच न रुचे** - भाव हा की तुमच्यासारखे वाग्जाळ पसरणे मला आवडत नाही. स्पष्टच सांगते की दोन्ही वर दिले म्हणा किंवा दुसरा वर देत नाही म्हणा व अकीर्ति पदरात घ्या. उगाच सटरफटर सतरा बयादी लावून, एरंडाचे गुऱ्हाळ चालवून काय उपयोग? दशरथाने केलेल्या विधानांवर आणखी ताशेरे झाडून आपल्या हृदयांतील विष वक्रोक्तीने आता ओकील. कुबडीने जे विष भरून ठेवले आहे त्याचेच फुत्कार बाहेर पडणार आहेत.

*। राम साधु तुम्ह साधु सयाने । राममातु भलि सब पहिचाने ॥७॥*
*। जस कौसिलाँ मोर भल ताका । तस फलु उन्हहि देउँ करि साका ॥८॥*
*हिं.दो. । होत प्रातु मुनिबेष धरि जौं न रामु बन जाहिं ॥*
*॥ मोर मरनु राउर अजसु नृप समुझिअ मन माहिं ॥३३॥*
*। राम साधु तुम्हि साधु शहाणे । रामजननि साध्वी, सब जाणें ॥७॥*
*। चिंति कौसिला भलें मम असें । देइन त्यां विख्यात फळ तसें ॥८॥*
*म.दो. । मुनिबेषें जर उदयिं ना जातिल राम वनांत ॥*
*॥ मम मरणहि तव अयश नृप समजा होय मनांत ॥३३॥*

**अर्थ :** राम साधु आहेत; तुम्ही शहाणे साधु आहात आणि राममाता साध्वी आहे ! मी सगळ्यांना (चांगली) जाणते (तुम्हाला) ! ॥७॥ कौसल्येने माझे जसे चांगले चिंतिले तसेच त्याचे चांगले विख्यात (विशेष प्रसिद्ध) फळ मी त्यांनाच (उन्हहि) देईन बरं ! ॥८॥ सकाळ होताच जर का राम मुनिवेषाने वनात गेले नाहीत, तर राजा ! मनात (पक्के) समजून ठेवा की माझे मरण व तुमचे अयश होणार ! ॥दो.३३॥

**टीका. चौ. - ७ (१) राम साधु - 'सकलहि कहति राम अति साधू'** (३०।६) या दशरथ वचनावर हा टोमणा मारते. हे औपरोधिक भाषण आहे. राम ना ! अगदी पक्का साधू ! स्वार्थ साधू; म्हणूनच एवढा राज्याभिषेकाचा

बेत ठरला तरी मला सांगायला सुद्धा आला नाही. **'रामा प्रिय तुम्हि सत्य चि वाणी ॥ असे पूर्वि, ते दिवस गत असां । मित्र होति रिपु काळ बदलतां॥** (१७।६) ही कुबडीची शिकवणच येथे बोलली. **(क) तुम्हि साधु शहाणे** - तुम्ही तर काय पक्के महाज्ञानी-हुशार साधु ! म्हणून तर माझ्या भरताला दिला पाठवून आणि त्याला बोलावणं सुद्धा न पाठविता केला गुपचुप बेत. तुम्हीच तर सगळ्या साधूंचे म्होरके, बुद्दे, अनुभवी साधु ! मला सुगावा सुद्धा लागू दिला नाही अं ! एवढी तयारी काय एका दिवसांत झाली होय? मुखमें राम और बगलमें छुरी, मला प्रिये ! प्राणप्रिये, सुंदरी ! वगैरे गोड गोड शब्दांनी आंधळी बहिरी करून केसाने गळा कापण्याचा डाव टाकणारे तुम्हीच ना ! **'चित्तमलिन मुख-मधुर नृप अपला उजू स्वभाव'** (१७) हे बीज कुबडीने पेरले होते तेच आता उगवून फुगून वर येऊन आपले विष पसरीत आहे.

(२) **रामजननि साध्वी - 'प्रेम नृपाचें फार तुम्हांवरि । पाहुं न शकते सवती-मत्सरिं । सवत बघे करुं तव उन्मूलन । अढवा घालुन यत्न सुकुंपण'** इ. इ. जे कुबडीने राणीच्या पोटात शिरून हृदयांत भरून ठेवले होते तेच ती आता औपरोधिक भाषेत राजाला सांगत आहे. काय काय बोल्ली असेल याची कल्पना वरील पायावर रचता येईल म्हणून विस्तार नको. भाव हा की राम माता ××× पक्की आहे. **(क) सब जाणें** - तुमच्या सगळ्यांचे डाव पेच मला कळले नाहीत असे तुम्हांस वाटले असेल; पण मी तरी वेळ आल्याशिवाय बोलून काय उपयोग? 'चोर धरावा मोटेवर' म्हणतात तसे मी केले.

**चौ. ८ - (१) चिंति कौसिला भलें मम जसें** - राम माता साध्वी नाही. का? रामाला राज्यावर बसवून मला दासी बनवून, भरताला कारागृहात टाकण्याचा कट रचणारी तीच ना कौसल्या राममाता ! भरताला आजोळी धाडून देशोधडीस लावण्यासाठी तुमचे कान फुंकणारी तीच का दुसरी कोणी? आणि म्हणे राममातेने मला कधी कांऽहि सांगितले नाही ! चोराला मोर साक्षी ! पण माझे नशीब सिकंदर म्हणून बरे तर बरे ! आता तिला म्हणावे चांगला पदर सावरून ठेव. त्या दोघांनी जे बीज पेरले त्याचे यथायोग्य फळ

अगदी अस्सं ख्याति करून, जगभर प्रसिद्ध करून तिच्या ओटीत आणि तिच्या पुत्राच्या पदरांत घालते की जन्मभर विसरणार नाहीत व कैकयी म्हणजे कोण याची चांगली आठवण राहील. (साक = प्रसिद्धी, दरारा, ख्याति)

**दोहा.** - (१) शब्दावडंबर, पाल्हाळ तिला आवडत नाही म्हणून राजाच्या विनंती अर्जावर शेवटचे निकालपत्र अगदी निःसंदिग्धपणे देते. रामाला वनवासास पाठविला तर काय होईल याचे भविष्य जसे राजाने सांगितले तसे राम वनवासात न गेले व मुनिवेषाने न गेले तर काय होईल हे कैकयी सांगते. राम वनांत जाईल तर मी मरेन असे दशरथाने सांगितले. ही म्हणते राम वनांत, उद्या सकाळीच न जातील तर मी मरेन, व अपयश, अकीर्ति तुमच्या पदरात पडेल. (क) तिनेसुद्धा दशरथापुढे दोन मार्ग ठेवले आहेत. १) जगण्याची लालसा असेल तर अपकीर्ती पदरात घ्यावी व कैकयीला मेलेली पहावी. २) अकीर्ति नको असेल तर रामाला वनात धाडून कैकयीला जगवावी आणि अकीर्ति टाळावी व स्वतः मरावे वाटले तर. सार हे की नवरा जगला-मेला तिला पर्वा नाही. सवतीचा सूड घेऊन जो आसुरी आनंद मिळविण्याची इच्छा आहे तो मिळाला म्हणजे झाले. वा.रा. तर कैकयीने राजाला 'दुर्मति' म्हटले आहे. (ख) **वि.ल.डे.** - **'नृप'** - येथे कैकयी दशरथांस 'नृप !' म्हणाली. पूर्वी प्रिय ! प्राणप्रिय ! इ. म्हणाली होती. भाव हा की 'तुमचा आमचा पति-पत्नी संबंध संपला. तुम्ही केवळ 'नृप' असे मी समजते.'

(२) प्रथम मागितले तेव्हा **'तापस बेषि बिसेष उदासी । चौदा बर्ष राम बनवासी'** असे मागितले. केव्हा वनात जावे याचा उल्लेख त्यात नव्हता. तो करण्याची संधी मात्र तिने येथे साधली. प्रथमच हो म्हटले असते तर भरत येईपर्यंत व त्याला राज्याभिषेक होईपर्यंत तरी तिचा शब्द न मोडता रामसंगतीचा लाभ घेता आला असता; कारण भरताला राज्य व रामाला तापस वेषाने वनवास अशी तिची मागणी होती. कैकयीच्या शब्दांनुसार फायदा घेण्याचे मनात आणले असते तर दण्डकारण्याची आवश्यकता येथे अजूनही नाही. कारण कोणते वन याचा उल्लेख तिने केला नाही. १०/१५ मैलांवरील एखाद्या वनात जाऊन १४ वर्षे तेथेच राहण्याची आज्ञा दिली असती तर रोज १/२

वेळा दशरथ जाऊन भेटू शकले असते. परंतु भरतशत्रुघ्न आल्यावर राम वनात जाणे शक्य झाले नसते. दोन पुत्र जवळ असल्याने दशरथास मरण आले नसते व राक्षसवधादि अवतार कार्ये झाली नसती किंवा अधिक दुष्कर होऊन, सीताहरणादी गोष्टी राजाला याच देही ऐकणे भाग पडले असते. प्रभूची इच्छा असती तर जवळच्या वनातसुद्धा सीताहरण झाले असते. सार हेच की **कैकयीला किंवा राजाला जी जी इच्छा होत आहे ती 'हरि-इच्छा, भावी बलवान् अति' असल्यामुळेच होत आहे. म्हणून कोणी दोषी नाही की गुणी नाही. पूर्वप्रारब्ध बलाने मनुष्य स्वभावाविरुद्ध सुद्धा वागू लागतो. इतरांनी बोध घेऊन कुसंगति टाकून सुसंगती धरून स्वतःचे कल्याण साधण्यास शिकावयाचे आहे. (क)** इतके बोलता बोलताच कैकयीचा रोष आणखी वाढला. रोष, बहुरोष (रोष अवतार) व अति रोष या तीन पायऱ्या आधीच चढली आहे. 'अति'च्या पुढे आणखी विशेषण नाही म्हणून आता उत्प्रेक्षेने रोषतरंगिणीचे वर्णन करून तिच्या क्रोधाची कल्पना चित्रासारखी पुढे उभी करतील.

***हिं. । अस कहि कुटिल भई उठि ठाढ़ी । मानहुँ रोष तरंगिनि बाढ़ी ॥१॥***
***। पाप पहार प्रगट भइ सोई । भरी क्रोध जल जाइ न जोई ॥२॥***
***। दोउ बर कूल कठिन हठ धारा । भवँर कूबरी बचन प्रचारा ॥३॥***
***। ढाहत भूपरूप तरु मूला । चली बिपति बारिधि अनुकूला ॥४॥***

***म. । कुटिल वदुनि असं तडकन् उठली । रोष तरंगिणि जणुं अति फुगली ॥१॥***
***। पाप-पहाडीं प्रगट जाहली । क्रोधजळें, बघवे ना, भरली ॥२॥***
***। युग वर तट, हट धार सुघोरा । कुबडी-वाक्प्रेरणा हि भोरा ॥३॥***
***। उलथी भूपरूप तरु-मूला । निघे विपद्वारिधि अनुकूला ॥४॥***

**अर्थ :** असे सांगून कुटिल कैकयी ताडकन उठली - उभी राहिली; जणू रोष नदी (तरंगिणी) च अतिशय फुगली (पूर आला, वाढली) ॥१॥. ती पापरूपी पर्वतांतून प्रगट झाली असून क्रोधजळाने (इतकी) भरली आहे (की) तिच्याकडे बघण्याची सोय नाही.॥२॥ दोन वर हे तिचे दोन तट (किनारे) आहेत. तिचा हट्ट ही फार घोर धार आहे आणि कुबडीच्या वचनांनी दिलेली प्रेरणा (चिथावणी) हा भोवरा (भोरा) आहे.॥३॥ राजारुपी तरुला मूळासुद्धा उलथून

टाकून ती विपत्ती सागराला मिळण्यास (वेगाने) चालली (निघाली) आहे.॥४॥

**टीका.** - कैकयी रोषाने उठून उभी राहिली ती कशी हे उपमेने सांगून स्पष्ट कल्पना येण्यासारखी नाही म्हणून उत्प्रेक्षा केली आहे. उत्प्रेक्षा करून नदीशी सांगरूपक केले आहे. हे रूपक कोष्टकरूपाने मांडून दाखविल्याने कल्पना चित्र चांगले लक्षात घेता येईल. परंतु रूपकातील काही अंशांचा उल्लेख या चौपायांत नाही. रूपकाचे विश्लेषण टीकेत करीत असता गुप्तांश प्रगट झाल्यावर रूपक चित्र कोष्टकांत दाखविल्याने पाठीमागून खोडाखोड करण्याचा प्रसंग येणार नाही म्हणून टीकेच्या शेवटी ते करणे योग्य.

**चौ. - १ -** (१) कैकयी अति त्वेषाने **अपार रुष्ट झालेली** अशी **ताडकन उठली.** बसलेल्या माणसापेक्षा उभ्या असलेल्या माणसाची उंची एकदम वाढते. नदीला फार मोठा लोंढा एकदम आला म्हणजे तिची उंची एकदम वाढते. पाणी खाली असते ते एकाएकी वर येते. तरंगिणि = तरंगिणी - तरंगांनीयुक्त असलेली नदी. कैकयी रूपी रोष नदीला गुप्तरोष, रोष, बहुरोष, अति रोष यांचे **क्रोधी विचार, उच्चार व हावभाव रूपी तरंग** आले हे पूर्वी दाखविले. तरंग कोणते हे रूपकात स्पष्ट नाही. **(क) कुटिल** - नद्यांची गति कुटिल (नागमोडी, वाकडीतिकडी) असते तशी कैकयी कुटिल (गति) आहे. '**गति** काव्यसरिते **कुटिल** जेवीं पुण्यपाथांची महीं' (१।७० छंद) प्रवाह केव्हा पूर्वेस तर केव्हा दक्षिणेस तर केव्हा पश्चिमेस, या प्रमाणे प्रवाहाची दिशा बदलते. कैकयीच्या क्रोधाचा प्रवाह केव्हा रामाकडे, केव्हा राजाकडे तर केव्हा कौसल्येकडे वहात आलेला आपण पाहिला आहे. (ख) नदीची एकदम वृद्धी होण्यास वरच्या बाजूस कोठेतरी फार जोराचा पाऊस पडावा लागतो. तो येथे सांगितला नाही. जेथे नदी फुगून एकदम वर आलेली दिसते तेथे जर पाऊस पडलाच नाही तर कवींनी वर्णावा तरी कसा? दशरथाचे मृदु, शीतल, स्नेहल, सुगंधी, जीवनसंरक्षक, भाषण हाच पाऊस आधी पडला. यालाच घृताहुती असे वर म्हटले. 'घृतं आयुः' 'अप्सुच घृतामृते' (अमरे) घृत = पाणी, अमृत; '**घृतमाज्ये जलेक्लीबं** (मेदिनी) अग्नीचे रूपक होते म्हणून घृत = आज्य म्हटले. नदीला लोंढा आणावयाचा आहे म्हणून त्याचाच अर्थ पाणी = पाऊस घेणे जरूर आहे. पावसाचे पाणी निर्मल, शीतल,

स्नेहल (चिकट) 'जलचिक्कणता' द्रवरूप, जीवनसंरक्षक, पानीय (पिण्यास योग्य) असते; पण ते जमिनीवर पडून घाणेरडे, लाल, काळे पिण्यास अयोग्य, स्निग्धतारहित, मीनांचा प्राण घेणारे (गढुळी - नवे पाणी) अशा विरुद्ध धर्माचे बनून त्याधा नदीला लोंढा येतो. 'भूवर पडतां पाणी गढुळलें । मायेनें जणुं जीव वेष्टले' **'क्षुद्रनद्या भरुनी फोंफावति । अल्पधनें खल जैसे माजति'** (४।१४।६,५). कैकयी क्षुद्र नदी नाही असे कोण म्हणेल? या दोन चौपाया कैकयीस तंतोतंत लागू आहेत. दशरथाच्या भाषणांतील गुणांचे घृताच्या गुणांशी जे साम्य दाखविले तेच जलाच्या गुणांशी बरोबर लागू पडते. दशरथांच्या भाषणात आपले जीवन चालू ठेवण्याची इच्छा स्पष्टच आहे. यावरून मानसाधारेच ठरले की **दशरथांचे भाषण हा वरच्या बाजूस, आधी पडलेला पाऊस आहे.** वरील ४।१४।६,५ या दोन चौपाया पावसाच्या वर्णनातीलच आहेत. (पाऊस कोणता, तरंग कोणते, कुटिलता कोणती हे टीकाकारांनी मुळीच दाखविलेले नाही.) मोठ्या - पात्र रुंद असलेल्या - नद्यांची वृद्धि एकाएकी होत नाही. पण कैकयीच्या क्रोधाची झाली; **म्हणून ही क्षुद्र नदी आहे** हे ठरले. महानद्यांच्या पुरांतून पोहून पार जाता येते पण क्षुद्र नद्यांच्या पुरांतून पोहून जाणे अशक्य असते. **क्षुद्रत्वामुळे अलंघ्यता आली.**

**चौ.२ - (१) पाप पहार्डी प्रगट जाहली** - नदी एखाद्या पर्वतावर उगम पावते, तरी तिचे खरे रूप तेथे दिसत नाही. ती पर्वतांतून बाहेर पडून मैदानांत आली म्हणजे प्रगट होते; म्हणून **'उगम पावली' न म्हणता प्रगट झाली** असे म्हटले; **इतका वेळ गुप्त होती.** गंगा नदी ऋषिकेशला स्वर्गाश्रमाजवळ प्रगट झालेली दिसते. ही रोष नदी **कपटी स्नेहरूपी दऱ्याखोऱ्यांतून गुप्त होती.** पापरूपी पर्वतांत उगम पावून, कपटी स्नेहरूपी दऱ्याखोऱ्यांतून गुप्तपणे वहात येऊन राजाच्या फार खोल वा विषम नसलेल्या सरळ-सम-हृदय भूमीवर प्रगट झाली. पहाडी = पर्वतातून असा अर्थ करणे जरूर आहे. अन्यथा प्रगट शब्दाचे महत्त्व नाही. **(क) क्रोध जलें भरली** - पूर आला म्हणजे लाल लाल पाण्याने नदी भरलेली असते. ही रोष नदी **क्रोधरूपी जलाने दुथडी भरली आहे. बघवत नाही** इतक्या प्रचंड लाटा उसळत आहेत. कैकयीच्या मुखाकडे पाहणे भयावह झाले आहे. तिचे डोळे, भिवया, चर्या यांनी **अत्यंत** भयंकर **उग्ररूप धारण केले आहे.**

नदी जसा फो फो, घो घो आवाज करू लागते तशी जोराने **फुसफुसत, हुंकार टाकीत जोराने श्वासोच्छ्वास करीत, पाय आदळीत आहे इ.**

**चौ. ३ - (१) युग बर तट** - दोन वर हे या नदीचे दोन तट - किनारे आहेत. तटांमुळेच नदीला तटिनी म्हणतात. नदीच्या दोन तटांच्या मधून वाहणाऱ्या जलांत जो फार जोराचा ओघ असतो त्यास नदीची **धार म्हणतात.** दुसरा वर न सोडण्याचा, न बदलण्याचा जो तिचा कठीण, **निष्ठुर - हट्ट** (हट) आहे तीच या रोष तरंगिणीची कठीण **सुघोर धार आहे.** महानद्यांची धार तोडून - पोहताना उल्लंघन करून - पलीकडे जाता येते. परंतु पर्वतांतून नुकत्याच प्रगट झालेल्या क्षुद्र नदीची धार तोडणे मोठमोठ्या अट्टल पोहणारांनासुद्धा अशक्य असते म्हणून सुघोरा - अति भयंकर म्हटले. ती पाहिल्याबरोबरच धीर खचतो. नदीची धार एखाद्या तटाजवळून किंवा मध्येही असू शकते. **(क) भोरा** - भोवरा - अशा नद्यांत पुष्कळ भोवरे (आवर्त) असतात. कुबडी वाक्प्रेरणाच भोरा - कैकयीच्या चित्तांत राहिलेली कुबडीची वाक्येच या क्रोधजळाला प्रेरणा-चिथावणी देत आहेत. भोवऱ्यांतील पाणी जसे चक्राकार गरगर फिरत असते तसा कैकयीचा क्रोध गिरक्या खात आहे. यमुनेसारख्या फार खोल व रुंद नदीच्या भोवऱ्यांतून खोल बुडी मारून बाहेर पडता येते; पण क्षुद्र नद्या, ओढे यांच्या भोवऱ्यांत सापडलेला बुडून मरतोच. कारण खाली खडक-पाषाण असल्याने बुडी मारली की कपाळमोक्षच ! दशरथ राजा याच भोवऱ्यांत सापडून मरणार हे सुचविले. भोवऱ्यांत सापडण्यापूर्वी ती वस्तू वा व्यक्ती पुराच्या पाण्यात पडून धारेत सापडावी लागते.

**चौ.४ - (१) उलथी भूपरूप तरु-मूला** - ही नदी दशरथ राजारुपी तरुला (वृक्षाला) मुळासकट उलथून पाडीत आहे, असे येथे म्हटले आहे. त्या अर्थी हा तरू कोणत्या तरीं एका तटावर असला पाहिजे हे ठरले. दोन तटांपैकी **हा तट कोणता?** नदी आपल्या प्रवाहाच्या वेगाने व लाटांनी तटाची भू (माती) पाडून तटावरील वृक्षाला मुळासकट प्रवाहात पाडते. मुळासहीतच ते झाड प्रवाहाबरोबर वहात जाते. मूळ एका बाजूस व झाड निराळे असे येथे होणे शक्य नसते. **मूळ कोणते?** राम व राजा यांची एकच गती असती तर राम

मूळ आहेत असे मानता आले असते. पण तसे झालेले नाही. राम विपत्तींत सापडले हे खरे असले तरी राम वनातून परत आले आहेत. दशरथ मरण पावले आहेत म्हणून राम हे भूपतरूचे मूळ मानता येत नाही. (क) कैकयीचा क्रोध खरा नसून थट्टेतला असल्याने राम वनवासरूपी तट (वर) तिच्या स्वाधीन करावा लागणार नाही असे राजाला वाटत होते. तिला तर हा वररूपी तट आपल्या ताब्यात घ्यावयाचा आहे. राजा तो खुषीने देण्यास तयार नाही. ज्या आधाराने हा तरु तटाला-दुसऱ्या वराला घट्ट धरून आहे तो आधार उपटला की वृक्ष पडेल व तट आपोआप आपल्या ताब्यात येईल म्हणून तिने औपरोधिक भाषेने सांगितले की तुमच्या बोलण्यावर माझा मुळीच विश्वास नाही. 'राम साधु तुम्हि साधु शहाणे ।... इथें न लागे आपली माया' याने स्पष्ट झाले की कैकयीचा राजाने घेतलेल्या रामशपथेवर सुद्धा विश्वास नाही. **म्हणून कैकयीचा विश्वास व राजावरील प्रीती हे मूळ मानणेच योग्य आहे. 'प्रिये वदसि कसं भलत्या रीतीं । भीरु सोडुनी प्रचिती प्रीती'** (३१।५) प्रचिती = विश्वास. राजाला असा संशय प्रथम आला होता पण क्रोध खरा नसेल असे वाटत होते. आता तो भ्रम दूर झाला. ज्या आधारावर राजा तिची समजूत घालीत होता तो साफ सुटला. या (३२।५) चौपाईची टीका पुन्हा पहावी. **राम वनवास तटाला भूप तरु घट्ट धरून राहिला आहे** असे मानणेच संयुक्तिक आहे. भूचे पालन-रक्षण करणारा तो भूप. 'तरन्ति अनेन इति तरुः' दशरथासारखा पालक असला तरच प्रजेला तरणोपाय आहे. पुढे कौसल्येने असेच म्हटले आहे. **'तारु अयोध्या नाविक आपण । पांथिक बसले सगळे प्रियजन ॥ धीर धरां तर पावूं पारा । ना तर बुडूं सहित परिवारा'** (१५४।६-७). भरत राज्यरुपी तट राजाने केव्हाच कैकयीच्या ताब्यात दिला आहे. (ख) झाड पडले की त्याच्या आजूबाजूची भू (जमीन-माती) फुटते व नदीच्या प्रवाहाने वाहून नेली जाते. म्हणून दशरथाची भूमी अयोध्या विपत्ती प्रवाहात पडणार हे ठरले. नदी सागरात जाऊन पडतेच. तशीच कैकयीरुपी रोषनदी सर्वांच्या शेवटी विपत्तीसागरात पडणार हे सुचविले. पुरांत सापडलेले लोक, प्राणी कोठे तरी तीराला लागतात किंवा कोणीतरी त्यांना काढतात. तसे भरत सर्व प्रजेला

विपत्ती सागरातून वाचविणार आहेत. पण **नदीला मात्र सागरांतून बाहेर पडता येत नाही. तसाच कैकयीच्या विपत्तींचा अंत होणार नाही हे सुचविले.** रूपकाचे विश्लेषण मानसाधारे व्यवहाराला धरून करीत गेल्याने सर्व गुप्तांश सहज ओघानेच बाहेर पडले. आता हे रूपक कोष्टकरूपाने दाखविणे योग्य आहे.

## रोष - तरंगिणी

| | | |
|---|---|---|
| नदी | १ | कैकयी रोष नदी |
| उगम पर्वतावर | २ | पाप पर्वतावर (राजाचे व कैकयीचे पाप) |
| दऱ्याखोऱ्यांत गुप्त | ३ | कपटी स्नेहात बराच काळ गुप्त |
| मैदानावर प्रगट होते | ४ | दशरथाच्या सम हृदयभूमीवर प्रगट झाली |
| दोन तट | ५ | भरत राज्य व रामवनवास हे दोन वर |
| कुटिल गति | ६ | कुटिल आचरण, गति |
| एकदम वाढणे, लोंढा येणे | ७ | ताडकन उठून उभी राहिली |
| प्रवाहदिशा बदलते | ८ | रोषाचा प्रवाह राजा, राम, कौसल्या यांकडे |
| वरच्या बाजूस आधी पाऊस | ९ | राजाचे पूर्वीचे जलासारखे भाषण |
| क्षुद्र नदी | १० | क्षुद्रबुद्धि स्त्री |
| तरंग, लाटा, कल्लोळ | ११ | विचार, उच्चार व हावभाव |
| नदीतील जल | १२ | क्रोध |
| रौद्ररूप, बघवत नाही | १३ | रौद्रमुखचर्या, डोळे, भिवया, ओठ इ. बघवत नाही |
| फो फो, घोघो ध्वनि | १४ | फुसफुसणे, हुंकार, पाय आदळणे इ. |
| वाम तट | १५ | भरतराज्य, कैकयीच्या ताब्यात दिले आहे. |

| | | |
|---|---|---|
| दक्षिण तट | १६ | राम वनवास, दशरथांनी ताब्यात दिला नाही. |
| वामतटावर शांतता | १७ | दक्षिण तट धारेने फोडण्याचा प्रयत्न |
| तरु (वृक्ष) | १८ | दशरथ राजा दक्षिण तटाला धरून आहे |
| धार सुघोर | १९ | कैकयीचा कठीण हट्ट |
| भोवरा | २० | कुबडीच्या वाक्यांची प्रेरणा |
| वृक्षाचे मूळ | २१ | कैकयीचा राजावरील विश्वास व प्रीती |
| भू | २२ | अयोध्या |
| मुळासकट वृक्ष उलथते | २३ | मुळासकट दशरथ राजाला पाडणार भोवऱ्यांत |
| भूमी प्रवाहात वाहून जाते | २४ | अयोध्या विपत्ति प्रवाहात सापडणार |
| वृक्ष मुळासकट मरतो | २५ | दशरथाला मरण येणार |
| धार तटाला ताब्यात घेते | २६ | दुसरा वर ती घेणार, राम वनात जाणार |
| सागरात पडण्यास जाते | २७ | कैकयी विपत्ती सागराकडे चालली आहे |
| शेवटी सागरात पडते | २८ | कैकयी शेवटी विपत्ति सागरात पडणार. |

I : चारच ओळींच्या रूपकांत किती भावार्थ भरून ठेवले आहेत हे वरील २८ गोष्टींच्या तुलनेने व चिंतनाने सहज चांगले ध्यानात येईल. मा.पी. मुद्दाम पहा !

II : 'क्रोधमहा अघमूल (१।२७७) असे लक्ष्मणाने म्हटले आहे. येथे क्रोधनदीचे उगमस्थान पापपर्वत सांगितले. दोन्ही वचने सत्य आहेत. **पाप असेल तर क्रोध येतो व क्रोध आला की पाप घडते. असा यांचा अन्योन्य कार्यकारण संबंध आहे. पाप व लोभ, पाप व दारिद्र्य, विवेक व वैराग्य इत्यादी अनेक जोड्यांचे असेच आहे.**

III : विपत्ती सागरात पडल्याचा अनुभव कैकयीला वैधव्य आले तरी येणार नाही. ती मोठ्या आनंदाने भरतास ओवाळण्यास येते. भरतच जेव्हा

तिचा अधिक्षेप करतात व राज्याचा स्वीकार करण्याचे नाकबूल करून रामदर्शनास व रामाला वनांतून परत आणण्याच्या हेतूने चित्रकूटास जातात तेव्हाच तिला विपत्ती सागरात पडल्याचा अनुभव येतो. **नदी प्रगट झाल्यापासून सागरात जाऊन पडण्यास बराच काळ लागतोच !** त्या विपत्ती प्रवाहांतून इतर सर्व १४ वर्षांनी बाहेर पडतात व परम सौख्याच्या शिखरावर चढतात; पण सर्वांच्या शेवटी विपत्ती सागरात पडणारी कैकयी मरेपर्यंत त्या सागरात पश्चात्ताप वडवानलाने जळत राहतेच. **सर्वांत जास्त विपत्ती व हानि कैकयीचीच !**

**उपदेश** - कुबडीसारख्या आगलाव्या नीच त्रयस्थ व्यक्तीच्या वचनांवर विश्वास ठेवून सावत्र संबंधातील एखाद्या व्यक्तीने भाऊबंदकी माजविली की ती चिथावणारी व्यक्ती बाजूस राहते व सर्व कुटुंबासच क्लेश होतात पण काही काळच; पण त्या चिथावणीला बळी पडून ज्यांनी भाऊबंदकी माजविली असेल त्या व्यक्तींस मात्र शेवटपर्यंत विपत्ती भोगाव्या लागतात ! हलक्या कानांची, व्यवहारशून्य माणसे व विशेषतः अहंकारी, शिरजोर झालेल्या, फाजील स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या स्त्रियाच अशा चिथावणीस जास्त बळी पडतात.

*हिं.* ***। लखी नरेस बात फुरि साँची । तिय मिस मीचु सीस पर नाची ॥५॥***
***। गहि पद बिनय कीन्ह बैठारी । जनि दिनकर कुल होसि कुठारी ॥६॥***
***। मागु माथ अबहीं देउँ तोही । राम बिरहँ जनि मारसि मोही ॥७॥***
***। राखु राम कहुँ जेहि तेहि भाँती । नाहिं त जरिहि जनम भरि छाती ॥८॥***

म. ***। कळे नरेशा कथित चि साचें । नारिमिषें शिरिं मृत्यू नाचे ॥५॥***
***। बसवुनि विनवी धरुन चरणां । तूं दिनकर-कुल-कुठार बन ना ॥६॥***
***। माग अतांच देउं शिर तुजला । राम-वियोगें मार न मजला ॥७॥***
***। रामा राखि गमे तें तुज कर । तूं ना तर उरिं जळसि जन्मभर ॥८॥***

**अर्थ :** नरेशाला कळले की ही जे म्हणाली (तो विनोद नसून) खरेच आहे व आपला मृत्यू स्त्रीच्या निमित्ताने शिरावर नाचत आहे.॥५॥ (तेव्हां) तिला बसवून तिची पायधरणी करून विनंती करतात की तू सूर्यकुळाला (दिनकरकुल) कुऱ्हाड बनू नकोस.॥६॥ माझे मस्तक (हवे तर) आता माग तुला आताच देतो; पण तू मला रामवियोगाने मारू नकोस.॥७॥ तुला वाटेल ते (बाकीचे)

कर पण रामाला ठेव नाहीतर जन्मभर तुझी छाती जळत राहील.॥८॥

**टीका. - चौ. ५ - (१) कळे नरेशा कपितचि साचें** - राणी क्रोधाचे सोंग थट्टेने आणून वर मागत असेल असे जे नरेशाला (राजाला) वाटत होते तो केवळ भ्रम ठरला अशी आता त्याची खात्री झाली. मागील दोह्यांत जो निर्वाणीचा खलिता मिळाला व रोषतरंगिणीचे जे रौद्ररूप लगेच दिसले त्यांनी पूर्ण खात्री झाली की रोष खरा आहे व जे हिने मागितले व बोलली ते सर्व मनापासूनच, वरवरचे नव्हे. **(क) नरेश** - नरांचा ईश, पुरुषांवरसुद्धा सत्ता गाजविणारा, पण त्यास आपल्या स्वतःच्या बायकोच्याच मनातील भाव इतका वेळ कळाला नाही व एका नारीवर सत्ता चालविता आली नाही हे केवढे आश्चर्य ! **(ख) नारिमिषें शिरिं मृत्यू नाचे** - वा.रा. प्रमाणे-पडलेल्या दुःस्वप्नांवरून, उत्पातांवरून व ग्रहयोगांवरून राजाला वाटतच होते की आपला मृत्यू जवळ आला आहे. पण मानसांत हे उल्लेख नाहीत. कधीही अपमान करीत न बोलणारी, रामावर प्राणांसारखे प्रेम करणारी असून ही स्त्री आज एकाएकी इतकी उद्दाम, बेफाम, माझ्या मरणालाही न भिणारी निर्लज्ज व अत्यंत क्रूर, निष्ठुर बनली आहे त्या अर्थी माझ्या मृत्यूनेच तिचा स्वभाव बदलला व आता तो अगदी माझ्या डोक्यावर नाचत आहे; **ही स्त्री निमित्तमात्र आहे.**

(२) **वा.रा.** २।१२।८१ व १०५ यांमध्येही **ही उदार, शांत, भावना नाही.** तू महाविषारी काळी सापीण आहेस हे न जाणता तुला घरात बाळगून तुझ्याशी रममाण झालो असे तेथले सार आहे. **(क)** सतीमोह प्रकरणातसुद्धा सतीच्या स्वभावात एकाएकी बदल झालेला दिसताच महेशांनी तिला दोष न देता 'हरि इच्छा भावी बलवान अति' असे मनाशी म्हटले. याज्ञवल्क्यांनीही तसेच म्हटले आहे. **(ख)** अरण्यकाण्डांत सीतेचा स्वभाव बदलून तिने कांचनमृगाचे चर्म मागितले व पुढे तीच सीता जे बोलू नये ते लक्ष्मणाला निष्कारण बोलली. तेथेही हरि-इच्छा हेच कारण मानले आहे. **(ग)** किष्किंधा, सुंदर व लंका या तीन कांडांत याच्या उलट घडले आहे. सुशील, पतिव्रता स्त्रिया, त्यांचा स्वभाव दुर्दैवाने न बदलल्यास, पतीच्या हितासाठी अत्यंत झटतात. पतीला हितोपदेश करतात; पण कालवश झालेला त्यांचा दुर्दैवी पती त्यांचे न ऐकता कसा विनाश

पावतो हे तारा व मंदोदरी यांच्या चरित्रात दाखविले आहे. ल.ठेवण्यासारखा सिद्धान्त हा की विनाशकाल आला म्हणजे कोणी तरी निमित्त होऊन हट्टाने व अविचाराने मरणाला आमंत्रण दिले जाते. **'काल न दंडें कुणास वधतो । धर्मही बल मति विचार हरतो'** (६|३७|७) व कोणाला तरी, कशाला निमित्त बनवितो. **दशरथाच्या मृत्यूला कैकयी निमित्त बनविली आहे, म्हणून ती दशरथावर सत्ता गाजवीत आहे असे दिसते.** म्हणूनच तिने आपला पत्नीधर्म, पतिप्रेम इत्यादी सोडले, सुबुद्धि नष्ट झाली. दशरथाची सत्ता तिच्यावर चालेना व सुविचार करण्याची शक्ती तिला राहिली नाही. **ही उदार व तात्त्विक विचारसरणी वा.रा. मध्ये येथल्यासारखी दशरथाच्याच मुखाने सांगितलेली नाही. येथे दशरथ या तात्त्विक विचारावर आरुढ असल्याने त्याला क्रोधाचा स्पर्श होत नाही. तो अपशब्द, दुर्वाद उच्चारीत नाही. आपली शांती गमावीत नाही आणि फक्त रामविरहभयशोक कमावतो. कोणते स्वभावचित्र अधिक अनुकरणीय आहे हे वाचकांनीच ठरवावे.** आकस्मिकपणे अंध झालेल्याचा पाय आमच्या डोक्यावर पडला तर त्याला दोष देणे योग्य होईल काय? व त्याच्यावर क्रोध करून दुरुत्तरे बोलण्याने फायदा तोटा काय व कोणाचा?

**चौ.६ - (१) बसवुनि विनवी धरून चरणां** - 'मृत्युर्बुद्धिमताऽपोह्यो यावत्बुद्धि-बलोदयम्' या श्रीमद्भागवत-वचनानुसार राजा पुन्हा प्रयत्न करतो. वा.रासुद्धा पाया पडून हात जोडले आहेतच. **'अंजलिं कुर्मि कैकेयि ! पादौ चापि स्पृशामि ते'** (२|१२|३६) असे म्हटले आहे. सार हे की प्रत्यक्ष पायांवर डोके ठेवले नाही की पाय हातांनी धरले नाहीत. 'मी तुझ्या पाया पडतो, हात जोडून तुला विनवितो' असे म्हणाले. मुलगा भलताच हट्ट घेऊन बसला म्हणजे माता काकुळतीस येऊन असेच म्हणत नाही काय? **असे स्त्रीला म्हणण्याची पाळी बलवान पुरुषांसही प्रपंचांत येत नसेल असे नाही. तेच दशरथ करीत आहेत. हे हास्यास्पदही नाही व अशक्यही नाही. असहाय, दीन झालेल्या पुरुषाची ही एक स्वभावोक्ती आहे.** हा भाषेचा एक अलंकार आहे. **(क) तूं दिनकर-कुल कुठार बन ना** - येथे कुठारचा अर्थ लक्षणेने कुऱ्हाडीचा दांडा असा घेणे जरूर आहे. काळ कुऱ्हाड आहे पण दांडा असल्याशिवाय कुऱ्हाड वृक्षास तोडू शकत

नाही. 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' व 'काळाची कुऱ्हाड' अशी म्हणच आहे. भाव हा की सूर्यकुळाचा नाश होणार हे स्पष्ट दिसत असले तरी सूर्यकुळांतीलच एक स्त्री निमित्त होणे बरे नाही. तेणे करून तुला कायमचा कालिमा लागेल. सूर्य हा जसा विश्वसुखद आहे - **'विश्वसुखद इव इंदु - तमारी'** तसेच दिनकर-कुल विश्वसुखद आहे. **'राम सच्चिदानंद दिनेश' = दिनकर** आहे. कुल = तनु शरीर, 'कुलं... भवने च तनौ क्लीबम्' (मेदिनी) राम हेच दिनकर कुलाचे शरीर आहे. तेच वनात घालविलेस की दिनकर-कुलालाच वनात घालविल्यासारखे होणार.

**उपदेश** - प्रारब्ध कर्मबलाने - दैवाने - एखाद्याचा विनाश होणार असला तरी असल्या **घोर कर्माचे निमित्त बनण्याचे आपण टाळावे. कल्याण-हित-कारक कर्माचे निमित्त बनणे श्रेयस्कर असते** हे येथे दाखविले.

**चौ.७ - (१) माग अतांच देउं शिर तुजला** - मी मरणाला भितो असे नाहीं - 'न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः' एका स्त्रीवर विश्वास ठेऊन कामी दशरथाने धर्माच्या नावाखाली रामासारख्या विश्वसुखदायक पुत्राला वनात पाठविला अशी अकीर्ति होईल व सर्व कुळाचा नाश होईल याला भितो. **'अनार्य इति मामार्याः पुत्रविक्रयिणं ध्रुवम् ॥ धिक्करिष्यन्ति रथ्यासु सुरापं ब्राह्मणं यथा ॥७८॥ बालिशो बत कामात्मा राजा दशरथो भृशम् । स्त्रीकृतेयः प्रियं पुत्रं वनं प्रस्थापयिष्यति ॥८३॥** (वा.रा. २।१२।) आर्य लोक माझा दारुड्या ब्राह्मणासारखा व पुत्र विक्रय करणारा अनार्य म्हणून भर रस्त्यात धिक्कार करतील. सज्जन म्हणतील की दशरथ राजा खरोखर अत्यंत कामी व बालिश आहे म्हणूनच त्याने बायकोसाठी प्रिय पुत्राला की हो वनांत हाकलून लावला ! **(क)** त्यापेक्षा वाटल्यास मला आधीच ठार मारून टाक; आताच्या आता मार; ही माझी मान नी ही घे तलवार ! मी मेल्यानंतर भरत राज्यावर बसला म्हणजे वाटेल तर तुझी दुसरी इच्छा घे पुरवून. माझ्या नावाला कलंक तरी लागणार नाही. भरताला राज्य दिले असल्याने तू राजमाता झालीच आहेस. त्याच्या गैरहजेरीत तू प्रशासक आहेस. दिलेल्या वचनाप्रमाणे मी वागत नाही म्हणून मला दे देहान्त शिक्षा. म्हणजे पापमुक्त होईन व मला कलंक लागणार नाही.

असे न केलेस तरी रामाला वनवासास पाठवून पतीला ठार मारणारी, पतिघातिनी असे लोक तुला म्हणणारच. आधी मारलास तर माझ्यावर तुझे उपकार होतील; पण रामविरहाने मात्र मला मारू नकोस. 'एक म्हणति हें **भलें न केलें** । वरां विचारें नृपें न दिधले ।। हटें कि दुःखा भाजन झाले । जणूं **ज्ञान-गुण गत, वश अबले**' (४८।२-३) असे काही लोक म्हणालेच आहेत. 'मायबाप ते वद सखि कैसे । जे धाडिति वनिं बालक ऐसे' (२।८९।२; १११।७) असे वनवासी ग्रामीण नारीनरसुद्धा म्हणाले आहेत.

**चौ. ८ - (१) रामा राखि गमे तें तुज कर** - वाटेल तेथे नगरांत ठेव. गुरुगृही ठेव, बंदिवासांत जन्मभर टाक, नाहीतर दुसऱ्या गावी स्थानबद्ध करून ठेव. मी तेथे जाऊन राहीन व रोज ।। सुखदायक मुख लोचनी पाहिन ।।. वाटल्यास आम्हा दोघांना तुरुंगात टाक; पण रामविरहाने मला मारू नकोस. नाहीतर 'मुनिवेष, तापस, विशेष उदासी' एवढे काढून टाक म्हणजे राम वनात राहील. तेथे मी व त्याच्यावर प्रेम करणारी मंडळी जाऊन राहू. तू व भरत आणि तुमच्यावर प्रेम करणारे असतील त्यांनी सुखाने अयोध्येत रहावे व तू गुण्यागोविंदाने राजविलास भोग. रामाचा व माझा वियोग केलास व तू आपला हट्ट मुळीच सोडला नाहीस तर मी लवकरच मरणारच. परंतु तुला मात्र जन्मभर पश्चातापाने जळावे लागेल. राम वनात गेले तर काय काय होईल या विषयी दशरथाने केलेले भाकीत व नगरजनांनी केलेले भाकीत अगदी तंतोतंत एक आहे. कैकयीने रचलेले सुखासमाधानाचे, सत्तालाभ, सवतीचा सूड इत्यादींचे उंच मनोरे मात्र पार धुळीस मिळाले आहेत. याचे कारण राजा व प्रजा सद्धेतुपूर्वक विचारे विवेके धर्मानुकूल वागणारे आहेत. कैकयीच एकटी द्वेष बुद्धीने प्रेरित, स्वार्थी, अधर्मी, पतिद्रोही व रामद्रोही बनली आहे. **क्रोधाने व दुष्टविकारांनी कलुषित झालेल्या मनाने केलेले तर्क बहुधा कुतर्क असतात**. संशय सर्प डसले की कुतर्क लहरी येऊन प्राणांतिक दुःख होतेच. 'संशयसर्पाशन उरगादः' राम जो पर्यंत विशेष कृपा करीत नाहीत तो पर्यंत हे असले जालीम विष उतरत नाही.

*हिं.दो.* *। देखी ब्याधि असाधि नृपु परेउ धरनि धुनि माथ ॥*
*॥ कहत परम आरत बचन राम राम रघुनाथ ॥३४॥*

*म.दो.* *। बघुनी व्याधि असाध्य नृप पडे धरणिं पिटि माथ ।*
*॥ परम आर्त बोलत वचन राम राम रघुनाथ ॥३४॥*

**अर्थ :** व्याधि (रोग) असाध्य आहे असे जाणून राजा मस्तक बडवीत धरणीवर पडला व परम आर्त (स्वराने) राम ! राम !! रघुनाथ!!! असे उच्चारू लागला.।।दो.३४।।

**टीका. दो. - (१) व्याधि** - 'विविधाः आधयः यस्मात्' (अ.व्या.सु.) ज्याच्यापासून विविध चिंता उत्पन्न होतात तो; अर्थात **अनेक चिंताजनक रोग.** असाध्य-बरा न होणारा. औषधे मंत्रतंत्रादि उपायांनीसुद्धा बरा न होणारा रोग असाध्य समजतात. साध्य, कष्टसाध्य व असाध्य असे रोगांचे तीन वर्ग वैद्यकशास्त्राने पाडले आहेत. असाध्य रोगांची लक्षणे **माधवनिदान** ग्रंथांत फारच चांगली दिलेली आहेत. त्यांची प्रतीति जेथे येईल तेथे यशस्वी वैद्याने औषधे देऊ नये असे **सुश्रुतांतही** स्पष्ट सांगितले आहे. सन्निपातज म्हणजे त्रिदोषजनित व्याधी बहुधा असाध्य वर्गात घातल्या आहेत. ज्वरांतच सन्निपात असतो असे नाही. कोणत्याही रोगांत कफवातपित्त हे त्रिदोष कुपित होणे म्हणजे संन्निपात होणे शक्य असते. **(क) कैकयीला कोणता असाध्य रोग झाला आहे** याचे निदान टीकाकार वैद्यांना नीट झालेले दिसत नाही. **तिला सवतीमत्सर शीतांग सन्निपात ज्वर झाला आहे.** 'दोन्ही **ज्वर मत्सर** अविवेकहिं' 'एक रोगवश नर मरति बहु, **असाध्य या व्याधि** ।। जीवा संतत पीडिती तो कशि लभे समाधि' (७।१२१।). **मत्सर हा वैष्णव ज्वर** असून **असाध्य आहे.** कौसल्या, दशरथ वैष्णव नाहीत असें कोण म्हणेल? शिवोपासनेने त्यांना परमोत्तम रामभक्ती प्राप्त झाली आहे. ज्वराने अंगाचा दाह होतो. डोळे लाल होतात. कैकयी क्रोधाने जळत आहे.. **क्रोध पित्त आहे. 'काम वात'** कौसल्येचा सूड घेण्याची कामना हा वात कुपित झाला आहे व तेवढ्यासाठी भरताला राज्य देण्याचा व आपली **सत्ता वाढविण्याचा अपार लोभ** उत्पन्न झाला आहे. **'कामवात कफ लोभ अमित तों । क्रोध पित्त**

उर नित्य जाळतो ॥ **प्रीति करिति जर तीन्ही भाई । सन्निपात उपजे दुखदाई'** (७।१२१।३०-३१) आता वाचकांनी सांगावे की **कैकयीला सवती मत्सर-सन्निपात ज्वर झाला आहे की नाही?** हा असाध्य व्याधि कैकयीला झाला आहे हे दशरथ वैद्याला प्रथम कळलेच नाही. त्याला वाटले की नुसता पित्तरोग आहे. निदानच चुकले. मग औषध कसे लागू पडणार ! हा शीतांग सन्निपात आहे. अंगाला हात लावला तर अगदी गार गार लागते पण तापमापन केले की १०५ असते ! हसणे, डोळे मारणे, प्राणप्रिय ! इत्यादी शीतल शब्दांचा उपयोग ती करीत होती. त्यामुळे १०५ ताप असेल अशी कल्पना येणारच कशी? **(ख)** भरताला राज्य हे गोड, सुगंधी **सीतोपलादि चूर्ण दिले,** पण कफ-शमन झाले नाही. स्वतःला मरण येईल ही **हेमगर्भाची व समीरपन्नगाची** मात्रा दिली तरी कामवाताचे शमन झाले नाही. **सूतशेखराची मात्रा** सकाळीच भरताकडे दूत पाठवितो वगैरे कबूल केले ही, पित्त शमनासाठी **दिली** तरी कोणताच दोष कमी झालेला दिसला नाही तेव्हा या भोळ्या वैद्याचे डोळे उघडले व कळले नक्की की व्याधी असाध्य आहे. **(ग)** काडीचा आधार घेऊन रामवनवास तटाला कसेतरी बिलगून होते; पण तो आधार आता सुटला. त्याबरोबर धाडकन पडले जमिनीवर. पूर्ण निराधार, असहाय, दीन झाले तेव्हा लागले डोके बडवून घ्यायला ! दुसरा वररूपी तट राजाने जरी कैकयीला दिला नाही तरी रोष प्रवाहाच्या धडक्या देऊन ती युक्तीने घेणारच.

(२) **परम आर्त** - अत्यंत दुःखी, व्यथित, शोकविव्हळ, निराश झाले. अशा दशेत **रामभक्ताच्या** मुखांतून तो **शिवोपासक असला** तरी राम राम ! रघुनाथ ! हेच शब्द बाहेर पडणार. स्वभावोक्ती अलंकार आहे. 'स देव्या व्यवसायं च घोरंच शपथं कृतं ।। ध्यात्वा **रामेति निःश्वस्य छिन्नस्तरुरिवाऽपतत्** ॥ (वा.रा. २।१२।५४). हे वाक्य व वरील दोह्यांतील वर्णन यांची तुलना करून सांगावे की कोणते वचन भावपूर्ण आहे? विविध विकारांचे व भावनांचे चित्र कोणते वचन उभे करते?

***हिं.*** ***। ब्याकुल राउ सिथिल सब गाता । करिनि कलपतरु मनहुँ निपाता ॥१॥***
***। कंठ सूख मुख आव न बानी । जनु पाठीनु दीन बिनु पानी ॥२॥***

*। पुनि कह कटु कठोर कैकेई । मनहुँ घाय महुँ माहुर देई ॥३॥*
*। जौं अंतहुँ अस करतब रहेऊ । मागु मागु तुम्ह केहिं बल कहेऊ ॥४॥*
म. *। व्याकुळ राव शिथिलता अंगां । जणुं करि करिणि कल्पतरु-भंगा ॥१॥*
*। कंठ सुके मुखिं येइ न वाणी । जणुं पाठीन दीन विण पाणी ॥२॥*
*। तैं कैकइ कटु कठोर वदते । जणूं क्षतामधिं विषा घालते ॥३॥*
*। होतें अंतिं असें करणें जर । वदला 'माग' बळें कवणें तर ॥४॥*

**अर्थ** : राजा व्याकुळ झाला व सर्व अवयवांना अशी शिथिलता आली की जणू करिणीने कल्पतरूच मोडून टाकला.॥१॥ कंठ सुकून गेला, मुखांतून शब्द सुद्धा निघेना व असा दीन झाला की पाण्यावाचून पाठीनच ॥२॥ तेव्हा (पुन्हा) कैकयी कटू व कठोर बोलून जणूं जखमेत (घावांत) विषच भरू लागली.॥३॥ तुमच्या मनात सरशेवटी असेच करायचे होते तर मग 'माग' असे कोणत्या बळावर म्हणालात?॥४॥

**टीका. चौ. १ - (१) जणुं करि करिणि कल्पतरु-भंगा** - 'मदिय **मनोरथ सुरतरु** फुल्ला । फळत करिणिने जणु उन्मुळला ' (२९।७) असे पूर्वी म्हणाले. **येथे राजाला कल्पतरु म्हटले.** याचकांच्या मागणीप्रमाणे कल्पतरु पाहिजे ते जसे पुरवितो तसे दशरथ राजा सर्वांच्या इच्छा पूर्ण करणारे आहेत. कैकयीने पूर्वी ठरविल्याप्रमाणे व पुढे ठरविणार आहे तसे दशरथ कृपण, लोभी नाहीत. सर्व लोकांची एकच लालसा आहे की राजा जिवंत असताच त्याने रामास युवराजपद द्यावे. दो. ५२ ही पहा. ही इच्छा पूर्ण होण्याच्या ऐन वेळीच हा कल्पवृक्ष या हत्तिणीने उपटून पाडला. म्हणजेच सर्व लोकांचा मनोरथरूपी कल्पतरु उपटला. (२९।७ टी.प.) दशरथ कैकयीचे मनोरथ पूर्ण करणारे असून तिने हे केले. कृतघ्न, पशुतुल्य, उन्मत्त बनली. **(क) आत्मघातकी पण आहेच** - असलेल्या एकाच कल्पतरूच्या डाहळ्या, पाने तिने तोडून खाल्ली असती तरी तिचे पोट भरले असते. पण आता झाडच उपटून टाकल्याने तिचे आजही पोट भरणार नाही व पुढेसुद्धा उपाशीच राहणार. भरतराज्य घेऊन स्वस्थ राहिली असती तर भागले असते पण आता तेल गेले तूप गेले हाती फुटके धुपाटणे आले असे होणार. झाड उपटून खाली पाडले की त्याच्या फांद्या पाने,

अगदी मलूल होतात तशी सर्व अंगे राजाची मलूल पडली. अवयवांतील जीवनच जणू कमी झाले.

**चौ. २ - (१) कंठ सुके** - घसा सुकला, कोरड पडली, सात्विक भाव प्रगट झाले. पाठीन - फार मोठा मासा. याला फार पाणी लागते. 'सुखी मीन जे जळां अगाधा । जशि हरिशरणां एक न बाधा' (४।१७।१) हरि = राम. हरिशरणांस बाधारहित ठेवणारे अगाध जळ म्हणजे हरिच. पाठीन अगाधजलशरण असतात. राम हेच अगाध जळ असून ते काढले जात आहे तोच ही दशा झाली. पाण्याबाहेर काढलेला मोठा मासा जसा फार तडफडतो, तसे दशरथ तडफडत आहेत. अगदी दीन झाले आहेत. रामरूपी जळ जाणार या कल्पनेनेच ही दशा झाली. मग वनांत गेल्यावर काय होईल ! (क) पाठीन शब्दाने येथे भव्यता दर्शविली. पूर्वी ताल वृक्षाने दाखविली होती. दाखविले की ताडाचे झाड कोणीकडे व तडफडणारा २-३ हात लांबीचा मासा कोणीकडे? वाणी मुखातून न येण्याला पूर्वी श्येनाने झडपलेल्या लावा पक्ष्याची उपमा दिली होती. (२९।५) लावापक्ष्यापेक्षा पाठीन अधिक व्याकुळ व गुदमरलेला असतो.

**चौ. ३ (१)- कटु कठोर वदते - 'वदे कैकयी किति कटु वचना । क्षतामधें जणुं घाली लवणा'** (३०।८) असे पूर्वी घडले पण आता **'जणूं क्षतामधिं विषा घालते'** पूर्वी कटु होते पण असे कठोर नव्हते तेव्हा लवण घातल्यासारखे दुःख झाले पण आता हे विषासारखे मारक व अत्यंत दाहक होणार.

**चौ.४ - (१) वदलां 'माग' बळें कवणें तर - 'विहसुनि घे इच्छित तें मागुनि'** (२६।७) **'मिथ्या दोष मला ना यावे । दोन च कां चारहि मागावे'** (२८।३) असे जे राजाने पूर्वी म्हटले त्यावर हा टोला आहे. **देण्याची शक्ती नसेल त्याने वाटेल ते माग म्हणणे चुकीचे आहे. औदार्याचा आव आणणाराने आपल्या दानशक्तीचा विचार करावयास हवा. मागेल ते काहीही देण्याची ज्याची धमक नसेल त्याने 'देतो, माग हवे ते' म्हणणे म्हणजे दंभ व फसवेगिरी आहे.** कैकयीचा भाव हा आहे की मी अविचाराने मागितलेच नाही; तुम्ही ज्या मर्यादा घातल्यात त्या मर्यादांचे उल्लंघन न करताच मी मागितले आहे. **'रंक कोण वद करूं नरेश'** ही एक मर्यादा व **'कुणा नृपा वद देउं विदेश'** (२६।२) ही

दुसरी मर्यादा होती. मी रंकाला नरेश करण्यास न सांगता तुमच्याच एका आवडत्या मुलाला युवराज करण्यास सांगितले, यात मी कोणता अतिक्रम केला? कोणत्याही राजाला हद्दपार करताना तुम्हाला या अगदी उतार वयात त्याच्याशी प्रथम युद्ध करावे लागले असते. कदाचित तो मेला असता व मगच तुम्हाला विजय मिळाला असता. तरीपण 'विदेश' देता न आल्याने तुमचा शब्द खोटा ठरला असता. राम एका शब्दानेसुद्धा विरोध करणार नाही व तुमचा शब्द सहज सत्य होईल. यांत तरी मी मर्यादाभंग कुठे केला. तुम्हीच अविवेकाने 'अमराला सुद्धा मारीन' अशी कोणालाही अशक्य असणारी गोष्ट करण्याचे बोललात; पण ते करण्यास सांगितले नाही. २६।२ च्या टीकेत पूर्वीच सुचविले आहे की ही राजाची प्रणय लीलांतील भाषाच त्याला विघातक ठरणार आहे. (क) इतक्या या सहज सोप्या गोष्टी करवत नाहीत. धारिष्ट नाही, तर **'जावो प्राणहि बचन-भंग ना' 'नहिं असत्यसम पातकपुंजा'** इत्यादी शुष्क वल्गना भ्याडाने कराव्याच का? **'सहसा करुनी मग पस्तावति । ते ना बुध, बुध वेदहि सांगति'** (२।२३१।४). आपले पोट जळत नाही त्याने महाराजाला मेजवानीला बोलावणे व तो रागावला म्हणजे हाता-पाया पडणे किती शहाणपणाचे ठरेल?

(२) फौजदार कोर्टातील वकिलाचे हे म्हणणे बिनतोड वाटत असले तरी ते एकतर्फी, शब्दच्छलावर आधारलेले, कायद्याच्या शब्दांवरच बोट ठेवणारे व खऱ्याला खोटे व खोट्याला खरे ठरविणारे आहे. **कायद्याचा भावार्थ (Spirit of the law) व गुन्हा करणाराचा हेतु लक्षात घेऊन न्यायाधीशाने निकाल द्यावयाचा असतो.** ब्राह्मण याचना करण्यास आल्यावर वाटेल ते माग म्हटल्यावर त्याने गोमांस किंवा मद्य मागितले किंवा त्याची स्वतःची मान उडविण्यास सांगितले तर ते देणे किंवा करणे धर्म्य व योग्य होईल काय? तू प्रियतम पत्नी म्हणून मी मागण्यास सांगितले की माझी व रघुकुळाची वैरीण समजून मागण्यास सांगितले? मी वरदान कबूल केले होते ते प्राणसंरक्षिका पतिव्रतेला की पुरुषाला पेचात फसवून त्याचा प्राण घेणाऱ्या पण्यांगनेला? रंकाला नरेश करीन असे म्हटले होते ना? भरत रंक नाही म्हणून त्याला नरेश करण्यास

मी वचनबद्ध नाही व राम अजून नरेश नाही म्हणून त्यास हद्दपार करता येत नाही. हेच म्हणणे हेतू व शब्द या दोन्ही दृष्टीने खरे आहे. ब्रह्मदेव सर्वज्ञ, त्रिकालज्ञ असूनसुद्धा त्याने 'वर माग' म्हटल्यावर कोणी मरणरहित आयुष्य मागितले तेव्हा 'हा वर मला देता येत नाही. काही अटींवर अमरत्व मागून घे.' असे अनेक वेळा सांगितले आहे. मागणारे दुष्ट, क्रूर राक्षस आहेत हे जाणूनसुद्धा 'वर माग' असे व्यापक दानच कबूल केले आहे. ब्रह्मदेवाची ही स्थिती तेथे त्याने निर्माण केलेल्या जगातील मानवांच्या दानशक्तीला मर्यादा असणारच ! परंतु 'हरि इच्छा'च वनात जाऊन विश्वकल्याण करण्याची असल्याने व 'भावी अति बलवान' असल्याने दशरथांचा मनवकील असे उत्तर देऊ शकला नाही व फिर्यादीनेच निकालपत्राची वाट न पाहता कायदा आपल्या हातात घेतला हे पुढे दिसेलच. **तथापि मागील परिच्छेदांतील ठळक अक्षरांतील तीन ओळी कृतींत उतरविणे मानवाचे कर्तव्य आहे.** आता आणखी तोंडसुख घेते :

***हिं.*** ***। दुइ कि होइ एक समय भुआला । हँसब ठठाइ फुलाउब गाला ॥५॥***
***। दानि कहाउब अरु कृपनाई । होइ कि खेम कुसल रौताई ॥६॥***
***। छाड़हु बचनु कि धीरजु धरहू । जनि अबला जिमि करुना करहू ॥७॥***
***। तनु तिय तनय धामु धनु धरनी । सत्यसंध कहुँ तृन सम बरनी ॥८॥***

***म.*** ***। सकृत किं होति उभय भूपाला । खदखद हसत फुगविणें गालां ॥५॥***
***। म्हणवोनी दाता हि कृपणपण । क्षेम कुशल साधतां शूरपण ॥६॥***
***। मोडा वचना; धीर धरा त्रा । अबलांसम ना शोक करावा ॥७॥***
***। तनु ललना सुत धरणि धाम धन । उक्त सत्यसंधा गणना तृण ॥८॥***

**अर्थ :** भूपाला ! दोन (विरोधी) गोष्टी एकाच वेळी घडू शकतात काय? खदखदां हसणे व गाल फुगविणे.॥५॥ दाता म्हणविणे व कृपणपणा करणे (आणि) शूरवीर म्हणवून क्षेमकुशल साधणे (या गोष्टी एकाच वेळी घडतात काय?) ॥६॥ (तेव्हा) एक तर वचन मोडा नाही तर धीर धरा; बायकांच्या सारखे (मुळमुळ रडत) शोक करीत बसू नका.॥७॥ जे सत्यसंध असतात त्यांना आपले शरीर, स्त्री, पुत्र, धरणी, घर व धन ही तृणासमान वाटतात. असे (सज्जन) म्हणतात. (उक्त) ॥८॥

**टीका. चौ. ५ रघुकुल-रीतिस कदा खंड ना । जावो प्राणहि वचन-भंग ना'** या राजाच्या वचनावर पुढील तीन चौपायांत झोड उठविली आहे. हिने पूर्वीच म्हटले आहे की **'स्तवुनि सत्य वर देतो म्हटले । चणे फुटाणे घेइ वाटले'** (३०।६) प्रतिज्ञाभंग न करता रामाला वनवासास पाठवू नये अशी राजाची उघड उघड इच्छा दिसते. त्यावर हे तडाके मारीत आहे. (१) **भूपाला** - 'उलथी भूपरूप तरुमूला' यांत भूप शब्द ज्या भावार्थाने वापरला आहे तोच भाव येथे 'भूपाल' शब्दांत आहे. रामवनवासरूपी भू (नदीचा तट-वर) कैकयीला देण्याची इच्छा नाही. ती भू (भूमि, वर = तट) आपल्या ताब्यात ठेऊन सत्यसंध रहावयाचे आहे. (क) **खदखद हसत फुगविणे गाला** - खदखदा हसताना ओठ उघडतात. तोंड उघडते व गालांना खाडे पडतात. गाल फुगवताना ओठ व तोंड मिटतात व गाल फुगतात. एक हास्य रस आहे व एक क्रोधाचे प्रगट लक्षण आहे. हास्य व क्रोध एकत्र असू शकत नाहीत. हा चरण फार गूढ आहे. विहसणे (खदखदा हसणे) हसणे व स्मित करणे या उत्तरोत्तर उतरत्या पायऱ्या आहेत. कैकयी तीन वेळा खदाखदा हसली (विहसली) व एकदा हसली आहे. (२६।७, २६, व २७।८ 'विहसुनि', २८।८ हसुनि') राजा फक्त एकदाच हसला आहे. खदखदां हसला नाही की क्रोधाने गाल फुगविले नाहीत. म्हणून या चरणाचा संबंध कैकयीशीच आहे. कारण विहसून रोषाच्या पायऱ्या तीच चढली आहे. 'प्रिये हासरुष सोडुनी -' (३२) असे राजाने तिच्याबद्दलच-तिलाच म्हटले आहे. कैकयीचा भाव हा आहे की मी खूप रागावले, मोठमोठ्याने हसले व खूपखूप रागावले; त्यावरून तुमच्या सारख्या राजनीतिपटु भूपालास कळावयास हवे होते की ही आता प्रिया राहिली नसून वैरीण बनली आहे ! वाच्यार्थ अगदी स्पष्ट आहे.

**चौ.६** (१) **म्हणवोनी दातहि कृपणपण** - 'जावो प्राणहि वचन-भंग ना' अशी शेखी मिरविणाराने 'मोडिन वचना प्राणभंग ना' अशी कृती करणे हे दंभ आहे. माझ्यापुढे दंभ टिकणार नाही. दाता म्हणवून कवडीचुंबक बनणे हेहि दंभच; पण ते किती वेळ टिकणार? (क) **क्षेमकुशल साधतां शूरपण** - वीर, शूर धीर भूपती असतात ते प्राणत्यागाला भीत नाहीत. योगक्षेम तर

चालावा, शरीराला इजा तर मुळीच होऊ नये. दमडी खर्च होता नये आणि शूर वीर बनून युद्धाला जाण्याची भाषा तर बोलवयाची हे भ्याडाचे, नामर्दाचे लक्षण आहे. रामराज्य जाणार व ऐश्वर्य हानी होणार आणि रामवनवासामुळे विरहदुःख भोगावे लागणार या भीतीने तुम्ही आता मागे पळ काढता हे काय शूराचे व वीराचे लक्षण? सत्याची प्रशंसा केलीत, रघुकुलरीतीचे गोडवे गाइलेत, रामाच्या शपथा घेतल्यात नी आता मला दम भरता की राम वनात गेला तर मी मरेन? याचा अर्थच हा की दुसरा वर देत नाही असे स्पष्ट न सांगता आडपडद्याने सांगावयाचे. म्हणजेच प्रतिज्ञाभंगाचे भय, अपकीर्तीचे भय, कुलकलंक ठरण्याचे भय रघुकुळांतील विश्वविख्यात, कीर्तिमान, शूरवीर राजाला मुळीच वाटत नाही हे ठरलेच. थोडक्यात सार हे की तुम्ही मेलात तरी मला वाईट वाटणार नाही पण रामाला वनात धाडल्याशिवाय गत्यंतर नाही. (ख) पूर्वी म्हणाली, **'वदुनि 'देउं वर' भलें न देणें । त्यजुनि सत्य जगिं अपयश घेणें'** (३०।५) **'द्या किं अयश घ्या म्हणून नाही'** (३३।६) यापेक्षा येथील भाषण अधिक कठोर व विषारी नाही काय?

**चौ. ७ - (१) अबलांसम ना शोक कराया** - स्वतः अबला असून प्रबल झाली आहे व सम्राटाला, स्वतःच्या स्नेहमूर्ति पतीला अबला ठरवीत आहे हा दैवदुर्विपाक व स्त्रीचरित्र लक्षात ठेवावे. अत्यंत प्रेमाने व सुशीलतेने पतिमनोरंजन करणारी रमणी प्रबल झाली म्हणजे एका सुविचाराशिवाय कोणती गोष्ट करणार नाही? ती सांगते की सत्यप्रतिज्ञ ठरणे असेल तर रामाचा त्याग करा, नाहीतर प्रतिज्ञा मोडा. या शिवाय तिसरा मार्ग नाही. परंतु 'प्रतिज्ञा मोडा' हे म्हणणे वरवरचे व राजाच्या सत्य निष्ठेला जागृत करण्यासाठी मारलेली पराणी आहे. **'मुनिवेषे जर उदयिं ना जातिल राम वनांत ॥ मम मरणहि तव अयश नृप समजा होय मनांत'** (३३) असे सणसणून बजावले आहे.

**चौ. ८** (१) क्रोधाच्या आवेशात बोलताना चुकून ती थोडी घसरली; पण लगेच ध्यानात आले की याने जर वचनभंग करण्याचे ठरविले तर इतके करून काय मिळविले? हा दुखावलेला भुजंग माझा पक्का सूड घेतल्याशिवाय राहणार नाही. ही घसरगुंडी या चौपाईने सुधारते. (क) तनु - प्रथम उल्लेख केला.

कारण **'प्रिय न तनू-प्राणांहुनि काहीं'**. तुम्हाला मरणाचे भय वाटते; पण सत्यसंध तनूला तृणासमान मानतात. तनु = तुच्छ, स्वल्प, क्षुद्र असेच बोलून चालून मनुष्य शरीर ! त्याचा इतका लोभ कशाला? **(ख) ललना** - देहाच्या खालोखाल प्रिय असते स्त्री. तुम्हाला कौसल्या रामापेक्षा जास्त प्रिय वाटते हे सुचवीत आहे म्हणून 'सुद्धा' नंतर घातला. राम सकाळी मुनिवेषाने वनात गेले नाहीत. तर मी मरेन (प्राण देईन) असे तिने स्पष्ट सांगितले असता राजा रामाला वनात धाडण्यास तयार नाही. यावरून त्याला कैकयीच्या मरणाची पर्वा नाही हे उघड होत आहे. **'प्रिये ! प्राण सुत, सर्वहि मम जें । प्रजा सपरिजन तववश समजे'** (२६।५) असे जे राजा म्हणाला त्यावर हा तडाका आहे. या सर्व गोष्टी माझ्या स्वाधीन केल्याक्र आता मरणाची भीती का वाटते? मरणाने या सर्वांचा वियोग होईल, हे सर्व तृणासमान ठरेल हे ठरलेलेच ! **(ख)** शिबि दधीचि बलि जें जें वदले । त्यजुन देह धन वचन पाळले' असे पूर्वी म्हणाली. (३०।७) **'सत्यसंधाला तृणासमान वाटतात'** म्हणण्यात भाव हा की तुम्हाला तृणासमान वाटत नाहीत म्हणून तुम्ही सत्यसंध नाही. असा हा उघड उघड आरोप आहे, विष आहे !

*हि.दो.* ***। मरम बचन सुनि राउ कह कहु कछु दोषु न तोर ॥***
***॥ लागेउ तोहि पिसाच जिमि कालु कहावत मोर ॥३५॥***

*म.दो.* ***। श्रुनि मर्म-वच नृप म्हणे वद, न दोष तव कांहिं ॥***
***॥ पिशाच्चसा लागून तुज काळ वदवि मम पाहि ॥३५॥***

**अर्थ :** तिचे मर्मी भाषण ऐकून राजा म्हणाला 'बोल (तुला हवें तें बोल) त्यात तुझा मुळीच दोष नाही. माझा काळच तुला पिशाच्चासारखा लागला आहे व तो (च) तुझ्याकडून हे बोलवीत आहे.।।दो.३५।।

**टीका दो.** - (१) **'नारिमिषें शिरिं मृत्यू नाचे'** (३४।५) असे नुकतेच दशरथांस वाटले. या उपसलेल्या रोषतरवारीने पूर्वी चांगलेच वार केले. या वेळी तर ती विषारी बनली व वारंवार मर्मावर वार केले गेले. **(क) पिशाच्चसा काळ** - शिरावर नाचणाऱ्या मृत्यूला, काळाला, राजाच्या मर्मस्थानी शिरता येईना. तेव्हा त्याने जणू काय पिशाच्चरूप घेतले व ते पिशाच्च कैकयीला

लागले व त्याने विषारी वार वारंवार केले. दशरथाचा काळरूपी पिशाच्चाने कैकयीला झडपली आहे. पिशाच्च लागलेली व्यक्ती जशी बेफाम, उद्दाम होऊन त्या पिशाच्चाच्या प्रेरणेने वाटेल त्याला, वाटेल ते बोलते तशीच ही बोलत आहे. **दोष कैकयीचा नसून आपला काळ तिच्याकडून, तिच्या मुखाने हे मर्माघात करीत आहे. हे राजाने ओळखले. किती उदात्त, किती संयमी व किती शांत हृदय हे ! वा.रा. असे चित्र नाही.** 'वातभूतवश जे मदमस्त । ते बोलति अविचारें ग्रस्त ॥ जिहिं कृत महामोह-मद-पाना । त्यांचे शब्द न घेणे कानां' (१।११५।७-८) हा उपदेश येथे सक्रीय झालेला दाखविला. 'भूतोपहतचित्तेव ब्रुवती **मां न लज्जसे ॥ शीलव्यसनमेतत्ते नाभिजानाम्यहं पुरा**' (वा.रा. २।१२।५७) यांत पिशाच्च-भूत-लागणे इतकेच साम्य आहे. येथे (वा.रा.) जे अपशब्द वापरले आहेत तसे मानसांत मुळीच नाहीत व तेथे कैकयीला निर्दोष ठरविली नाही. कैकयी निर्दोष असून स्वतःचा काळच कारण आहे हे मानसांत येथे सांगितले.

***हिं.*** ***। चहत न भरत भूपतहि भोरें । बिधि बस कुमति बसी जियँ तोरें ॥१॥***
***। सो सब मोर पाप परिनामू । भयउ कुठाहर जेहिं बिधि बामू ॥२॥***
***म.*** ***। भरत न होउं इच्छि मुळि नृपती । विधिवश जीविं वसे तव कुमती ॥१॥***
***। हें मम पापाचें फळ पिकलें । म्हणुन अवेळीं दैव किं फिरलें ॥२॥***

**अर्थ :** राजा होण्याची इच्छा भरताला मुळीच नाही. पण दुर्दैवाने (प्रारब्धवशात) दुर्बुद्धीने तुझ्या हृदयात वस्ती केली (शिरली ती). ॥१॥ हे माझ्या पापाचे परिपक्व झालेले फळ आहे; म्हणूनच भलत्या वेळी दैव फिरले (उलटले) ॥२॥

**टीका. - चौ. १ - (१) भरत न होउं इच्छि नृपती -** भरताला निष्कंटक राज्य मिळावे अशी तुझी इच्छा आहे; पण ही दुर्बुद्धी आहे. कारण राज्य आपल्याला मिळावे असे भरतास कधीच वाटणार नाही. तू ज्या भरतासाठी ही सर्व खटपट केलीस तो भरत राज्याचा मुळी स्वीकारच करणार नाही. भाव हा की तुला दोन्हीकडून पश्चात्ताप होईल.पण तू तरी काय करणार ! जन्मभर पश्चात्तापाच्या भट्टीत बिनबोभाट होरपळत राहण्याचे तुझ्या प्रारब्धांतच असल्याने तुला दुर्बुद्धि झाली आहे. (वा.रा. दशरथाने भरताला सशर्त शाप दिला आहे.)

**चौ. २ - (१) हें मम पापाचें फळ पिकलें** - तुला दुर्बुद्धि झाली हे माझ्याही पापाचे फळ आहेच. माझ्या पापाचे फळ माझ्या पदरात टाकण्यास कोणीतरी अधिकारी व्यक्ती पाहिजे होती. म्हणून तुला ऐनवेळी अशी दुर्बुद्धी झाली. तूही काही तरी घोर पाप केले असशील पूर्वी म्हणून माझ्या पापाचे फळ मला देण्यास तूच निमित्त बनत आहेस. '**बीज विपत् वर्षा ऋतु किंकरी । कैकयि-कुमतिच बने भूमि बरि** (२३।५) या चौ.च्या टीकेत दाखविले आहे की कैकयीलाच दुर्बुद्धी का झाली व दशरथाचे व तिचे पाप कोणते. समान संस्कार व भोक्तव्य आणि समान पुण्य फलभोग असल्याने दोन्ही जीव कर्मविपाक सामर्थ्याने ईशप्रेरणेने एकत्र आले. स्वतःच्या पापांचे फळ पदरात पडण्यास कोणी स्वतःच निमित्त होतात तर कोणाच्या पदरांत इतर कोणाकडून ते टाकले जाते. (**क) अवेळी दैव फिरले** - ज्या वेळी रामाला राज्यावर बसवून सर्वांनी आनंदात मग्न व्हावयाचे त्याच वेळी अगदी विपरीत घडून सर्वांनी शोक सागरात बुडावयाचे व मी मरावयाचे इतकेच वाईट आहे. रामराज्याभिषेकानंतर मला मरण आले असते तर ते विपरीत वाटले नसते. तो सरळ मार्गच आहे. सुखाच्या शिखरावर बसण्याच्या वेळी दुःखाच्या खाईत पडणार हेच सर्वांना असह्य होणार आहे. काय दाखविणार होता आणि काय दाखविले विधीने ! राजहंसाचे चित्र काढता काढता तयार झाले काकाचे - कावळ्याचे चित्र ! इत्यादी प्रकारे हाच भाव सर्व लोकांनी प्रगट केला आहे.

**वि. ल. टे.** - '**दोष तव नाही**', '**मम काळ तुज ववती**', '**नारिमिषें शिरिं मृत्यू नाचे**', व '**मम पापाचें फळ पिकलें**' इत्यादी वाक्यांनी दशरथाची कैकयीच्या आचरणाकडे पाहण्याची दृष्टी दाखविली व '**कोणि कुणा सुखदुःख न दाता । निजकृत कर्मभोग ते भ्राता ! ॥** (२।९२।४) **विश्वा कर्मप्रधान राखिला । जो करि जसें तसें फळ चाखित**' या कर्मविपाक सिद्धान्ताचा उपयोग दुःखभोगसमयीं कसा करावा हे येथे दशरथाच्या आचार, विचार, उच्चारांनी प्रत्यक्ष दाखविले आहे. दशरथ म्हणतात ते केवळ स्वतःच्या तत्कालिक समाधानासाठी किंवा कैकयीस खूष करण्यासाठी नाही. अशा बिकट प्रसंगी अशाच विचाराने वागले पाहिजे. आपल्या पापांचे कडू फळ आपल्या पदरात टाकण्यास निमित्त केली

जाणाऱ्या व्यक्तीवर क्रोध करण्याचा व वैरभाव धरण्याचा खरोखर आपला अधिकारच नाही व तसे केल्याने आपण नवे घोर पाप करतो हे विसरू नये. हा कर्मविपाक-सिद्धांत याच काण्डांत लक्ष्मण गीतेत सांगितला आहे.

***हिं.*** ***। सुबस बसिहि फिरि अवध सुहाई । सब गुन धाम राम प्रभुताई ॥३॥***
***। करिहहिं भाइ सकल सेवकाई । होइहि तिहुँ पुर राम बड़ाई ॥४॥***
***। तोर कलंकु मोर पछिताऊ । मुएहुँ न मिटिहि न जाइहि काऊ ॥५॥***

***म.*** ***। पुन्हां स्ववश पुरि बसेल शोभन । राम सकल गुणनिधिचें शासन ॥३॥***
***। करितिल बंधु रामसेवा किल । राम महत्ता त्रिलोक गातिल ॥४॥***
***। तुझा कलंक नि पस्तावा मम । मरुन नष्ट कधिं होइ न उपशम ॥५॥***

**अर्थ :** पुरी अयोध्या पुन्हा सुशोभित होऊन स्वतंत्रपणे बसेल आणि सर्व गुणांचे सागर अशा रामाची सत्ता (प्रभुता, शासन) सुरू होईल.॥३॥ सगळे बंधु रामाची सेवा करतील हे निश्चित आणि रामाची महत्ता त्रैलोक्यात गाइली जाईल.॥४॥ (परंतु) तुझा कलंक (तूं) मेल्यावर सुद्धा कधी जाणार नाही व माझा पश्चात्ताप मी मेल्यावरसुद्धा शान्त होणार नाही.॥५॥

**टीका.चौ.३ - (१) पुरि पुन्हां वसेल - 'पाडि अयोध्ये उजाड कैकयि'** (२९।९) असे जे मनात म्हणाले होते तेच ध्वनित करतात की या तुझ्या दुर्बुद्धीने अयोध्या ओसाड पडली तरी ती पुन्हा उत्तम प्रकारे बसेल. सुबस = स्वबस = स्ववश; (जसे सुभाउ = सुभाव = स्वभाव) = स्वतंत्र. १४ वर्षानंतर स्वतंत्रपणे वसेल. सुचविले की १४ वर्षे परतंत्र राहील. **'शोक शोक करि धरुनी हो तन'** (२९।७) अशी शोकाची सत्ता सध्या दशरथ राजावरच चालत आहे; पण शोकाचे सैन्यच डंके पिटून अयोध्येवर आता स्वारी करणार आहे. **'मुख सुकती स्रवती नयन उर अपुरा शोकरस ॥ जणूं करुणरस-कटक करि चाल पिटुनि डंक्यांस'** (४६). या प्रमाणे अयोध्या १४ वर्षे शोकरूपी शत्रूच्या ताब्यात राहणार. शोक-परतंत्र होणार. **(क) वसेल शोभन** - परतंत्रता पूर्णपणे जाऊन स्व-तंत्रता मिळाली की आनंद उत्साह, सुख, समाधान यांची लयलूट होते. तसेच अयोध्येला लाभेल व अयोध्या सुंदर, मनोहर, पवित्र दिसू लागेल. भाव हा की १४ वर्षे अयोध्या भयाण, अपवित्र, कुरूप होऊन राहील. **'दिसे अयोध्या भीषण**

**भारी । काळरात्र कीं जणुं अंधारी ॥ घोर जंतुसम पुरनरनारी । बघुनि परस्पर भितात भारी ॥ जणुं भूतें परिजन मसाण घर । मित्र सुहृद सुत जणुं यम किंकर'** (८३।५-७) अशी अयोध्येची दशा रामवनगमनानंतर दशरथ मरण्यापूर्वीच झाली आहे. मसाण, भुतें, इ. सर्व अपवित्र भीषण व कुरूप उजाड असतेच.

(२) **रामसकल गुणनिधिचें शासन** - तुझ्या इच्छेने शोकाची व तुझी, सकल-अवगुण निधीची, सत्ता (शासन) १४ वर्षे राहणार म्हणून अयोध्येची वरच्यासारखी दुर्दशा होईल; पण सकल सद्गुण सागर राम अयोध्याधीश होतील १४ वर्षांनी, तेव्हाच अयोध्या शोभन व स्वतंत्र होईल. भाव हा की भरत राज्य स्वीकारणार नाही. स्मशानासारख्या झालेल्या नगरीवर तू राज्य कर. जे जे व्हावे असे तुला वाटत आहे ते ते न होता सर्व गोष्टी तुझ्या इच्छेविरुद्धच घडतील.

**चौ. ४ - (१) करितिल बंधु राम सेवा** - तुला वाटत आहे की भरत स्वामी व्हावा व रामादिकांनी त्याची गुलामाप्रमाण सेवा करावी. पण तसे न घडता रामच स्वामी होणार व तिघे बंधु खुशीने रामाची सेवा करतील. रामसेवक बनतील. (क) तुला वाटते की राम कायमचाच वनात राहील किंवा १४ वर्षांच्या आंत नष्ट होईल व कदाचित परत आला तरी त्याला कोणी विचारणार नाही. पण राम अशी कीर्ती संपादन करून येईल परत की **'राम महत्ता त्रिलोक गातिल'** सर्व जग रामाची स्तुती करतील व त्याची कीर्ती गाईल. तुझी प्रसिद्धी व्हावी असे तुला वाटते पण -

**चौ. ५ - (१) तुझा कलंक मरुनि कधिं नष्ट न होइ** - तुझ्या नावाला, तोंडाला कलंक, काळिमा लागेल व तो वज्रलेप होईल. तू मेलीस तरी तुझ्या नावाला लागलेला कलंक मरणार नाही. तो कल्पांतापर्यंत राहील. अजूनही 'कैकयी' हे नाव कलंकितच आहे. लाखो वर्षे गेलीच जोपर्यंत रामकथा राहील तोपर्यंत कैकयीचा कलंक जाणार नाही. (क) **पस्तावा मम होइ न उपशम** - **दशरथांचा पश्चात्ताप मेल्यावर** सुद्धा होताच; परंतु **फक्त १४ वर्षेच**. लंकाकांडांत रावणवधानंतर दशरथ तेथे आले असता प्रभूंनी कृपादृष्टीने अवलोकन करून त्यांस ज्ञान दिल्यानंतर पश्चात्ताप नष्ट झाला आहे. म्हणून मेल्यावरसुद्धा उपशम पावणार नाही हे वचन सत्यच आहे. वा.रा. ६।१२२।१५ त स्पष्टच

म्हटले आहे की **'त्वां तु दृष्ट्वान कुशलिनं परिष्वज्य सलक्ष्मणम् ॥ अद्य दुःखाद्विमुक्तोऽस्मि नीहारादिव भास्करः'** आज तुला लक्ष्मणासहित कुशल पाहून व आलिंगन देऊन मी दुःखविमुक्त झालो. जसा धुक्यांतून सूर्य.

(क) कैकयीच्या कलंकाला जन्मभर पश्चातापाची जोड आधीच दिलेली आहे - 'तूं ना तर उरिं जळसि जन्मभर' (३४।८). येथे सुद्धा हेच दाखविले की जास्तीत जास्त दुःख व अकीर्ती कैकयीच्याच वाट्यास येणार. (ख) मग न शोक तनु राहो जावो । जेणें पश्चात्ताप न पावों' (२।४।५) असे दशरथांनी वसिष्ठांजवळ म्हटले आहे. रामाला राज्याभिषेक करण्याआधी मरण आले तर मला शोक व पश्चात्ताप करण्याची पाळी येईल, असे म्हटले. आता मरणाच्या आधी राज्याभिषेक तर होत नाहीच पण रामाला वनात पाठविण्याची पाळी आली ! तेव्हा राजाला शोक व पश्चात्ताप किती झाला असेल याची कल्पनासुद्धा इतरांस करता येणार नाही. राजाने केलेले सर्व भाकीत अक्षरशः खरे झाले आहे.

*हिं.* ***। अब तोहि नीक लाग करु सोई । लोचन ओट बैठु मुहु गोई ॥६॥***
***। जब लगि जिऔं कहउँ कर जोरी । तब लगि जनि कछु कहसि बहोरी ॥७॥***
***। फिरि पछितैहसि अंत अभागी । मारसि गाइ नहारु लागी ॥८॥***

*म.* ***। आतां कर जें रुचे तव मना । जा येथुनि बस लपवुनि वदना ॥६॥***
***। विनवुं जुळुन कर, जगेन जोंवर । नको पुन्हां वदुं काहीं तोंवर ॥७॥***
***। मग पस्तावसि अंतिं अभागी । गाय मारिसी वादीलागीं ॥८॥***

**अर्थ :** आता तुला बरे वाटेल ते कर; (फक्त) येथून दूर जा व आपले (काळे) तोंड लपवून बस (कुठेही) ॥६॥ तुला हात जोडून विनंती करतो की जोपर्यंत मी जगेन तोपर्यंत तू पुन्हा काही सुद्धा बोलू नकोस.॥७॥ (चामड्याच्या) वादीसाठी गाय मारीत आहेस पण तू अभागी आहेस व शेवटी तुला (भरपूर) पश्चात्ताप करावा लागेल.॥८॥

**टीका. - चौ. ६ - (१) कर जें रुचे तव मना -** मला जितक्या प्रकारांनी तुझी समजूत घालता आली व घालणे कर्तव्य होते तितकी मी घातली; पण तुझा माझ्या शब्दांवर विश्वास नाही. यापुढे तुझ्याशी भाषण करण्याची माझी इच्छा नाही व करणे योग्य नाही. तुझ्या मनाला बरे वाटेल ते तू कर. भरताला

राज्य दे वा देऊ नकोस; रामाला राज्यावर बसव नाहीतर वनात धाड. जे परिणाम होतील म्हणून मी सांगितले त्यांतील तुला जो आवडत असेल त्यास आवश्यक व योग्य ते कर. **(क) राजाने राजनीतीच्या चारी चरणांचा उपयोग क्रमशः करून पाहिला. I साम** - प्रथम सामोपचारांनी सांगितले की तू रामप्रेमी व पतिव्रता आहेस तेव्हा तू असे करशील असे मला वाटत नाही. हातापाया पडून विनंत्या केल्या. **II दाम - (दान)** भरताला राज्य देतो अगदी थाटाने समारंभ करू वगैरे. **III दंड** - रामाला वनवासास पाठविशील तर मला मरण येईल व तू विधवा होशील. तुझी अकीर्ति होईल. पतिघातिनी म्हणतील तुला; इत्यादी. **IV भेद** - भरत राज्य स्वीकारणार नाही. राम अयोध्यापती होतील व बंधू रामसेवा करतील. तुझा कलंक मेल्यानेसुद्धा जाणार नाही इ. **(ख) जा बस लपवुनि वदना** - तू रामविमुख, विश्वास घातकी, रामद्रोही, रविकुल कलंकिनी बनलीस म्हणून तुझे तोंड पाहणे सुद्धा पाप आहे. हे रामद्रोही तोंड कोणालाही दाखवू नकोस. कुठेतरी अशा ठिकाणी बस लपून की तुझे तोंड कोणाच्या दृष्टीस पडणार नाही. भरत तर याहून कठोर शब्दांत सांगतात **'काळें तोंडा कर । कुठें दडव, मज दाखवि ना बरं !'** (१६२।८)

**चौ. ७-८ (१) जोंवरि जगेन** - आतां मी फार दिवस जगणार नाही. आता यापुढे रामद्रोही मुखांतून निघालेले शब्द ऐकण्याची इच्छा नाही. ते कानी पडले तर मला अधिक क्लेश होतील. **(क) मग पस्तावसि अंतिं** - आज तुला वाटत आहे की राजा बोलत आहे या केवळ धमक्या आहेत. रामाला वनवासात पाठवू नये म्हणूनच उभे केलेले हे काल्पनिक भयाचे डोंगर आहेत; ५ग ज्या वेळी माझे शब्द खरे ठरतील व भरत तुझा अत्यंत धिक्कार करून तुझा अव्हेर करेल आणि जी ती व्यक्ती तुझी निंदा करील त्या वेळी शेवटी तुझा मद उतरेल आणि मग जन्मभर पश्चात्ताप करीत बसशील. पण मग त्या पश्चात्तापाचा काही उपयोग तुला होणार नाही. पण ज्या अर्थी अजूनसुद्धा तुला सुमति सुचत नाही त्या अर्थी तू पक्की **अभागी आहेस** असे दिसते. **'बधुनि सरल सीते दो भावां । राणिस कुटिल पुरा पस्तावा ॥ अवनि-यमां मागत कैकेई । महि न ठाव, विधि मरण न, देई ॥ रामविमुख थळ नर्कि न पावति'** (२।२५२।५-७). अशी

दुर्दशा शेवटी झालीच आहे.

(२) **गाय मारसी बादी लागीं** - गाय मारणे मोठे पातक आहे. गायीच्या मुळेच शेती करता येते. त्यामुळे अन्नधान्यादी पिकते. गायीच्या आश्रयानेच यज्ञयाग करून सुभिक्ष आणि देवदेवता प्रसन्न करून ऐश्वर्य संपादन करता येते. अशा गायीला मारणे म्हणजे धर्मनाश. प्रजाद्रोह, देवद्रोह करण्यासारखे आहे. कोणत्याही कारणाने गोहत्या करणे हे भयंकर पाप आहे. गोहत्या करणाराला तो प्रायश्चित्त करीपर्यंत बहिष्कृत करावा. त्याच्याशी भाषण, पंक्तिभोजन इ. व्यवहार करणे सुद्धा पाप आहे. त्यातून चामड्याच्या वादीसाठी गाय मारणे तर अत्यंत घोर पातक आहे. महामूर्खपणा व मदांधता आहे. (क) अयोध्येच्या राज्यासाठी तू गायीसारख्या दीन झालेल्या अयोध्याधीशाला व आपल्या पतीला ठार मारीत आहेस. अयोध्येचे राज्य रामविरहित होऊन भोगणे म्हणजे चामड्याची वादी चघळण्यासारखे आहे, असे मला वाटते व माझ्या प्रिय भरतालाही वाटेल. चामड्याची वादी आधीच अपवित्र, त्यातही गाय मारून तिच्या चामड्याची वादी चघळणे म्हणजे गोहत्या करून गोमांस भक्षण करण्यासारखे आहे. दशरथ धीर, वीर, महापराक्रमी असून वचनबद्ध झाल्यामुळे गायीपेक्षाही दीन, असहाय झाले आहेत. कैकयी वाघीण बनून दशरथ पतिरूपी गायीला ठार मारू बघत आहे. वाघीण जशी गायीला मारून मांस भक्षण करते व त्या गायीच्या चामड्याचे तुकडे आपल्या पिलांस चघळण्यास शिकविते, तसे दशरथांस मारून स्वतःच्या हाती सत्ता घेऊन भरताला राज्यभोग मिळवून देण्याची हिची इच्छा आहे. पुढे कैकयीला वाघीण म्हटलेच आहे. 'बघे मृगिंस वाघीण भुकेली' (५१।१) पण भरत सिंहाचा छावा आहे तो असे दुसऱ्यांनी मिळविलेले अपवित्र राज्य मुळीच स्वीकारणार नाही. त्याच्या नुसत्या क्रोधाच्या दृष्टीने तुझ्यासारख्या हत्तीणीचा मद तेव्हाच क्षणात उतरेल. कैकयीला करिणी = हत्तीण म्हटलेच आहे.

(३) **नहारू**, नाहरू, नहारहि, नहारुहि असे विविध पाठ येथे आहेत. नाहरु = वाघ, सिंह; नहारू = नाहरू = वाघ, सिंह, ससाणा व कातड्याची वादी असे अर्थ हिंदी-मराठी कोषांत (वैशंपायन) आहेत. पैकी येथे सिंह व वादी हे दोन अर्थ योग्य आहेत व त्या अर्थाधारेच वरील भाव स्पष्ट केले

आहेत. टीकाकारांनी नानाविध अर्थ केले आहेत व पाठभेद विपुल आहेत. जो बहुतमान्य व पुराण पाठ आहे तो मा.पी व कल्याण मानसांक इत्यादींत आहे. नहारू = नाहरु याचे वरील दोन अर्थ घेतले की कल्पनांचे रान माजविण्याचे कारण उरत नाही. **'नहारू' हा पाली भाषेतील (चामड्याची) वादी या अर्थाचा शब्द आहे.** नहारू शब्द हिंदी शब्दकोषांतून सुद्धा नाही; नाहरू आहे. मा.पी.संपादक नहारू = नाहरुच समजतात.

(४) हिंदी अनुवाद लिहिताना आज (४-१०-६३) एक चांगला अर्थ साधार सापडला. 'नहार' = अनशेपोटी, रिकाम्या पोटी, अनशेपोटी भूक शमविण्यासाठी तू गोहत्या करीत आहेस जशी भुकेली वाघीण करते. ५१।१ मध्ये कैकयीला भुकेली वाघीण म्हटलेच आहे. जसा 'पहार'चा 'पहारू' बनविला आहे तसाच 'नहार'चा 'नहारू' केला. पहारू १।२७३।२; २।६६।३ २।९०।३ मध्ये (एकूणतीस वेळा) आहे आणि 'पहार' २।३४।२ आणि २।६३।२ मध्ये वापरला आहे. हा अर्थ घेतल्याने 'नहारू' = नाहरू समजण्याची आवश्यकता रहात नाही व भरत किंवा राम यांचा संबंध आणावा लागत नाही. म्हणून हाच अर्थ अधिक संयुक्तिक असल्याने ग्राह्य ठरतो. राजाने इतके म्हटले तरी ती काहीच बोलत नाही म्हणून कवि म्हणतात की –

***हिं. दो.*** ***परेउ राउ कहि कोटि बिधि काहे करसि निदानु ।***
***कपट सयानि न कहति कछु जागति मनहुँ मसानु ॥३६॥***

***म.दो.*** ***पडे भूप बहु विनवुनी कां करिशी अवसान ।***
***कपट - पटु न कांहीं वदे जागवि जणूं मसाण ॥३६॥***

**अर्थ :** माझा विनाश कां करते आहेस असे नाना प्रकारे विनवून राजा मूर्च्छित पडला । पण कपट-चतुर काहीही बोलली नाही जणु काही स्मशान जागवित आहे. ॥ दो. ३६ ॥

**टीका - दोहा** - अवसान - अंत, विनाश. मसाण = (सं. श्मशान) जागविणे - स्मशानात मौन साधून बसून मुडद्याला जागवून त्याच्या पासून घोर तामसी सिद्धि प्राप्त करण्याचा विधिपूर्वक प्रयत्न करणे.

एखादे विशिष्ट दिवशी पुरलेले प्रेत उकरून काढून किंवा जळत असलेल्याची

चिता विझवून, त्या प्रेताच्या छातीवर बसून विशिष्ट मंत्राचा जप करीत राहवयाचे असते. जप व त्यातील तंत्र चालू असता ते प्रेत मधे मधे बोलते, विचारते, त्या वेळी जप करणारा त्या प्रलोभनाला भुलला की त्याचा नाश होतो, वेड लागते वगैरे अनेक प्रकार होतात. तीन प्रहर रात्र उलटून जाईपर्यंत मौन राहून मंत्राचा जप व उडीद मंत्रून त्यांनी काही तंत्र (क्रिया) करावे लागते. चेटूकविद्या सिद्ध करणाऱ्या सौभाग्यवती स्त्रिया व विकेशा विधवासुद्धा हे किंवा असले प्रयोग सिद्ध करण्यासाठी अमावस्येच्या रात्री, स्मशानात जाऊन, नग्न होऊन नाना प्रकार करीत असतात. (दिसल्या आहेत या डोळ्यांना इ.स. १९१५-१९१८). **(क)** दशरथ जणू प्रेत-शव आहे. त्याच्या छातीवर बसून जणू काय रामवनवास सिद्धि मिळवावयाची आहे. कैकयी ही जणू त्या नंग्या स्त्रीसारखी चेटकीण आहे. राजा तिला नाना प्रकारे समजावीत आहे तेच जणू त्या प्रेताने दाखविलेले प्रलोभन आहे असे जाणून ती काही बोलत नाही. बोलले तर सर्वनाश होईल असे तिला वाटत आहे. क्रूर, धाडसी, निर्भय, निर्लज्ज, कठोर, घोर बनली आहेच. तीन प्रहर होईपर्यंत ती काही बोलणार नाही. तेथपर्यंत सिद्धि प्राप्त करणाऱ्या मंत्राचे (गुप्त उपायाचे) चिंतन करीत राहणार. काय काय चिंतन केले असेल ते पुढील प्रकरणांतील तिचे उच्चार व आचरण यांवरून समजणार आहेच.

(२) **कांहीं न बदे** - आता काही बोलू नकोस असे राजाने सांगितले. त्या आज्ञेचे जणू ती पालन करीत आहे; पण उठून जा, तोंड दाखवू नकोस असे जे सांगितले त्याचे पालन मात्र केले नाही; परंतु 'आता रुचेल ते कर' या दशरथ वचनाच्या विरुद्ध ते नाहीच. या वाक्याने रामाला पाठविण्याचा अधिकार आपल्याला मिळाला आहे असे तिला वाटत आहे; मग आता आणखी बोलून शब्दांच्या जाळ्यात सापडण्याची संधी का द्या ! 'सावधपणाने सर्व साधून घे' अशी तिच्या गुरुची आज्ञाच आहे ! **(क)** वा.रा. दशरथ तिला म्हणाले की, **'प्रियं चेद्भरतस्यैतद्राम प्रवाजनं भवेत् ॥ मास्म मे भरतः कार्षीत् प्रेतकृत्यं गतायुषः'** (२।१२।९२-९३) रामवनवास जर भरताला प्रिय वाटला तर मी मेल्यावर माझी प्रेतक्रिया व उत्तरक्रिया त्याने करू नये. ११३ श्लोकापर्यंत

व पुढील १३,१४ हे दोन सर्ग अवलोकनीय आहेत. सर्ग १२ मधील दशरथाचे एक वचन लक्षात ठेवण्यासारखे आहे. '**धिगस्तु योषितो नाम शठाः स्वार्थपराः सदा ॥१०१॥ न ब्रवीमि स्त्रियः सर्वा भरतस्यैव मातरम्** ॥ (ख) **पडे भूप** - राजा पडल्याचा उल्लेख दो. ३४ मध्ये एकदा केला व आता येथे पडल्याचे पुन्हा सांगितले. यावरून मध्ये केव्हातरी उठून बसला होता हे ठरले. आता मात्र सुमंत्र येऊन उठवीपर्यंत राजा मूर्च्छित किंवा नुसता विव्हळत पडलेला राहणार आहे. पडलेल्या राजाच्या दुर्दशेचे आता वर्णन करतात :

*हिं.* ***। राम राम रट बिकल भुआलू । जनु बिनु पंख बिहंग बेहालू ॥१॥***
***। हृदयँ मनाव भोरु जनि होई । रामहि जाइ कहै जनि कोई ॥२॥***
***। उदउ करहु जनि रबि रघुकुल गुर । अवध बिलोकि सूल होइहि उर ॥३॥***
***। भूप प्रीति कैकइ कठिनाई । उभय अवधि बिधि रची बनाई ॥४॥***

*म.* ***। राम राम मुखिं भूप विकळ तो । जणुं विहंग विण पंख विवळतो ॥१॥***
***। विनविति मनिं कीं न उजाडावें । रामा कोणि न हें कळवावें ॥२॥***
***। रघुकुल-गुरु रवि ! करा न उदया । शूळ उठेल, बघुनि पुरि, हृदया ॥३॥***
***। नृपप्रीति कैकयी - कठिणता । विधि विरचित अवधीच उभयता ॥४॥***

**अर्थ :** विव्हळ होऊन भूपती 'राम राम', असे म्हणत आहे की जणू पंख नसलेला (तोडलेला) पक्षी (विहंग) च विवळत आहे.॥१॥ राजा मनात विनवीत आहे की उजाडूच नये व ही बातमी कोणी रामाला सांगू नये.॥२॥ हे रवि ! तुम्ही रघुकुळाचे गुरु आहांत; तरी आपण उगवूच नये; नाही तर ही नगरी पाहून तुमच्या हृदयात शूळ उठेल.॥३॥ (कवि म्हणतात) राजाची प्रीती आणि कैकयीची कठोरता (निष्ठुरपणा) ही दोन्ही विधात्याने परमावधीचीच बनविली आहेत.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) जणुं विहंग विण पंख** - दोन्ही पंख तोडून टाकलेला पक्षी अ-गतिक होऊन, अति दीन, दुःखी, व्याकुळ होऊन ची-ची-ची असे व्यथित स्वराने उच्चारीत असतो. दशरथराजाचे दोन्ही पंख कैकयी भिल्लीणीने उपटून टाकल्यामुळे तो अती दीन, पीडेने विव्हळ झाला आहे व अति आर्त स्वराने, कष्टाने राम ! राम ! राम ! असे उच्चारीत आहे. पंखांच्या योगाने

विहंगाला (विह = आकाश) आकाशात भराऱ्या मारता येतात व स्वेच्छेने आहार विहारादि करता येतात. त्या प्रमाणेच भावी सुखाच्या आकाशात रामराज्याभिषेक होणे व तो आपल्या डोळ्यांनी पाहणे या मनोरथ रूपी दोन पंखांनी राजा विहार करीत होता. **'मी असतां हा उत्सव व्हावा'** (४।३।) यांत हेच दोन पंख सुचविले आहेत. (क) दोन वर हे दोन पंख असे म्हणण्याकडे सहज प्रवृत्ती होईल; पण पंख असल्याचा अनुभव विहंगाला आधीपासूनच असतो. या दोन वरांची कल्पना राजाला स्वप्नांत तरी होती का? असलेले पंख तोडले-उपटले गेले आहेत. पुढे जटायूचे उदाहरण अरण्यकांडांत आहेच. रामाला राज्य मिळत नाही व मिळाले तरी तोपर्यंत आपण असत नाही (मी असतां) असे नक्की ठरले तेव्हाच ते दोन्ही पंख उपटले गेले. हे दोन वर, हे पंख कधी फुटलेलेच नव्हते. कोणी म्हणतील की देवासुर युद्धाचे वेळीच हे फुटले होते; परंतु त्या वेळी राम व भरत यांचा जन्मच झाला नव्हता ! त्या वेळी कोणते दोन वर हे ठरलेच नव्हते. म्हणून या दोन वरांना पंख म्हणणे अव्यवहारीपणाचे ठरेल. 'यथा पंखविण **दीन** विहग अति । मणिविण फणि सोंडेविण गजपति' (६।६१।९).

**चौ. २ - (१) बिनविति मनिं** - उघड बोलण्याची आता सोय नाही; कारण त्यामुळे त्या कुमतीचा तोफखाना पुन्हा सुरू होईल ही भीती वाटत आहे. वाणीलाही आता शक्ती राहिली नाही. ही विनंती रात्रीला केली जात आहे. कारण रात्र गेली तरच उजाडणार. **(क) न उजाडावें - प्रातःकाळ होऊच नये** - सूर्योदयापूर्वीच्या तीन घटका म्हणजे प्रातः काळ. अशा वेळीच म्हणतात की चांगले फटफटीत उजाडले की हो ! वा.रा. हा उल्लेख अगदी स्पष्ट आहे. 'न प्रभातं त्वयेच्छामि **निशे नक्षत्रभूषिते**' (२।१३।१८) रात्रीचेच रूपांतर प्रातः काळांत होते. हे रात्री ! निदान दोन महिने तरी असे करण्याचा तुला हक्क आहे; कारण रामजन्माच्या वेळी सूर्याने तुला एक महिनाभर येऊ दिली नाही; म्हणून त्याचा आता **सव्याज वचपा काढ व दुप्पट रहा.** पण विचार केला की रात्र आहे पराधीन. आपण उगवण्यापूर्वीच सूर्य तिचे रूप बदलून टाकतो. तिच्या अंगावरील सर्व मणिमोत्यांचे दागिने तो अरुणाकडूनच काढवितो. सूर्याला काळी

बायको आवडत नाही म्हणून तो तिला तांबुस-गोरी करतो. असे होऊ नये म्हणून आता सूर्याला प्रार्थना करतील. **(ख) रामा कोणि न हें सांगावें** - रात्र असेपर्यंत, तारे सर्व दिसत आहेत तोपर्यंत इकडे कोणी येणार नाही व कोणी रामाला कळविणार नाही. उषा झाली की बंदीमागधादि येणार. नंतर ठरल्याप्रमाणे वसिष्ठादि येणारच व ही बया त्यांना सांगेल व रामाला कळेल. म्हणून रात्रीला प्रार्थना केली की तू उजाडूच देऊ नको म्हणजे रामाला कळणार नाही. रामाला कळली ही हकीगत की राम वनात जाणारच हे दशरथ पक्के जाणतात.

**चौ.३ - (१) रघुकुल गुरु रवि ! करा न उदया** - सूर्याला प्रार्थना करतात की तुम्ही जसे पूर्वी एक महिना आकाश मध्यात रथासहित स्थिर राहिलात तसेच आता इकडे डोकावूसुद्धा नका. पूर्वी एक महिना राहून जो आनंद लुटलात त्यावर पाणी फिरू नये असे वाटत असेल.तर अयोध्येच्या उलट दिशेला असलेल्या एखाद्या देशात एक महिना तरी काढा म्हणजे तुम्हाला दुःख होणार नाही. मला सुख नाहीतर नाही; पण राम वनात गेल्याचे दुःख तरी होणार नाही. एवढीच एक फट राहिली आहे. 'मुनिवेषें **जर उदयिं ना जातिल** राम वनांत' (३३) तुमचा उदय होईपर्यंत राम येथे राहू शकतील. तुम्ही उगवला नाही तर तुमचे सुख तरी कायम राहील व रात्रीचे कर्ज फिटेल. **(क) रघुकुल गुरु** - तुम्ही रघुकुलगुरु आहात. येथे गुरु = श्रेष्ठ, सर्वात वडील. 'शुश्रूषस्व गुरुन्' (शाकुंतल) यांत याच अर्थाने, वडील माणसे या अर्थानेच वापरला आहे. तुम्हाला दुःख झालेले मला पाहवणार नाही म्हणून ही प्रार्थना करतो.

(२) **यावर** अशी **शंका** घेतली जाईल की उदयास येणे न येणे सूर्याच्या हाती नसता त्यास अशी प्रार्थना कशी केली? 'उजाडू नये' ही जशी मानसात केली; रात्रीला जशी वा.रा. केली तशीच ही केली. 'आर्त कधीं न विचारें वदतो' (२५८।१). एक महिना सूर्य जसा राहू शकतो व (मानसांत राहिल्याचे वर्णन आहे) रात्र येऊ शकत नाही तसेच हे. याच अडचणीसाठी रघुकुल गुरु = **वसिष्ठ असा अर्थ करण्याची आवश्यकता नाही.** ही प्रार्थना वसिष्ठांस उद्देशून घेण्यात व्याकरणाच्या अडचणी आहेत. **'करहु'** हे आज्ञार्थाचे द्वितीय पुरुषाचे आदरार्थी बहुवचन आहे. **जनि** = नका. उदय करणारा रवि आहे. 'उदय **करहि**

जनि रवि रघुकुल गुरु । असा पाठ असता तर अर्थ बरेच शब्द अध्याहृत घेऊन झाला असता की रघुकुल गुरु (वसिष्ठ) ! रवि उदय करणार नाही (असे तुम्ही करा). हे शब्द अध्याहृत घ्यावे लागतील; पण पाठ 'करहु' आहे म्हणून 'रघुकुल गुरु' हे शब्द 'रवि' बरोबरच घेतले पाहिजेत. (क) **हृदया शूल उठेल** - आज संध्याकाळपर्यंत जी अयोध्या पाहून तुम्हाला परमानंद होत होता, तीच अयोध्या रामविहीन, जिच्यात राम नाही अशी ओसाड नगरी, शोकाचे राज्य व स्त्रीचे साम्राज्य पाहून तुमच्या हृदयाला अत्यंत वेदना होतील. **मनुष्य कोणत्याही विकाराने अति आर्त झाला म्हणजे शक्याशक्यतेचा विचार त्याच्या मनाला शिवत नाही.** आर्तिविनाश कसा होईल हा एकच विचार तो करतो. अन्यथा 'लतातरूंना जाति विचारित' (३।३०।८) इत्यादी रघुनाथाविषयीची मानसांतीलच वचने खोटी म्हणावी लागतील. **म्हणूनच अशा वचनांना आर्तप्रलाप म्हणतात.** येथे स्वभावोक्ति अलंकार आहे. आर्ताच्या स्वभावाला योग्य असेच हे वचन आहे.

**चौ. ४ - (१) नृपप्रीति कैकयी कठिणता इ.** राजाच्या रामप्रेमाला सीमा नाही व कैकयीच्या निष्ठुरपणाला सीमा नाही. दोन्हीही दोन गोष्टींच्या परम सीमा आहेत. या सीमा कोणाला स्वतःच्या प्रयत्नाने गाठता येत नाहीत. या दोन सीमा विधात्यानेच निर्माण केल्या आहेत असेच म्हटले पाहिजे. भाव हा की दशरथांसारखे रामप्रेम इतर कोठे पाहण्यास सापडणार नाही व कैकयीसारखी निष्ठुरता या कैकयीच्याच ठिकाणी दिसावयाची. राजाच्या ठिकाणी निष्ठुरतेचा लेश नाही व कैकयीच्या ठिकाणी राजा व राम यांवरील प्रीति मुळीच शेष नाही. (क) या प्रकरणारंभीच म्हटले आहे की 'निष्ठुरतेप्रति गमन करि जणुं कीं स्नेह सुदेहि' (२४।-) तेच येथे सांगून या दशरथ कैकयी-संवादाचा उपसंहार येथे सुचविला. स्नेहमूर्ति दशरथ व निष्ठुरतामूर्ती कैकयसुता यांचा हा रात्रीचा एकांतातील संवाद येथे समाप्त.

(२) चोविसाव्या दोह्यांत दशरथ कैकयीकडे गमन करते झाले व हा ३७ वा दोहा चालू आहे. (१४ दोह्यांचा संबंध यांत आहे). हा दशरथ-कैकयी संवाद स्नेहमूर्ती व निष्ठुरता मूर्ती यांच्यातील संवाद असून दोन्हींचे आदर्श चित्रण यांत केलेले आहे. वा.रा. कैकयी सजीव निष्ठुरताच आहे पण दशरथ

सजीव स्नेह नाही. त्यांच्यांत निष्ठुरता बरीच शिरली आहे; मानसांतील दशरथांस ती शिवली नाही. सरलता व कुटिलता यांतील हा संवाद अशाच प्रकारच्या कपटीकुटील मुनि व सरळ राजा प्रतापभानु यांच्यातील संवादासारखा कंटाळवाणा मुळीच वाटत नाही. याचे कारण यांत राम, रामभक्त व रामस्नेह यांचे मिश्रण ओतप्रोत आहे. व त्या संवादांत या तिन्ही गोष्टींचा गंधसुद्धा नाही. दोन्ही संवाद दुःख पर्यवसायी व कपटकुटिलतेचा विजय दाखविणारे असूनसुद्धा हा संवाद स-रस वाटतो तसा व तितका कैकयी-कुबडी संवाद सरस वाटत नाही. काव्यमनोहर आहे. राम, रामप्रेम व रामप्रेमी यांचे मिश्रण आहे. पण उपजत नीच-कपटीच्या कपटाने सरलमति, रामप्रेमीला कपटी कुटिल बनविली हे वैशिष्ट्य त्यांत आहे. या संवादांत कपट व निष्ठुरता सरल, स्नेही व रामस्नेही राजाच्या मनात कपट किंवा निष्ठुरता यांस उत्पन्न करण्यास असमर्थ ठरली आहेत व तसा प्रयत्नही केला गेला नाही. या मंद बुद्धिलाच असे वाटते की सर्वच वाचकांना-रसिकांना वाटते हे ज्याने त्याने पडताळून पहावयाचे आहे. राजाने केलेली प्रार्थना रात्रीने ऐकली नाही हे आता दिसेल.

हिं. *। बिलपत नृपहि भयउ भिनुसारा । बीना बेनु संख धुनि द्वारा ॥५॥*
*। पढ़हिं भाट गुन गावहिं गायक । सुनत नृपहि जनु लागहिं सायक ॥६॥*
*। मंगल सकल सोहाहिं न कैसें । सहगामिनिहि बिभूषन जैसें ॥७॥*
*। तेहि निसि नीद परी नहिं काहू । राम दरस लालसा उछाहू ॥८॥*

म. *। झाली प्रभात विलपत नृपती । द्वारिं वेणु-वीणादि वाजती ॥५॥*
*। पढति भाट गुण गाती गायक । श्रुणि नृपा जणुं लागति सायक ॥६॥*
*। रुचति न तसे सकल मंगलगण । जशिं सहगमनिं सतीस विभूषण ॥७॥*
*। त्या रात्रीं कुणि शयन न केलें । रामदर्शनोत्सवा भुकेले ॥८॥*

**अर्थ :** राजा विलाप करींत असताच प्रातः काळ झाला (उजाडले) व द्वाराजवळ वीणा वेणु (मुरली) शंख इत्यादी (मंगल) वाद्ये वाजू लागली.॥५॥ भाट ब्रीदावली उच्चारू लागले व गायक (राजाचे) गुण गाऊ लागले. (परंतु) ते सर्व ऐकून राजाला जणू बाण लागू लागले.॥६॥ पतीबरोबर सहगमन करणाऱ्या (सती जाणाऱ्या) सतीला जशी विभूषणे अप्रिय वाटतात (रुचत

नाहीत). तसेच हे सर्व मंगल समुदाय राजाला अप्रिय (दुःखद) वाटू लागले.॥७॥ सर्वांनाच रामदर्शनोत्सवाची तीव्र उत्कंठा लागली असल्याने त्या रात्री कोणीच झोपले नाहीत. (निद्रा आली - घेतली नाही).॥८॥

**टीका. चौ. ५ (१) झाली प्रभात** - उजाडू नये अशी रात्रीला व त्यासाठी सूर्याला प्रार्थना केली तरी प्रभूचीच इच्छा वनात जाण्याची असल्याने राजाची प्रार्थना कोण ऐकणार ! ठरलेल्या वेळी पहाटेस - रात्र संपतांच - कैकयीच्या महालाच्या दाराशी मंगल वाद्ये वाजू लागली. ज्या दिवसाची अपेक्षा आबाल वृद्ध, नरनारी चातकाप्रमाणे करीत होती त्या दिवसाची पहाट झाली. हे राजाला वीणा, मुरली (अलगुज) शंख, सतार, मृदंग, सनया इत्यादी मंगलवाद्यांच्या मधुर स्वराने समजले. पहाटेच्या वेळच्या कोमल, मालकंस, भूप, भैरव, भैरवी इ. रागांत तंतुवाद्ये, मुरली व सनयादिक वाजू लागली.

**चौ. ६ - ७** - (१) आज सगळ्यांनाच परमानंद व परम उत्साह वाटत असल्याने 'मागध सूत बंदि गुणगायक । वर्णिति गाति सुयश रघुनायक ॥ त्या बिचाऱ्यांना काय माहीत की एका रात्रीत या राजवाड्यात शोक व निष्ठुरता यांचा निवास झाला आहे हे ! ते रोजच्या वेळेला आले व आज तर झाडून सारे आले असणारच. या मांगलिक वाद्यघोषाने व गायनाने रामराज्य व रामवनवास यांचे चित्र राजाच्या डोळ्यांपुढे नाचू लागले व हे सर्व मंगलध्वनि राजाच्या हृदयाला बाणांसारखे (सायक-बाण) बोचू लागले. काय करणार होतो व काय करावे लागले ! काय पाहणार होतो व काय पहावे लागणार ! इत्यादी अत्यंत घोर विरोध शल्यासारखा अत्यंत सलू लागला. **हेही एक सुंदर स्वभावचित्र आहे. मानवी मनाच्या चंचल सुखदुःख कल्पनांचे एक प्रभावी उदाहरण आहे.** त्या ध्वनीत, त्या शब्दांत असे काय होते की राजाला आजच ते अत्यंत दुःखद वाटावे? इतरांना हेच ध्वनि किती सुखानंददायक वाटले असतील बरे? राजाच्या मनालाच हा मंगलोत्सव प्रतिकूल वाटतो इतकाच फरक झाला. एक भावगर्भित दृष्टांत देतात.

(२) **जशि सहगमनिं सतीस विभूषण - सहगमन** = मृत पतीच्या प्रेताबरोबर स्मशानात जाऊन पतीच्या मृत देहाबरोबर आपला सजीव देह जाळून पति

(तो जीव) जिकडे जाईल तिकडे त्याच्याबरोबर (त्या पत्नीच्या जीवाने) जाणे = सती जाणे. सतीस = पतिव्रतेला - (क). **सतीस जशि बिभूषण** - सती जाणाऱ्या पतिव्रतेला मंगलस्नान घालून नवी, मंगल वस्त्रे नेसवितात; कपाळाला कुंकवाचे मळवट भरून त्यावर अक्षता लावतात, काजळ, हळद इत्यादी नित्य शृंगार व सर्व दागदागिने - अलंकार - (विभूषणे) घालून तिला सजवितात; पण पति मरणाचे दुःख व मरणाची तयारी केलेला देह प्रेतासारखा - शवासारखा वाटत असल्यामुळे तिला ती सर्व मंगलविभूषणे शवशृंगारासारखी वाटतात. ते उपचार अत्यंत दुःखदायक वाटतात; पण नेत्रांतून अश्रुबिंदू ढाळावयाचे नसतात. तोंड मिटून हृदय वज्राहून कठोर करून हे सर्व सोसावे लागते. (ख) राम वनात जाणार व दशरथ जणू काय देहत्याग करून सतीप्रमाणे त्यांच्याबरोबर जाऊ इच्छितात ही भावना येथे ध्वनित केली. पुढे सीता आपल्या मनाशी विचार करतेच की माझ्या देहासहीत प्राण प्रभूंबरोबर वनात जाणार की केवळ प्राणच जाणार? जी रात्र महाराजाला काळ रात्रीसारखी वाटली तीच रात्र लोकांना कशी वाटली हे पुढील चौपाईत सांगतात व **सुखदुःखभोगांचा तात्त्विक सिद्धान्त ध्वनित करतात.**

**चौ. ८** - (१) या रात्री अयोध्या नगरात कोणालाही झोप आली नाही. दशरथालाही नाहीच आली व कुबुद्धि राणीलाही नाही आली. राम वनवासास जाणार व भरताला राज्य मिळणार या दोन गोष्टी याच रात्री ठरल्या. या गोष्टींमुळे दशरथ मरणाच्या मार्गास लागून त्या मंगल ध्वनींच्या श्रवणाने अधिक दुःखी कष्टी होत आहेत. कैकयी 'जितंमया' अशा विजयानंदाने मनात परमसुखी झाली आहे व म्हणत आहे की उद्या पहाटेस भाट माझ्या भरताचे यश असेच गातील. रामयशगान ऐकण्याने मात्र थोडा विरस झालाच असेल. या राम वनवासाचा ठराव रात्रीच एकमताने पसार झालेला असता सर्व नगरी आनंदाने, उत्कंठेने उजाडण्याची वाट पहात उत्सवाची तयारी करीत मनोरथांत मग्न आहे. लोकांना ही दुःखद बातमी कळाली नाही म्हणून आता लवकरच सिंहासनासीन सीतारामांचे दर्शन होऊन जन्मसाफल्य होणार या भावनेने लोक आनंदमग्न आहेत. **दुःखद कारण घडले आहे पण कळले नाही म्हणून लोकांना**

**दुःख नाही.** अनुकूल गोष्ट घडणार या भावनेने लोकांना व कैकयीला आनंद, सुख वाटत आहे व प्रतिकूल गोष्ट घडणार हे कळले म्हणून राजा दुःखी आहे. **यावरून सिद्ध झाले की मनाला अनुकूल वाटणारी गोष्ट घडणार याचे ज्ञान सुखाचे कारण व प्रतिकूल गोष्ट घडणार याचे ज्ञान दुःखाचे कारण आहे.** लोकांना जे अनुकूल ते कैकयीला प्रतिकूल वाटत आहे व कैकयीला जे अनुकूल वाटत आहे ते राजाला प्रतिकूल वाटले व लोकांना प्रतिकूल वाटणार आहे. म्हणजेच **अनुकूलता किंवा प्रतिकूलता त्या विशिष्ट घटनेत, त्या गोष्टीत नसून मनाच्या भावनेवर व संस्कारांवर म्हणजेच मनावर अवलंबून आहेत. 'मन एव मनुष्याणां कारणं सुखदुःखयोः।** हा सिद्धान्त येथे प्रत्यक्ष कृतीने दाखविला आहे व या काण्डांत आता वारंवार दाखविला जाईल. जे जे घडेल ते अनुकूल मानण्याचे मनास शिकविले म्हणजे सर्वच गोष्टी सुखद वाटतील. किंवा निदान दुःखद तरी वाटणार नाहीत. **पण काहीच अनुकूल किंवा प्रतिकूल न मानण्याचे मन शिकले की व्यावहारिक, विषयजन्य, सुखही होणार नाही व दुःखही होणार नाही आणि हे संतसंगतीने, प्रयत्नाने, विवेकाने व संतकृपेने सहज साध्य होते. यालाच उदासीन वृत्ती म्हणतात. 'उदासीन राहे वृत्ति तेथें खुंटे काळगति'** उदासीनता तत्वतां सार आहे' 'देहदुःख तें सौख्य मानीत जावें' यांत हीच शिकवण आहे.

***हिं.दो.*** *। द्वार भीर सेवक सचिव कहहिं उदित रबि देखि ॥*
*॥ जागेउ अजहुँ न अवधपति कारनु कवन बिसेषि ॥३७॥*

***म.दो.*** *। द्वारिं दाटि सेवक सचिव म्हणति उदय पाहून ॥*
*॥ कारण काय विशेष कीं उठले नृप न अजून ॥३७॥*

**अर्थ :** राजवाड्याच्या द्वाराशीं सेवक, सचिव वगैरेंची गर्दी झाली आहे व सूर्योदय झालेला पाहून ते म्हणतात की अजून राजे (अयोध्यापति उठले नाहीत (जागे झाले नाहीत) असे विशेष कारण तरी काय आहे?

**टीका. दो. -** (१) ही दाटी कैकयीच्या महालाच्या किंवा अंतःपुराच्या द्वाराशी झाली नसून राजाच्या मुख्य राजवाड्याच्या द्वारापाशी झाली आहे. **'प्रविशति कोणी निघति जन दाटी राजद्वारिं'** (३३) असे काल जेथे घडले तेच हे राजद्वार आहे. **'जा सुमंत्र जागवा किं जाउनि'** (३८।२) याने हेच ठरते.

**'करुं कार्या आज्ञेतें पावुनि'** यावरून ठरते की हे सर्व सेवक सचिवादि लोक पुढल्या कार्याची आज्ञा घेण्यासाठी जमलेले आहेत. सूर्योदय झाला तरीसुद्धा राजे राजवाड्यात आले नाहीत ! आज फार महत्त्वाचा सोहळा असल्याने राजे रोजच्यापेक्षा लवकर यावयाचे, पण सूर्योदय झाला तरी सुद्धा पत्ता नाही ! **'विस्मय वाटे आज आम्हां अति'** असे का घडले? असे वाटणे स्वाभाविक आहे. काहीतरी विशेष कारण असल्याशिवाय असे घडणे शक्य नाही. राजे अजून उठलेच नाहीत की उठूनही इकडे आले नाहीत? आहे तरी काय? येथे हे दाखविले की अद्याप कोणालाही दु:ख शोकभयाची अंधुक कल्पनासुद्धा नाही. रामदर्शनासाठी लोक उतावीळ झाले आहेत. कारण काय आहे ते जाणण्यासाठी लोक व सचिव आता सुमंत्राला पाठवतील.

***श्रीमानसगूढार्थ - चंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय ४ था समाप्त.***

●●●

# अध्याय ५ वा

हिं. *। पछिले पहर भूप नित जागा । आजु हमहि बड़ अचरजु लागा ॥१॥*
*। जाहु सुमंत्र जगावहु जाई । कीजिअ काजु रजायसु पाई ॥२॥*
*। गए सुमंत्रु तब राउर माहीं । देखि भयावन जात डेराहीं ॥३॥*
*। धाइ खाइ जनु जाइ न हेरा । मानहुँ बिपति बिषाद बसेरा ॥४॥*
म. *। चौथे प्रहरीं रोज नृप जागति । विस्मय वाटे आज अम्हां अति ॥१॥*
*। जा सुमंत्र ! जागवा किं जाउनि । करुं कार्या आज्ञेतें पावुनि ॥२॥*
*। राजभवनिं मग सुमंत्र शिरले । दिसत भयाण जात घाबरले ॥३॥*
*। बघवेना जणुं गिळुं ये धावत । विपद-विषाद-वास जणुं भासत ॥४॥*

**अर्थ :** (लोक म्हणाले) रोज राजे तीन प्रहर रात्र उलटून गेल्यावर (चौथे प्रहरी) उठतात; (तेव्हा) आम्हाला अति आश्चर्य वाटते.॥१॥ जा सुमंत्रा ! जाऊन उठवा (जागे करा) की; (मग) आज्ञा मिळाली म्हणजे त्या प्रमाणे कार्य करू.॥२॥ तेव्हा मग सुमंत्र राजभवनांत (अंतःपुरात) शिरले (तोच) ते भयाण दिसू लागले व जाण्यास (जाताना) भीती वाटू लागली.॥३॥ जणू काय धाऊन गिळण्यास (खाण्यास) च येत आहे (असे वाटून) तिकडे बघवेनासे झाले व (वाटले की) जणू विपत्ती व विषाद यांनीच (तेथें) वस्ती केली आहे.॥४॥

**टीका. चौ. १-२-(१)** राजे आज रोजच्यापेक्षाही लवकर उठायचे; पण रोजच्या वेळेवर सुद्धा उठले नाहीत ! सूर्य उगवला तरी उठले नाहीत. असे उलटे कसे झाले? झाले तरी काय न उठायला? असे कधीच घडले नाही व घडायचे नाही, तेव्हा चमत्कारच वाटतो हा ! **कधी न घडणारी गोष्ट अनपेक्षित वेळी घडणे म्हणजे विशेषच आश्चर्य ! (क) जा, जाऊन जागवा की** - ही द्विरुक्ती उतावीळपणा व आदर दर्शक आहे. केव्हा एकदा राजा उठतो व केव्हा एकदा रामराज्याभिषेक-कार्याचा आरंभ होतो असे सर्वांस वाटत आहे. आज्ञा झाल्याशिवाय आपण तरी कार्याला आरंभ कसा करावा? यावरून स्पष्ट झाले की सुमंत्राशिवाय इतर कोणाला परवानगीशिवाय अंतःपुराच्या हद्दीत पाऊल

टाकता येत नसे. सुमंत्र जातीचा सूत आहे. राजाच्या रथाचा सारथीही आहे आणि मुख्य सचिव आहे, असे असून त्यास परवानगीशिवाय अंतःपुरांत जाऊन झोपलेल्या राजाला उठविण्याचासुद्धा अधिकार आहे. लोकांच्या म्हणण्यातील भाव हा की राजे एकाएकी आजारी तरी नाही झाले? पण मंगलसमयी अनिष्ट भाषा उच्चारणे बरे नाही म्हणून स्पष्ट बोलले नाहीत.

**चौ. ३-४ (१) दिसत भयाण** - शयनागाराच्या पुढील आंगणांत, पाय टाकतांच सर्व भयाण, भयानकच दिसू लागले. पुढे पाऊल टाकण्यास भीती वाटू लागली. **एका मनुष्याच्या प्रभावी, दृढ भावनांचा, संकल्पांचा परिणाम आजूबाजूच्या वातावरणावर व इमारती वगैरेंवर सुद्धा कसा होतो हे दाखविले.** रामवनवास भयाने व शोकाने राजा व्याकुळ झाला आहे त्या राजवाड्याच्या एका खोलीत व बाहेर त्याचा परिणाम सुमंत्रासारख्या धीरवीर, गंभीर, राजनीतिनिपुण रामभक्ताला अनुभवास येत आहे ! असाच संतांच्या वसतिस्थानाच्या सभोवती व आंत त्यांच्या शांत, प्रेमळ, आनंदमय भावनांचा परिणाम झालेला असतो. (२) **बघवेना, जणुं गिलुं ये धावत** - समोर दिसणारा राजमहाल जणू खायला येतो आहे असे वाटले. भाव हा की तो काळासारखा फार घोर व भयानक, रौद्र वाटू लागला. त्याच्याकडे पाहिल्यास गिळून टाकील असे वाटू लागले. **(क) विपद-विषादवास जणुं भासत** - वाटले की या महालात विपत्ती आणि शोक (विषाद) यांनीच आज रात्री वस्ती केली आहे की काय? विपदा - विपत्तिरूपी कैकयी आहे व शोकरूपी दशरथ आहेत. विपत्ति हे शोकाचे कारण आहे म्हणून प्रथम उल्लेख केला. पूर्वी निष्ठुरता ठरली. आता विपत्ति ठरली कैकयी.

**हिं.** ***। पूछें कोउ न ऊतरु देई । गए जेहिं भवन भूप कैकई ॥५॥***
***। कहि जय जीव बैठ सिरु नाई । देखि भूप गति गयउ सुखाई ॥६॥***
***। सोच बिकल बिबरन महि परेऊ । मानहुँ कमल मूलु परिहरेऊ ॥७॥***
***। सचिउ सभीत सकइ नहिं पूँछी । बोली असुभ भरी सुभ छूछी ॥८॥***

**म.** ***। पुसतां उत्तर कोणि न देई । जाइ गृहीं ज्या नृप-कैकेई ॥५॥***
***। जय जिव वदुनि बसे शिर नमुनी । बघुनि भूपगति गेला सुकुनी ॥६॥***
***। शोक-विकल महिं विवर्ण पडले । कमळ समूळचि जणूं उपटलें ॥७॥***
***। सभय सचिव पुसुं शकत काहिं ना । अशुभमयी वदली शुभहीना ॥८॥***

**अर्थ :** (शयन गृहांत) विचारले पण कोणी काहीच उत्तर दिले नाही. तेव्हा ज्या खोलीत (कोप भवनात) भूप व कैकयी आहेत तेथे गेले.॥५॥ जय जीव म्हणून मस्तक नमविले व सुमंत्र बसला. पण राजाची दुर्दशा दिसताच सुकून गेला.॥६॥ मुळासकट उपटून टाकलेले कमल पडलेले असावे तसेच जणू भूपति शोकाने व्याकुळ होऊन विवर्ण झालेले जमिनीवर पडलेले दिसले.॥७॥ सचिव (इतका) घाबरला (की) काही विचारू शकला नाही; पण शुभहीन व अशुभांचीच बनलेली ती (राणी) म्हणाली - ॥८॥

**टीका. चौ. ५-६** (१) सुमंत्र भीतभीतच राजाच्या शयनागारात गेले. तेथील दासदासींना विचारले की महाराज आज अजून का नाही उठले? कोणी काहीच उत्तर दिले नाही. पण कोणीतरी दासीने सांगितले की संध्याकाळी धाकट्या राणीसाहेबांच्या महालाकडे जाताना दिसले होते. इकडे महाराज आलेच नाहीत. तेव्हा कैकयीच्या महालात जाऊन पाहू लागले तो कोपभवनात महाराज व कैकयी दिसली. **(क) जय जिव कहुनि बसे शिर नमुनी** - सचिव आहे म्हणून जय जीव म्हटले व मस्तक नमविले. दशरथ पडलेले होते. शुद्धीवर नव्हते, म्हणून आज्ञेशिवाय बसणे चुकीचे नाही. **(ख) बघुनि भूपगति गेला सुकुनी** - यावरून स्पष्ट दिसते की सुमंत्राचे राजावर फारच प्रेम होते. भूप कसे दिसले ते सांगतात -

**चौ. ७-८** (१) काळे ठिक्कर पडलेले (विवर्ण) शोकाने अत्यंत व्याकुळ झालेले व मुळासकट उपटून जमिनीवर टाकून दिलेल्या कमळासारखे भूपति दिसले. प्रथम वीज पडलेल्या ताडासारखे पडले होते. तेथे विवर्ण झाल्याचा उल्लेख आहे. त्या वेळी ताडासारखा कणखरपणा शरीरात होता. नंतर तीरावरील वृक्षासारखे समूळ उलथले गेले. कणखरपणा थोडा कमी झाला तरी अवयव टवटवीत दिसत होते थोडा वेळ वृक्षाच्या पानांसारखे; नंतर जलविहीन पाठीन माशासारखे व्याकुळ झाले. आता मात्र उपटून टाकलेल्या कमलासारखे सर्व अवयव अगदी निर्जीव, मलूल, मुख अगदी कोमेजून गेलेले व शरीर अगदी कृश झाले आहे. कमळाच्या देठासारखे निःसत्व, लिवलिवीत, लुल्यासारखे दिसत आहे. चलन-वलन करण्याचे सामर्थ्य उरलेले नाही. कुठे ताल व कुठे

कमलनाल ! (क) दशरथासारख्या शूरवीर धीर धर्मधुरंधर जगप्रसिद्ध महापुरुषाची ही दुर्दशा पाहून सुमंत्राची छातीच दडपून गेली. भयभीत झाला. काय बोलावे? कोणाला विचारावे, हे काहीच सुचेना.

(२) **अशुभमयी बदली शुभहीना** - अशुभ = अमंगल, पाप; शुभ = मंगल, पुण्य. मंगलायतन रामास वनात पाठवून स्वतःच्या पतीला ठार मारण्यास कारण झालेल्या उन्मत्त स्त्रीला अमंगलांची व पापांची प्रतिमा नाही म्हणावयाचे तर कोणाला म्हणावयाचे? 'नहि असत्य समपातकपुंजा' 'सत्यमूल सब सुकृत शोभती' असे आपल्या पतीच्या मुखांतून श्रवण केल्यावर असत्यवादी होऊन अपयश पदरात घेऊ नका इ. पतीला, महाराजाला वारंवार टोचून सांगणारी, आता रामाला वनात पाठविण्यासाठी धडधडीत खोटे बोलते म्हणून पातकांचा महापर्वतच बनली आहे.

हिं.दो. *। परी न राजहि नीद निसि हेतु जान जगदीसु ॥*
*॥ रामु रामु रटि भोरु किय कहइ न मरमु महीसु ॥३८॥*
हिं. *। आनहु रामहि बेगि बोलाई । समाचार तब पूँछेहु आई ॥१॥*
म.दो. *। रात्रिं न निद्रा नृपतिला हेतु विदित जगदीश ॥*
*॥ राम राम रटतां उदय, वदे न मर्म महीश ॥३८॥*
म. *। रामा सत्वर घेउनि येणें । समाचार मग येउनि पुसणें ॥१॥*

**अर्थ :** राजाला रात्रभर मुळीच झोप आली नाही. हेतु काय तो जगदीशाला माहीत. (मात्र) राऽम, राऽऽम, राऽऽऽम म्हणत उजाडले; पण मर्म काय ते महीश काही सांगत नाही.।दो.३८॥ (तेव्हा) रामाला अगदी त्वरेने (बोलावून) घेऊन या व (राम) आल्यावर मग समाचार विचारा ॥१॥

**टीका. - दो.** (१) दोह्याच्या ओळींतील पहिली गोष्ट सत्य आहे. बाकीचे सर्व असत्य आहे. हेतु तिची निष्ठुरता व दुसरा वर बदलून न घेणे हा आहे व तिला माहीतही आहे. पण रामाला बोलावून राजाने वरदान दिल्याचे त्याच्या कानांवर घातले म्हणजे राम स्वतःच वनात जाईल अशी तिची खात्री आहे. म्हणून स्वतःचा डाव साधण्यासाठी सुमंत्राला राजाशी काही बोलू देत नाही व रामाला आणण्यास सांगते. (क) **हेतु विदित जगदीश** - हेतु मला माहीत

नाही हा मुख्य भाव आहे. मी पुष्कळ विचारले पण मलासुद्धा राजा काही सांगत नाही; मग तुम्हाला का सांगणार आहे ! राम प्राणप्रिय आहेत तेव्हा त्यांना सांगेल कारण असे वाटते. कारण की अगदी रात्रभर पापणीला पापणी लागली नाही. मुळीच झोप नाही; आणि राऽम, राऽम म्हणत राजा सारखा तळमळत आहे. काय व्यथा होत आहे, काय दुःख होत आहे हे मला सुद्धा नाही सांगत हो ! 'जगदीश हेतु जाणतो' म्हणण्यातील भाव मला माहीत नाही हा असल्याने ते धडधडीत खोटे आहे.

(२) **बदे न मर्म महीश - ल.ठे. 'कहइ'** हे एकवचन आहे. ती जाणून बुजून अनादराने बोलत नसली तरी तिच्या मनातील अनादर न कळत बाहेर पडला आहे. 'अंतरीचें धावे स्वभावें बाहेरीं' असेच घडले. (क) कैकयी कपटाने असत्य बोलत आहे. असे अति दुःखी होण्याचे कारण राजा मला सांगत नाही. मी काकळुतीस येऊन विनवलं पण राम शब्दाशिवाय काहीच बोलत नाही महीश ! (ख) तिच्या मनातील भाव हा की रामाला वनवास देतो की नाही हे सांगत नाही. (ग) आणखी भाव हा आहे की महीशाने मर्म = गुप्त गोष्ट स्त्रियांजवळ सांगू नये अशी राजनीति असल्याने नसेल सांगत महीश, म्हणून मी बसले चुळबुळत जागत. याला एकच उपाय दिसतो की राम इथे आले की सगळा उलगडा होईल.

**चौ. १ -** (१) रामाला आणल्याशिवाय विचारून काही फायदा नाही. उगाच वेळ मात्र फुकट जाईल. म्हणून रामाला शक्य तितक्या त्वरेने घेऊन या म्हणजे महीश बोलू लागेल व मग समाचार विचारता येईल. (क) सुमंत्राच्या चर्येवरून चतुर राणीने ताडले मंत्री घाबरला आहे. राजा शोकाकुळ आहे हे त्याने ओळखले आहे. सुमंत्राने विचारले की राजा म्हणेल 'मला जरा बरं वाटत नाही म्हणून श्रीवसिष्ठांच्या आज्ञेप्रमाणे राज्याभिषेकाचे कार्य उरकून घ्या' असे सांगितले म्हणजे आटोपलेच सर्व व माझा सर्वनाश झालाच. याला राजाशी काही बोलू न देता रामाला आणविला की माझे काम झालेच; म्हणून ती असे गोड गोड बोलली.

(२) **अ.रा. -** रात्री निद्रा न येणे हे राजाच्या व्यथेचे कारण तिने सांगितले

आहे. वा.रा. - रामराज्याभिषेकाच्या आनंदात गप्पागोष्टी करण्यात रात्र गेली व त्यामुळे दमूनभागून नुकताच डोळा लागला आहे असे या अशुभमयीने सांगितले आहे. त्या दोन्हींपेक्षा मानसांतील कैकयी अधिक हुशार, दूरदर्शी, प्रसंगावधानी व संधीचा योग्य फायदा वेळेवर घेणारी आहे हे स्पष्ट दिसते. वा.रा. सुमंत्र कैकयीच्या सांगण्यानेच रामाला आणण्यास गेला आहे. पण प्रकार बराच निराळा आहे. सर्ग १४ व १५ वाचून पाहणे योग्य आहे. येथे विस्तारभयास्तव अधिक तुलना करणे योग्य नाही. मानसांत, अ.रा. व वा.रा. यांतही कैकयी असत्य बोललीच.

हिं. ***। चलेउ सुमंत्रु राय रुख जानी । लखी कुचालि कीन्हि कछु रानी ॥२॥***
***। सोच बिकल मग परइ न पाऊ । रामहि बोलि कहिहि का राऊ ॥३॥***
***। उर धरि धीरजु गयउ दुआरें । पूँछहिं सकल देखि मनु मारें ॥४॥***
***। समाधानु करि सो सबही का । गयउ जहाँ दिनकर कुल टीका ॥५॥***

म. ***। बघुनि भूपकल सचिव निघाले । राणि कांहिं करि कुचाळि कळलें॥२॥***
***। शोक-विकल पथिं पडे न पाउल । सांगति रामा काय किं राउळ ॥३॥***
***। धीर धरुनि मग गेले द्वारीं । पुसती, पाहुन उदास, सारीं ॥४॥***
***। समाधान करुनी लोकांचें । जाति भवनिं रघुकुलतिलकांचे ॥५॥***

**अर्थ :** राजाचा कल पाहून सचिव (सुमंत्र) निघाले (पण) त्यांनी ओळखले (कळले) की राणीने काहीतरी कुचाळी (उपद्व्याप) केलेली दिसते.॥२॥ (सुमंत्र) चिंतेने व्याकुळ झाले व त्यांचे पाऊल पुढील मार्गावर पडेना. (मनांत म्हणतात की) रामचंद्रांना बोलावून राजे काय सांगणार आहेत कोणास ठाऊक.॥३॥ कसातरी धीर धरून सुमंत्र राजद्वाराशी गेले. त्यांचे ते उदास (उतरलेले, चिंतातुर) मुख पाहून सर्व लोकांनी त्यांस (कारण) विचारले.॥४॥ लोकांचे (कसेतरी) समाधान करून सुमंत्र रघुकुलतिलक रामचंद्रांच्या भवनास गेले.॥५॥

**टीका. चौ. २ - (१) बघुनि भूपकल** - कैकयीची आज्ञा ऐकताच सुमंत्राला संशय आला की राणीने काहीतरी मोठी कुचाळकी केली असली पाहिजे; कारण राजा अत्यंत शोकाकुळ व दीन दुर्बळ झालेले आहेत. कैकयीच्या महालातील

कोपभवनात, जमिनीवर तळमळत पडले आहेत. राणी राजाविषयी अनादराने बोलत आहे. तेव्हा राणी रागावून येथे बसली असेल व तिची समजूत करण्यासाठी भूपति येथे आले असावेत व दोघांत काहीतरी मोठी बाचाबाची होऊन त्यांत राजाला प्राणांतिक वेदना होण्यासारखे काहीतरी कारण घडले असले पाहिजे; म्हणून राणीच्या म्हणण्याला राजाची संमति नसेल तर आता कसे करावे? असा पेच निर्माण झाला तेव्हा सुमंत्राने राजाच्या मुखाकडे जिज्ञासेने पाहिले. तेव्हा दिसून आले की राजाची सुद्धा तशीच इच्छा आहे. **सुमंत्र इंगितज्ञ आहेत हे येथे दाखविले. राजाच्या मनातील भावना सचिवाला जाणता आली पाहिजे हा एक सचिवाचा गुण येथे सुचविला.** सचिवपुत्राला रामाचे मनोगत कळले; हे पुढे दिसेल. दो. ३८।१ पासून सुमंत्रचरित्रचित्रण सुरू झाले.

**चौ. ३-४ (१) शोकविकर्ल** - राजा इतके व्याकुळ कां? राणीने काय उपद्व्याप केला व रामाला बोलावून राजा काय सांगणार या तीन गोष्टींच्या चिंतेने सचिव अगदी व्याकुळ झाला. विशेष शोक चिंतेचे कारण म्हणजे रामराज्याभिषेक कार्याचा प्रारंभ होण्याच्या वेळीच राजा इतका शोकविव्हळ का? (क) या शोक, भय, चिंता इ. विकारांचे चित्र सुमंत्राच्या मुखावर प्रगट झाल्यावाचून कसे राहणार? व राजांना उठण्यास उशीर का झाला हे पाहण्यास गेलेला सुमंत्र असा चिंतातूर दिसताच लोक कारण विचारणारच असेच घडले.

**चौ.५ - (१) समाधान करुनी लोकांचें** - राजद्वाराजवळ सुमंत्रास भेटलेल्या मंडळींत वसिष्ठ, साम्राज्यांतील मोठे मोठे राजे, धनिक वर्ग इत्यादी असल्याचा उल्लेख वा.रा. आहे. सर्ग १५ श्लोक १-१६ पहावे. सुमंत्राने सांगितले की 'रामं राज्ञो नियोगेन त्वरया प्रस्थितोऽस्म्यहम्' राजाच्या आज्ञेने मी त्वरेने रामचंद्राकडेच निघालो आहे. असे सांगून सुमंत्र रथ घेऊन रामभवनाकडे गेले आहेत. रामभवनाचे वर्णन श्लो. ३१-४९ मध्ये आहे. राम त्या रथात बसूनच सुमंत्राबरोबर निघाले अहेत. (वा.रा. १६।२८-४८). 'महाराजांच्या आज्ञेने मी अति त्वरेने रामचंद्राकडे जाण्यास निघालो आहे.' हेच उत्तर देऊन समाधान केले असेल व लोकांना वाटले असेल की आता सुमंत्र रघुनाथास घेऊन गेला राजांकडे म्हणजे कार्याला आरंभ होईल.

हिं. *। राम सुमंत्रहि आवत देखा । आदरु कीन्ह पिता सम लेखा ॥६॥*
*। निरखि बदनु कहि भूप रजाई । रघुकुलदीपहि चलेउ लेवाई ॥७॥*
*। राम कुभाँति सचिव सँग जाहीं । देखि लोग जहँ तहँ बिलखाहीं ॥८॥*

म. *। राम सुमंत्रा येता पाहुनि । आदर देति पित्यासम मानुनि ॥६॥*
*। निरखुनि मुख राजाज्ञा सांगुनि । जाई रघुकुल दीपा घेउनि ॥७॥*
*। जाति राम सह सचिव कसेसे । जो बघतो तो विकल होतसे ॥८॥*

**अर्थ** : रामचंद्रांनी सुमंत्राला येताना पाहिला व पित्याप्रमाणे मानून त्याचा आदर सत्कार केला.॥६॥ सचिवाने रामचंद्रांच्या मुखाकडे (एकदा प्रेमाने) न्याहाळून पाहिले व राजाची आज्ञा निवेदन केली आणि रघुकुलदीपाला घेऊन चालले.॥७॥ राम कसेसेच सचिवाबरोबर जात आहेत हे ज्यांनी ज्यांनी पाहिले ते ते सर्व व्याकुळ झाले.॥८॥

**टीका. चौ. - ६-७ (१) आदर देति पित्यासम मानुनि** - पुढे येऊन भेटले व घरात घेऊन गेले व बसण्यास उत्तम आसन दिले. मानसात सुमंत्र रथ घेऊन आल्याचा उल्लेख नाही. सुमंत्र रामभवनाकडे चालतच गेले व दोघेही परत जाताना चालत जात असलेलेच दिसले. (२) **निरखुनि मुख** - रामचंद्रांनी पितृभावनेने त्यांचे स्वागत केले, तर सुमंत्र पुत्रवात्सल्याने रामचंद्रमुखचंद्राला न्याहाळून पाहू लागले. '**निरखुनि सादर सुंदर बदना । बदली माय मधुर मृदु वचना**' (५२।६) 'बघुनि राम छबिधाम मुख गत पीडा बहु हाल' (३।३०।) असेच सुमंत्राचे झाले. (क) **रघुकुलदीप** - कैकयीच्या मंदिरात शोकविपत्ति दांपत्याने गडद अंधार पाडला आहे. सूर्योदय झाला तरी दशरथ शोकविव्हळ होऊन जमिनीवर लोळत आहेत. रघुकुलदीपाला तेथे नेल्यावर या दीपाचा प्रकाश तेथे पडेल, अंधार दूर जाईल व सर्व काही प्रकाशात येईल. **तीनचार गोष्टींवर प्रकाश पडेल.** राजाला उठण्यास उशीर का? राजाला शोक का? राणीने काय दुष्टपणा केला आणि रामाला का बोलावून घेतला? मानसात व भ-गीतेत ज्ञानाला दीप म्हटले आहे 'अहमज्ञानजं तमः । नाशयाम्यात्मभावस्थो **ज्ञानदीपेन** भास्वता' (भ.गी.) मानसांतील **ज्ञानदीप प्रकरण** प्रसिद्धच आहे. ज्ञानदीप तेथे नेला म्हणजे **अज्ञानतम नष्ट होईल.**

**चौ.८ - (१) जाति राम कसेसे** - राज्याभिषेकाचा उत्तम पोषाख घालून उत्तम हत्तीवर किंवा सुंदर शृंगारलेल्या रथांत, सिंहासनावर बसून, छत्रचामरांनीयुक्त इ. प्रकारे जातील अशी लोकांची अपेक्षा होती. परंतु यांतील एकही राजचिन्ह तर नाहीच; पण रोज अंगावर असणारे अलंकारही नाहीत व पायी अनवाणी चालत जात आहेत. रोजच्या सारखी प्रसन्न मुद्राही दिसली नाही. भलत्याच वेळी असे का? असे वाटून ज्यांनी ज्यांनी जाताना पाहिले त्यांना तेथल्या तेथे चिंतेने व्याकुळ केले.

**हिं.दो.** *। जाइ दीख रघुबंसमनि नरपति निपट कुसाजु ॥*
*॥ सहमि परेउ लखि सिंघिनिहि मनहुँ बृद्ध गजराजु ॥३९॥*

**म.दो.** *। जाति बघति रघुवंशमणि अति नृपतिचा कुसाज ॥*
*॥ बघुनि सिंहिणिस पतित जणुं सभय वृद्ध गजराज ॥३९॥*

**अर्थ :** रघुवंशमणि राम गेले व पाहतात तो नरपति अत्यंत दुःस्थितीत (कुसाज) असे पडलेले दिसले की जणू सिंहिणीला पाहून भयभीत होऊन गजराजच पडला असावा. दो. ॥३९॥

**टीका. दो. - (१) रघुवंशमणि** - पूर्वी रघुकुलदीप म्हटले, पण दीपाचा प्रकाश परतंत्र असतो. तो वाऱ्याने विझतो. कैकयीरूपी विपत्ती आपल्या मुखरूपी पदराने वचनरूपी वारा घालून त्याला विझवण्याचा प्रयत्न करील म्हणून येथे रघुवंशमणि म्हटले; कारण रामचंद्राचे मन मुळीच विचलित होणार नाही व ज्ञानरूपी प्रकाश कायम राहणार आहे. आणखी सुचविले की, दशरथांचे रघुवंशशिरोमणित्व संपणार व ते रामाकडे येणार. 'सर्वा परम प्रकाशकर जे । राम अनादि अयोध्याधिप ते' (१।११७।६) 'परम प्रकाशरूप' -

(२) **अतिकुसाज** - जो सिंहासनावर बसलेला असावयाचा तो उघड्या जमिनीवर लोळत आहे. ज्याच्या मस्तकावर छत्र चामरे ढाळली जावयाची त्याचे मस्तक नुसत्या जमिनीवर आहे इ. सर्व विपरीत दुर्दशा दृष्टीस पडली. **(क) सिंहिणीस बघुनि सभय वृद्ध गजराज पतित** - गजराज कितीही मोठा असला तरी सिंहिणीला पाहताच तो घाबरून जातोच. पण मदोन्मत्त तरुण असला तर निदान पळून जाण्याचा प्रयत्न तरी करतो. परंतु वृद्ध गजराजाला तेही करवत

नाही व तो भयग्रस्त होऊन जमिनीवर पडतोच. त्याचे पायच लुळे पडतात भयाने. तसेच दशरथाचे झाले आहे. वृद्ध शब्द किती यथार्थ व उचित आहे पहा ! राजसिंह होते ते वृद्ध गजराज झाले आहे. कैकयी सिंहिण बनली आहे. सिंहीणीच्या गर्जनेनेच गजराजाची सर्व शक्ती जशी नष्ट होते तशी 'तापसवेषिं विशेष उदासी । चौदा वर्ष राम वनवासी' ही एक गर्जना आणि 'मुनिवेषें जर उदयिं ना जातील राम वनांत' ही दुसरी गर्जना आणि वारंवार टोचून बोलली त्या अनेक घोर गर्जना यांनी दशरथाची सर्व शक्ती, स्वतंत्रता व विचारशक्ती नष्ट झाली आहे. जगण्याची आशा राहिली नाही. ही सिंहीण ठार मारणार अशी खात्री वाटत आहे. या गजराजाला ठार मारून त्याच्या गंडस्थळांतील अयोध्येचे राज्यरूपी मोत्ये आपल्या भरतरूपी करभकाला (शावकाला) खायला घालू पहात आहे. 'गाय मारिसी वादी लागी' यांतील सिंहीण (नहारू-नाहरू) हा भाव येथे स्पष्ट केला आहे. सिंहसिंहिणी गजमुक्ता भक्षण करतातच. 'जोंवरि न पाहिला गज-मुक्ताफळ-कवळ भक्षिता हरि (सिंह) तो' आणखी दुर्दशा पहा :

*हिं.* *। सूखहिं अधर जरइ सब अंगू । मनहुँ दीन मनिहीन भुअंगू ॥१॥*
*। सरुष समीप दीखि कैकेई । मानहुँ मीचु घरीं गनि लेई ॥२॥*
*। करुनामय मृदु राम सुभाऊ । प्रथम दीख दुखु सुना न काऊ ॥३॥*
*। तदपि धीर धरि समउ बिचारी । पूँछी मधुर बचन महतारी ॥४॥*

*म.* *। सुकले अधर जळत सब अंग । जणूं दीन मणिहीन भुजंग ॥१॥*
*। सरुष समीप दिसे कैकेई । मृत्यु घडी जणुं मोजुन घेई ॥२॥*
*। राम कारुणिक मृदू स्वभावें । प्रथम दृष्ट दुख कानिं न ठावें ॥३॥*
*। धरिति धीर जाणुनि समयाला । माते वदति मधुर वचनाला ॥४॥*

**अर्थ :** ओठ सुकून कोरडे पडले आहेत व सर्व अंग जळत आहे. (लाही होत आहे) आणि जणू मणिहीन झालेला भुजंगच (अति) दीन होऊन पडला आहे.॥१॥ रुष्ट झालेली कैकयी जवळच दिसत असून जणू मृत्यूच घटका मोजून घेत (बसला) आहे.॥२॥ राम स्वभावताच करुणामय (कारुणिक) व कोमल (अंतःकरणाचे) व त्यातही त्यांनी दुःख म्हणजे काय हे ऐकले सुद्धा

नव्हते. पण आज प्रथमच दुःख पहावेच लागले.॥३॥ (त्यामुळे त्यांस अति दुःख झाले) पण वेळेचे महत्व जाणून त्यांनी धीर धरला व मधुर वाणीने मातेला (कैकयीला) म्हणतात.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) सुकले अधर** - विरहाग्नीच्या तापाने ओठ शुष्क झाले आहेत. व तोंडाला कोरड पडली आहे. सर्वांगाची विरहानल ज्वाळांनी लाही लाही होत आहे. **'विरह वन्हि, तनु तूल, समीर - । श्वासहि; जळतें क्षणें शरीर - ॥ वर्षति नेत्रजला स्वहितला । तनु न जाळवे विरह दवाला** ॥(५।३१।७-८) असे सीतेच्या दशेचे वर्णन आहे. दशरथांचा श्वास अजून समीर (जोराचा वारा) झाला नाही तरीपण नयन जलाचा वर्षाव करीत नसल्याने हा वन्ही शरीराला जाळून खाक करणार हे ठरल्यासारखेच आहे. वारा जोराचा सुटला नाही म्हणून धुमसत धुमसत जळत आहे इतकेच. किती सावधानतेने समन्वय साधला आहे हे पहावे ! अश्रूंचे वर्णन केले असते तर किती विसंगत झाले असते याचा विचार करावा ! (क) मागल्या छंदांत (दो.२५) कैकयीला भुजंगभामिनी म्हटले आहे. ती टीका पहावी. येथे दशरथ **भुजंग** बनले; पण राम रघुवंशमणि हा मणि त्यांच्या जवळून काढून घेतला असून तो परत मिळण्याचीही आशा नाही; कारण तो घोर वनात फेकला जाणार. त्यामुळे या भुजंगाला नुसते फुत्कार टाकण्याची सुद्धा शक्ती राहिली नाही. अगदी दीन बनून तळमळत-विवळत, निस्तेज होऊन पडला आहे.

**चौ.२ - (१) सरुष समीप दिसे कैकयी** - 'तू मागितलेला दुसरा वर तुला दिला' असे राजा अजून सांगत नाही म्हणून रुष्ट आहे. सूर्योदय होऊन गेला तरी अजून वनात जाण्याची आज्ञा रामाला दिली नाही. 'मुनिवेषे जर उदयिं ना जातील राम वनात ॥ मम मरणहि तव अयश नृप समजा होय मनांत' (३३) असे तिने बजावले होते. कैकयीचे हे वचन असत्य ठरलेच. सूर्योदय होऊन गेला व राम वनात गेले नाहीत तरी ही मेली नाही. (क) **मृत्यु घडी जणुं मोजुन घेई** - कैकयी जवळ बसली आहे. पण प्रत्यक्ष मृत्यूच तिच्या रूपाने जवळ येऊन बसल्यासारखे वाटत आहे. दशरथाच्या आयुष्याच्या घटका मृत्यू मोजीत बसला आहे ! मृत्यू = यम फार कराल दिसतो. तशीच रुष्ट कैकयी

दिसत आहे. दशरथाचा मरणकाळ समीप आला आहे असे दिसले. हिंदी 'मीचु' = मृत्यु स्त्रीलिंगी शब्द आहे. **कैकयी दशरथाचा मृत्यु ठरली !**

**चौ.३ - (१) राम कारुणिक मृदू स्वभावें - कारुणिक** - 'स्याद्दयालुः कारुणिकः कृपालुः (अमरे) करुणा शीलमस्य' (अ.व्या.सु.) = करुणाशील, करुणामय; हे राजाचे दुःख रामाला पाहवले नाही व करुणाशील, कोमल स्वभाव असल्याने त्यांनाही फार दुःख झाले. **(क) राम** = 'जो आनंदसिंधु सुखराशी' 'राम सकल आनंदनिधान' असून त्यांना दुःख झाले. करुणा उत्पन्न झाली. परंतु धर्मपत्नी असून नवरा मरत पडलेला समीप असून राणीला दुःखलेश नाही ! मूर्तिमंत निष्ठुरता, मूर्तिमान मृत्यूच ती ! मृत्यूला दया, करुणा, मैत्री इत्यादींचा गंध कोठला? **(ख) प्रथम दुष्ट दुःख कानिं न पडलें** - ज्यांनी कधी दुःख म्हणजे काय हे आजपर्यंत ऐकलेसुद्धा नव्हते त्यांनाच आज प्रथम हे दुःख पहावे लागले. अशा व्यक्तीला अल्पसे दुःख सुद्धा फार मोठे वाटते. येथे तर प्रत्यक्ष पिता मरणाच्या दारात पडलेला ! आणि माता कैकयी रुष्ट, करालकाल ! अशा स्थितीत असह्य दुःख होईल यात नवल काय? **(ग) प्रथम** - या शब्दाने सुचविले की हा दुःखानुभवाचा आरंभ आहे. अनेकांची अनेक दुःखे ऐकावी, बघावी लागणार आता !

**चौ.४ - (१) धीर धरिति** - पित्याची ती दुरवस्था पाहून धीर सुटण्याइतके दुःख झाले होते हे यावरून ठरते. पिता मरणासन्न असता वडील मुलाने धीर सोडून दुःख करीत बसणे योग्य नाही. माता तर यमराज बनून बसली आहे. **अशा स्थितीत पित्याचे दुःख निवारण करण्याचा, कष्ट कमी करण्याचा प्रयत्न करणे हे जाणत्या पुत्राचे कर्तव्य आहे. प्रेमाला-स्नेहाला वश होऊन कर्तव्य पराङ्मुख होणे हे शहाण्या माणसांस शोभत नाही.** परदुःख पाहून राम अत्यंत दुःखी झाले व पुढे अनेक वेळा दुःख होणार आहे; म्हणूनच मंगलाचरण श्लोकांत **'न मम्ले'** हे आत्मनेपदीरूप वापरले आहे. (गू.चं.प.) **(क) मधुर वचनाला वदति** - भाव हा कीं बाप अति दुःखी असता, सापत्न माता रुष्ट होऊन जवळ बसलेली असून राजाचे, वडिलांचे दुःख कमी करण्याचा प्रयत्न न करता ती इंगळासारखे लाल डोळे करून विक्राळ मुद्रेने त्यांच्याकडे बघत आहे, हे पाहून सुद्धा क्रोध

मुळीच आला नाही. दुसरा कोणी पितृभक्त राजपुत्र असता तर त्याने काय केले असते याचा विचार करावा. राम अगदी शांतपणें मृदु, मधुर शब्दांनी मातेला विचारीत आहेत. विचारण्यात हेतु नरनाट्य करणे हाच आहे, 'हेतु विदित जगदीश' असे जे कैकयी म्हणाली त्याप्रमाणे प्रभूंनी हेतु जाणलाच आहे. पित्यास विचारले व 'राज्याभिषेक करून घे म्हणजे माझे दुःख नष्ट होईल' असे त्यांनी सांगितले तर कार्य साधणार नाही. वनात जाता येणार नाही. कैकयीला विचारले म्हणजे ती सांगणारच की 'वनात जा व पित्याचे वचन सत्य कर' म्हणून मातेला विचारले. कैकयीला वाटले असेल की आता सावज चांगले सापडले ! राम परमात्मा आहेत हे ज्ञान तिला मुळीच नाही.

हिं. *। मोहि कहु मातु तात दुख कारन । करिअ जतन जेहिं होइ निवारन ॥५॥*
*। सुनहु राम सबु कारनु एहू - । राजहि तुम्ह पर बहुत सनेहू ॥६॥*
*। देन कहेन्हि मोहि दुइ बरदाना । मागेउ जो कछु मोहि सोहाना ॥७॥*
*। सो सुनि भयउ भूप उर सोचू । छाड़ि न सकहिं तुम्हार सँकोचू ॥८॥*

म. *। तात- दुःख कारण वद माते । करुनि उपाय निवारूं त्यातें ॥५॥*
*। राम पहा हें एकच कारण । राजस्नेह तुम्हांवर पार न ॥६॥*
*। होते युग वर मजला दिधले । रुचले मनिं ते मी मागितले ॥७॥*
*। ऐकुनि करिति भूप मनिं शोचा । त्यजुं न शकति तुमच्या संकोचा ॥८॥*

अर्थ : माते मला वडिलांच्या दुःखाचे कारण सांग; म्हणजे जेणे करून ते निवारण करता येईल असा उपाय (यत्न) करू.॥५॥ हे पहा राम ! कारण एकच की तुमच्यावर राजांचा अपार (पार न) स्नेह आहे.॥६॥ (त्यांनी) मला दोन वर देण्याचे कबूल केले होते व मला जे आवडले ते मी मागितले.॥७॥ ते ऐकून भूपांच्या मनाला (शोक) चिंता-लागली; कारण की तुमचा संकोच ते सोडू शकत नाहीत ॥८॥

**टीका. - चौ.** ५ (१) पित्याच्या दुःखाचे **कारण कैकयीला विचारले**; कारण राजा ते सांगण्याच्या परिस्थितीत नाहीत. ज्या प्रमाणे एकंदर परिस्थितीवरून सुमंत्राने ताडले की राणीनेच काहीतरी कुचाळकी केलेली दिसते, तसेच रघुकुलदीपाने जाणले की मातेने काहीतरी करण्यास सांगितले असावे व ते

करणे पित्याला दु:खदायक वाटत आहे व ते केले जात नाही म्हणून माता फार क्रुद्ध झाली आहे. सार हे की पित्याच्या दु:खाचे कारण मातेला माहीत असलेच पाहिजे हे ओळखले म्हणून विचारले. दु:खाचे कारण निवारण केले की कार्य दु:ख नष्ट होईल असे जाणून सांगितले की दु:खाचे कारण सांगितले तर ते निवारण करण्याचा प्रयत्न करता येईल. (हे नरनाट्य दृष्टीने आहे).

**ल.टे. - वद - कहु, हे एकवचन आहे.** राम ज्या ज्या वेळी फार प्रसन्न होऊन, अति प्रेमाने बोलले आहेत तेव्हाच एकवचनी प्रयोग किंवा संबोधन वापरले आहे. अन्यथा आपल्यापेक्षा लहान असलेल्या भरत व लक्ष्मण या भावांना सुद्धा '**सुनहु** तात' (३।१५।१ लक्ष्मणांस) 'तात जायँ जियँ **करहु** गलानी' '**तुम्हपर**' 'नाम **तुम्हार**' इ. या प्रमाणे बहुवचनच वापरले आहे. उत्तर कांडांत संत लक्षणे सांगताना मात्र भरतास 'सुनु' असे एकवचन वापरले आहे. **(क) अति प्रसन्न एकवचनामुळे** की मातृपितृ सेवा करण्यास सापडणार; **हा माधुर्य भावातील हेतु आहे**. वनवासाचे निमित्त मिळणार व निशाचर नाश करून भक्तांस सुख देता येणार **हा ऐश्वर्य भावातील हेतु आहे. 'मुखें प्रसन्न मनीं सुत्साहित । गत चिंता 'नृप नाहिं न राखित?'** ॥५१।८॥. 'राजा ठेवणार तर नाही ना घरी' अशी चिंता होती म्हणूनच राजाला विचारले नाही व कैकयी आज्ञा देईल असे वाटले म्हणून प्रसन्न झाले व म्हणून 'कहु' - 'वद' हा एकवचनी प्रयोग केला. **(टीकाकार येथे मौन !)**

**चौ.६ - (१) कैकयी मात्र रामाला बहुवचनाने संबोधित आहे.** 'सुनहु', 'पहा' बघ नव्हे. येथील राम-कैकयी संवादात हा भेद शेवटपर्यंत पाळला आहे, मोठेपणा देऊन, चढवून, कार्य साधावयाचे आहे. प्रशंसासुद्धा करणार आहे. पण मनात मात्र साशंकता व कपट आहे. **(क) एकच कारण** - राजाचे रामावर अपार प्रेम आहे हेच कारण तिने सांगितले. हे कारण खोटे नाही. **सदेह रामस्नेह म्हणजेच दशरथ** (दो. २ ). **रामप्रीतीची परमावधि म्हणजेच दशरथ.** (३७।४). परंतु कैकयी ज्या भावनेने बोलत आहे तो दूषित, कपटी असल्यामुळे हे सत्य असत्यापेक्षाही घोर आहे. 'मी कारण आहे.' असे ती म्हणत नाही. सवतीमत्सर व सूडबुद्धि हे आहे कारण.

**चौ. ७ - (१)** रामस्नेहच दुःखाचे कारण कसे ते आता ती दाखवते. पूर्वी दिलेले वर माग असे म्हणाले राजा म्हणून मला आवडले ते मी मागितले. भाव हा की राजांना ते आवडले नाहीत. कारण तुमच्यावर त्यांचा फार स्नेह आहे. कसा साळसूदपणा आहे ! मी रुसले, राजाला गोडगोड गुळथापांनी भुलवून विश्वासघात केला. टाकून-टोचून बोललें इत्यादी सांगते कशाला ! **स्वार्थसाधु, कुटिल कपटी असतात त्यांच्या स्वभावाचे हे यथार्थ चित्र पहा - पुढला मागला आपल्या विरुद्ध असलेला संभाषणातील भाग, आपली दुष्कृति, दुर्वचने इ. सर्व गाळून मतलबापुरता अगदी सोज्वळ दिसणारा भाग तेवढा पुढे मांडावयाचा व चूक आपली नसून दुसऱ्याची आहे हे जगाला दाखवीत सुटावयाचे. हलक्या कानांची माणसे ते खरे मानतात व तीही चांगल्या, निर्दोषी माणसांची, सज्जनांची निंदा करू लागतात** ! राम असे फसणारे नसले तरी अवतारकार्य करण्यास, घडण्यास, कैकयीचे भाषण पूर्ण अनुकूल व उपयुक्त आहे.

**चौ. ८ - (१) ऐकुनि करिति भूप मनिं शोचा** - मी मागितलेले वर ऐकून भूप असून त्यांना चिंता पडली. कारण **'त्यजुं न शकति तुमच्या संकोचा'** तुमचा संकोच तोडवत नाही. अमुक करा असे तुम्हाला सांगण्यास राजांना संकोच वाटतो. प्रेमाच्या माणसास दुःख होईल, त्रास होईल असे कार्य करण्यास सांगण्यास संकोच वाटतोच. तिचा भाव हा आहे की सांगण्याची भूपतींची इच्छा आहे. कारण की न सांगितल्यास प्रतिज्ञाभंग घडेल. पण तुमची भीड मोडवत नाही. तोंडाने सांगण्याचे धाडस राजांना करवत नाही. कशी बाजू उलटी रंगवली पहा ! हे सर्व ती पुढे स्पष्टच सांगणार आहे. हळूहळू मुख्य मुद्द्याकडे येत आहे. येथे मात्र राजाविषयी ती एकवचन वापरीत नाही. कारण ते करणे रामाला पसंत पडणार नाही व स्वतःचा दोष प्रगट होईल.

***हिं.दो.*** ***। सुत सनेहु इत बचनु उत संकट परेउ नरेसु ॥***
***॥ सकहु त आयसु धरहु सिर मेटहु कठिन कलेसु ॥४०॥***

***म.दो.*** ***। सुतस्नेह इथं वचन तिथं संकटिं पतित नरेश ॥***
***॥ शक्य तराज्ञा धरा शिरिं कठिण निवारा क्लेश ॥४०॥***

**अर्थ :** इकडे पुत्रस्नेह व तिकडे आपले वचन अशा संकटांत नरेश

सापडले आहेत. तुम्हाला शक्य असेल तर आज्ञा (तर+आज्ञा=तराज्ञा) शिरसा मान्य करा (शिरावर धरा) व कठीण क्लेश निवारण करा.॥दो.४०॥

**टीका : दो. (१) सुतस्नेह इथं बचन तिथं** - इथं = इथे, इकडे, तिथं - तिथे, तिकडे - 'इथे' जवळची गोष्ट दाखवितो व 'तिथे' दूरची. भाव हा की वचनापेक्षा नरेशांना पुत्रप्रेम अधिक वाटत आहे. (क) पुत्रस्नेह इथेच सुखदायक होणार पण वचनाचे पालन परलोकसुख देऊ शकेल. ऐहिक सुख क्षणिक आहे पण पारलौकिक सुख चिरंतन असते हे नरेशांना कळत नाही असे नाही; पण पुत्रस्नेहामुळे भीड मोडण्याचे धारिष्ट करणार नाहीत. करवणारच नाही. अशा धर्मसंकटात पडले आहेत ! स्वतः बाहेर पडण्याची ताकद नाही. तुम्ही त्यांना या धर्मसंकटातून सोडवू शकाल असे मला वाटते. (ख) दुसरा भाव हा की नरेशांनी आज्ञा दिली तर तुम्ही मानाल की नाही अशी त्यांना शंका वाटत असावी. नरेश असल्याने आज्ञाभंगाबद्दल दंडशिक्षा इतर कोणालाही करू शकतील; पण स्वतःच्या प्राणप्रिय पुत्रानेच आज्ञा मोडली तर त्याला तशी शिक्षा कशी करवेल? म्हणूनच नरेश असून तुम्हाला सांगत नाहीत असे मला वाटते. हेतु हा आहे की शब्द मर्मी लागून पित्राज्ञा पालनाची प्रवृत्ती उसळी मारून उठावी. ज्या ज्या युक्तींनी नवऱ्याला फसवून जाळ्यात पकडला व फास आवळला त्याच युक्त्या ती आता योजीत आहे.

(२) **शक्य तर आज्ञा शिरिं धरा (व) कठिण क्लेश निवारा** - पित्राज्ञा शिरसावंद्य मानणे हा पुत्रधर्म आहे. पित्याचे क्लेश निवारण करणे हाही पुत्रधर्म आहे. पण सगळ्यांनाच हे शक्य असते असे नाही. आज्ञा शिरीं धरली तर क्लेश निवारण होतील. अमान्य केलीत तर क्लेश निवारण होणार नाहीत. तुम्हाला शक्य असेल ते करा. 'करुनि उपाय निवारूं' असे राम म्हणाले त्या वचनात त्यांस पकडीत आहे. (क) हा जसा पुत्रधर्म आहे तसा जणू काय पत्नीचा हा धर्म नाही की पतीची आज्ञा मानून, पतीची इच्छा जाणून त्याप्रमाणे वागून पतीचे क्लेश निवारण करावे ! रामाला वनात पाठवू नकोस असे हाता-पाया पडून विनविले तरीही आपला दुष्ट हट्ट न सोडणे हा पत्नीचा धर्मच असेल ! पण 'आपला तो बाब्याच व दुसऱ्याचा तो कारटा?' **आपल्या अधर्मी,**

**निधर्मी, आचरणाने आसुरी, राक्षसी महत्त्वाकांक्षा तृप्त करून घेण्यासाठी, धर्माची महती दुसऱ्यांस सांगणारे धूर्त, स्वार्थसाधु, साधु-संत म्हणविणारे, असेच बोलत असतात** ! 'पर-उपदेश-कुशल बहु असती ! (ख) कोणते वर मागितले, कोणती आज्ञा देणे जड वाटते, कोणती आज्ञा शिरी धरावयाची इत्यादी कशाचा मागमूस न लागू देता गुळगुळीत, मोघमच बोलत आहे. राजासारखाच रामाला एकदा उत्तेजित करून मग आपले 'पोतडे' बाहेर काढणार आहे.

हिं. ***। निधरक बैठि कहइ कटु बानी । सुनत कठिनता अति अकुलानी ॥१॥***
***। जीभ कमान बचन सर नाना । मनहुँ महिप मृदु लच्छ समाना ॥२॥***
***। जनु कठोरपनु धरें सरीरू । सिखइ धनुषबिद्या बर बीरू ॥३॥***

म. ***। निधडक बसुनि वचन कटु वदते । श्रवत कठिणता अति विव्हळते ॥१॥***
***। वचन विविध शर जीभ कमानहि । जणुं महीप मृदु लक्ष्य समानहि ॥२॥***
***। जणुं कठोरपण वीर-कलेवर । धरुनि धनुर्विद्याच शिके वर ॥३॥***

**अर्थ :** निःशंकपणे (निधडक) बसून इतके कटु भाषण करीत आहे की ते ऐकताना कठिणता सुद्धा अत्यंत विव्हळ होते (होईल) ॥१॥ विविध वचने हे विविध बाण आहेत. जीभ हे धनुष्य (कमान) आहे आणि महीपति (दशरथ) जणू मृदु (मऊमऊ) लक्ष्यासारखे आहेत.॥२॥ जणू कठोरपणाच वर (श्रेष्ठ) वीरांचे शरीर (कलेवर) धारण करून उत्तम धनुर्विद्याच शिकत आहे.॥३॥

**टीका. चौ. १ - (१) निधडक** - बेधडक, निधड्या छातीने; लाजलज्जा, मर्यादा, भय, संकोच इ. स्त्रियांच्या सर्व सद्गुणांचा त्याग करून बसली आहे. तिच्या कटुभाषणाला उपमाच राहिली नाही. 'वदे कैकयी अति कटु वचना । क्षतामधें जणुं घाली लवणा' (३०।८) पुन्हा, 'तैं कैकइ कटु कठोर वदते । क्षतामध्ये जणुं विषा घालते' (३५।३) आता रामाला जे म्हणाली ते ऐकणे तर प्रत्यक्ष कठिणतेला सुद्धा व्याकुळ करणारे आहे. मग दशरथासारख्या कोमलहृदयी, दीन, अति शोकविव्हळ झालेल्यास किती दुःखद झाले असेल ! राम मृदु व करुणामय आहेत; पण त्यांच्यावर याचा काहीच वाईट परिणाम झाला नाही. मृदु असले तरी त्यांना राणीची करुणा आली. देवमायेने मोहित

मनुष्य कसे बनते याचा नमुना दिसला. राम मनात हसत आहेत हे पुढे कळेल.

**चौ. २ - ३** - (१) यांत धनुर्विद्या शिकणाऱ्या वीराचे रूपक आहे. **बचन बिबिध सर** - काही बोथट, काही तीक्ष्ण, काही विषारी, काही पिसे लावलेले वगैरे. तशी विविध प्रकारची वचने हेच बाण. जीभ हेच धनुष्य आहे. जीभ स्त्रीलिंगी म्हणून कमान हा स्त्रीलिंगी शब्द वापरला. (क) **जनुं महीप मृदु लच्छ** - ज्यावर बाण मारावयाचे त्याला लक्ष्य म्हणतात. लक्ष्यांत बाण शिरला म्हणजे लक्ष्यवेध झाला. **मृदु लच्छ** - ज्यांत नवशिक्या माणसाचासुद्धा बाण सहज शिरू शकेल असे मऊ लक्ष्य, नवशिक्या वीरासमोर गवत किंवा भुसा भरलेला माणसाचा पुतळा वस्त्रे घातलेला, एखाद्या भिंतीपुढे उभा करतात; किंवा मेणाची मूर्ती करून ती तशीच भिंतीजवळ उभी केली जाते. महीप दशरथ जणू त्या मृदु लक्ष्यासारखे आहेत. तिचे तीक्ष्ण-तिखट (कटु) वाग्बाण राजाच्या मेणासारख्या हृदयात भराभर घुसून अडकत आहेत.

**चौ. (३) जनु कठोरपनु (पना) धरें - बीरकलेवर धरुनि धनुर्बियाथ सिकें** - कठोरपण-कठोरपणा पुल्लिंगी आहे, कैकयी स्त्री आहे व त्या काळी स्त्रिया धनुर्विद्या शिकत नव्हत्या म्हणून उत्प्रेक्षा केली. प्रत्यक्ष कठोरपणाच उत्तम वीराचे शरीर धारण करून बाण मारण्याचा अभ्यास करीत आहे. शिकताना जे बाण मारले जातात ते त्या लक्ष्याला विनाकारण मारले जातात. त्याने काही शत्रुत्व, वैर, विरोध इ. केलेले नसते. मारणारा आपली हौस पुरविण्यासाठी त्या मृदु लक्ष्याला भोके पाडीत असतो. भोके पडतात पण रक्ताचा थेंब निघत नाही. कैकयीच्या तीक्ष्ण वाग्बाणांनी दशरथाच्या कोमल हृदयाला निष्कारण भोके पाडली व असह्य वेदना होत आहेत पण रक्ताचा थेंब नाही व मरणही येत नाही. भाव हा की हे वाग्बाण सहन करण्यापेक्षा मरण आले असते तर इतके क्लेश झाले नसते. **उत्तम धनुर्विद्या शिकत आहे** म्हणजे नवशिक्या असून एकही बाण फुकट जात नाही. प्रत्येक वाक्य दशरथाच्या हृदयाला भोक पाडीत आहे. मृदु असल्यामुळे हृदयाचे तुकडेही होत नाहीत. हृदयाची नुसती चाळणी होत असून बाण त्यांत अडकून सलत आहेत.

(३) कैकयी कठोरपणा शिकली कुबडीजवळ. तिचे पहिले काही बाण

फुकट गेले. ते लागले नाहीत; पण कैकयीरुपी कठोरपणाचा एकही बाण व्यर्थ गेला नाही. कैकयीने स्त्रीस्वभाव सुलभ सर्व सद्‌गुणांचा त्याग तर केलाच, पण साधारण पुरुषांपेक्षा व क्षत्रिय वीरांपेक्षाही ती अधिक कठोर, निर्दय व उद्दाम बनली आहे. (क) ती रामाशी बोलत असली व तिचे वाग्बाण रामाला लागत नसले तरी तिचे हे भाषण राजाला मरणापेक्षाही अधिक क्लेशदायक असून असत्याने भरले आहे. रामाला वनवासात पाठविण्याची आपली राक्षसी हौस पुरविण्यासाठी ती बोलत आहे. तिने असे दुःखदायक काही बोलू नये म्हणून दूर जाऊन तोंड लपवून बस व मी जिवंत असेपर्यंत पुन्हा काही बोलू नकोस असे राजाने निक्षून सांगितले असून निष्कारण खोटे बोलत आहे.

**हिं.** ***। सबु प्रसंगु रघुपतिहि सुनाई । बैठि मनहुँ तनु धरि निठुराई ॥४॥***
***। मन मुसुकाइ भानुकुलभानू । रामु सहज आनंद निधानू ॥५॥***

**म.** ***। सकल कथा रघुपतिला सांगे । बसुनी निष्ठुरता जणुं आंगें ॥४॥***
***। स्मित मनिं करुनि भानुकुल भानू । राम सहज आनंद निधानू ॥५॥***

**अर्थ :** जणू निष्ठुरता स्वतःच देह धरून बसून तिने (दोन वरांविषयींची) सर्व हकीगत रघुपतीला सांगितली.॥४॥ भानुकुलाला प्रकाशित करणारे भानु, सहज, आनंदाचे निधान असलेले राम मनात स्मित करून - (म्हणाले) ॥५॥

**टीका. चौ - ४ -** (१) राजासारखा रामाला वचनबद्ध करण्याचा प्रयत्न सफल होत नाही; कारण राम काही बोलत नाहीत की विचारीत नाहीत असे पाहून तिला वाटले की आपणच सर्व गोष्टी रामाला स्पष्ट सांगितल्या नाहीत तर राजा रामाशी बोलू लागेल व सर्व डाव हुकेल; म्हणून (क) **सकल कथा रघुपतिला सांगे** - देवासुर संग्रामात वरदान मिळण्याच्या हकीगतीपासून, राजाचे सायंकाळी येणे, वर मागणे वगैरे सर्व मुख्य मुद्याच्या गोष्टी – कोणते दोन वर मागितले व राजा का देत नाही इत्यादी सर्व सांगितले. कवि म्हणतात, कैकयीने सर्व सांगितले असे म्हणण्यापेक्षा निष्ठुरताच देहधारी बनून बसली व तिने सांगितले असे म्हणणेच योग्य आहे. भाव हा की ही हकीगत सांगतानासुद्धा राजाला मर्मी लागतील असे विषारी बाण तिने मारलेच. (क) येथे 'रघुपति' शब्द भावगर्भित आहे. या प्रकरणात आतापर्यंत बहुधा 'राम'

शब्दच वापरला आहे. या ठिकाणी दशरथ हजर असून रामचंद्रांस 'रघुपति' म्हणण्यात कवि मनातील भाव हा की आता दशरथ 'रघुपति' राहिले नाहीत. त्यांनी एका वराने भरतास राज्य देऊन टाकले आहे. कैकयी भरताला 'रघुपति' करू पहात आहे. पण भरत 'रघुपति' न होता शेवटी रामच 'रघुपति' होतील. कुळाची कीर्ती अखंडित व विभूषित ठेवल्यानेच कुळाचे खरेखुरे पालन केले जाते. श्रीरामचंद्रच आता रघुकुळाची कीर्ती-प्रतिष्ठा राखतील म्हणून त्यांना 'रघुपति' म्हटले.

**चौ. ५ - 'स्मित मनिं करुनि'** - राणी अत्यंत निष्ठुरतेने आणि कपट चातुर्याने बोलली तरीही रामांनी मनात स्मित केले. विशेष लक्षांत ठेवा - जेथे श्रीरामांचे स्मित करणे, हसणे किंवा विहसणे वर्णन केले आहे तेथे पुढील तीन भावांपैकी एक भाव त्यात असतो. एक तर आपल्या मायेला प्रेरणा देतात किंवा मायेला आकर्षित करतात अथवा अलौकिक प्रीति पाहून प्रसन्न होतात. पहा – १।१९२ । छंद ३; १।२१६।७; १।२६५; १।५३।६; १।१२८ । ६; १।१३२।८ (गू. चं. पहा) 'श्रीरामाचे हास्य व त्याचा परिणाम 'प्रस्तावना' प्रकरण १३।१४ यांत सविस्तर, सोदाहरण लिहिले आहे. मानसमणि जानेवारी १९६४ मध्ये प्रकाशित झाले आहे. (क) राणीला आता तर आनंद होतो आहे पण भविष्यात अपार दुःख आणि अकीर्ति होणार आहे या भावनेने राम हसले असे म्हणणे अज्ञानी, विषयी जीवासंबंधी उचित ठरेल. देवमायेने अवतार कार्यात मदत करण्यासाठी... माझी इच्छा जाणून, हिला निमित्त केली आहे हे जाणणाऱ्या रामप्रभूंना या किंवा असल्या हेतूने हसे येईल हे शक्यच नाही. उलट प्रभूला या राणीची कीवच येत आहे. पण तिच्या प्रारब्ध कर्मानुसार ती निमित्त बनत आहे त्याला प्रभु तरी काय करणार ! अवतार कार्यातील महत्त्वाचा भाग सिद्धीस नेण्याचा मार्ग मोकळा झाला म्हणून प्रसन्नता वाटली. माधुर्य भावाने असा हेतु दिसतो की पितृवचन परिपालन, मातेची इच्छा पुरविणे, मुनिजनांचे दर्शन होणार, राज्याच्या उपाधीतून सुटणार व भरतासारख्या प्रिय भावास राज्य मिळणार या भावनेने हर्ष झाला व स्मित केले, हे पुढे स्पष्टच दिसणार आहे.

(२) **भानुकुलभानू** - 'राम सच्चिदानंद दिनेश । मोहनिशा न तिथें लवलेश; हर्षविषाद रहित रघुराव' असे असल्याने त्यांना कैकयीच्या वचनाने वाईट तर वाटले नाहीच पण ते कैकयीची आज्ञा व पित्याचे वचन आनंदाने पालन करतील हे येथे सुचविले. ते मोहात पडणार नाहीत व 'ममता तरुण तमी अंधारी' मध्ये दशरथांसही पडू देणार नाहीत. यामुळे ते सूर्यकुळातील सर्व पूर्वजांची मुखकमले प्रफुल्लीत करतील. (**क**) रघुकुलतिलक, मग रघुकुलदीप, नंतर रघुवंशमणि व आता भानुकुलभानु झाले. तेज, प्रकाश व प्रताप यांत उत्तरोत्तर वाढत गेला आहे. वनात गेल्यानंतर राज्यावर बसेपर्यंत तेज व प्रताप उत्तरोत्तर वाढत जाणार हे सुचविले. 'जेव्हा रामप्रताप दिनपति । प्रबल परम उदया ये खगपति ! ।। तदा त्रिलोकीं प्रकाश भरला' (७।३१।१-२) तिलक त्या भालाला-कपाळालाच प्रकाशित करतो. दीप घराला किंवा अल्पशा क्षेत्रालाच प्रकाशमय करतो पण परावलंबी असतो व वाताने विझू शकतो. मण्यात हे दोष नसले तरी तो दीपासारखाच मर्यादित प्रकाश देतो; पण भानु पूर्ण स्वयंप्रकाश, स्वतंत्र असून त्रैलोक्याला प्रकाशित करून वृष्टी, अन्न, जीवन, तेज, बुद्धि इत्यादी पुरवितो. तसेच आता होणार हे सुचविले. (७।३१ मधील सर्व टी. पहा.) **दशरथांसही रघुकुलमणि** (१।२१६।८) व **'भानुकुल भानु'** (२।५८३, २।१९९।७) म्हटले आहेच. येथे सुचविले की आता दशरथरूपी 'भानुकुलभानु' लवकरच अस्तास जाईल. 'क्षीण नृपति कौसल्ये भासत । जाणे रविकुल-रवी मावळत' (२।१५४।३) मरण समयीचे हे वर्णन आहे.

(३) **राम सहज आनंदनिधानू** - जे सहज असते तेथे सायास करावे लागत नाहीत. राम आनंदरूपच असल्याने त्यांना साम्राज्य सिंहासन काय वा कानन काय सारखेच आनंददायक वाटणार. त्यांचा आनंद त्यांच्या जवळच भरपूर आहे. तो बाह्य विषयांनी कमी-अधिक होण्यासारखा नाही. **हे ब्रह्मविद्वरिष्ठाचे लक्षण आहे**. मूर्तिमती निष्ठुरतेने सांगितलेल्या हकीगतींत 'मी 'भरताला राज्य व तुम्हाला मुनिवेषाने १४ वर्षे, विशेष उदासिन वृत्तीने वनबास द्यावा' असे मागितले पण भूपति वनात जा असे तुम्हाला सांगत नाहीत. त्यांना सांगण्याचे धारिष्ट होत नाही; म्हणून त्यांना क्लेश होत आहेत.' हा मुख्य महत्त्वाचा भाग

आहे. त्यावर आता राम सांगतात :

हिं. । ***बोले बचन बिगत सब दूषन । मृदु मंजुल जनु बाग बिभूषन ॥६॥***
***। सुनु जननी सोइ सुतु बड़भागी । जो पितु मातु बचन अनुरागी ॥७॥***
***। तनय मातु पितु तोषनिहारा । दुर्लभ जननि सकल संसारा ॥८॥***

म. ***। बदले बचन बिगत सब दूषण । मृदु मंजुल जणुं वाणि-विभूषण ॥६॥***
***। श्रुणु जननी तो सुत बहुभागी । जो पितु-मातुवचनिं अनुरागी ॥७॥***
***। तनय मातृपितृ तोषविणारा । दुर्लभ जननि ! सकल संसारा ॥८॥***

**अर्थ** : (वाणीच्या) सर्व दूषणांनी रहित असलेले, असे कोमल व सुंदर (मंजुल) वचन राम बोलले की जणू वाणीचे (वाचेचे, शारदेचे) विशेष विभूषणच. ॥६॥ हे बघ (श्रुणु, ऐक) आई ! जो पुत्र पिता व माता यांच्या वचनांवर प्रेम करतो तो महाभाग्यवान (बहुभागी - बड़भागी) होय. ॥७॥ पण आई (जननि) ! आईला व बापालाही तोषविणारा मुलगा संसारांत (या जगात) दुर्लभ आहे.॥८॥

**टीका. - चौ. ६ - (१) बचन बिगत सब दूषण** - वा.रा. (४।३।२९-३२) मध्ये वाणीच्या भाषणाच्या - गुणदोषांचे वर्णन रघुवीरानेच केले आहे. ते श्लोक किष्किंधाकाण्ड टीकेत दिले आहेत. अपशब्द, मुख नेत्र, ललाट, भिवया किंवा इतर गात्रांच्या ठिकाणी विकार, फार विस्तार, संदिग्धपणा, फार घाईने किंवा फार सावकाश बोलणे, फार मोठ्याने किंवा फार हळु बोलणे, अस्पष्टता, संस्कार रहित, क्रमभंगयुक्त भाषण इ. वाणीचे दोष आहेत. हे दोष नसून मध्यम स्वराने, कल्याणकारक, हृदयहारी (मनो-हर) मधुर व स्नेहसंयुक्त भाषण हे वाचेचे-वाणीचे गुण आहेत. **(क) मृदु मंजुल** - या दोन शब्दांत वरील सद्‌गुणांचा अंतर्भाव केला. **(ख) वाणिविभूषण** - वाणी ही स्त्री आहे. तिचे विभूषण म्हणजे सौभाग्यालंकार. विशेष (सोळा) शृंगार म्हणून ज्यांचे वर्णन बालकांडांत केले ते अलंकार. सत्य, प्रिय, धर्म्य, विनीत हे गुण सहज शृंगारासारखे, नित्य शृंगारासारखे आहेत. 'जयति वचन-रचना अति नागर' (१।२८५।३) **(ग)** कैकयीच्या कटु, कठोर, कुटिल वाग्बाणांचे उत्तर निर्दोष मृदु, मंजुल, मधुर, कल्पतरु कुसुमांनीच आता दिले जात आहे. दुसरा एखादा पितृभक्त पुत्र आणि विशेषतः पितृभक्त क्षत्रिय बच्चा अशाच परिस्थितीत सापडला असता तर त्याच्या पायाची आग मस्तकात

जाऊन त्याने कृतान्ताचे रूप घेतले असते. (लक्ष्मणच रामाच्या जागी असता तर काय झाले असते याचा विचार करावा.) किंवा शोक करीत बापाच्या जवळ विव्हळत पडला असता. (घ) वर वर्णन केलेले वाणीचे सर्व दोष कैकयीच्या भाषणात दशरथ-कैकयी संवादांत, व कुबडीच्या भाषणांत कैकयी-कुबडी संवादांत ओतप्रोत भरलेले दिसतील. निवडून रुजवात करून पाहण्याचे कार्य वाचकांवर सोपविणे भाग आहे.

**चौ. ७ - (१) जननी** - जन्म देणाऱ्या मातेला जननी म्हणतात. कैकयी रामाची जननी-जन्मदात्री नाही; तरीसुद्धा राम तिला जननी म्हणाले व अनेकवार म्हणणार आहेत ! आपली जननी व भरताची जननी यात तिळमात्र भेदभाव राम मानीत नाहीत हे दाखविले. उलट कौसल्येशी बोलताना बालकाण्डांत किंवा या काण्डांत रामचंद्रांनी 'जननी' शब्द तिला वापरला नाही, हे वैशिष्ट्य आहे. म्हणजेच राम भरतजननीला कौसल्येपेक्षा अधिक मान देत असत व आहेत हे स्पष्ट झाले. पुढे चित्रकूटला व वनवासातून परत आल्यावर ही हीच भावना कायम आहे. कवितावली अयो.कां.पद ३ मध्ये कौसल्या जे स्पष्ट म्हणाली आहे तेच माता व जननी या शब्दांनी येथे मानसांत ध्वनित केले आहे. **भाव प्रदर्शनाची ही कला कुठे पाहण्यास सापडेल** ! कैकयीच प्रथम म्हणाली आहे की 'कौसल्येसम माता सर्वहि । प्रिय रामाला स्वभाव सहजहि ॥' परंतु 'स्नेह विशेष करिति माझ्यावर । प्रेमपरीक्षा केली म्यां बर ॥' (१५।५-६)

(२) **तो सुत बहुभागी । जो पितुमातुवचनिं अनुरागी** - महा भाग्यवान पुत्र कोण याची व्याख्याच या व पुढल्या चौपाईत आहे. **वचनिं अनुरागी** - आज्ञेवर अनुरक्त असणारा; पिता व माता मला आज्ञा केव्हा देतील व मी वाटेल ते करून त्या आज्ञेचे पालन केव्हा करीन अशी वाट पाहणारा. आज्ञा मिळण्याची सुद्धा वाट न पाहता पिता किंवा माता यांनी जे वचन उच्चारले असेल ते खरे करून दाखविण्याच्या संधीची वाट पाहणारा. उदा. 'मी तुला अमुक अमुक देईन' असे पित्याने कोणास सांगितल्याचे कळताच ते पितृवचन पित्राज्ञेची वाट न पाहता पूर्ण करणारा तो पितृवचनानुरागी. **असे करण्याची बुद्धि ज्याला होते तो पुत्र महाभाग्यवान समजावा; जो असे करीत नाहीं तो अभागी हेही ठरलेच.**

(क) येथे **पितृमातृ असा क्रम** आहे. पित्याला अग्रस्थान दिले आहे. याचा अर्थ असा नव्हे की पित्यापेक्षा मातेची किंमत कमी समजावी. येथे प्रथम उल्लेखाने सुचविले की पित्याचे वचन पाळल्याशिवाय राहणार नाही. पित्याने कैकयीला वचन दिले आहे व 'शक्य असेल तर ते पालन करा' अशी कैकयीची - मातेची सूचना आहे. म्हणून पितृमातृ असा क्रम येथे आहे.

**चौ.८ - (१) तनय मातुपितु तोषविणारा** - दशरथाचे वचन पाळले गेले तरी त्यामुळे त्यांना संतोष होणार नाही. संतोष मातेला होणार आहे. म्हणून येथे मातेचा उल्लेख प्रथम केला. वचन पित्याचे पाळावयाचे आहे म्हणून पूर्वी पित्याचा उल्लेख प्रथम केला; व त्यायोगे संतोष मातेला द्यावयाचा आहे म्हणून संतोष देण्यात मातेचा उल्लेख येथे प्रथम केला. ज्यांना हा भेद कळला नाही ते कदाचित म्हणतील की दोन ठिकाणी क्रमशः दोघांचा उल्लेख प्रथम करून दोघांची समता दाखविली. **पण हे म्हणणे पुराणनिगमागम संमत नाही;** कारण **'पितुर्दशगुणा माता गौरवेणातिरिच्यते'** मातेचा गौरव पित्याच्या दसपट केला पाहिजे. येथे भाव हा आहे की पित्याच्या वचनाची पूर्ती करून मी तुला संतुष्ट करण्यास तयार आहे. त्यात पित्याचा परलोक मार्ग अकुंठित होईल व तुला संतोष होईल. (क) पित्याला व मातेला संतोष देता आला असता तर माझ्यासारखा भाग्यवान कोणी नाही असे मला म्हणता आले असते. पण जेथे माता व पिता यांच्या इच्छाच परस्पर विरोधी आहेत तेथे जगातील (या संसारातील) कोणाही पुत्राला ते करता येणे अशक्य आहे. दोघांना तोषविणे येथे अशक्यच झाले आहे. भाव हा आहे की मी वनात जावे अशी पित्याची इच्छा नाही; तुझी इच्छा पतिविरोधी आहे. **भूपतींची तुम्हाला सांगण्याची इच्छा असून धारिष्ट होत नाही हे म्हणणे खरे नाही. परंतु जेथे माता व पिता यांच्या इच्छा परस्पर विरोधी असतील तेथे मातेला संतुष्ट करणे हे पुत्राचे आद्य कर्तव्य आहे.** म्हणून मी तुला संतुष्ट करण्यासाठी पित्याला संतोषकारक न वाटणारी गोष्ट करीन. ५६।१ पहा कौसल्यावचन. (ख) आईबापांना संतोषविणारा पुत्र सर्व जगात दुर्लभ आहे हा सामान्य अर्थ आहे. तो सुभाषितासारखा आहे. रामचंद्रांच्या मनातील भाव पूर्वी दाखविलेला मान्य न केल्यास 'जगात जे दुर्लभ

ते मी करीन' अशी आत्मप्रौढी, अहंकार रामचंद्रांच्या पदरी बांधल्याचे श्रेय घ्यावे लागेल. वर (क) मध्ये जो भाव दाखविला आहे तोच आता दोह्यांत स्पष्ट केला जात आहे.

*हिं.दो. । मुनिगन मिलन बिसेषि बन सबहि भाँति हित मोर ॥*
*॥ तेहि महँ पितु आयसु बहुरि संमत जननी तोर ॥४१॥*

*म.दो. । मुनिगण - मिलन विशेषिं वन मजसि परम हितकारि ॥*
*॥ पित्राज्ञा त्यांतहि तुजसि जननी ! संमत भारि ॥४१॥*

**अर्थ :** आई ! मला तर ही गोष्ट परमहितकारी वाटते. कारण की एक तर वनात राहण्यास सापडणार. तेथे विशेष म्हणजे मुनिगणांच्या भेटीगाठी होणार, वडिलांच्या आज्ञेचे पालन करता येणार आणि त्यातही तुला फार आवडणारी गोष्ट करता येणार दो. !॥४१॥

**टीका. दो. - (१) मुनिगण-मिलन -** अयोध्येतसुद्धा वसिष्ठ वामदेवांसारख्यांचा सहवास घडतो; तरी या नगरात ऋषिमुनींच्या तपोवनासारखी शान्ती व सौंदर्य इ. दुर्मिळच. घरी असल्यावर विविध उपाधी पाठीस लागावयाच्याच. राज्यावर बसलो असतो तर मुनि नगरात व जवळ असूनसुद्धा सहवासाचा लाभ घेता आला नसता. **संतांच्या संगतीत परम पवित्र, एकान्त, परमरमणीय नदी किनाऱ्याला रहावयास मिळणे भाग्यात असेल त्यालाच शक्य होते;** हेच खरे परम हितकारी आहे. मला मनापासून जे आवडते तेच घडणार आहे हे येथे सुचविले. (क) योगवासिष्ठावरून सिद्ध होते की - विवाहाच्या पूर्वी रामचंद्रांना परमवैराग्य उत्पन्न झाले व अन्नपाणी सोडून एकांतांत खोलीतच बसून राहू लागले तेव्हा वसिष्ठांनी ज्ञानोपदेश केला. त्या वेळी सुद्धा वाटू लागले की अखंड निर्विकल्प समाधीत रहावे, तेव्हा वसिष्ठांनी सांगितले की **'अन्तस्त्यागी बहिर्भोगी सदा विहर राघव' तेव्हा मग विश्वामित्रांबरोबर गेले आहेत. येथे हे दाखवावयाचे आहे की वनवासाची, एकान्ताची व बाह्यत्यागाची आवड पूर्वीपासूनच होती.** म्हणूनच येथे या दोन गोष्टींचा प्रथम उल्लेख केला; व दाखविले की पुढील दोन-तीन गोष्टी गौण आहेत.. त्या सहज साधत आहेत इतकेच.

(२) **पित्राज्ञा त्यांत -** त्यांत आणखी पित्राज्ञापालनाचे श्रेय सहज पदरात

पडणार व सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे कैकयी मातेला फार आवडणारी गोष्ट सहज करता येणार. यातील एक गोष्ट घडणेसुद्धा कठीण. मला तर या चार व आणखी एक गोष्ट मिळून पाच गोष्टी एकाच वेळी, मी कोणताही प्रयत्न न करता सहज लाभणार; तेव्हा माझ्या सारखा भाग्यवान कोण असेल. (क) येथे 'पित्राज्ञा' व 'तुला फार संमत' हा भेद स्पष्ट केला. सुचविले की हे वडिलांना संमत नाही. पितृवचनानुराग व मातेला संतोष या मागील गोष्टीच येथे निराळ्या भाषेत पण अधिक स्पष्ट सांगितल्या. यांना गौणत्व देण्यात भाव हा आहे की माझ्या परमभाग्यानेच हे वर मागण्याची तुला इच्छा झाली. यांत तुझा दोष मुळीच नाही. माझे भाग्य उदयाला येण्यास तू निमित्त झालीस इतकेच. **जी माता आपल्या पुत्राला असे परमहित प्राप्त करून घेण्यास मदत करील ती खरोखरच त्या पुत्रावर व वंशावर उपकारच करते** असे म्हटले पाहिजे.

**ल.टे.** - (१) वडिलांकडे जाण्यासाठी राम आपल्या भवनातून निघाल्यापासून पुत्रचरित्र-पुत्रधर्माचे चित्रण करण्यास प्रारंभ झाला आहे. या प्रकरणात रामचरित्रांतर्गत पुत्रधर्माचे निदर्शन मुख्य आहे. **'धर्ममार्ग चरित्रेण'** (रा.पू.ल.) **दाखवीत आहेत.** (क) येथील हे भाषण तोंडपुंजेपणाचे, कैकयीला प्रसन्न करण्यासाठी आहे असे वाटण्याचा संभव आहे. कैकयीला हे तसे वाटलेच आहे. पण राम पुढे वाल्मीकींजवळ जे म्हणाले ते मानभावीपणाचे असणे शक्य नाही. **'तात वचन नी मातुहित भाउ भरतसा भूप ॥ प्रभु-दर्शन मज हा मम पुण्यप्रभाव खूप' 'बघुनि पाय मुनिराय आपले । आमचें सकलहि सुकृत सुफळलें'** (१२५; १२६।१). ही वचने मानसांत नसती तर वरील दोह्यांतील वचन वरकरणी आहे असा शेरा सहज मारला गेला असता.

**हिं.** *। भरतु प्रान प्रिय पावहिं राजू । बिधि सब बिधि मोहि सनमुख आजू ॥१॥*
*। जौं न जाउँ बन ऐसेहु काजा । प्रथम गनिअ मोहि मूढ़ समाजा ॥२॥*

**म.** *। राज्य मिळे प्राणप्रिय भरता । विधि अनुकूल आज मज पुरता ॥१॥*
*। कार्जि अशाहि न जाइन वनिं जर । प्रथम गणा मज मूढजनीं तर ॥२॥*

**अर्थ :** (आणि) मला प्राणप्रिय असलेले भरत राज्य पावतील; (म्हणून) आज मला विधि (दैव) पूर्णपणे (सर्व प्रकारे) अनुकूल झाला आहे (यांत संशय

नाही).॥१॥ अशा ही कार्यासाठी मी जर वनात गेलो नाही तर माझी गणती मूढ लोकांत पहिला म्हणूनच केली पाहिजे.॥२॥.

**टीका - चौ. १ - (१) येथें पावहिं** = पावतील, हे बहुवचन भरताविषयी वापरले आहे. व **जाउँ** - जाईन, **मोहि** - मज असे एकवचन स्वतःविषयी? **(क) प्राणप्रिय भरत** - हे तोंडदेखले बोलणे नाही. सीतारामांच्या एकांतातील संवादांत असेच म्हटले आहे. **'कोण जगीं प्रिय सम भरता ही'** (७।७) तेथे टीकेत दुसरी वचने दिली आहेत. कौसल्या, निषादराज, भरद्वाज इ. सर्वांनी हेच म्हटले आहे की 'रामचंद्रांस भरत प्रियतम आहेत. **'भाउ भरतसा भूप'** (१२५।-) असे प्रभूंनी वाल्मीकींना सांगितले आहे. **'जोही विश्वभरणपोषण करि'** (१।१९७।७) असा भरत राजा झाल्यावर लोकांना - सर्व विश्वाला भरणपोषणाची चिंताच उरणार नाही.

**(ख) विधि अनुकूल आज मज पुरता - 'हा मम पुण्य प्रभाव खूप'** (१२५) असे वाल्मीकींना सांगितले आहे. तोच भाव येथे आहे. माता, पिता व बंधु यांचे हित करून स्वतःचे परमहित साधणार आहे. 'मजसि परमहितकारी' (४१) असे नुकतेच म्हटले. **ही माधुर्य भावातील भाषा आहे. धाकटा सावत्र भाऊ व त्याची आई यांचे तिच्या इच्छेसारखे ऐहिक हित, पित्याचे पारलौकिक हित व स्वतःचे परमहित साधण्यास अनुकूल प्रारब्ध, महद्भाग्य व भगवत्कृपा यांचा संयोग झाला** तरच असा कपिलाषष्ठीचा दुर्लभ **महायोग येतो.** 'पुण्यपुंज विण भेट न संतां' वनांत अनेक संतांच्या भेटी होतील व 'सत्संगति करि संसृति-अंता' अशा रीतीने जन्ममरण परंपरा तुटेल व परमहित होईल.

**चौ. २ - (१) प्रथम गणा मज मूढजनीं** - एवढे सर्व प्रकारचे लाभ होत असता मी वनात न जाणे म्हणजे सर्व मूर्ख शिरोमणि बनणेच आहे. प्रथम-मुख्य, श्रेष्ठ 'अंशांमधें जगिं गणा प्रथम मज' (१।१२।४) यांत 'प्रथम' चा जो अर्थ आहे तोच येथे आहे. मूर्ख शिरोमणि कसा ते आता दृष्टान्ताने सांगतात.

**हिं.** *। सेवहिं अरँडु कलपतरु त्यागी । परिहरि अमृत लेहिं बिषु मागी ॥३॥*
*। तेउ न पाइ अस समउ चुकाहीं । देखु बिचारि मातु मन माहीं ॥४॥*

म. *। त्यजि सुरतरु सेवी जेपाळा । त्यजुनि अमृत मागतो विषाळा ॥३॥*
*। तेहि न चुकति संधि अशि मिळुनी । माते मनिं बघ विचार करुनी ॥४॥*

**अर्थ :** कल्पतरुचा त्याग करून जो जेपाळाची सेवा करतो व अमृत फेकून देऊन विष मागून घेतो.॥३॥ (असे असतील) ते सुद्धा अशी सुसंधी आली-मिळाली-असता हातची दवडणार नाहीत (चुकणार नाहीत); म्हणून माते तू आपल्या मनात जरा विचार करून बघ (म्हणजे तुझी खात्री होईल की हा वनात जाणारच) ॥४॥

**टीका. चौ. ३ - (१) अँडु = एरंड.** कोणता एरंड हे स्पष्ट नाही. एरंडांत दोन-तीन प्रकार आहेत. सर्वांनाच फळे येतात. तिन्ही प्रकारांतून तेल निघू शकते. मोगली एरंड, जेपाळ व सुरती (गावठी) एरंड अशी त्यांची नावे आहेत. गावठी एरंडाच्या बियांचे जे तेल काढतात त्यास एरंडेल तेल म्हणतात. इतर दोन जातींच्या बियांचे तेल कोणी फारसे काढीत नाहीत; पण ते अत्यंत तीव्र रेचक आहे. एकांतील बिया भुईमुगाच्या दाण्यांसारख्या असतात व चवसुद्धा तशीच लागते पण त्या खाण्याने जुलाब, वांत्या होऊन मरण्याची पाळी येते. ही झाडे फार उंच होत नाहीत. जेपाळाची फळे व बिया बऱ्याच मोठ्या असतात. ही झाडे कुंपणाला लावतात व याच्या पाल्याचे उत्तम खत होते. बियांचा गुण मोगली एरंडाच्या बियांसारखाच. ही झाडे शिताफळीच्या एवढी मोठी होतात. म्हणून येथे जेपाळ समजणे योग्य कारण तो वृक्षासारखा असतो. दुसरा प्रकार झुडपासारखा असतो. हे दोन्ही घातक, वाईट ! **(क)** येथे त्याग व ग्रहण या संबंधी दोन विरोधी दृष्टान्त दिले आहेत. कल्पतरु व अमृत या ग्राह्य वस्तू आहेत आणि जेपाळ व विष त्याज्य वस्तू आहेत.

(२) **कल्पतरू** - अर्थ व काम या दोनच पुरुषार्थांना म्हणजे ऐहिक सुखच देऊ शकतो; पण धर्म व मोक्ष देऊ शकत नाही. '**अमृत** जीववी विष करि घाता' चांगले टाकून वाईट करणाऱ्यास व घेणाऱ्यास मूर्ख म्हणतात. पण हे मूर्ख शिरोमणि ठरणार नाहीत. कारण की पुष्कळ जगण्यासाठी अमृत सेवन करणारे देव व कल्पतरूच्या साह्याने अर्थ व कामप्राप्ती करून घेणारे देवसुद्धा या दोन्ही गोष्टींचा त्याग करून, देवदेहाचा त्याग करून, मनुष्य देह मिळावा

अशी प्रार्थना करतात. पण तो त्यांस मिळत नाही. 'बहुभाग्यें **मानुषतनु** मिळली । **सुरदुर्लभ** सद्‌ग्रंथि गाइली' (७।४३।७) 'नरतनु मिळुनि विषयिं मन देती । सुधा देति **ते** शठ **विष घेती** ।। तया भला कधिं म्हणे न कोणी । गुंजा घेइ परिस टाकोनी' (७।४४।२-३) **या तनुचें फळ विषय न भाई । स्वर्गहि अल्प अंतिं सुखदाई'** (७।४४।१). ही अवतरणे वरील दृष्टांतांचा अर्थ स्पष्ट करण्यास सबळ आधार आहेत.

(३) **जेपाळ फळें देतो व कल्पतरुही फळेंच देतो** - एक या पृथ्वीवर देतो व दुसरा स्वर्गात देतो. भाव हा की मनुष्य देहाचे फळ विषय सेवन आहे असे मानणारे मूर्खसुद्धा अशी सुसंधी दवडणार नाहीत. कारण येथले विषय आणि स्वर्गातील विषय फळेच आहेत - नश्वर आहेत. ही संधी साधल्याने पित्राज्ञापालन व मातेला संतोष होणार. पुत्रधर्माचे पालन होणार म्हणजे स्वर्ग तर मिळणारच व प्राणप्रिय भावाला राज्य मिळाले म्हणजे विषय प्राप्तीचे साधन जे धन ते मिळालेच. धन असले म्हणजे कामतृप्तीचे साधन मिळालेच व एकांतांत संतसंगतीत वनवास मिळाला म्हणजे मोक्षही सहज हाती येऊन मनुष्य देहाचे सार्थक होणार. **पहिला दृष्टान्त मनुष्य देहाचे फळ विषय सेवन आहे असे वाटणाऱ्या, विचार करणाऱ्या लोकांविषयी आहे. व दुसरा दृष्टान्त त्या विचारानुसार कृती करणारांविषयी आहे.** हे वर (२) मध्ये दिलेल्या उत्तर कांडांतील अवतरणांवरून स्पष्ट होते. आधी विचार व मग कृती असा स्वाभाविक क्रम असल्याने येथे व उत्तर कांडांतसुद्धा त्याच क्रमाने वर्णन आहे.

**चौ.** ४ - (१) ज्याला नुसते ऐहिक सुख मिळवावे (एरंड सेवा) असे वाटते व जो धर्माचरण हे स्वर्गसुखाचे साधन (कल्पतरु सेवा) करीत नाही तो आणि जो अमृत = मोक्ष सुखाचे साधन न करता विषय सुखात मग्न असतो (विष मागून घेतो) तो. असे दोन्ही प्रकारचे मूर्ख सुद्धा या असल्या सुसंधीचा त्याग करणार नाहीत. कारण त्यांना जे पाहिजे ते या संधीने सहज, प्रयत्न न करता मिळणार असून ज्यांची अपेक्षा नाही व जे परम दुर्लभ आहेत असे धर्म व मोक्षसुद्धा सहज पदरांत पडणार आहेत. एक डोळा मिळण्यासाठी आटोकाट प्रयत्न करीत असता दोन दिव्य नेत्र सहज मिळणार असे कळतांच

मूर्खसुद्धा त्या संधीचा फायदा घेतल्याशिवाय राहणार नाहीत. मग मला हे सगळे माहीत असता मी तिचा फायदा घेईन की नाही अशी शंका हे माते ! तुला का बरे येते? मी म्हटले त्याचा विचार कर म्हणजे तुझी खात्री होईल की राम हे आनंदाने करील. (क) आता पित्राज्ञा व तुझी भारी आवड या दोन गोष्टींमुळे मी प्रापंचिक व राजकीय बंधनांतून सुटलो. म्हणून मला आनंद झाला असेल की विषाद वाटत असेल याचा विचार करून पहा. **'नव-गजेन्द्र रघुवीर मन, राज्य अलान समान ॥ सुटले जाणुनि गमन वनिं इदिं आनंद महान॥'** (५१) या दोह्यांत रघुवीराच्या मनातील वर दाखविलेले भावच कवींनी स्पष्ट सांगितले आहेत. (मा.पी.प!)

*हिं. । अंब एक दुखु मोहि बिसेषी । निपट बिकल नरनायकु देखी ॥५॥*
*। थोरिही बात पितहि दुख भारी । होति प्रतीति न मोहि महतारी ॥६॥*
*। राउ धीर गुन उदधि अगाधू । भा मोहि तें कछु बड़ अपराधू ॥७॥*
*। जातें मोहि न कहत कछु राऊ । मोरि सपथ तोहि कहु सतिभाऊ ॥८॥*

*म. । अंब एक अति दुःख मला हें । अति विव्हळ नरनायक पाहें ॥५॥*
*। अल्पास्तव अति दुःख पित्यातें । येइ न चित्तीं प्रतीति माते ! ॥६॥*
*। राव धीर गुण-उदधि अगाधू । घडे कांहिं मम महापराधू ॥७॥*
*। वदति न काहिं राव मज जास्तव । शपथ तुजसि मम सांग किं वास्तव ॥८॥*

**अर्थ :** अंबे ! मला एकच विशेष (अति) दुःख वाटते. (कारण) नरनायक अति व्याकुळ झालेले मला दिसत आहेत.॥५॥ अल्पशा कारणास्तव पित्याला इतके दुःख होईल अशी प्रतीति (विश्वास) माझ्या मनाला वाटत नाही. ॥६॥ (कारण की) महाराज धीर असून गुणांचा अगाध सागर आहेत. (तेव्हा मला) असे वाटते की माझ्याकडूनच काहीतरी मोठा (महा) अपराध घडला असावा.॥७॥ ज्या अपराधामुळे महाराज माझ्याशी काहीसुद्धा बोलत नाहीत. तो कोणता (अपराध) ते खरे खरे सांग. तुला माझी शपथ आहे.॥८॥

**टीका. चौ. ५ - (१) एक दुःख अति** - बाकी कोणत्याही गोष्टीचे दुःख वाटत नाही. वनवास, राज्यत्याग इत्यादींचे मुळीच दुःख वाटत नाही. दशरथ राजा अति विव्हळ झालेले दिसत आहेत म्हणून अति दुःख होत आहे.

**चौ. ६-७ - (१) अल्पास्तव अति दुःख पित्यातें...माते !** - वनवासात जा असे मला सांगावे लागणार एवढ्याचसाठी भूपतींना दुःख होत आहे या म्हणण्यावर माझा विश्वास बसत नाही. कारण की वनात जा असे सांगणे ही गोष्ट अगदी क्षुद्र आहे. तेवढ्याचमुळे इतके व्याकुळ होणारे माझे वडील नाहीत असे मला नक्की वाटते. कारण की (क) **राव धीर गुण-उदधि अगाधू**- महाराज अत्यंत धैर्यसंपन्न आहेत आणि सद्‌गुणांचा तर अगाध सागर आहेत. अशा अगाध सागराचा अल्पशा कारणाने इतका क्षोभ होईल असे मला वाटत नाही. माझ्याकडूनच काहीतरी मोठा अपराध घडला असावा अशी मला शंका येते. कारण की :

**चौ. ८ - (१) बदति न कांहिं राव मज जास्तव** - तसे सांगण्याबद्दल त्यांना दुःख होत आहे असे जरी मानले तरी त्यामुळे माझ्याशी अगदी एक अक्षर सुद्धा बोलणार नाहीत असे होणार नाही व होण्याचे कारण नाही. ज्या अर्थी माझ्याशी अबोला धरला आहे त्या अर्थी काहीतरी मोठा अपराध माझ्याकडून घडला असावा. (क) **काहीतरी** म्हणण्यातील भाव हा की घडल्याचे माझ्या स्मरणात तर नाहीच, पण न कळत घडला असल्यास काय सांगावे ! ज्या अपराधामुळे अबोला धरला तो तुला माहीत असणारच; पण तू स्पष्ट सांगत नसशील. म्हणून तुला विनवितो की काय अपराध घडला असेल तो प्रगट करून सांगून टाक. संकोचाने गुप्त ठेवू नकोस. खरे खरे असेल ते सांग. एवढ्याने कदाचित खरे सांगणार नाही असे वाटल्याने आणखी शपथ घातली. शपथ घालणाऱ्या रघुवीराचे कैकयीवरील प्रेम कमी झाले नसले तरी कैकयीचे रामप्रेम पूर्ण नष्ट होऊन, द्वेषाने सूड घेण्याची राक्षसी इच्छा बळावली असल्याने तिचा या भाषणावर व शपथेवर विश्वास कसा बसणार ! तिला काय वाटले पहा.

*हिं.दो.* *। सहज सरल रघुबर बचन कुमति कुटिल करि जान ॥*
*। चलइ जोंक जल बक्र गति जद्यपि सलिलु समान ॥४२॥*

*म.दो.* *। सहज सरल रघुवर वचन कुटिल मानि कुमती हि ॥*
*॥ जाइ जळूं जळिं वक्रगति सलिल समान जरीहि ॥४२॥*

**अर्थ :** रघुवराचे वचन सहज सरळ आहे (पण कैकयी) कुबुद्धि व कुटिल आहे. म्हणून (हि) तिला ते कुटिल वाटले. सलिल जरि समान असले तरी जळू त्या जलात वक्रगतीनेच चालावयाची (चालते-जाते). ।।दो.४२।।

**टीका दो. - (I) सहज सरल रघुवर वचन** - 'सहज सरल रघुवर वच परिसुनि । साधु साधु वदले ज्ञानी मुनि' (१२६।७) असे वाल्मीकी म्हणाले. रघुवीर तर ऋजुतावीर आहेत. सहज कृपाळू, सहज सुजाण, सहज आनंदनिधान इत्यादी सगळ्याच गोष्टी रघुवराच्या ठिकाणी सहज आहेत. त्यांना त्या मिळवाव्या लागल्या नाहीत की कधी कमी होत नाहीत. परंतु **कपटी-कुटिल असतात त्यांस सरळपणा कुठेच दिसत नाही.** प्रत्येक सरळ, सत्य वचनाचा ते विपर्यासच करतात. उलटा अर्थ ग्रहण करतात. कुबडीचे अधर्मी, कपटी, कुटिल भाषण कैकयीला सत्य वाटले व रघुवराचे सरळ, सत्य धर्ममय प्रत्येक वाक्य तिला कपटपूर्ण वाटू लागले. कसे उलटे वाटले हे कळणे जरूर आहे. II (१) 'श्रुणु जननी तो सुत बहुभागी । जो पितृमातृ वचनिं अनुरागी' (४१।७). ती मनात म्हणते 'एवढे जर प्रेम आहे तर हे व्याख्यान कशाला? सरळ म्हणाला असता की इतकेच ना, हा निघालो बघ ! मातेचं नाव नी पित्याचं गांव. (२) 'तनय मातृपितृ तोषविणारा । दुर्लभ...' (४१।८) 'भाव हा दिसतो की तुला संतोष मिळणे दुर्लभ आहे' असे मनात म्हणाली. (३) 'मुनिगणमिलन विशेषिं वन' आताच कुठले प्रेम उत्पन्न झाले? म्हणे तुमच्यासाठी ! ज्याला खरे वैराग्य झाले तो कशाला राज्याभिषेक करून घ्यायला तयार होतो? (४) 'राज्य मिळे प्राणप्रिय भरता । बिधि अनुकूल -' 'प्रतिकूल शब्द लपवून ठेवला' 'प्रतिकूल आज मज पुरता' हे आहे मनात. जी गोष्ट धडधडीत प्रतिकूल आहे तिला पुरती अनुकूल कोण म्हणेल? 'हा राहिला तर भरताला प्रतिकूल होणार !'

(५) 'काजिं अशा हि न जाइन वनिं जर... प्रथम गणा मज मूढजनीं तर' 'जर' व प्रथम गणा वगैरे पुढले शब्द केवळ दाखवायचे दात आहेत. 'स्पष्ट म्हणतोच आहे की काजि अशा हि न जाइन वनिं; कसा नाही जात ते मी पाहतेच आता. (६) मला म्हणतो की 'त्यजि सुरतरु सेवी जेपाला' चांगला

धंदा ! मी काय मरू जमालगोटा खाऊन? आणि म्हणतो की 'त्यजुनि अमृत मागतो विषाला?' याला राज्य अमृतासारखे वाटते, मग 'मी विषाला थोडाच मागतो?' असा आहे भाव. (७) 'तेहि न चुकति संधि अशी मिळुनी' कुबडी म्हणाली तेच खरे ! भरत मामाकडे आहे ही चांगलीच संधी सापडली या तिघांना आणि स्पष्ट म्हणतोच की अशी मिळालेली सुसंधी कोण दवडील?' (८) याला वाटते की मी अविचारी आहे. प्रेमळ पुत्र असे कुठे, कधी म्हणतो की 'आई ! तू विचार करून बघ?' मी पक्का विचार केला आहे संधीसाधूंना संधि न साधू देण्याचा ! (९) 'दुःख अंब अति एक मला हें' हे म्हणाला हेच खरे. दुःख देण्यासाठीच तर जागले रात्रभर ! (१०) 'अति विव्हळ नरनायक आहे' भाव हा आहे की वनवासाचा वर दे सोडून नी नरनायकाचे दुःख दूर कर; तुला कसे पाहवते हे दुःख? बापासारखाच बेटा ! मरे ना का नरनायक ! त्याचे दुःख नाहीसे करायचे म्हणजे मला सवतीची दासी बनावे लागणार ! त्या बयाने पढवूनच पाठविला असेल. (११) 'अल्पास्तव अति दुःख पित्यातें' एवढेशा अल्प गोष्टीसाठी नवऱ्याला इतके दुःख का देतेस हा आहे भाव दुसरे काय? (१२) **'येइ न चित्तीं प्रतीति माते'** बरोबरच आहे. माझ्या म्हणण्यावर व माझ्यावर विश्वास नाहीच याचा. मग मी तरी याच्या भुलथापांवर विश्वास का ठेवू? (१३) **'राव धीर गुण उदधि अगाधू'** राजा धीर आहे म्हणे ! दिसतेच आहे की ! बायकांच्या सारखा निष्कारण शोक करीत आहे तो ! हा मात्र 'गुणउदधि अगाधू' आहे आणि मला विचारतो की 'घडे कांहि मम महापराधू?' हा अगदी धर्माची मूर्ती ! याच्याकडून कुठला अपराध घडणार? अपराध काय तो माझाच की मी इतके दिवस याच्यावर व याच्या बापावर विश्वास ठेवला ! कुबडीने जागी केलीन म्हणून बरे, नाहीतर माझे धिंडवडेच काढले असते की? (१४) **'वदति न कांहिं राव मज जास्तव'** बरोबरच आहे. मी अपराध केला मग याला कसा बोलणार राजा? मलाच बोलणार ! थोडे नाही बोलला काही? (१५) म्हणे **'काय अपराध घडला तो सत्य सांग.'** मी खोटी नी हाच काय तो सत्य वक्ता ! (१६) म्हणे **'माझी शपथ आहे तुला'** या असल्या फुसक्या, फसव्या शपथांना धूप घालणारी मी नाही हे कुठे माहीत आहे अजून !

या प्रमाणे रघुवराच्या प्रत्येक वाक्याचा तिने त्या त्या वेळीच विपर्यास केला. रंगभूमीवर रघुवराच्या प्रत्येक वाक्यानंतर तिचे हे प्रत्येक स्वगत हावभाव युक्त भाषण किती प्रभावी ठरेल याचा विचार करावा. रघुवराचे सरळ वचन कुटिलपणाचे ठरविले ते असे.

III **जाइ जलू जकि वक्रगति सलिल समान जरीहि** - पाणी वाहणारे (सलिल) असो की संथ असो ते तोडीत वक्र गतीने जाणे जळवांचा स्वभावच आहे. वक्र = कुटिल. भाव हा की कुटिल कुबुद्धी माणसाशी बोलणारी व्यक्ति कुटिल असो की सरळ सत्य बोलणारी संथ पाण्यासारखी शांत असो कुटिल माणसे दोघांनाही कुटिलच समजतात. (क) सलिल - षल गती, गतिमान असणारे, वाहणारे पाणी. वाहणारे पाणी समपातळीत नसते. ते आपल्याबरोबर इतरांना खाली खाली वाहून नेते म्हणून त्यांतून पलीकडे जाताना त्याला दूर सारीत तोडीत जावे लागते. संथ पाण्यात तशी वाहून जाण्याची भीती नसूनसुद्धा जळू पाणी तोडीत कुटिल गतीनेच जाते.

***हिं.*** ***। रहसी रानि राम रुख पाई । बोली कपटु सनेहु जनाई ॥१॥***
***। सपथ तुम्हार भरत कै आना । हेतु न दूसर मैं कछु जाना ॥२॥***
***। तुम्ह अपराध जोगु नहिं ताता । जननी जनक बंधु सुखदाता ॥३॥***
***। राम सत्य सबु जो कछु कहहू । तुम्ह पितु मातु बचन रत अहहू ॥४॥***

***म.*** ***। हर्षे राणि राम-कल पाहुनि । बोले कपटी स्नेहा दावुनि ॥१॥***
***। तुमची शपथ नि भरत-आण कीं । हेतु न मज माहीत आणखी ॥२॥***
***। तुम्हिं न तात अपराधा लायक । जननी-जनक-बंधु-सुखदायक ॥३॥***
***। राम सत्य जें काहीं वदतां । तुम्हिं पितृ-मातृ-वचन-रत असतां ॥४॥***

**अर्थ :** रामचंद्रांचा कल जाणून राणी हर्षित झाली व कपटी स्नेह दाखवित म्हणाली की - ॥१॥ मी तुमची शपथ व भरताची आण घेऊन सांगते की (राजांचा दुःखाचा) मला आणखी कोणताच हेतु माहीत नाही.॥२॥ तात ! तुम्ही अपराध करण्यास लायक नाही व आई-बाप व भाऊ यांना सुख देणारे आहात.॥३॥ राम तुम्ही जे काही सांगत आहात (आता सांगितलेत) ते सर्व सत्य आहे. कारण तुम्ही पिता-माता-वचनांत रत असतां ॥४॥

**टीका. - चौ. १-२- (१) रहसी = हरषी;** हा विपरीत ठरणारा हर्ष आहे म्हणून 'हरषी' च्या विपरीत 'रहसी' शब्द वापरला आहे. ४।१ पहा. आता हर्ष होत आहे पण जन्मभर विषादांत रहावे लागणार आहे हा कवींचा भाव आहे. (क) राम वनात जाणार नाही असे तिला प्रथम वाटत होते पण रामभाषणावरून वाटू लागले आहे की वनात जाण्याची तयारी दिसते; पण राजाने आज्ञा दिली नाही. तो देणार नाही हे दिसत आहेच - तर जाणार नाही; म्हणून वरकरणी, कपटी स्नेह दाखवून प्रसन्न करू पहात आहे. हेतु हा आहे की राजाने आज्ञा दिली नाही तरीसुद्धा रामाने वनात जावे. ती वनात पाठविण्याचा हट्ट सोडीत नाही यावरून दिसते की तिच्या मनात रामस्नेह मुळीच नाही; पण स्नेहाने बोलत आहे म्हणून म्हटले **'कपटी स्नेहा दावुनि बोले'.**

(२) **तुमची शपथ, भरत आण** - प्रथम रामशपथ घेते व नंतर भरताची; हेतु हा आहे की रामावर अधिक प्रेम आहे असे वाटावे. पण रामशपथ घेतल्यावर मनात वाटू लागले की मी रामशपथ कुठे मानली आहे? कदाचित रामाचा विश्वास बसणार नाही म्हणून भरताची आण शपथ घेतली. **शुद्ध, सरळ, प्रेमळ माणसांशी बोलताना कपटी माणसाचे मन त्यांचे त्यांनाच खात असते.** त्यामुळे पदोपदी चाचपडत जावे लागते. (क) राजांच्या दुःखाचे दुसरे काहीतरी कारण असून ते तुला माहीत असले पाहिजे, पण तू सांगत नाहीस असे सुचवून आपली स्वतःची शपथ घालून रामचंद्रांनी म्हटले की खरे खरे सांग? त्यावर उत्तर देताना एका शपथेऐवजी दोन शपथा ! **स्वतःच्या पुत्राची खोटी शपथ घेण्यास जरासुद्धा कचरली नाही** ! याचाच परिणाम की काय पुढे भरताने कैकयीचा अप्रत्यक्ष त्यागच केला आहे ! स्वार्थांध, कपटी, मत्सरी लोकांना करणी करताना विचार रहात नाही. खोट्या शपथांचे घोर परिणाम दिसू लागण्यास फार वेळ लागत नाही. याची पुष्कळ उदाहरणे या कानांनी व डोळ्यांनी अनुभविली आहेत. तिचे पुन्हा म्हणणे हेच आहे की तुमच्या स्नेहामुळे 'वनांत जा' असे सांगण्याचे धारिष्ट नरेशांस करवत नाही व त्यामुळेच दुःख होत आहे. **'आणखी हेतु मज माहीत नाही'** हा मुद्दा ती मुळीच सोडणार नाही.

**चौ. ३** (१) **तुम्हिं न तात ! अपराधा लायक** - **'घडे काहिं मम महापराधू'** या रामवचनावर हे उत्तर आहे. अपराध घडलाच नाही. राजाचे कान भरून भरताच्या गैरहजेरीत स्वतःचा राज्याभिषेक उरकून घेण्याचा कट केला. हा अपराध केला असे तिला नक्की वाटत आहे. पण तसे बोलून दाखविता येत नाही. कारण रामाचा कोणताही अपराध घडल्याचे सांगितले तरी पूर्वी सांगितलेले कारण खोटे सांगितले असे ठरणार; म्हणून अघळ-पघळ स्तुती करीत आहे. तुम्ही का अपराध करण्यासारखे आहात? चुकून सुद्धा तुमच्याकडून तसे काही घडणार नाही. (क) **जननी-जनक-बंधु-सुखदायक** - मनातला भाव आहे की जन्मदात्या मातेला, पित्याला व लक्ष्मणाला सुख देण्याचा तुमचा प्रयत्न आहे. **'भरत बंदिगृह सेविती लक्ष्मण राम-दिवाण'** (१९) या कुबडीच्या वचनाचा प्रतिध्वनि निघत आहे. **'राज्य मिळे प्राणप्रिय भरता'** व **'तनय मातुपितु तोषविणारा । दुर्लभ जननि सकल संसारा'** यांचा बाह्य पडसाद म्हणजे हे येथले वचन आहे. यांत ती दाखवीत आहे की तुम्ही वनात गेल्याने भरताला, मला व राजांनाही सुख होणार आहे. न गेलात तर मात्र राजांना अति दुःख होईल. (४१।८ टी.प.) (ख) असा पुत्र जगात दुर्लभ आहे असे जे राम म्हणाले त्यावर ही म्हणत आहे की जगात असा पुत्र दुर्लभ असला तरी आमच्या भाग्याने तुम्ही लाभला आहात. ४१।७ चे उत्तर पुढील चौपाईत देत आहे.

**चौ. ४** - (१) **राम सत्य जें काहीं वदतां** - 'ते करा, नुसत्या बढाया नकोत' असे म्हणावयाचे आहे पण अजून वेळ आहे. (क) **तुम्हिं पितुमातु वचन रत असतां** - तर एवढा वेळ वाटच पाहिली नसतीत पित्राज्ञेची; माझ्या वचनावर विश्वास ठेऊन केव्हाच चालू लागला असता व **'येइ न चित्तीं प्रतीति माते'** असे म्हणालाच नसता हा आहे तिच्या मनातला भाव; पण वरकरणी स्नेह दाखवीत आहे. तुम्ही पित्याच्या व मातेच्या ('जननी' नाही म्हणत, रामाचेच शब्द उच्चारीत आहे) वचनावर अनुराग बाळगणारे आहात हे काय मला माहीत का नाही ! **'जो पितुमातुवचनिं अनुरागी'** हे तुमचे वचन अगदी सत्य आहे. भाव हा की तुमचे वडील काही बोलत नाहीत, तेव्हा मातृवचन-अनुरागी असल्यामुळे माझ्या वचनाप्रमाणे तुम्ही करणारच; मला त्याबद्दल मुळीच शंका

नाही. **'राम साधु ! तुम्हि साधु शहाणे । रामजननि साध्वी ! सब जाणें'** (३३।७) असे राजाला टोचून बोलणारी, स्वार्थसाधू, कुटिल येथे तोंडावर रामाची कशी स्तुती करीत आहे पहा ! **कोणी मुखावर स्तुती करू लागल्यास समजावे की बहुधा 'मुखमें राम और बगलमें छुरी (सुरी) घेऊन आला आहे; व सावध असावे.**

***हिं. । पित हि बुझाइ कहहु बलि सोई । चौथेंपन जेहिं अजसु न होई ॥५॥***
***। तुम्ह सम सुअन सुकृत जेहिं दीन्हे । उचित न तासु निरादरु कीन्हे ॥६॥***
***म. । तनु कुरवंडिं, पित्या समजावा । वार्धकिं अकीर्ति-लाभ न व्हावा ॥५॥***
***। दे जें सुकृत तुम्हांसम तनया । उचित न करणें अनादर तया ॥६॥***

**अर्थ :** हा देह मी तुमच्यावरून कुरवंडून (ओवाळून) टाकते; (पण) तुम्ही वडिलांची अशी समजूत घालावी की वृद्धपणी अकीर्तीचा लाभ होऊ नये.॥५॥ ज्या पुण्याईने तुमच्यासारखा पुत्र दिला त्या पुण्याईचा अनादर करणे उचित नाही.॥६॥

**टीका. चौ. ५ - (१) 'बलि'** = बलि जाना; कोणावरची इडा पिडा आपल्यावर घेणे या अर्थाने तिकडे स्त्रियांत हा वाक्प्रचार आहे. राम राज्यावर बसण्यापूर्वी आपणास नमस्कार करण्यास आले आहेत या भावनेने कौसल्या ज्या वाक्प्रचाराचा प्रेमाने उपयोग करते त्याचाच उपयोग कैकयी रामाला वनात पाठविण्यासाठी स्नेहनाटक करताना येथे करीत आहे ! राम कौसल्येच्या भेटीस गेल्यावर त्यांस कौसल्या माता म्हणाली **'बचा तात ! कुरवंडिं कलेवर । कधिं मुहूर्त शुभ मुदमंगलकर'** (५२।७) **उलट्या काळजाची करणी व वाणी कशा असतात हे येथे केवळ 'बलि' या एका शब्दाने दाखविले आहे. (क) पित्या समजावा** - धर्मपालनासाठी तुम्ही सर्वस्वाचा त्याग करण्यास एका पायावर सिद्ध झालात; पण तुमचे वडील तुमच्या प्रेमाला वश होऊन स्वधर्मच्युत होत आहेत. अकीर्तिपात्र बनत आहेत. मला वर कबूल करून तुम्हाला मात्र तसे सांगण्यास धजत नाहीत. म्हणून त्यांची नीट समजूत घाला. **(ख) वार्धकिं अकीर्ति लाभ न व्हावा - वार्धक** = वृद्धपणा, म्हातारपण. चौथेंपन = चौथी अवस्था = वार्धक्य. **बाल्य** ५ वर्षे; **कौमार्य** ५-१५ अखेर; **तारुण्य** १६-४० आणि पुढे **वार्धक्य**; या वयोमानाने चार अवस्था १०० वर्षे पूर्णायुष्य समजून, मानल्या

आहेत. '**वार्धकं** वृद्धसंघाते **वृद्धत्वे** वृद्धकर्मणि (विश्व) आजपर्यंत व तारुण्यात सुद्धा ज्यांच्याकडून अधर्म घडला नाही व त्यामुळे अकीर्ति झाली नाही; त्यांनी वृद्धपणी - अगदी आयुष्याच्या सीमेवर आल्यावर, जाणून बुजून अकीर्ति पदरात घेणे योग्य आहे का याचा तुम्हीच विचार करा. असे होऊ नये म्हणून सांगते की पित्याची चांगली समजूत घाला. (ग) हिनेच दुसरा वर मागे घेतला असता किंवा तो सौम्य करून रामाला अयोध्येच्या बाहेर कुठेही राहण्याची परवानगी दिली असती तर अपयश हिच्याही पदरात पडले नसते. ही अगदी सहज, सोपी गोष्ट स्वतः न करता रघुवीराला लांबलचक धर्माच्या गप्पा सांगत आहे. पतिविरोध, पतिघात स्वतः करीत आहे. विश्वासघात केला आहे. हा मात्र तिला अधर्म वाटत नाही. **स्वार्थी, दुष्ट, कपटी, कारस्थानी लोक मानभावी भाषा कशी वापरतात त्याचा हा उत्तम नमुना आहे.**

**चौ. ६ - (१) जें सुकृत तुम्हांसम तनया दे** = ज्या सुकृताने - पुण्याईने -तुमच्यासारखा पुत्र दिला. भाव हा की तुमच्यासारखा जननीजनक बंधुसुखदाता, पितृमातृवचनरत, सत्यसंध, परम विरागी, सर्वांग सुंदर, सकलसद्गुणसागर, धर्मशील पुत्र लाभला हा महाराजांच्या अपूर्व, अनुपम पुण्याईचाच प्रभाव आहे. '**दशरथ-सुकृतचि राम सदेही**' (१।३१०।२). वर देतो म्हणून प्रतिज्ञेवर शपथा घेऊन, कबूल करून मागितल्यावर तो आनंदाने न देणे, बदलून घे म्हणून सांगणे हा असत्यवादीपणा ठरतो. '**नहिं असत्य सम पातकपुंजा**' असे स्वतःच म्हणाले. असे करणे म्हणजे त्या पुण्याईचा अनादर-अपमान करण्यासारखे आहे. भाव हा की 'भूपति लढाईत मरत होते तेव्हा मी स्त्री असून वाचविले. मागितलेले वर देऊन त्या उपकाराची फेड करण्याचे सोडून उलट मलाच वाईट म्हणतात ! त्या वेळी मेले असते तर कुठला राम नी कुठला राज्याभिषेक?' पण मग कुठला भरत व कुठले भरताला राज्य? आता यावर कवि आपले मत सांगून रघुवीरास काय वाटले ते सांगतील.

**हिं.** ***। लागहिं कुमुख बचन सुभ कैसे । मगहँ गयादिक तीरथ जैसे ॥७॥***

***। रामहि मातु बचन सब भाए । जिमि सुरसरिगत सलिल सुहाए ॥८॥***

म. *। कुमुखिं दिसति शुभ वचनें कैसीं । मगधिं गयादिक तीर्थे जैसीं ॥७॥*
*। मातृवचन सब रामा रुचलीं । जशिं सुरसरिगत सलिल सब भलीं ॥८॥*

**अर्थ :** कैकयीच्या कुमुखात ही शुभवचने कशी दिसतात म्हणाल तर मगध देशात जशीं गया वगैरे तीर्थ दिसतील तशी.॥७॥ जसे सुरसरितेत (गंगेत) येऊन पडणारे विविध जलप्रवाह चांगले (गंगाजल, पवित्र) च होतात तशी कैकयीची सर्व वचने रामाला रुचली.॥८॥

**टीका.चौ. ७ - (१) कुमुखिं शुभ वचने** - कैकयीचे मुख कुमुख आहे. अशुभ, अपवित्र आहे. कारण तीच 'अशुभमयी शुभहीना' विश्वास घातकी, पतिघातिनी इ. आहे. परंतु आता शेवटी तिच्या अपवित्र मुखांतून जी २/४ मुक्ताफळे गळली ती कपटाने ओकलेली असली तरी शुभ आहेत. ती शुभ असली तरी दशरथाला विषारी बाणांसारखी बोचणारी राक्षसी वृत्तीची आहेत. दुसरा वर न देण्याने प्रतिज्ञाभंग, असत्य भाषण हा मोठा अधर्म घडलाच असता, प्रतिज्ञाभंग केल्याने सर्व सुकृताची हानी झालीच असती. 'सुकृत-हानि जर पणास परिहरु' (१।२५२।५) असे जनक राजांनी म्हटलेच आहे. अनंत अनुपम पुण्याईने राम पुत्र लाभला हेहि खरे आहे; व रामाला वनात पाठविण्याचा वर न देणे म्हणजे रामशपथशत घेऊन केलेली प्रतिज्ञा व ती शपथ मोडणे म्हणजे पुण्याईचा तिरस्कार करणेच आहे हेही खरे आहे. म्हणून ही तिची वचने शुभ आहेत. 'बालादपि सुभाषितं ग्राह्यम्' तसेच हे मानणे योग्य आहे. **त्या दुर्मुखाचा विचार न करता त्या शुभवचनांचा विचार व ग्रहण करणेच योग्य. याला दृष्टान्त देतात. (क) मगधिं गयादिक तीर्थे** - मगध देश अति अपवित्र असला तरी त्यात असलेली गया, फल्गु वगैरे तीर्थे जशी पवित्र आहेत व तेथे पिंडदान वगैरे तीर्थविधि केल्याने पितरांना स्वर्ग, मोक्ष इत्यादी शुभ गती मिळते; म्हणून ती सेव्य आहेत. तशीच कैकयीची वरील २/४ वचने शुभ आहेत. म्हणून सेव्य व ग्राह्य आहेत. येथे हे सुचविले की **बोलणाराच्या सुष्टदुष्टतेचा विचार न करता त्याची वचने जर पुराणनिगमागमसंमत शुभ असतील तर त्यांचा अनादर करणे योग्य नव्हे.**

**चौ.८ - (१) सुरसरिगत सलिल सब भलीं** - 'गावींचे ×× ओहोळ । गंगेसि

मिळतां गंगाजळ' (दा.बो.) **'आणुनि गंगाजलकृत वारुणि । पान करिति ना संत तया कुणि ॥ गंगे मिळतां पावन जैसें ॥** (१।७०।२) ॥ १९४।७ पहा. कैकयी भाषण रामा तैसे । असे समस्यापूरण केले म्हणजे अर्थ स्पष्ट होतो. सुरनदीत कितीही अपवित्र पाण्याचे प्रवाह येऊन पडले किंवा मदिरेची पिंपे ओतली तरी ती त्या सर्वांना पावन करून आत्मसात करते. त्याप्रमाणे कैकयीची वचने रामचंद्रांस अग्राह्य न वाटता सर्वच रुचली, आवडली. त्यांचा ते मुळीच तिरस्कार करणार नाहीत. तिच्या म्हणण्याप्रमाणेच करतील. दशरथांनी आज्ञा न दिली तरी वनात जाणार आहेत. दशरथांची समजूत घालणार आहेत. आता कैकयीच्या सूचना कृतीत उतरविण्याची संधी सहज मिळणार आहे.

***हिं.दो.*** ***। गइ मुरुछा रामहि सुमिरि नृप फिरि करवट लीन्ह ॥***
***॥ सचिव राम आगमन कहि बिनय समय सम कीन्ह ॥४३॥***

***म.दो.*** ***। गत मूर्छा रामा स्मरत वळले नृपति कुशीस ॥***
***॥ रामागमन वदे सचिव करी उचित बिनतीस ॥४३॥***

**अर्थ :** दशरथांची मूर्छा गेली व राम राम उच्चार करीत ते कुशीस वळले. तेव्हा सुमंत्राने राम आल्याचे सांगितले आणि समयानुसार विनंती केली.॥दो.४३॥

**टीका. दो. - (१) गत मूर्छा -** मूर्छा केव्हा आली याचा स्पष्ट उल्लेख पूर्वी कुठे केलेला नाही. पण मागील उल्लेखांवरून निश्चित अनुमान करता येते. सुमंत्र प्रथम राजाकडे आले तेव्हा त्यांनी जय जीव म्हणून मस्तक नमविले आहे. (३८।६) नंतर 'बघुनि भूपकल सचिव निघाले' (३९।९) म्हणून सुमंत्र रघुकुल-तिलकाला आणण्यास जाईपर्यंत राजाला मूर्च्छा आली नव्हती हे ठरले. सुमंत्र व राम आल्यावर दोघांपैकी कोणीहि नमनादि केले नाही व सुमंत्रांने राम आल्याचेही सांगितले नाही. म्हणून सुमंत्र गेल्यानंतर व त्याच्याबरोबर राम येण्यापूर्वी दशरथांस मूर्छा आली हे ठरले. कवि सुमंत्राबरोबर राम दर्शनास गेल्यावर केव्हा मूर्छा आली हे ते नक्की कसे व कोठे सांगणार ! **(क) रामा स्मरत -** 'राम राम' असा उच्चार करून. या अर्थाने हा शब्द पूर्वी अनेक वेळा वापरलेला आहे. 'राम नाम तैं **स्मरुं** शिव **लागति । जाणे सती** जगत्पति **जागति'** (१।६०।३) 'राम राम तो तैं **स्मरुं लागत । कपि हृदिं** हर्षित सज्जन

जागत' (३।६।३) बिभीषण झोपेतून जागा झाल्यावर हे घडले. (ख) उचित = समयोचित, या वेळेला, परिस्थितीला साजेल अशी. महाराज ! चिरंजीव रामचंद्र आले आहेत, समय कठीण आहे खरा, पण धीर धरून रामचंद्रांशी चार शब्द बोलला नाहीत तर रघुनाथांस दुःख होईल. अवनिपति, रामचंद्रांनी पदार्पण केले आहे. रामचंद्र रघुनाथ शब्द मुद्दामच वारंवार वापरले आहेत व अवनिपति शब्दांत श्लेष आहे.

हिं. *। अवनिप अकनि रामु पगु धारे । धरि धीरजु तब नयन उघारे ॥१॥*
*। सचिवँ सँभारि राउ बैठारे । चरन परत नृप रामु निहारे ॥२॥*
*। लिए सनेह बिकल उर लाई । गै मनि मनहुँ फनिक फिरि पाई ॥३॥*

म. *। अवनिप परिसुनि रामपदार्पण । धरिति धीर मग उघडिती लोचन ॥१॥*
*। नृपा सचिव संभाळुनि बसविति । चरणिं पडत रामा नृप निरखिति ॥२॥*
*। स्नेहविकल लाविति हृदयाला । गत मणि फणिला जणूं मिळाला ॥३॥*

**अर्थ :** रामचंद्रांनी पदार्पण केले आहे असे अवनिपतीच्या कानी पडताच त्यांनी धीर धरला व मग डोळे उघडले.॥१॥ सचिवाने राजांस सांभाळून बसते केले व (राम) पाया पडत असता राजाने रामाकडे निरखून पाहिले.॥२॥ स्नेहाने व्याकुळ होऊन त्यांना असे हृदयाशी धरले (लावले) की जणू हरवलेला मणि फणीला (नागाला) परत मिळाला.॥३॥

**टीका. चौ. १ - (१) अवनिप** - अवनि = पृथ्वी, अव रक्षणे, अवन - रक्षण करणारी ती अवनि; तिचे पालन करणारा तो अवनिप (जसा महीप, भूप). सर्व पृथ्वीचे पालन, पोषण, रक्षण करणारे असून आपल्या शरीररूपी पृथ्वीचे पालन करण्यास राम सहज आनंदनिधान आले असे दशरथांस वाटले. 'अवनिप अकनि रामु पगु धारे' अवनिपति ! रामचंद्रांनी पदार्पण केले आहे. असे सुमंत्राने म्हटले असले पाहिजे. दशरथांनी ऐकले की अवनिपति रामचंद्रांनी पदार्पण केले आहे. दशरथांनी काय ऐकले तेच या चरणाने येथे सांगितले आहे. हे ऐकून राजाला वाटले फार चांगले झाले. मोठे विघ्न टळले. राज्याभिषेकाच्या वेषांत आता दिसतील अशा मोठ्या आशेने ते रामरूप पाहण्यासाठी डोळे उघडले. परंतु अशक्तपणा इतका आला आहे की डोळे

उघडण्यासाठी सुद्धा मन घट्ट करावे लागले, धीर धरावा लागला. माझ्या प्राणांचा संरक्षकच आला असे दशरथांस वाटले. हा 'अवनिप' शब्दांतील एक भाव आहे. धैर्य धरण्याचा संबंध मुख्यतः दाखविणे असेल तेथे धरणी, धरा शब्द वापरले आहेत व रक्षणाचा संबंध दाखविण्यास 'अवनि' वापरला आहे. '**शब्दकला** अतुला तुलसीची' हे प्रकरण प्रस्तावनेत पहावे.

**चौ.२ - (१)** निजलेल्या, आडवा पडलेल्या, माणसास नमन करू नये, म्हणून दशरथांनी उठून बसणे आवश्यक होते; पण ज्यांना डोळे उघडण्यास सुद्धा प्रयास करावे लागले त्यांना उठून बसण्याची शक्ती असणे शक्य नाही असे जाणून सुमंत्राने **सांभाळून** म्हणजे काळजीपूर्वक, हळूच त्यांचा तोल जाणार नाही अशा रीतीने धरून, उठवून बसले केले. लोळागोळाच झालेला होता. 'जणूं समूळचि कमळ उपटलें' (३८।७) अशी दशा होतीच. **(क)** उठवून बसविताच रामचंद्रांनी पायांवर डोके ठेवले. राम नमन करीत असताच दशरथ त्यांच्याकडे निरखून पाहू लागले. **निरखून हेच पाहिले की** राज्याभिषेकाचा वेष तर दिसत नाही तेव्हा रघुनाथ आहेत की भरत आहेत? सचिवाने तर सांगितले की अवनिपति रामचंद्रांनी पदार्पण केले ! राजमुकुट, राज्याभिषेकाच्या वेळची विभूषणे इ. काहीच दिसले नाही म्हणून निरखून पाहिले. मस्तक पायांवर असल्यामुळे मुख प्रथम दिसले नाही; त्यामुळे संशय आला की राम आहेत का भरत? पण जेव्हा खात्री झाली की रामच आहेत तेव्हा काय झाले पहा ! सर्व मनोरथ धुळीस मिळाले ! पापिणीने डाव साधला. आता राम वनात जाणार इ. भयानक कल्पनांचे काहूर उठले.

**चौ.३ - (१) स्नेह-बिकल** - माझा नयनाभिराम, प्राणविश्राम, सर्वसुखानंद धाम राम वनात जाणार या एकाच भावनेने स्नेह अत्यंत बळावला व व्याकुळ झाले. हृदयाशी धरून कडकडून कवटाळले. सांडलेला मणि सापडला म्हणजे सर्प त्यावर झडप घालून पुन्हा त्याचा वियोग होऊ नये म्हणून चटकन आपल्या हृदयात (मुखांत) **लपवून ठेवतो**, त्याप्रमाणेच जणू राजा रघुकुल मणीला **आपल्या हृदयांतच लपवून ठेवण्याचा प्रयत्न करीत आहेत** असे वाटले. 'सह सुंदर वधु सासू निजती **शिरमणि** जणुं उरिं **फणी लपवती**' (१।३५८।४) 'निज मन फणि,

मूर्तीस मणि करा' (१।३३५।७).

हिं. *। रामहि चितइ रहेउ नरनाहू । चला बिलोचन बारि प्रबाहू ॥४॥*

*। सोक बिबस कछु कहै न पारा । हृदयँ लगावत बारहिं बारा ॥५॥*

म. *। नृप रामाला निरखित राहति । लोचनिं वारीप्रवाह वाहत्ति ॥४॥*

*। शोक-विवश ववे ना काहीं । घडि घडि आलिंगिति हृदया ही ॥५॥*

**अर्थ :** राजा दशरथ रामाकडे (टक लावून) बघत राहिले आहेत व नेत्रांतून पाण्याचे (अश्रूंचे) प्रवाह वाहात आहेत.॥४॥ शोकाकुळ (शोकाला विशेष वश) झाले असल्याने शब्द सुद्धा बोलवत नाही. फक्त पुनः पुन्हा हृदयाशी धरून आलिंगन देत आहेत.॥५॥

**टीका. चौ. ४** - (१) या दोन व मागल्या दोन चौपायांत मिळून करुणा रसाचे मुके पण किती सजीव चित्र काढले आहे ! राम मुखाकडे चकोराप्रमाणे बघत असता हृदयांत विरह कल्पनांचे किती काहूर माजले असेल ते नेत्रांतून वाहणाऱ्या अश्रु प्रवाहांवरून किंचित कळण्यासारखे आहे. हे सहज-सौंदर्य सुखनिधान आज कोणत्या वेषांत पाहणार होतो, काय आशीर्वाद देणार होतो व आता काय पहावे लागणार ! वनात जा असे या कोमलतेच्या कुमार मूर्तीला सांगू तरी कसे? दैवा ! यापूर्वीच प्राण का नेले नाहीस? हे अपार सुखद मुख पुन्हा मला कधी दिसेल? कोणाच्या मुखाकडे पाहण्यासाठी जगवीत आहेत? मी सख्खा बाप, याला घोर अरण्यात हिंडावयास लावणार ना? ती सुकुमारी सीता तरी कशी राहील याला टाकून? तिचे काय होईल वनात? माझे कपाळ फुटले हेच खरे ! इत्यादी विचारांचे उत्तुंग कल्लोळ हृदयावर आदळत आहेत.

**चौ.५ - (१) घड़ि घड़ि आर्लिगिति हृदया ही** - वारंवार हृदयाशीं कवटाळीत आहेत; अश्रुधारांनी अभिषेक करीत आहेत. मनात म्हणतात की मी या अति सुकुमाराला हृदयात लपवू पहात आहे; पण माझ्या वज्राहून कठोर हृदयांत शिरीष कुसुमाहून कोमलमूर्ती शिरणार कशी? हृदय दाह शीतल तरी होईल म्हणून पुनः पुन्हा हृदयाशी धरीत आहेत.

हिं. *। बिधिहि मनाव राउ मन माहीं । जेहिं रघुनाथ न कानन जाहीं ॥६॥*
*। सुमिरि महेसहि कहइ निहोरी । बिनती सुनहु सदासिव मोरी ॥७॥*
*। आसुतोष तुम्ह अवढर दानी । आरति हरहु दीन जनु जानी ॥८॥*

म. *। भूपति विनवीती विधिला मनिं । कीं रघुनाथ न जावे काननिं ॥६॥*
*। स्मरुनि महेशा प्रार्थिति नृपती । ऐका सदाशिवा मम विनती ॥७॥*
*। आशुतोष तुम्हि लहरी दाते । जाणुनि दीन हरा विपदाते ॥८॥*

**अर्थ :** दशरथ राजा मनात विधीला विनवितात की जेणे करून रघुनाथ वनांत जाणार नाहीत.॥६॥ महेशाचे स्मरण करून प्रार्थना करतात (मनातच) की हे सदाशिवा ! माझी विनंती ऐकावी.॥७॥ तुम्ही शीघ्र संतुष्ट होणारे व लहरीत येईल ते देणारे आहात; तेव्हा मी दीन आहे हे जाणून माझ्या विपत्तींचे हरण करा.॥८॥

**टीका. - सूचना -** केलेल्या प्रतिज्ञेचा भंग होऊ नये व मी आपल्या मुखाने सांगितल्याशिवाय रघुनाथाने वनात जाऊ नये या हेतूने पुढील प्रार्थना, विनवण्या केल्या जात आहेत. वनवासाची आज्ञा स्वतःच्या मुखाने, काही झाले तरी द्यावयाची नाही, असा निश्चय दशरथांनी केला आहे हे पुढे दिसेल. **चौ. ६ (१) विधिला मनिं विनवीती -** एक तर वैखरीने बोलण्याची शक्ती नाही व कैकयी जवळ बसलेली आहे म्हणून मनात विनवीत आहेत. बुद्धीची देवता विधि - ब्रह्मदेव आहेत; म्हणून त्यांना विनवितात (६।१५) की रघुनाथाच्या बुद्धीत अशी प्रेरणा द्या की ते वनांत जाणार नाहीत. दशरथांस धास्ती वाटत आहे की मी जरी आज्ञा न दिली तरी माझे वचन पूर्ण करण्यासाठी राम वनात जातील. कारण ते रघुनाथ आहेत.

**चौ. ७-८ (१) स्मरुनि महेशा प्रार्थिति -** ब्रह्मदेवाने बुद्धि दिली तरी तिचे कृतीत रूपांतर होण्यास अहंकाराचा आधार लागतो. अहंकाराची देवता शिव आहे. 'अहंकार शिव बुद्धि अज मन शशि चित्त महान' (६।१५ रा.) व शंकर महेश रघुकुळाचे व दशरथांचे इष्टदेव आहेत म्हणून त्यांना प्रार्थना करीत आहेत. **(क) आशुतोष -** आशु - शीघ्र, तोष होतो ज्यांना ते आशुतोष - शीघ्र प्रसन्न होणारे. **लहरी दाते -** लहर लागेल ते, पात्रापात्रादि विचार न करता

देणारे. आशुतोष व लहरी दान याचे एक सुंदर उदाहरण मानसात भुशुंडीच्या पूर्वजन्मचरित्रांत आहे. उत्तरकाण्ड दो. १०६ पासून १०९ पहा. **(ख) महेश** - तुमच्यापेक्षा मोठा ईश - सत्ताधारी - शासक कोणी नाही. कोणीही देव तुमच्या इच्छेविरुद्ध काही करू शकत नाही. म्हणून तुम्हाला प्रार्थना. **(ग) सदाशिव** - तुम्ही आपल्या दीन दासांचे सदाशिव म्हणजे कल्याणच करता म्हणून तुम्हांस सदाशिव म्हणतात. मीसुद्धा तुमचा एक **दीन** दास आहे. राम वनात गेले तर विविध विपत्ती कोसळतील. माझे व माझ्या प्रिय प्रजेचे अकल्याण होणार आहे. म्हणून सर्व **बिपदांनां** - विपत्तींना दूर करा. त्या दूर करणे सोपे आहे.

***हिं.दो.*** ***। तुम्ह प्रेरक सब के हृदयँ सो मति रामहि देहु ॥***
***॥ बचनु मोर तजि रहहिं घर परिहरि सीलु सनेहु ॥४४॥***

***म.दो.*** ***। प्रेरक तुम्हिं सर्वांतरीं द्या अशि मति रामास ॥***
***॥ त्यजुनि वचन मम राहि गृहिं त्यजि शीलस्नेहास ॥४४॥***

**अर्थ** : तुम्ही सर्वांच्या हृदयांत (अंतरीं, अंतरांत) प्रेरक आहात, तेव्हा रामाला अशी बुद्धि द्या की माझ्या वचनाचा त्याग करून आणि शीलावर जो स्नेह आहे त्याचा त्याग करून घरी राहील. ॥दो.४४॥

**टीका. दो. - दशरथ शिवोपासक** - येथे दशरथांनी शिवास - शंकरास हृदयप्रेरक म्हटले. हृदयप्रेरक = अन्तर्यामी, एकच असू शकतो. शिवोपासक त्यास शिव म्हणतात. रामोपासक रामाला हृदयप्रेरक, अंतर्यामी म्हणतात. 'प्रेरक हृदिं रघुवंशविभूषण' जो ज्या देवतेचा उपासक असेल तो त्या देवतेला हृदयप्रेरक मानतो. दशरथ येथे शिवाला हृदयप्रेरक मानतात. यावरून ते शिवोपासक आहेत हे ठरले. हे नाकारता येणार नाही. **'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति । भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया'** (भ.गी.) यालाच दशरथांनी येथे महेश, आशुतोष, सदाशिव म्हटले. शिवोपासक विप्राने 'प्रसीद प्रभो **सर्वभूताधिवासम्**' (७।१०८।८) असे मानसातच म्हटले आहे.

**(१) त्यजुनि वचन मम** - येथे वचन म्हणजे आज्ञा असा अर्थ करणे प्रकरणसंदर्भानुसार चुकीचे ठरेल. दशरथांनी अजून रामास वनवासाची आज्ञा दिली नाही व पुढे देणार नाहीत. येथे **'मम बचन'** = कैकयीला राजाने दिलेले

वचन. रामचंद्रांनी वनात न जाता घरी रहावे ही मुख्य इच्छा आहे. माझे वचन पूर्ण करणे आपले कर्तव्य आहे असे रामाने समजू नये. (क) त्यजि शीलस्नेहास - पित्याने कोणास दिलेले वचन पुत्राने पूर्ण न करण्याने पुत्राच्या शीलाला डाग लागतो. रामाचा आपल्या शीलावर फार स्नेह आहे; म्हणून पितृवचनपूर्ति केल्याशिवाय राहणार नाही अशी धास्ती दशरथांस वाटत आहे. म्हणून रामाने आपले शीलसंरक्षणाचे प्रेम बाजूस ठेवून घरी रहावे हा एक सरळ अर्थ आहे. (ख) माझ्या स्वतःच्या शीलाविषयी त्याला जो स्नेह वाटतो, वडिलांच्या शीलास डाग लागू न देणे हे पुत्राचे कर्तव्य आहे असे जे वाटते ते त्याने बाजूस ठेवावे. (ग) शील व स्नेहास असे सुटे शब्द घेतले म्हणजे अर्थ होतो की माझ्या स्नेहास = स्नेहासाठी त्याने आपल्या शीलाचा या बाबतीत त्याग करावा. थोडेसा डाग लागला तरी लावून घ्यावा. परंतु राम शीलाचे व स्नेहाचेही संरक्षण करणार असून तसेच करण्याची संधी पित्याला देणार आहेत. स्नेहाला वश होऊन अपयश पदरी घेणे बरे नाही अशी सूचना ते सर्वांनाच देतात हे पूर्वी (२४।४ गू.चं.) दाखविले आहे.

*हिं.* । *अजसु होउ जग सुजसु नसाऊ । नरक परौं बरु सुरपुरु जाऊ ॥१॥*
। *सब दुख दुसह सहावहु मोही । लोचन ओट रामु जनि होंही ॥२॥*
। *अस मन गुनइ राउ नहिं बोला । पीपर पात सरिस मनु डोला ॥३॥*

*म.* । *अपयश मिळो, सुयश जगिं जावो । मिळो नर्क वा स्वर्ग न पावो ॥१॥*
। *दुःसह दुःख सकल मज देणें । रामा नेत्रां आड न नेणें ॥२॥*
। *असें चिंति मनिं राव न बोले । पिप्पल-पत्रासम मन डोले ॥३॥*

**अर्थ** : जगात माझे अपयश, अकीर्ति होवो की सुयशाचा नाश होवो; नरकप्राप्ति होवो की स्वर्ग न मिळो (हातचा जावो) ॥१॥ (जगात असतील ती) सर्व दुःसह दुःखे (महेशा !) मला द्या (सोसण्यास लावा = सहावहु) पण रामाला माझ्या डोळ्यांआड नेऊ नका.॥२॥ अशा प्रकारचे चिंतन राजा मनात करीत आहे व काही बोलत नाही; पण त्याचे मन मात्र पिंपळाच्या पानासारखे फडफडत (डोलत) आहे.॥३॥

**टीका. - सूचना** - पहिल्या दोन चौपायांत सदाशिवालाच प्रार्थना करीत

आहेत हे 'सहावहु' = सोसण्यास लावा या शब्दाने सुचविले आहे. तिसरीत कवि सांगतात की हा केवळ नमुना दिला आहे. अशा प्रकारच्या प्रार्थना व अशा विचारांचे वादळच राजाच्या हृदयांत सुरू आहे.

**वि.ल.ठे.** - या दोनच चौपायांत दाखवितात की - रामदर्शनापुढे ऐहिक पारलौकिक सुख, कीर्ति-अकीर्ति, स्वर्ग नर्क यांची पर्वा रामप्रेमी जीव करीत नाही व रामदर्शन सुखासाठी जगातील कोणतीही व कितीही दुःखे सुखाने भोगण्यास सिद्ध असतो. हा उत्तम आदर्श येथे निर्माण केला आहे. **'देव जोडे तरि करावा अधर्म'** या संत वचनाचे सार सर्वस्व येथे भरून ठेवले आहे. हा सिद्धान्त साती काण्डांत कोणीतरी आचरणात आणलेला आहे. प्रस्तावनेत **'देवजोडे तरि करावा अधर्म' हे १२।८ प्रकरण पहावे.**

**चौ. १-२** - (१) पहिल्या चौपाईत **यथासंख्य अलंकाराने** कार्यकारण संबंध सुचवून **कर्मविपाकाचा एक सिद्धान्त सहज दाखविला आहे.** (क) जोपर्यंत मनुष्याची अपकीर्ति जगात राहते तोपर्यंत तो जीव नर्कात पडतो असा सर्वसाधारण कर्मविपाक सिद्धान्त आहे. याच्या उलट जोपर्यंत जगात कीर्ति राहते तोपर्यंत तो जीव स्वर्गात राहतो. प्रत्येक सिद्धान्तास अपवाद असतातच. 'सापअपवादा नियमाः' या सिद्धान्ताला दोनच अपवाद आहेत. **'ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते'** (भ.गी.) हा एक आणि **'सन्मुख होइ जीव मम (भगवंतास) जेहीं। जन्मकोटि अघ नासे तेहीं'** हा दुसरा. **(ख) अपयश मिळो - 'अपयश लाभ कि जेथे पाप न'** पापाने अपयश मिळते व **'पुण्याविण किं मिळे यश पावन'** (७।११२।७) पुण्याने सुयश मिळते. (ग) वचन देऊन ते मोडणे, तसे न करणे, याने सुयशाचा नाश आहे. सत्याचा लोप करून असत्याचा आश्रय करण्याने पापाचा पर्वतच तयार होतो. **'न हि असत्यसम पातकपुंजा'** रामाला वनवासास न पाठविता घरी राहण्यास परवानगी देण्याने दशरथांच्या वाट्यास या दोन्ही गोष्टी येतात म्हणून ते म्हणतात नर्कात पडलो किंवा स्वर्ग न मिळाला तरी चालेल पण रामदर्शन लाभ हातचा जाऊ नये. **(घ) राम परमात्मा आहेत हे दशरथ विसरले आहेत; तथापि** जाणता किंवा न जाणता ज्याचे सगुणावर इतके प्रेम असेल त्याला भगवद्भक्तीचे फळ

मिळाल्याशिवाय रहात नाही. परिसावर जाणून किंवा न जाणता लोखंड ठेवले तरी फल सोने मिळणारच.

(२) स्वर्गनाश किंवा नर्कपतन ही फळे मेल्यावर मिळावयाची असतात; पण पापाचे फळ दुःख येथेही भोगावे लागतेच म्हणून दुसऱ्या चौपाईत सांगतात की जितकी दुःसह दुःखे जगात असतील तितक्या सर्व दुःखांत मला हवा तर लोटा-टाका; पण रामाला दृष्टीआड करू नका; घरांत राहू द्या. **'हेंचि दान दे गा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ गुणगाईन आवडीं । हेचि माझी सर्व जोडी ॥ नलगे मुक्ति धनसंपदा । संतसंग दे गा सदा ॥'** एवढे सर्व मिळाल्यावर **'तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी ॥'** हे तुकोबांचे जसे म्हणणे तसेच दशरथांचे वरील म्हणणे आहे !

**(चौ. ३)** I कवि सांगतात की दशरथांनी या प्रमाणे महेशांस विनवणी केली व असे विचार त्यांच्या मनात नाना प्रकारे घोळत आहेत; एवढेच नव्हे तर रामस्नेह व रघुवंशी सुप्रसिद्ध राजाचे कर्तव्य या दोन विरुद्ध दिशांनी वहात येणाऱ्या विचाररूपी सोसाट्याच्या वाऱ्यात त्यांचे मन सापडले आहे व एक निमिषार्ध ही शान्ती, स्थिरता नाही. फडफडणाऱ्या पिंपळाच्या पानाचा सर्वांचा परिचयाचा अगदी साधा दृष्टान्त दिला. ते वाऱ्याने फडफडते सर्वांस माहीत आहे. मनाचा सारखा फडफडाट तडफडाट चालला आहे. **दशरथ = अश्वत्थ,** पिंपळ, **मन = त्यांचे पान,** पत्र.

**II हा दृष्टान्त किती व्यापक आहे पहा : पिंपळाच्या पानाचा दृष्टान्त** - (१) **अश्वत्थः सर्व वृक्षाणाम्'** (भ.गी.) दशरथ राजा साधा भूपति नसून **'नराणांच नराधिपः'** फार थोर भगवंताची विभूती आहे. अश्वत्थ विभूति व 'नराधिपः' सुद्धा विभूती. (२) अश्वत्थांत ब्रह्मा, विष्णु, शिव या त्रिदेवांचा निवास आहे. राजाने ब्रह्मदेवाला व शिवाला प्रार्थना केली व रामाचे चिंतन सतत चालू आहे. (३) **अश्वत्थ शब्द** सांगतो की आज आहे उद्या नाही असे दशरथाचे जीवित झाले आहे. मरण जवळ आले आहे. (४) पिंपळाचे - अश्वत्थाचे पान गुळगुळीत, पवित्र, मृदु पण चिवट असते. वाऱ्याने लवकर फाटत नाही की पक्व झाल्याशिवाय गळून पडत नाही आणि वाऱ्याचा मारा मात्र सहन करावा

लागतो. तसेच दशरथांचे मन आहे व चिंतेचा मारा सहन करावा लागत आहे. (५) अश्वत्थ उंच, भव्य, पूज्य असतो; टिटाळींचे कोवळे पान जणू आकाशाला भिडलेले असते. तसे हे मन उच्च मनोरथांच्या शिखरावर चढत आहे. (६) जुनाट, म्हातारा झालेला अश्वत्थ जसा बाहेरून कणखर दिसत असला तरी आतून पोकळ झालेला असतो व झंझावाताच्या तडाक्याने उन्मळून, मोडून पडतो तसेच राजाचे होणार आहे.

III ही तुलना अश्वत्थ शाखांसारखीच आणखी विस्तारता येईल; पण टीकेतील विस्ताराला काही मर्यादा पाहिजेच; व वाचकांच्या बुद्धीस विस्तृत होण्यास वावही पाहिजेच.

हिं. *। रघुपति पितहि प्रेम बस जानी । पुनि कछु कहिहि मातु अनुमानी ॥४॥*
*। देस काल अवसर अनुसारी । बोले बचन बिनीत बिचारी ॥५॥*
*। तात कहउँ कछु करउँ ढिठाई । अनुचित छमब जानि लरिकाई ॥६॥*

म. *। रघुपति पित्या प्रेमवश पाहुनि । माता पुनरपि वदेल जाणुनि ॥४॥*
*। देश काळ अवसर अनुसारें । वदले वचन विनीत विचारें ॥५॥*
*। वदतो कांहीं करुनि धृष्टता । गणुनि बालपण क्षमणें ताता ! ॥६॥*

**अर्थ :** वडील प्रेमवश झाले आहेत असे पाहून (जाणून) व माता (पुन्हा) काही बोलेल हे जाणून (अनुमान करून) ॥४॥ रघुपति देश, काळ, वेळ यांना अनुसरून विचारपूर्वक व विशेष नम्रतेने म्हणाले की - ॥५॥ ताता ! मी धीटपणा करून काही बोलतो, पण माझे बालपण लक्षात घेऊन आपण (मला) क्षमा करावी.॥६॥

**टीका. - चौ. ४-५** (१) रघुनाथाने नमस्कार केल्यावर व राजाच्या बाहूंतून सुटल्यावर ते हात जोडून उभे राहिले. काही काळ असाच गेला तरी राजाने आशिर्वाद दिला नाही, की कुशल विचारले नाही की बस म्हणून खुणेनेसुद्धा सांगितले नाही. यावरून व मुखचर्येवरून जाणले की प्रेमाला वश होऊन शोकाकुल झाल्याने त्यांना बोलवत नाही. (क) न विचारता बोलणे यात धृष्टता-उद्धटपणा दिसतो. काही न बोलता स्वस्थ रहावे तर 'राम जवळ उभा असून इतका वेळ झाला तरी राजा काही बोलत नाही; वनात जा असे रामाला

सांगत नाही.' असे वाटून कैकयी काहीतरी मर्मी बोलून दशरथांस-पित्याला दुःख देईल असे अनुमानाने वाटले-जाणले. पित्याचा मातेने केलेला अपमान ऐकण्याची वेळ येईल असा बिकट काळ आला आहे. अशा ठिकाणी आहेत की ही कोंडी योग्य वेळी युक्तीने फोडणारी कोणी व्यक्ती वसिष्ठ वामदेवांसारखी येथे नाही. त्यांना बोलावून आणण्यास धाडावे तर सुमंत्र पित्यासमान असल्याने त्यांस सांगता येत नाही. दुसरे कोणी नाही व आता ते करण्यास **अवसर-वेळ ही नाही.** अशी ही देशकाल अवसर परिस्थिती निर्माण झाली आहे; म्हणून बोलणे भाग आहे.

**चौ. ५-६ (१) लक्ष्मणापुढे अशी परिस्थिती, पेचप्रसंग नव्हता;** 'ज्येष्ठो भ्राता पितुः सम' या भावनेने बोलणार नसून 'स्वामी ज्येष्ठ बंधु लघुसेवक' या सेवकभावाने बोलवयाचे असता प्रभु रघुवीरास काही सांगण्यापूर्वी लक्ष्मण उपक्रम करतात तो येथे तुलनेसाठी पाहण्यासारखा आहे - **'स्वामि ! कहिं बदतो, ना पुसतां । समयीं धीट, न दासधृष्टता'** (२।२२७।७) स्वामी ! आपण न विचारतांच मी बोलतो पण प्रसंगी - योग्य समयी सेवकाने धीट बनणे ही धृष्टता - उद्धटपणा नाही. योग्य वेळ त्यांनीच ठरविली. पुढील सिद्धान्त त्यांनीच ठरविला ! क्षमा याचना नाही, बालपणादि उल्लेख नाही. बोलत आहेत स्वामींजवळ; राम बोलणार आहेत वृद्ध पित्याजवळ ! त्यांच्या शब्दांत किती नम्रता ! इतके अज्ञान पांघरले की लाडिवाळपणाने, बालक बनूनसुद्धा, क्षमायाचना करीत आहेत. राम शुद्ध, सत्वगुणी व लक्ष्मण जीव, विश्व, रजोगुणयुक्त सत्वप्रधान व स्वामींच्या भावी अपमानाच्या काल्पनिक भीतीने तमोगुणांत शिरू पाहणारा ! इतका भेद स्वभावात असल्याने भाषेत भेद ! एक मधुर (रामाची) तर एक ओजस्वी, एक पितृभक्तिरसार्द्र तर एक वीर रसाने खडबडीत ! ओजस्वी. (क) ही सगळी परिस्थिती पाहून कैकयीची छाती धडधडू लागली असेल. पण ती पक्की खंबीर व धूर्त आहे. तिला लवकरच आनंद होईल, आता राम म्हणतात :

***हिं. । अति लघु बात लागि दुख पावा । काहु न मोहि कहि प्रथम जनावा ॥७॥***
***। देखि गोसाइँहि पूँछिउँ माता । सुनि प्रसंगु भए सीतल गाता ॥८॥***

म. । अति लघु कार्जी दुःखी बनलां । प्रथमच कां न कळविलें मजला ॥७॥
। दशा बघुनि पुसलें मातेतें । तनु शीतल परिसुनि वार्तेतें ॥८॥

**अर्थ :** आपण अगदी क्षुद्र कार्यात दुःखी झालात. मला आधीच का कळविले नाही? आपली दशा पाहून मी मातेला विचारले व सर्व हकीगत ऐकून शरीर शीतल झाले.॥८॥

**टीका. चौ. ७ - (१) अति लघु काज** - चौदा वर्षाच्या मुनिवेषादि व्रताने वनवासास राम अति लघु कार्य म्हणतात. त्यांच्या दृष्टीने वनवास दुःखाचे कारण नाही; पण दशरथांस वाटत आहे की पुत्राला वनात अत्यंत असह्य कष्ट होतील म्हणून त्यास कसे सांगावे. याहीपेक्षा ते पुत्रवियोगाला जास्त भीत आहेत. राम म्हणतात की वनवास म्हणजे काही मोठे संकट नाही, दुःख नाही. त्याबद्दल आपल्याला एवढे दुःख होण्याचे कारणच नाही. मातेला वचन दिल्याबरोबरच मला कळविले असते तर फारच चांगले झाले असते. कोणाच्याही बरोबर निरोप धाडला असता मला, तरी सुद्धा मी मान्य केले असते. अगदी साधी सोपी गोष्ट व त्यामुळे आपणास एवढे दुःख ! आता बहुधा कैकयीला वाटले असेल की राम माझ्याजवळ म्हणाले ते खरेच म्हणाले.

**चौ. ८ (१) दशा बघुनि** - आपली अत्यंत व्याकुळ दशा पाहून मला फार वाईट वाटले. मी पुत्र जिवंत असता पित्याला असह्य दुःख झालेले पाहून माझ्या देहाची आग होऊ लागली. तेव्हा मीच मातेला कारण विचारले. भाव हा की तिने होऊन 'वनात जा' असे मला सांगितले नाही. मी कारण विचारले म्हणून मातेने घडलेले सर्व थोडक्यात सांगितले. त्यात तिचा काही दोष नाही. हकीगत समजली तेव्हा माझ्या अंगाचा दाह शांत झाला. कारण की पित्याला धर्मसंकटातून सोडविणे सोपे आहे व ते केले म्हणजे दुःख दूर होईल अशी खात्री झाली.

हिं.दो. । मंगल समय सनेह बस सोच परिहरिअ तात ॥
॥ आयसु देइअ हरषि हियँ कहि पुलके प्रभु गात ॥४५॥

म.दो. । मंगल-समयीं स्नेहवश शोक नसावा तात ॥
॥ आज्ञा यावी मुदित मज, प्रभु पुलकित होतात ॥४५॥

अर्थ : बाबा ! (तात) मंगलकारक प्रसंगी स्नेहाला वश होऊन शोक करू नये. मला आनंदाने (हर्षाने) आज्ञा द्यावी; (असे म्हणून) प्रभु रोमांचित झाले.।।दो.४५।।

**टीका दो.** - (१) **मंगल समय** - पित्याचे वचन पाळणे, मातेला संतुष्ट करणे व भरतासारख्या भावाला राज्य मिळणे या तिन्ही गोष्टी मंगलकारक असून त्या एकाच वेळी करण्याचा सुयोग मला मिळाला त्या अर्थी हा समय, ही वेळ, मंगलकारक आहे. (क) आपले वचन कृतीत उतरणार व विमल कीर्ती होणार म्हणून आपणांसही ही वेळ मंगलकारक आहे. भरताचे मंगल करणारी गोष्ट घडणार म्हणून मातेलाही हा समय मंगलकारकच आहे. अशा अति मंगल समयी शोक नसावा. 'मंगल म्हणुनि नयनजल रोखिति (७।७।३) मंगल कार्यात शोक किंवा शोकाचे चिन्ह सुद्धा प्रगट होऊ नये. प्रेमाश्रु-आनंदाश्रु आले तरी अमंगलच गणले जातात.

(२) **प्रभु पुलकित होतात** - येथे प्रभु शब्दाने सुचविले की अशा दुर्धर प्रसंगी इतकी सरळ भाषा, इतके सापत्न मातेवर प्रेम, पितृवचन पालनात इतकी दक्षता, साम्राज्यासारख्या ऐश्वर्याची हानी होत असता हृदयातच नव्हे तर शरीरात सुद्धा हर्ष (रोमांच येणे) प्रगट होणे इत्यादी गोष्टी १७ वर्षाच्या वयात करणे मानवाला शक्य नाही. राम प्रभु आहेत म्हणून त्यांना हे सर्व सहज करता आले. येथे पुन्हा आधिदैविक दृश्य दाखविले. (क) **ऐश्वर्य भावाने 'मंगलसमय' या अर्थ** होतो की जगाचे अमंगल करणाऱ्या खरदूषणरावणादि राक्षसांचा वध करून जगाचे मंगल करणाऱ्या कार्याचा हा प्रारंभ आहे. त्यासाठी हे प्रयाण आहे; म्हणून रघुवीराचा हर्ष हृदयात मावेनासा होऊन तो रोमांच रूपाने शरीरावर प्रगट झाला. **'मंगलभवन अमंगलहारी'** आहेत राम **'दशरथ अजिर बिहारी'** पुत्रधर्माचे महत्त्व थोडे वर्णन करून आज्ञा मागतील.

***हिं.*** *। धन्य जनमु जगतीतल तासू । पितहि प्रमोदु चरित सुनि जासू ॥१॥*

*। चारि पदारथ करतल ताकें । प्रिय पितु मातु प्रान सम जाकें ॥२॥*

*। आयसु पालि जनम फलु पाई । ऐहउँ बेगिहिं होउ रजाई ॥३॥*

म. ***। धन्य जन्म जगतीतळिं त्याचें । प्रमुदित पिता चरित्रें ज्याचे ॥१॥***
***। करतळिं चारी पदार्थ त्यातें । प्राणप्रिय तातांबा ज्यातें ॥२॥***
***। जन्म-सफलता आज्ञा-पालन - । करुनी येइन या अनुशासन ॥३॥***

**अर्थ :** ज्याच्या चरित्राने (ते श्रवण करून) पित्याला विशेष आनंद त्याचा (पुत्राचा) जन्म या जगतीतळावर धन्य होय.॥१॥ ज्याला पिता व माता प्राणप्रिय वाटतात त्याच्या मुठीत (तळहातावर) चारी पुरुषार्थ (पदार्थ) आले (असे समजावे) ॥२॥ (आपल्या) आज्ञेचे पालन करून जन्माची सफलता करून मी (लवकर) येईन, तरी आज्ञा द्यावी.॥३॥

**टीका. - चौ. १ - (१) प्रमुदित पिता चरित्रें ज्याचे** - आपली आज्ञा-वचन-पालन करण्यात मला हर्ष होत आहे हे ऐकून व पाहून जर आपणास विशेष आनंद (प्रमोद) झाला तर माझा जन्म धन्य होणार आहे. त्यामुळे तुम्हाला जर खेद झाला तर माझ्यासारखा अभागी कोणी नाही. सार हे की आपण खेद न करता अत्यंत हर्ष मानण्यासारखी ही गोष्ट आहे. **'राम रूप गुण शिला स्वभावा । बघुनि परिसुनी प्रमोद रावा'** (२।१।८) असे या पूर्वीच घडत होते. या पूर्वी जसा हर्ष होत असे तसा आताही होणे जरूर आहे. ही चौपाई सुभाषितरूप आहेच. **(क) ज्याच्या कृतीने पित्याला दुःख विषाद होईल तो पुत्र अभागी हे ही ठरलेच.** ('जन्म' संस्कृतात नपुंसक लिंगी आहे).

**चौ. २ - (१) करतळिं चारी पदार्थ** - अर्थ, धर्म, काम व मोक्ष हे चारी पुरुषार्थ एकाच वेळी प्राप्त होणे जवळ जवळ अशक्य आहे, असे असून अनन्य भावाने पितृभक्ती व मातृभक्ती केल्याने ते सहज प्राप्त होतात; अगदी मुठीत सापडतात. तळहातावर ठेवल्यासारखे लाभतात. **(क) प्राणप्रिय तातांबा** - **तात** = जनक, पिता, अंबा - माता, जननी. **'तनुप्राणसें प्रिय ना काहीं'** स्वतःच्या प्राणांवर, जिवावर प्रत्येकाची परम प्रीती असते. तितकी व तशीच प्रीती करणे म्हणजे प्राणप्रिय वाटणे. म्हणजेच भक्ती करणे. पित्यावर तशी प्रीती असेल तर ती पितृभक्ती, मातेवर असेल तर मातृभक्ती, रामावर असेल तर रामभक्ती ठरेल. **अत्यंत प्रीति म्हणजेच भक्ती. 'प्रीति विना नहिं भक्ति सुदृढता'.**

**चौ.३ - (१) जन्म-सफलता आज्ञापालन करुनी - पित्राज्ञा पालन करणाऱ्या पुत्राचा जन्म सफल होतो हे** येथे दाखविले. भाव हा की या आज्ञेच्या पालनाने माझा जन्म सफल होणार आहे; म्हणून आज्ञा देण्यास संकोच करण्याचे कारण नाही. **(क) येइन** - मी काही जन्मभर नाही राहणार वनात. परत येईनच येईन. आपण त्या विषयी काळजी करू नये. 'वेळ न लागे दिवसां जाया' (६२।२).

**वि.ल.ठे. - येऊन भेटेन** असे न म्हणता **'येईन'** इतकेच दशरथांस **म्हणाले;** पण **'येइन तव पददर्शना'** (५३।.) असे कौसल्या मातेला म्हणाले. आपण येईपर्यंत हे जगणार नाहीत असे पक्के माहीत असल्याने 'येऊन भेटेन' असे म्हणाले नाहीत. तसे म्हटले असते तर तापसाचा शाप खोटा ठरला असता; किंवा रामवचन खोटे ठरले असते; पण दोन्ही गोष्टी खोट्या ठरणाऱ्या नसल्याने कवींनी 'येऊन भेटेन' हे शब्द येथे राममुखात घातले नाहीत. तसेच **'चितां सकल चाल किं भेटावा'** (५७।३) या कौसल्येच्या विनंतीचे रघुनाथाने काहीच उत्तर दिले नाही ते याच हेतूने. **किती सावधानता बाळगून समन्वय साधला आहे !**

*हिं. । बिदा मातु सन आवउँ मागी । चलिहउँ बनहि बहुरि पग लागी ॥४॥*
*। अस कहि राम गवनु तब कीन्हा । भूप सोक बस उतरु न दीन्हा ॥५॥*

*म. । येतो मी माताज्ञा मागुनि । मग जाईन वना पदिं वंदुनि ॥४॥*
*। राम वदुनि असं करिती गमना । देति शोकवश उत्तर नृप ना ॥५॥*

**अर्थ :** मी आईकडे जाऊन निरोप घेऊन येतो व मग आपल्या चरणांना वंदन करून वनात जाईन (जाण्यास निघेन). ॥४॥ असे सांगून रामचंद्रांनी गमन केले (पण) शोकाकुल झाल्यामुळे नृपति काही उत्तर देऊ शकले नाहीत.॥५॥

**टीका. चौ. ४-५-(१)** आज्ञा घावी अशी विनंती केल्यावर सुद्धा वडील काहीच बोलत नाहीत असे पाहिले तेव्हा राम म्हणाले की, आपण माझे जनक, पिता असल्याने तशी आज्ञा देणे जर आपणांस जड जात असेल तर आईला किती जड जाईल याचा विचार करावा. मी आईची आज्ञा-निरोप-घेऊन येतो. मग तर मला निरोप देणे आपणास जड वाटणार नाही ना? **(क)** मातेने आज्ञा

दिली की तुम्हाला सहज देता यावी. मी येतोच आता; मग आपल्या पायांना वंदन करीन, निरोप घेईन व लगेच वनात जाण्यास निघेन. **पुन्हा येऊन मग जाईन असे म्हणण्यात हेतु : I** दशरथ बोलू शकत नसता राम वनात गेले असते तर राजाला अधिक दुःख झाले असते की, 'वनात जाण्यास निघाले असता प्रेमाचे चार शब्द बोलून एकदा शेवटी हृदयाशी सुद्धा धरता आले नाही !' या दुःख शोकाने गमनाच्या आधीच मृत्यू आला तर काय करावे? अशा विचाराने पुन्हा दर्शनाची आशा निर्माण करून ठेवणे जरूर वाटले. जर कदाचित मातेने आज्ञा दिली नाही व घरी रहा म्हणून सांगितले तर 'वनांत जातो' हे म्हणणे खोटे ठरण्याची शक्यता व्यावहारिक दृष्टीने होती. असत्यवादीपणा आपल्याकडे येऊ नये म्हणून काळजी घेणे जरूर होतेच; म्हणून म्हणाले की मातेची आज्ञा घेऊन येतो व मग वनांत जाईन. (क) हे ऐकून कैकयीच्या छातीत धडकीच भरली असेल व तिने काय काय कल्पना केल्या असतील त्या वाचक सहज जाणू शकतील म्हणून विस्तार नको.

(२) सूर्योदयाबरोबर रामराज्याभिषेकाच्या कार्यास आरंभ व्हावयाचा होता. सूर्योदयापूर्वीच राजद्वाराशी दाटी झाली होती. सूर्योदय झाल्यानंतर सुमंत्र राजाकडे गेले; नंतर रघुकुल दीपाकडे जाऊन त्यांस राजाकडे घेऊन गेले. नंतर मागे वर्णिलेले संवाद झाले, या काळात राजद्वाराजवळ किती दाटी झाली असेल ! लोकांच्या मनात काय काय भयानक कल्पना येऊन गेल्या असतील? लोक किती चिंतातूर झाले असतील याची कल्पना आपणास कशी येणार !

***येथे रामराज्यरस-भंग प्रकरण पूर्ण झाले.***

पुरवासी जन-विरह-विषाद हे प्रकरण आता सुरू होते. यात पुरजन विषाद, कौसल्याराम संवाद व रामसीता संवाद ही तीन प्रकरणे आहेत.

